# ऋग्वेद-दर्शन



असावादित्यो ब्रह्म

रा. गो. कोलंगडे
ग्रंथकर्ता

मुंबई विश्वविद्यालयाच्या उदार आश्रयाखालीं
योगीश्वर प्रकाशन, पुष्प ६ वें

# ऋग्वेद-दर्शन

( ऋग्वेदांतरंग समालोचन )



## रामचंद्र गोविंद कोलंगडे

योगीश्वर याज्ञवल्क्य, यजुर्मणिमाला, याज्ञवल्क्य-दर्शन,
भगवान गौतम बुद्ध, ऋग्रत्न भांडार इत्यादि
ग्रंथांचे कर्ते

---

यथेमां वाचं कल्याणीमावदानि जनेभ्यः ।
ब्रह्मराजन्याभ्यां शूद्राय चार्याय च ।
स्वाय चारणाय च । प्रियो देवानां
दक्षिणायै दातुरिह भूयासम् ।
( शुक्ल यजुर्वेद २६-२ )



शीव ( मुंबई २२ ) | १९५४ | किम्मत १० रुपये

# प्रस्तावना

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतीयांची आत्मावमानशीलता स्वाभाविकपणेंच कमी होऊन, वृत्ति अन्तर्मुख झालेली आहे. अशा वेळीं आपल्या प्राचीन वाङ्मयांतील श्रेष्ठ विचारांचा व उच्च ज्ञानाचा सुलभ परिचय करून देणारे ग्रन्थ जितके अधिक निर्माण होतील तितके चांगले. भारतीय देशी भाषांची जननी अथवा मातामही जी संस्कृत भाषा, तिच्यांतील ग्रन्थ-संपत्ति अमोप व अमाप आहे. आणि प्रत्येक भारतीयाला त्या भाषेंतील व्यावहारिक किंवा पारमार्थिक ज्ञानानें परिपूर्ण असलेल्या भारत-रामायण, पंचतंत्र-हितोपदेश वगैरे ग्रंथांचें मुळांतच परिशीलन करण्याइतकें, तसेंच कविश्रेष्ठ कालिदासादिकांच्या काव्यनाटकादि कलाकृतींचें प्रत्यक्ष रसास्वादन करण्याइतकें संस्कृत भाषेचें ज्ञान अत्यंत अवश्य आहे, हेंहि खरें आहे. तथापि या गोष्टीची जाणीव मध्य सरकार, राज्य सरकारें व विश्वविद्यालयें यांतील अधिकाऱ्यांना होऊन ही अत्यंत इष्ट गोष्ट प्रत्यक्ष कृतींत उतरेपर्यंत अर्थातच बराच काळ लोटणार. शिवाय संस्कृत वाङ्मयांतील अधिक प्रौढ भाषेंत लिहिलेले ग्रन्थ, त्याचप्रमाणें छांदस संस्कृत भाषेंतील सर्व वैदिक वाङ्मय हें सर्व संस्कृत भाषेचें सामान्य ज्ञान असणारांसहि दुर्गमच राहणार. यासाठीं अशा सामान्यतः अगम्य असणाऱ्या ग्रंथांतील विचाररत्नें देशीभाषांत उतरवून आबाल-वृद्धांना उपलब्ध करून देणें हें तज्ज्ञ विद्वानांचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य निरलसपणानें व निरपेक्ष बुद्धीनें करणाऱ्या चतुरस्र विद्वानांपैकीं श्रीयुत कोलंगडे वकील हे एक आहेत, अशी खात्री त्यांनीं मराठी भाषेंत आतांपर्यंत प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांकडे पाहिलें असतां सहजच पटेल, यांत शंका नाहीं.

श्रीयुत कोलंगडे यांची वैदिक वाङ्मयाच्या चिकित्सायुक्त अध्ययनाकडे विशेष प्रवृत्ति असल्यामुळें त्यांनीं आतांपर्यंत यजुर्वेदीय वाङ्मयविषयक तीन ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्यांतील एकांत ( यजुर्मणिमाला ) यजुर्वेदांतील उक्तींचा सार्थ संग्रह केला आहे, तर दुसऱ्यांत शतपथ ब्राह्मणांतील

तत्त्वज्ञानाचें दिग्दर्शन मूल वाक्यांच्या आधारानेंच मराठी भाषेंत केलें आहे. तिसऱ्या ग्रंथांत यजुर्वेद कालांतील अत्यंत श्रेष्ठ प्रतीचा तत्त्ववेत्ता व व्यवहारकुशल पंडित जो योगीश्वर याज्ञवल्क्य त्याच्या चरित्राचा परामर्श यजुर्वाङ्मयाच्या आधारानें त्यांनीं घेतला आहे. याशिवाय यजुर्मणिमाला या ग्रंथाच्या धर्तीवर 'ऋग्रत्न-भांडार' नांवाचा ग्रंथही रचून प्रसिद्ध केला आहे. यांत ऋग्वेदांतील सुभाषितांचा व प्रमुख वचनांचा सार्थ संग्रह केलेला आहे. आतां प्रस्तुत म्हणजे ऋग्वेददर्शन या ग्रंथांत ऋग्वेदांतील सर्वच विषय सोप्या, मनोहर व उद्बोधक भाषेंत हाताळला आहे. हें सर्वच विवेचन फार स्फूर्तिदायक उतरलें आहे, यांत मला तरी शंका वाटत नाहीं.

ऋग्वेदसूक्तांचा अर्थ लावण्याच्या बाबतींत फार प्राचीन कालापासून मौलिक मतभेद अस्तित्वांत आहेत. तीं सूक्तें मंत्ररूप असल्यामुळें त्यांच्या उच्चारणांतच सामर्थ्य आहे, त्यांच्या अर्थज्ञानाचा प्रयत्न करणें अयोग्य, अस्थानीं व निरुपयोगी आहे, अशी विचारसरणी फार प्राचीन कालापासून तों आतांपर्यंत निरनिराळ्या स्वरूपांत प्रचलित आहे. या सूक्तांचा भाषाशास्त्र व मीमांसाशास्त्र यांच्या मदतीनें लावण्यांत येणारा अर्थ हा अत्यंत भ्रामक आहे, त्यावरून त्या सूक्तांतील गहन व सर्वंकष कल्पनांचा कांहींच बोध होण्यासारखा नाहीं, असेंहि मानणारा तज्ज्ञांचा अगर श्रद्धाळू पंडितांचा एक वर्ग अजूनसुद्धां अस्तित्वांत आहे. तथापि हा सर्व विवाद्य विषय बाजूला ठेवून बहुशः दुसऱ्या पक्षांच्या निंदेवरच आपल्या पक्षाची उभारणी करण्याच्या भरीस न पडतां, परंपरा, संदर्भ व तर्क यांच्या मदतीनें या सूक्तांचा अर्थ लावून त्यांतील सर्व प्रतिपाद्य विषयांची साधार व संगतवार माहिती श्री. कोलंगडे यांनीं प्रस्तुत ग्रंथांत दिली आहे, हें निःसंशय कौतुकास्पद व स्तुत्य आहे. आपल्या या ऋग्वेद-दर्शनाच्या पहिल्या २७ पृष्ठांच्या पूर्वपीठिकेंत त्यांनीं या संबंधांतील आपले विचार व कार्यपद्धति स्पष्ट रीतीनें मांडलेलीं आहेत. शिवाय कांहीं थोड्या सूक्तांच्या अर्थासंबंधीं वैदिक विद्वानांत मतभेद असले तरीही एकंदरींत ऋग्वेदांतील सूक्तांच्या बाबतींत फारसें दुमत होण्याचा संभव नाहीं हें खास.

तसेंच या ग्रंथाचा उद्देश ऋग्वेदसूक्तांच्या अर्थावर अधिक प्रकाश पाडण्याचा प्रयत्न करणें हा नसून, प्रकाशित असलेल्या अर्थाचें अवगाहन करून, सत्याचा अपलाप न करतां, त्यांतील विषयांचें पद्धतशीर संकलन करणें व या आपल्या अत्यंत प्राचीन वाङ्मयाबद्दल आदर, कुतूहल, जिज्ञासा व प्रत्यक्ष परिचयाबद्दलची तीव्र इच्छा जागृत करणें हाच आहे, हेंहि लक्षांत ठेवणें अवश्य आहे. या कामासाठीं लागणारी चिकित्सक बुद्धि, निःपक्षपातपणें विचार करण्याची प्रवृत्ति व साधी उत्स्फूर्त लेखन-शैली श्री. कोलंगडे यांच्या लिखाणांत आहे, हें प्रौढ वाचकांस दुसऱ्या कोणी समजावून देण्याचें कारण नाहीं.

या पुस्तकांत १८ प्रकरणें आहेत. त्यांत ऋग्वेदाच्या बहिरंगाचें व अंतरंगाचें समालोचन, दासदस्यू वगैरे आर्यांच्या शत्रूंची सूक्तांतून उप-लब्ध होणारी माहिती, मंत्रद्रष्ट्या ऋषींचा ऋक्सूक्तांतून बृहद्देवता वगैरे ग्रंथाच्या साहाय्यानें मिळणारा स्वल्प इतिहास, वैदिक राजांचा परस्पर संघर्ष, दानशूरता, आस्तिक्य बुद्धि व मंत्रद्रष्ट्या ऋषींबद्दलचा आदरभाव वगैरेंचें थोडक्यांत वर्णन, ख्यातनाम वैदिक स्त्रियांबद्दलच्या उद्बोधक उल्लेखांचें संकलन इत्यादि विषय आले असून, शिवाय वैदिक आर्यांचें ऐहिक जीवन, त्यांच्या आयुष्क्रमांतील यज्ञसंस्थेचें स्थान, त्यांच्या नीति-मत्तेच्या कल्पना, त्यांची सामाजिक घडण, त्यांचें राजकारण, त्यांचे संस्कार, त्यांची मरणोत्तर जीवनाबद्दलची विचारसरणी व त्यांचें थोर तत्त्वज्ञान या गोष्टींचा सुरस ऊहापोह केलेला आहे. शेवटीं प्रकरण १७ यांतहि ऋग्वेदांत उल्लेखिलेले नद्या-पर्वत, आर्यांच्या जमाती, हवनद्रव्यें, यज्ञोपकरणें, खाद्यपेयें, उद्योगधंदे, हिंस्र व माणसाळलेले पशुपक्षी, वनस्पती वगैरे सर्व बारीकसारीक गोष्टी यांच्याबद्दलची मिळणें शक्य असलेली सर्व माहिती ठिकठिकाणीं अवश्य ते उतारे व त्यांचा अर्थ देऊन एकत्रित केलेली आहे. या शिवाय दोन परिशिष्टें जोडलेलीं असून पहिल्या परिशिष्टांत ऋग्वेदांतील सार्थ उद्बोधक वचनसंग्रह ग्रथित केला आहे व दुसऱ्या परिशिष्टांत ऋग्वेद, शुक्लयजुर्वेद व कृष्णयजुर्वेद यांतील मंत्रांचें

तुलनात्मक कोष्टक जोडण्यांत आलें आहे. असा हा सुंदर व उद्‌बोधक ग्रंथ प्रत्यक्ष वाचूनच पाहावा अशी माझी वाचकांस जोरदार शिफारस आहे.

हा ग्रंथ लिहून आपल्या वैदिक वाङ्मयाबद्दल डोळस निष्ठा व चिकित्सक जिज्ञासा मराठी वाचकांत निर्माण करण्याचा स्तुत्य प्रयत्न केल्याबद्दल श्री. कोलंगडे हे निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

शास्त्री हॉल, मुंबई ७
१२-५-५४

ह. दा. वेलणकर

## श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य

( डॉ. कुर्तकोटी )

पंचवटी, नाशिक. ८-५-१९५४

यांचा आशीर्वाद

' वेद हे भारतीय संस्कृतीचे प्राणभूत ग्रंथ आहेत. परंतु आज भाषेच्या अडचणीमुळें वेदांविषयीं समाजांत अज्ञानच पसरलेलें दिसतें. श्रीयुत कोलंगडे ह्यांनीं ' ऋग्वेद-दर्शन ' हें पुस्तक लिहून ह्या क्षेत्रांत अभिनंदनीय कामगिरी केली आहे. सामान्य जनांस ऋग्वेदाच्या अंतरंगाची व बहिरंगाची माहिती ह्या पुस्तकद्वारें चांगली मिळू शकेल. पुस्तक लिहितांना सर्वानुक्रमणी, बृहद्देवता, निरुक्त आणि सायणभाष्य ह्या साधनांचा लेखकानें योग्य तो उपयोग करून घेतला आहे. पाश्चात्य विद्वानांविषयीं मात्र लेखकाच्या मनांत उपेक्षा बुद्धीच दिसते. ऋग्वेदासारख्या मोठ्या ग्रंथाचें दर्शन इतक्या लहान पुस्तकांत घडविणें पूर्णपणें विमर्शात्मक ह ोणार नाहीं, हें सांगावयास नकोच. तरी पण सामान्य लोकांस ऋग्वेदाची माहिती थोडक्यांत देण्यासाठीं लिहिलेला हा ग्रंथ अभिनंदनास्पद आहे.

पु. ल. पंचाक्षरी

कार्यवाह, श्री जगद्गुरु शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी

( श्रींचा अभिप्राय त्यांचे कार्यवाह यांनीं लिहून आम्हांस पाठविलेल्या पत्राचा उतारा. )

---

Bihar Governor's Camp,
Patna, March 31, 1954.

Dear Kolangade,

I have your nice Marathi book 'Rigveda-Darshan'. It is a mine of information and full of scholarship. The language and exposition is simple and easy to follow.

You had added one more important book to the series that you have already brought out on similar subjects of great cultural value. We have much to learn from the world but we have first to learn what we have already inherited from the rich past. Then only we can build on sound foundation.

The more deeply we study our heritage, the more we are convinced that there is something vital, deep, and inspiring that our forefathers have handed down to us.

I wish you every success in your other similar undertakings.

*Your Sincerely*
रंगनाथ दिवाकर
( Governor of Bihar )

---

# दोन शब्द

उतार वयांतही विद्याव्रत न सोडतां 'जें आपणास ठावें तें इतरांस शिकवावें' या न्यायानें आपल्या ज्ञानाचा लाभ इतरांस व्हावा म्हणून सतत झटणारे माझे मित्र श्री. कोलंगडे यांनी आपल्या 'ऋग्वेद-दर्शन' या नवीन ग्रंथाकरतां दोन शब्द लिहिण्याची विनंति केली. ती अमान्य करवत नाहीं.

गेलीं हजारों वर्षें वैदिक वाङ्मयाबद्दल भारतीयांची श्रद्धावृत्ति इतकी दृढ होती ( व अजूनहि बऱ्याच प्रमाणांत आहे ) कीं वेद हे अपौरुषेयच समजले गेले ! आधुनिक चिकित्सकांनीं ह्या समजुतीचा भोळसट म्हणून हंसण्या ऐवजीं ह्या समजुतीच्या उद्‌भवाचा विचार करावयास पाहिजे. लेखनकलेचा उपयोग न करतां गुरुशिष्यपरंपरेनें वेद मुखोद्गत करून त्यांचें रक्षण आर्यांनीं हजारों वर्षें केलें असल्यामुळें एखाद्या वैदिक पंडिताला 'वेद कोणी प्रसृत केले असावेत ?' हा चिकित्सक प्रश्न विचारला गेलाच तर त्याचें उत्तर 'मी आपल्या गुरूपासून शिकलों, माझे गुरुहि त्याच-प्रमाणें शिकले' असें चटकन् दिलें जाई. त्यामुळें व ही गुरुशिष्यपरंपरा अखंडत्वामुळें अनादि मानली गेल्यामुळें वेद हे ईश्वरोद्भवच समजले जाणें अपरिहार्यच होतें.

दुसरी गोष्ट म्हणजे पाश्चात्य पंडित वॉरन् व विद्वद्वर लोकमान्य टिळक यांच्या संशोधनांनीं एक गोष्ट निर्विवाद सिद्ध केली आहे कीं उत्तरध्रुव प्रदेशावरील खगोलस्थिति, दिनरात्रमान व उषादेवीचा विलास यांची माहिती ऋग्वेदीय ऋषींना खास होती. तद्वत् लोकमान्यांनीं सूचित केल्या-प्रमाणें भूगर्भशास्त्रांतील अद्ययावत् संशोधनाच्या आधारें १२ ते १५ हजार वर्षांपूर्वीं उत्तरध्रुव प्रदेशाचें हवामान वसाहतींना अनुकूल असून, नंतर हिमप्रलयानें त्या वसाहतींची पांगापांग झाली असण्याची शक्यता सिद्ध झाली आहे. ही शक्यता जमेस धरली तर ऋग्वेदीय ऋषींच्या प्रलय-पूर्वकालीन उत्तरध्रुवप्रदेश संबद्ध श्रुति ( निराळ्या अर्थानें ) व स्मृति

ज्या वेदांत अनुस्यूत आहेत, ते वेद अपौरुषेय समजले जावे, यांत नवल तें काय ?

असे हे अपौरुषेय वेद मुखोद्गत करून त्यांचें रक्षण करणें हें आद्य कर्तव्य ठरत असल्यामुळें त्यांच्या अर्थाकडे दुर्लक्ष होणें अपरिहार्य होतें. सामान्य अनुभवच आहे कीं अर्थ माहीत असलेल्या श्लोकांपेक्षां अज्ञातार्थ श्लोक जशाचा तसा ( काना-मात्रेचा फरक न करतां ) आपण मुखोद्गत करतों. शिवाय आदराच्या भावनेची परमावधि झाली कीं, ज्याप्रमाणें भक्त देवळांतील आदरणीय मूर्तीकडे पाहतांना त्या मूर्तीच्या रूपचिकित्से-कडे डोळेझांक करतो, त्याप्रमाणें शब्दब्रह्माच्या ध्वनींत दंग झाल्यावर अर्थचिकित्सेची उठाठेव वेदविषयक आदराला पोषक समजली जाणें शक्यच नव्हतें !

कारणें कांहींहि असोत, यास्काचार्यांनीं निरुक्तांत ध्वनित केल्या-प्रमाणें ब्राह्मणकालापासूनच ऋग्वेदाची अर्थपरंपरा खंडित झाली, हें निःसंशय. पुढें अनेक शतकांनंतर सायणाचार्यांचें संस्मरणीय भाष्य तयार झालें नसतें, तर भाषा शास्त्रादि अनेक तुलनात्मक शास्त्रांची व अनेक शोधांची मदत मिळूनहि आधुनिक वैदिक संशोधकांना सायणाचार्यांच्या खांद्यावर उभे राहून त्यांच्यापेक्षां वेदार्थ प्रदेशांत जास्त दूरवर नजर टाकण्याची जी सोय झाली ती झाली नसती !

हें सर्व वाचकांपुढें मांडण्याचें कारण असें कीं, सश्रद्ध भारतीय आज हजारों वर्षे श्रुति-स्मृति-पुराणांवर प्रवचनें श्रवण करीत आहेत. पण त्यांपैकीं बहुतेकांना वेदांत सांगितलें आहे तरी काय व हल्लीं प्रचलित असलेल्या देवतांहून भिन्न अशा तत्कालीन देवतांची स्तुति करतांना ऋग्वेदांत तत्कालीन समाजस्थिति कशी प्रतिबिंबित आहे, याचें ज्ञान नसतें याचें वाचकांना आश्चर्य वाटूं नये ! अशा परिस्थितींत ज्ञान-विकासाच्या व पृथग्जनप्रबोधाच्या या युगांत ऋग्वेदांत काय विषय आले आहेत, त्याचें महत्त्व काय हें ऋग्वेदाचें बहिरंग व अंतरंग परीक्षण करून सामान्य वाचकांना समजेल, अशा सुंदर व सुबोध भाषेंत ऋग्वेद-दर्शन या ग्रंथांत विशद केल्याबद्दल श्री. कोलंगडे यांचें हार्दिक अभिनंदन केलें

पाहिजे. कारण यापूर्वीच वकीली व्यवसायांतून निवृत्त झाल्यापासून आतां-पर्यंत ' योगीश्वर याज्ञवल्क्य, शुक्लयजुर्मणिमाला, याज्ञवल्क्य दर्शन ( शत-पथ परिचय ) व ऋग्रत्न भांडार ह्या उत्कृष्ट ग्रंथांच्या द्वारें त्यांनीं वैदिक वाङ्मयाची भरीव व बहुमोल सेवा केली आहे व ह्या त्यांच्या वाङ्मय तपस्येनें प्रसन्न होऊन श्रीमज्जगद्गुरु श्री. शंकराचार्य ( डॉ. कुर्त-कोटी ), ह्यांनी त्यांस ' वेदार्थविनोद ' ही पदवी देऊन त्यांचा यथोचित गौरवही केला आहे. तथापि त्यामुळें स्वतःला कृतार्थ समजून त्यांनीं आपल्या ग्रंथलेखनरूप कर्मयोगांत खंड पडूं दिला नाहीं. त्याचें प्रत्यंतर म्हणजे ' ऋग्वेद दर्शन ' हा प्रस्तुत ग्रंथ होय.

या ऋग्वेद-दर्शन ग्रंथांत भाषेप्रमाणेंच विषयाची मांडणीहि मोठी प्ररो-चक आहे व त्यामुळें वेद हें एक गौड बंगाल आहे, ही समजूत व वेदांत सांठविलेल्या ज्ञानाला भक्तिभावानें पण दुरूनच नमस्कार करण्याची ( म्हणजे पुराणांतील वांगीं पुराणांतच ठेवण्याची ) वृत्ति नाहींशी होण्यास खास मदत होईल. गेलीं ३४ वर्षे प्राध्यापकाचें काम करीत असतांना कालेजच्या विद्यार्थ्यांच्या वेदविद्येच्या आस्थेचा (?) जो अनुभव प्रस्तुत लेखकाला आहे, त्या वरून त्याचें निश्चित मत झालें आहे कीं मातृभाषा माध्यमाच्या या युगांत श्रीयुत कोलंगडे यांचें पुस्तक काले-जच्या अभ्यास क्रमांत समाविष्ट केलें तर मनोरंजन करतां करतां ज्ञानदान करणाऱ्या त्यांच्या कुशल भाषाशैलीमुळें विद्यार्थ्यांमध्यें वेदाभ्यासाचें आक-र्षण खास निर्माण होईल. इति शम्

विनायक महादेव आपटे
( M. A. Ph. D., Cantur )
अध्यक्ष, संस्कृतभाषाविभाग
सागर युनिव्हर्सिटी
( मध्य प्रदेश )

---

# आत्मनिवेदन

नान्यतो ज्ञायते धर्मो वेदादेवैष निर्बभौ ।
तस्मात्सर्वं प्रयत्नेन धर्मार्थं वेदमाश्रयेत् ।।—व्यास

यावत् स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले ।
तावत् ऋग्वेदमहिमा लोकेषु प्रचरिष्यति ।।—सायणाचार्य



In Rig Veda we have poems composed in perfect language, in elaborate metre, telling us about gods and men, about sacrifices and battles, about the varying aspects of nature and the changing condition of society, about duty and pleasure, philosophy and morality.

— *History of Ancient Sanskrit Literature.*

I maintain that to every body who cares for himself, for his ancestors, for his history, for his intellectual development, a study of vedic literature is indispensable.

There is no literary relic full of lessons to the true student of mankind than the RigVeda.

—*India, What It Teaches Us ?*
Max Muller,

हे वरील महर्षि व्यास, वेदमहाभाष्यकार श्री सायणाचार्य व जगप्रसिद्ध पाश्चात्यपंडित प्रो. मॅक्स मुल्लर साहेब यांचे ऋग्वेदविषयक प्रशंसोद्गार

अत्यंत मौलिक व मननीय नाहींत असें कोण म्हणेल ? वैदिक आर्यांचा ऋग्वेद हा एक मोठा ज्ञानकोश असून, त्याचें महत्त्व काय व किती आहे, याची साक्ष पटविण्यास आणखी निराळ्या पुराव्याची आवश्यकता दिसत नाहीं. जो कोणी या महाग्रंथाचा लक्षपूर्वक सूक्ष्म अभ्यास करील, त्याला वरील पंडित महाशयांच्या उपरोक्त उद्गाराची यथार्थता पटल्याशिवाय राहणार नाहीं. तो ग्रंथराज आहेच तसा दिव्य ज्ञानाचा प्रचंड महासागर ! काय वर्णावी त्याची थोरवी ? त्यांतील शब्दसंपत्ति, विचारसौंदर्य, प्रतिभाविलास, अर्थगांभीर्य, रचनाचातुर्य, वर्णनकौशल्य, शब्दसौष्ठव, पदलालित्य, सृष्टिनिरीक्षण, देवतावर्णन, तत्त्वचिकित्सा, जीवनविकास, तेजस्वी वृत्ति, प्रभावी राजकारण, सत्यनिष्ठा, यज्ञप्रकृति, समाजदर्शन, भूतानुकंपा इत्यादि सर्व विषय सूत्रबद्ध स्वरूपांत ग्रथित केलेले असून, त्याची सर जगांतील कुठल्याहि देशांतल्या आजपर्यंत उपलब्ध असलेल्या कोणत्याहि ग्रंथाला येणें शक्य नाहीं. हें फक्त भारतीय प्राचीन वेदग्रंथांचें दिव्य व महान् वैशिष्ट्य आहे, असें सांगितल्यास त्याला अतिशयोक्तीचा दोष मुळींच शिवणार नाहीं. याचें प्रत्यंतर थोडक्यांत पाहावयाचें असल्यास आमच्या ‘ ऋग्रत्न-भांडार ’ व ‘ ऋग्वेद-दर्शन ’ या ग्रंथांत त्याचें ओझरतें दर्शन खास होईल.

पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं आज आम्हां भारतीयांना हा प्रचंड ज्ञानाचा अमूल्य ठेवा पारखा झाल्यामुळें त्याचें सौंदर्य व महत्त्व याची ओळख आमच्यांतून साफ बुजून गेली आहे. अशी ही भारताची दुदैवी कथा असली तरी भारताबाहेर—विशेषतः जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड, अमेरिका इत्यादि सुधारलेल्या विद्यासंपन्न राष्ट्रांत—या वेदग्रंथांविषयीं कुतूहल व जागृति उत्पन्न होऊन, जोरानें त्या ग्रंथांच्या सूक्ष्म व सखोल अभ्यासाकडे तिकडील जिज्ञासु विद्वानांचें लक्ष्य वेधलें आहे. त्यांची वेदाभ्यासजिज्ञासा व वेदार्थ-प्रयत्न पाहून आम्ही भारतीयांनीं लज्जेनें तोंड खालींच घातलें पाहिजे. भारतीयांचा वेद भारतीयांनाच पारखा व्हावा व परकीयांना त्यांचा मोह सुटून ध्यास लागावा, हा योगायोग किती विचित्र आहे ! आतां वेळच अशी आली आहे कीं भारतीय पंडितांनीं खडबडून

जागे होऊन, सगळा आळस झाडून व अनास्था बाजूस सारून, तेजस्वी वेदनारायणाचें अष्टपैलू मंगल दर्शन बहुजन समाजास घडवून आणण्याचें पवित्र व्रत स्वयंस्फूर्तीनें स्वीकारलेंच पाहिजे. नाहींतर भारतीय संस्कृति तिच्या मायभूमींतच नष्ट होऊन, तेथें भावी काळांत सगळा अंधार व गोंधळ माजून राहील, याचीं स्पष्ट चिन्हें आज डोकावत आहेत.

या आपत्तीस यथाशक्ति व यथामति आळा घालावा म्हणून आम्ही 'योगीश्वर प्रकाशन' ग्रंथमालेचा उपक्रम करून, त्या क्षेत्रांत शिरून अल्प-स्वल्प प्रयत्न करण्याचें धाडस केलें आहे. या आमच्या ग्रंथमालेंत आतां-पर्यंत वेदावर चारपांच ग्रंथ प्रकाशित करण्याचा योग आम्हांस लाभला असून, त्यांत ऋग्वेद-दर्शन हा पांचवा ग्रंथ महाराष्ट्राच्या हातांत देण्यास आज आम्हांस मोठा आनंद व धन्यता वाटते. या ग्रंथाच्या उपयुक्तते-संबंधीं मुंबई येथील भारतीय विद्याभवनाचे जाइंट डायरेक्टर सुप्रसिद्ध विद्वान श्रीयुत हरि दामोदर वेलणकर, त्याचप्रमाणें सागर युनिव्हर्सिटीचे संस्कृत भाषाविभागाचे अध्यक्ष डॉ. विनायक महादेव आपटे व न्यायरत्न धुं. गो. विनोद या विद्वान त्रयांनीं 'प्रस्तावना', 'दोन शब्द' व स्वस्तिवाचन लिहून त्यांत प्रस्तुत ग्रंथाचें वैशिष्ट्य, महत्त्व, इष्टता व उपयुक्तता यासंबंधीं निवेदन केलें असून, त्याविषयीं अधिक लिहिणें म्हणजे तें चर्वितचर्वण होणार आहे. म्हणून त्या भरीस न पडतां येथेंच आमचें हें निवेदन आटपतें घेतों.

तत्पूर्वीं आणखी एका गोष्टीचा उल्लेख करावयाचा राहिला, तो करणें अत्यंत जरूर आहे. आमच्या प्रस्तुत ग्रंथप्रकाशनाच्या कार्यास ज्यांनीं ज्यांनीं सढळ हातानें मदत केली, त्यांचे आभार मानणें हें कर्तव्यप्राप्तच आहे. प्रथम म्हणजे मुंबई विश्वविद्यालयानें आम्हांस पांचशें रुपयांची उदार देणगी देऊन आमच्या कार्यास फार मोठें प्रोत्साहन दिलें, याबद्दल आम्ही त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. तसेंच हुबळीचे सुप्रसिद्ध उद्योगपति श्री. राघवेशराव व्ही. शिरूर यांनीं आपल्या पूज्य मातोश्रीच्या संस्मरणार्थ म्हणून आम्हांस स्वयंस्फूर्तीनें एक हजार रुपयांची बहुमोल मदत केली आणि त्यामुळें आमचें प्रकाशनाचें कार्य सुलभ झालें. अर्थात् या त्यांच्या

उदार देणगीबद्दल श्री. राघवेशराव व त्यांचे बंधु यांचे आम्ही अत्यंत आभारी आहों. मुंबई येथील भारतीय विद्याभवनानें आम्हांस शंभर रुपये देऊन उपकृत केले याबद्दल त्यांचेहि आभार मानतों. भारतीय विद्याभवनाचे सहाध्यक्ष श्रीयुत हरि दामोदर वेलणकर, एम्. ए. व सागर विद्यापीठाचे संस्कृतभाषाविभागाचे अध्यक्ष डॉ. विनायक महादेव आपटे एम्. ए., पीएच्. डी. या विद्वद्वर्यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन आमच्या ग्रंथास प्रस्तावना व दोन शब्द लिहून देऊन आम्हांस उपकृत केलें, त्याबद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानणें हें अपरिहार्यच आहे. याशिवाय अनेक उदार सद्गृहस्थांनीं आम्हांस सढळ हातानें मदत करून आमचें कार्य सुलभ केलें, याबद्दल या सर्वांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभारी आहों. शेवटीं पुण्याचे समर्थ भारत छापखान्याचे व्यवस्थापक श्रीयुत स. रा. सरदेसाई यांनीं प्रस्तुत ग्रंथ काळजीपूर्वक सुबक व सुंदर छापून दिला याबद्दल त्यांचे हृत्पूर्वक आभार मानून निवेदनाला पूर्ण विराम देतों.

शीव, मुंबई २२.

**रा. गो. कोलंगडे**
ग्रंथकर्ता

---

# स्वस्तिवाचन

ऋग्वेदाचीं निश्वसितें जेथें प्रथम अवतीर्ण झालीं त्या उत्तर-ध्रुवावरील प्रदेशांत प्रत्यक्ष वास्तव्य, व संपूर्ण पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आलेले, टोकियो येथील एप्रिल १९५४ मध्यें भरलेल्या जगत्-शांति परिषदेंत आंतरराष्ट्रीय शांतिसचिव म्हणून नियोजित झालेले, न्यायरत्न डॉ. धुं. गो. विनोद, दर्शनालंकार यांचें स्वस्तिवाचन या ग्रंथास लाभलें ही श्रुतिकृपाच होय.

रा. गो. कोलंगडे.

वैदिक संस्कृतीचे व्युत्पन्न विवेचक श्री. रा. गो. कोलंगडे यांच्या 'ऋग्वेददर्शन' या अभिनव ग्रंथाचें स्वस्तिवाचन करतांना मला आज विशेष समाधान होत आहे.

या ग्रंथांत ऋग्वेदाचें अंतरंग विशद करून श्री. कोलंगडे यांनीं मानवी समाजाच्या व संस्कृतीच्या अतीत, अनागत व वर्तमान-कालांचें एक स्थायी चित्र रेखाटलें आहे.

'ऋग्वेददर्शनां'त मानवतेचा पूर्वेतिहास व इतिहासपूर्व कालही समाविष्ट आहे; इतकेंच नव्हे तर, विद्यमान वस्तुस्थितीची व आगामी ध्येय-युगाची यथार्थ रूपरेषा येथें सहजसिद्ध आहे.

दाशराज्ञ युद्धाची परिस्थिति आजही उपस्थित आहे. मात्र आजचें युद्ध आर्य व अनार्य यांचेमध्यें नसून सर्व गोंधळ बहुसंख्याक अनार्यांमध्येंच आहे. "आर्य" या संज्ञेवर अधिकार असलेले मानवी समूह किंवा राष्ट्रें आजच्या जगांत आहेत कोठें ?

आशास्थान हेंच कीं एकादा महात्मा, अनेक द्रष्टे, कांहीं संत सत्पुरुष व त्यागैक वृत्तीचे हुतात्मे आजही आहेत.

केवळ युद्धनिर्मूलनच नव्हे तर यथार्थ व स्थायी अशी विश्व-शांति निर्माण करण्याची समाजशास्त्रीय व मानसशास्त्रीय प्रक्रिया या ऋग्वेददर्शनांत आढळून येईल.

मानवी विकासक्रमास आधारभूत असलेल्या सनातन सत्यांचें आकलन व उपयोजन करणें हाच आजच्या आत्मविध्वंसक अणु-युगावरील प्रत्यक्ष प्रतिकाराचा एकमात्र मार्ग होय.

'ऋग्वेददर्शन' हें सर्वदर्शी व सर्वस्पर्शी आहे. मानव्याचा भविष्यद्विकास, मानवी जीवनाची पूर्णता, मनुष्यमात्रांत सुप्त असलेल्या अतींद्रिय शक्तींची परिणति इत्यादि ध्येयांच्या पूर्ततेसाठीं लागणारी स्फूर्ति, गति व शक्ति ऋग्वेदाच्या अंतरंग अध्ययनानेंच उपलब्ध होईल.

श्रीयुत कोलंगडे यांचा प्रस्तुत ग्रंथ ऋग्वेदाच्या आंतररहस्यावरील मीमांसक पद्धतीनें लिहिलेलें सुलभ 'सायणभाष्य'च होय.

ऋग्वेदांतील सुसूक्ष्म अंगोपांगांचें निर्वचन, निवेदन व निरूपण करण्यांत शब्दसरस्वतीचा त्यांच्यावर झालेला प्रसाद त्यांच्या एकनिष्ठ व एकाग्र वेदोपासनेचें फलित होय.

महाराष्ट्रानें व महाभारतानें त्यांच्या सोज्वळ व्यक्तिमत्वाचें आणि त्रयोदशगुणी ग्रंथ-सारस्वताचें, लक्ष्मीपूजन करावें, एवढीच प्रार्थना.

पुणें २
आषाढ शु॥ १५, व्यासपौर्णिमा
१८७६

धुं. गो. विनोद.

# विषयानुक्रमणिका

---



## प्रकरण १ लें

# विषय-प्रवेश

**'ऋचो ह यो वेद स वेद देवान्'**

बृहद्देवता.

'वेद' हा शब्द 'विद्' या संस्कृत धातूपासून झाला असून, त्या धातूचे संदर्भाप्रमाणें निरनिराळे असे अनक अर्थ होतात. त्यांपैकीं पहिला व मुख्य अर्थ म्हणजे 'जाणणें' असा होतो. उदाहरणार्थ–'य एनं वेत्ति हन्तारं' या वचनांतील 'विद्' याचा अर्थ जाणणें असा होतो; त्याचप्रमाणें 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति', 'ऋचो ह यो वेद स वेद देवान्', 'तमेव विदित्वा अतिमृत्युमेति' इत्यादि वाक्यांतील 'विद्'चा अर्थ म्हणजे जाणणें असा होतो. त्याचा दुसरा अर्थ म्हणजे 'मिळविणें', 'संपादन करणें' असा होतो. जसें:––'सिद्धिं विन्दन्ति मानवाः' या वचनांत 'विद्' म्हणजे मिळविणें हा अर्थ अभिप्रेत आहे. त्याचा तिसरा अर्थ 'असणें' असा करण्यांत येतो. जसें:— 'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः' या वचनांत 'विद्' याचा अर्थ सत्ता अगर भावदर्शक असा होत असून 'न विद्यते' याचा अर्थ गीतेच्या टीकेंत श्रीशंकराचार्य 'नास्ति' असा करतात. तसाच चौथा अर्थ सांगावयाचा झाला तर 'विचार करणें' असें सांगतां येईल. जसें:–'विंत्ते धर्मं सदा सद्भिः'–येथें 'विद्'चा अर्थ विचार करणें असा होतो. याप्रमाणें 'विद्' धातूचे प्रसंगानुसार निरनिराळे अर्थ होत असून, त्या सर्वांचा अंतर्भाव पुढील वचनांत याप्रमाणें करून दाखविण्यांत आला आहे. 'वेत्ति सर्वाणि शास्त्राणि गर्वस्तस्य न विद्यते । विंत्ते धर्मं सदा सद्भिस्तेषु पूजां च विन्दति ॥' या वचनांत 'विद्' धातूचे 'ज्ञाने' 'भावे' 'मीमांसे' व 'लाभे' असे सर्व अर्थ आले आहेत. शिवाय त्याचे आणखी कांहीं किरकोळ अर्थ होतात. पण ते सर्व येथें देण्याचें प्रयोजन नसल्यामुळें ते येथें देण्यांत आले नाहींत.

तेव्हां आतां 'वेद' शब्दाचा थोडक्यांत अर्थ सांगणें म्हणजे 'वेत्ति (जानाति)', 'विन्दति (लभते),' 'विंत्ते (विचारयति) येन यस्मिन् वा सत्यज्ञानं स वेदः' याप्रमाणें सांगतां येईल. प्राचीन भारतीय आर्यांचें देवताज्ञान, विश्वज्ञान, सत्यज्ञान–अर्थात् जागतिक व पारलौकिक ज्ञान–ज्या ग्रंथांत सूत्ररूपानें ग्रथित करून ठेवण्यांत आलें आहे आणि ज्याच्या सहाय्यानें तें मनुष्याला प्राप्त होतें अगर विचार करण्यास मदत होते, त्याला वेद अशी संज्ञा आहे. आणि हें ज्ञान दोन प्रकारच्या ग्रंथांत मिळून सांगण्यांत आलें असून, त्यांपैकीं एका भागाला संहिता व दुसऱ्या भागाला ब्राह्मण हें नांव आहे. संहितेंत ऋषींनीं गाइलेले छंदोबद्ध मंत्र असून, ब्राह्मणांत त्या मंत्रांचा अर्थ, विनियोग व स्पष्टीकरण यांचा समावेश करण्यांत आला आहे. म्हणून मंत्र व ब्राह्मण या दोहोंना मिळून वेद अशी संज्ञा आहे. 'मंत्रब्राह्मणात्मको वेदः' अशी आपस्तंब ऋषींनीं व 'मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम्' अशी कात्यायन ऋषींनीं वेद शब्दाची व्याख्या केली आहे. मंत्रांत प्रामुख्यानें देवतांची स्तुति, प्रार्थना व वर्णन इत्यादि विषयांचा समावेश होत असून, ब्राह्मणांत विधि, अर्थ व विनियोग यांचा संग्रह व ऊहापोह करण्यांत आलेला असतो. विधीमध्यें यज्ञयागादि कर्मानुष्ठानाची चर्चा असून, अर्थवादामध्यें कर्माची प्रशंसा, निंदा, हेतु, चिकित्सा, परक्रिया व पुराकल्प वगैरे गोष्टींचा अंतर्भाव होतो. असो.

आतां वेद शब्दाचा आणखी एक अर्थ होतो, तोहि येथें देऊन टाकतों म्हणजे झालें. वेदांत लौकिक ज्ञान, लौकिक मार्ग, लौकिक उपाय, यांचा मधून मधून बोध असला तरी केव्हां केव्हां तेवढ्यावर भागण्यासारखें नसतें. मनुष्याची बुद्धि जेथें लटपटते, लुली पडते, अशा प्रसंगीं अलौकिक उपाय सांगून इष्टसिद्धि कशी करून घ्यावी, याचेंहि मार्गदर्शन या ग्रंथांत केलें असल्यामुळें मनुष्याला हे ग्रंथ ऐहिक व पारलौकिक उत्कर्षास कारणीभूत झाले आहेत. 'प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते । एनं विदान्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ।' प्रत्यक्ष अगर अनुमानानें मनुष्याला जो उपाय सुचत नाहीं, तो वेदानें सूचित केला जातो म्हणून वेदाची वेदता होय.

मनुष्य हा सुखप्रिय प्राणी आहे. त्याला नेहमीं सुख पाहिजे असतें. दुःखाचा त्याला मोठा तिटकारा असतो; आणि इष्टप्राप्ति झाली म्हणजे

त्याला सुख होतें, नि अनिष्ट घडून आलें म्हणजे दुःखाचा डोंब उठतो. वेद हे इष्टप्राप्ति व अनिष्ट-परिहार करण्यासाठींच अवतरले असल्यामुळें आत्मकल्याणेच्छु मनुष्याला प्रपंचांत ते मोठे उपकारक झाले आहेत. 'इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकमुपायं यो ग्रंथो वेदयति स वेदः'—इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार याविषयीं अलौकिक उपाय—लौकिक नव्हे—, अपौरुषेय उपाय—पौरुषेय नव्हे,—दैवी उपाय—मानवी नव्हे, सुचवून अगर दाखवून देणारा जो ग्रंथ त्यास वेद असें म्हणतात. याप्रमाणें वेद शब्दाचा हा थोडक्यांत अर्थ आहे.

**वेदाची उत्पत्ति**

हे वेद केव्हां झाले, कसे झाले, कोणीं केले याविषयीं चर्चा करणें—वाद माजविणें—हें आमच्या मतें आतां निष्फळ आहे. ते मनुष्यकृत म्हणजे पौरुषेय आहेत का मनुष्यकृत नाहींत म्हणजे अपौरुषेय आहेत, हा वादहि तितकाच फोल आहे. ते केव्हां झाले, कां झाले ही असली चर्चाहि अर्थशून्यच आहे, असें म्हटलें तरी चालेल. कां तर याविषयीं प्रत्यक्ष पुरावा, निश्चित पुरावा, भरीव पुरावा कोणाजवळहि नाहीं व कोणाला आतांपर्यंत मिळालेलाहि नाहीं व पुढें मिळण्याची आशाहि नाहीं. नुसत्या तर्कटावरच भागवावें म्हटलें,तर ती गोष्ट सर्व-मान्य होण्यासारखी नाहीं. कारण तो तर्क तरी असा कोठें सुप्रतिष्ठित आहे ? बुद्धीची कसरत करून आज कांहीं तरी निष्कर्ष काढावा न काढावा तों उद्यां कोणीतरी सवाई तर्कज्ञ येऊन निराळ्या विचारसरणीनें तो खोडून काढतोच कीं नाहीं ? मग तर्काची तरी प्रतिष्ठा ती काय राहिली ? एकानें तर्क करावा व दुसऱ्यानें तो खोडून काढावा, दुसऱ्यानें करावा व तिसऱ्यानें खोडावा, ही अशी शर्यत आतांपर्यंत सारखी चालत आली आहे. म्हणून तोहि अप्रतिष्ठित असल्यामुळें त्याच्यावर सर्वस्वीं अवलंबणें—भिस्त ठेवणें—हें शहाणपणाचें, सुरक्षितपणाचें, होणार नाहीं, हा अनुभव हिशोबांत घेणें हेंच हिताचें आहे.

तेव्हां कधींहि न मिटणाऱ्या या वादग्रस्त प्रश्नाचा नसता खीस काढीत बसण्यापेक्षां खुद्द वेदनारायणाचाच याविषयीं कौल घेणें हें अधिक हिताचें व फायद्याचें दिसतें. म्हणून या बाबतींत आम्ही वेदाचीच साक्ष वाचकां-

पुढें मांडतों म्हणजे झालें. त्या प्राचीन व अनादि अशा दिव्य ग्रंथावर ज्यांचा विश्वास असेल नि बसेल, त्यांना वेद हे अपौरुषेय मानणें यांत कांहीं गैर अगर पाप नाहीं व ज्यांचा त्यावर विश्वास नसेल अगर बसणार नाहीं, त्यांचें समाधान मग प्रत्यक्ष ब्रह्मदेवहि करूं शकणार नाहीं! असो.

आतां वेदाच्या उत्पत्तीसंबंधानें ऋग्वेदाचा कौल काय मिळतो हें आपण आतां पाहूं. जेथें हा प्रश्न आला आहे ती ऋचा ही अशी आहे. 'तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे । छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥ १०-९०-९ ॥ सर्व प्रकारचें हविर्द्रव्य हवन करण्यांत आलेल्या त्या आदियज्ञापासून ऋग्वेद झाला, सामवेद झाला, छंदें झालीं व यजुर्वेदहि त्यापासूनच झाला. या वचनावरून वेद हे यज्ञपुरुषापासून झाले—सृष्टि-उत्पत्तीच्या पूर्वीं झाले—जग निर्माण होण्याच्या आधीं म्हणजे मनुष्य उत्पन्न होण्याच्या अगोदर झाले—ही गोष्ट सिद्ध होते. वेदनारायणाचें हें असें स्पष्ट सांगणें आहे.

हाच भाव शतपथांत जरा निराळ्या तऱ्हेनें सांगण्यांत आला आहे तो असा—'एवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमेतत् । यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि सर्वाणि निश्वसितानि ॥ (श. प. १४-५-४-१०) याप्रमाणें या परमात्मस्वरूप महद्‌भूतापासून हा ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषत्, श्लोक, सूत्रें, व्याख्यानें, अनुव्याख्यानें इत्यादि सर्व निश्वसित झालीं आहेत. हें शतपथ वचनहि वरील ऋग्वेद वचनाचेंच अर्थतः अनुकरण करतें. वेद हे परमेश्वराच्या श्वासोच्छ्‌वासापासून झाले म्हणजे ते परमेश्वरनिर्मित आहेत असा निर्वाळा शतपथानेंहि दिला आहे.

शिवाय आणखी एक उत्पत्ति सांगितली आहे ती अशीः—स (प्रजापतिः) इमाँस्त्रीँल्लोकानभितताप । तेभ्यस्तप्तेभ्यस्त्रीणि ज्योतींष्यजायन्ताग्निर्योऽयं पवते सूर्यः ॥ स इमानि त्रीणि ज्योतींष्यभितताप । तेभ्यस्तप्तेभ्यस्त्रयो वेदाऽजायन्ताग्नेर्ऋग्वेदो वायोर्यजुर्वेदः सूर्यात्सामवेदः ॥ ( श. प. ११-५-२ व ३ )-प्रजापतीनें तपश्चर्या करून पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग असे तीन लोक उत्पन्न केल्यावर पुनः त्यानें त्या तीन लोकांना अभितप्त करून

त्यांपासून अग्नि, वायु व सूर्य हे उत्पन्न केले, आणि या तीन ज्योतींना पुनः अभितप्त करून त्यांच्यापासून तीन वेद निर्माण केले. अग्नीपासून ऋग्वेद, वायूपासून यजुर्वेद व सूर्यापासून सामवेद निर्माण झाला.

ही वेदोत्पत्ति दिसावयास वरील ऋग्वेदवचनास वरून वरून बाध आणण्यासारखी दिसली तरी सूक्ष्म विचारांतीं ती वस्तुतः तशी नाहीं. कारण अग्नि काय, वायु काय, सूर्य झाला काय हे सर्व त्या आदियज्ञापासूनच झालेले आहेत. 'चक्षोः सूर्योऽजायत' 'मुखादिन्द्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत' १०-९०-१३ असें ऋग्वेदांत स्पष्ट सांगितलें असून, वरील शतपथवचनांत त्या आदियज्ञपुरुषाच्या कोणत्या अंगापासून कोण उत्पन्न झालें याचें स्पष्टीकरण येथें केलें आहे इतकेंच. त्या दोन्ही वचनांत वस्तुतः परस्पर विरोध असा मुळींच नाहीं.

आतां जातां जातां मनूचा तेवढा अभिप्राय देऊन या विषयाला बाजूस सारतों. मनुस्मृतींत याविषयीं वचन आढळतें तें असें:–' अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् । दुदोह यज्ञसिध्यर्थमृग्यजुःसामलक्षणम्॥' ( मनु १-२३ ).- तो ब्रह्मा अग्नीपासून ऋग्वेद, वायूपासून यजुर्वेद व सूर्यापासून सामवेद असे हे तीन नित्य वेद यज्ञसिध्यर्थ निर्माण करता झाला. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य काय तर वेदोत्पत्तीसंबंधानें वरील चारहि वचनांत–वेद, ब्राह्मण व स्मृति वचनांत–मोठें विलक्षण साम्य असल्यामुळें वेदांची उत्पत्ति ही मानवकृति नसून ती ईश्वरनिर्मित आहे, असें धरून चालण्यांत कसलेंहि पाप नाहीं.

**वेदांतील विषय**

मानवाचें जें परमध्येय–म्हणजे धर्म, अर्थ, काम व मोक्ष-हे चार पुरुषार्थ–ते साध्य करून घेणें, हें व्यक्तीच्या स्वाधीन नसून, तें वेदाच्या-म्हणजे त्याच्या अर्थज्ञानाच्या-स्वाधीन आहे. याविषयीं आर्यपंडितांत मतभेद मुळींच नाहीं. पण देहतर्पणाच्या मागें लागलेल्या–इंद्रियसुखाच्या भोवऱ्यांत अडकलेल्या-जडमूढ विषयांधाला तें लाभणें शक्य नाहीं. पण जो वेदोक्त मार्गानें जीवनयात्रा कंठील, त्याला मात्र तें साध्य आहे. ' धर्मार्थकाममोक्षाख्य पुरुषार्थ–चतुष्टयसंपत्तिर्हि वेदार्थज्ञानाधीनता ' इत्यत्र न केषामप्यार्याणां

स्विप्रतिपत्तिः' असें माधवाचार्यांनी आपल्या न्यायमालाविस्तर भूमिकेंत म्हटलें आहे. तेव्हा वेदांत ते पुरुषार्थ साध्य करून घेण्याचा मार्ग-युक्ति-अगर उपाय-सांगितलेला आहे.

वेद या शब्दांत मंत्र व ब्राह्मण यांचा समावेश होत असून, त्यांत प्रामुख्यानें कर्म, उपासना व ज्ञान यांचें प्रतिपादन आहे. ( ' वेदश्च कर्मोपासनाज्ञानप्रतिपादकः' ) आतां कर्म, उपासना व ज्ञान यांचें लक्षण काय हें सांगणें ओघानेंच प्राप्त झालें. देव नि द्रव्य असे उभयसाध्य जे यागादिक तें कर्म होय. ( ' तत्र देव-द्रव्योभयसाध्यो यागादिः कर्म ' ) येथें कर्म हा शब्द रूढार्थवाचक नसून, तो पारिभाषिक रूपांत वापरला आहे. येथें कर्म म्हणजे वेदोक्त यज्ञ यागादिक कर्म होय. स्वाभाविक अशा ज्या इंद्रियचेष्टा, प्रापंचिक व्यवहार, त्यांना कर्म ही संज्ञा असली तरी त्या वैदिक कर्मांत मोडत नाहींत, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. आतां उपासनेचें लक्षण सांगावयाचें झालें तर तें असें:— ' ब्रह्मजीवयोरुपासकत्वदृष्टिरुपासना '—ब्रह्म व जीव यांच्यांत उपास्य व उपासक अशी जी दृष्टि ती उपासना. शिव व जीव यांच्यांतील सेव्यसेवक भावना तिला उपासना असें म्हणतात. आतां ज्ञान म्हणजे जागतिक व सांसारिक ज्ञान नव्हे. जडविश्वाचें—पंचमहाभूतात्मक जगताचें—ज्ञान नव्हे. म्हणून आधुनिक विज्ञानशास्त्रें हीं या वैदिक ज्ञानांत मोडत नाहींत. तर जीव व ब्रह्म यांचें जें अभेद ज्ञान—जीवशिवैक्य ज्ञान—त्यालाच वेदांत ज्ञान म्हटलें आहे. ( ' जीवब्रह्मणोरभेद एवात्र ज्ञानम् ')

यावरून वेदांतील मुख्य विषय कोणते याचा कोणालाहि सहज उमज पडण्यास अडचण भासेल असें आम्हांस वाटत नाहीं. असें जरी असलें तरी वेदांत जागतिक ज्ञान मुळींच नाहीं असें मात्र कोणीं समजूं नये. तेथें विश्वाचें ज्ञान भरपूर आहे पण आनुषंगानें आहे. अर्थात् तो वेदाचा मुख्य प्रतिपाद्य विषय नव्हे, इतकेंच. वेदांचा मुख्य विषय म्हणजे कर्म, उपासना व ज्ञान हा आहे, हें पुनः सांगून आतां पुढें चालूं लागतों.

**वेद हे अर्थगर्भ आहेत**

वेद ही एक दिव्य शब्दसृष्टि असून ती अनंत व अपार आहे. तशीच ती सूक्ष्म व गूढ आहे, पण ज्ञानगर्भ आहे. वेद ग्रंथाचें जें श्रेष्ठत्व व महत्त्व आहे, तें या महाग्रंथाच्या दिव्य ज्ञानांत —ब्रह्मज्ञानांत— अंतर्भूत

आहे, हें आज मुद्दाम सांगणें प्राप्त झालें आहे. मनुष्याला इहलोकीं जन्माचें सार्थक करून अखेर आपलें अखंड आनंदमय मूळपीठ गांठावयाचें झालें, तर त्याला तें हें वेदज्ञान अवश्यच आहे. त्याशिवाय इष्ट हेतु सिद्धीस जाणें शक्य नाहीं. म्हणून वेदाचें महत्त्व हें अर्थज्ञानांत आहे, केवळ अक्षरपठणांत नाहीं, हें येथें मुद्दाम सांगितलें पाहिजे. वेदकालीं म्हणजे वेदोक्तधर्म प्रत्यक्ष प्रचारांत असल्यावेळीं वेदाचा अर्थ तत्कालीन वेदोपासकांना अवगत होता-अवगत असावा-अवगत असला पाहिजे, ही गोष्ट वैदिक वाङ्मयावरून स्पष्ट बोधित होते. ‘धर्मार्थकाममोक्षाख्यपुरुषार्थचतुष्टयसंपत्तिर्हि वेदार्थज्ञानाधीनता’ असें माधवाचार्यांनी स्पष्ट म्हटलें आहे. पण पुढें कालांतरानें हा मनु पालटला, अर्थज्ञान बुजत चाललें आणि अखेर वेद हे आज तुम्हाआम्हांला दुर्बोध होऊन बसले.

वेद ही शब्दसृष्टि आहे असें वर सांगण्यांत आलेंच आहे. आणि शब्द म्हटला कीं त्याला कांहीं तरी अर्थ असतोच, असलाच पाहिजे; नाहींतर त्याला शब्दत्व येणार नाहीं. कारण अर्थाशिवाय शब्दाला शब्दत्व नाहीं. हेंच निराळ्या तऱ्हेनें सांगावयाचें तर शब्द हा अर्थगर्भ आहे, आणि भाषा ही अशा अर्थपूर्ण शब्दाच्या समुच्चयापासून झाली आहे, व ती वाणींतून-मुखांतून-प्रकट होते. मनुष्याच्या अंतरंगांतील विविध भावना, विचार व विकार इत्यादि मनोवृत्ति बाहेर प्रकट करण्यासाठीं-इतरांना कळविण्यासाठीं—या वाणीचा अवतार आहे, याविषयीं वाद नाहीं. मुखांतून निरनिराळे आवाज काढून-निरनिराळे वर्णोच्चार व शब्दोच्चार करून-मनांतील भावना व विचार मनुष्य हा बाहेर प्रकट करीत असतो. त्या आवाजांतून निघणाऱ्या निरनिराळ्या स्वरोच्चाराला वर्ण असें म्हणतात. या वर्णापासून अर्थगर्भ शब्द बनून, अशा अनेक शब्दांच्या सुसंगत समुच्चयानें वाक्याचा जन्म होतो.

या अशा अर्थप्रधान शब्दसृष्टीलाच वाङ्मय असें नांव आहे. अर्थ नसेल तर केवळ शब्दसंघाला वाङ्मय म्हणतां येणार नाहीं. ‘प्रधानमर्थः’—भाषेंत अर्थ हा महत्त्वाचा आहे. म्हणून अर्थाला अनुरूप अशी जी शब्दयोजना तीच वाङ्मयसृष्टि होय. म्हणजे तो शब्द मनांतील अर्थाचा

बोधक असला पाहिजे. हेंच निराळ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे अर्थाचें अभिव्यक्त स्वरूप—अंतरंगांतील भावनेचें प्रकट स्वरूप—हा शब्द आहे. ‘शब्दोहि तद्गुणायत्त इष्यते’ (बृहद्देवता २-९९)- शब्द हा त्या अर्थाच्या स्वरूपावर-गुणावर-अधिष्ठित असतो. म्हणून शब्दाला नाना उपायांनीं अर्थानुवर्ती करण्याचा प्रयत्न करावा. (‘तस्मान्नानान्वोपायैः शब्दानर्थवशं नयेत’ बृ. २-९९). तेव्हां सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, शब्द हा अर्थसूचक असतो व असावा आणि तसा करण्याचा प्रयत्न करावा.

**वेदमंत्र हे पदघटित आहेत.**

आतां हे वेद जे आहेत, ते शब्दघटित म्हणजे पदघटित आहेत. म्हणजे पदसमुच्चयानें ते मंत्र बनले आहेत आणि त्या पदाला कांहींतरी अर्थ आहे. अर्थाशिवाय त्यांची घटना झालेली नाहीं. म्हणजेच ते अर्थगर्भ आहेत. अर्थशून्य असतील तर त्यांना पद ही संज्ञा प्राप्त होणार नाहीं. ‘अर्थात्पदं स्वाभिधेयम्’—अर्थापासूनच तद्बोधक पदांचा जन्म झाला आहे. आणि अशा अर्थपूर्ण पदांपासून वाक्याचा अर्थ निश्चित केला जातो. (‘पदाद्वाक्यार्थनिर्णयः’). म्हणून वाक्य हें पद-घटित आणि पद हें वर्णघटित आहे. (‘पदसंघातजं वाक्यं वर्णसंघातजं पदम्’ बृ. दे. २-११७). आणि वेदांतील अशा अर्थपूर्ण ऋषिवाक्याला सूक्त हें नांव आहे. (‘संपूर्णमृषिवाक्यं तु सूक्तमित्यभिधीयते’ बृ. दे. १-१३). असो.

येथपर्यंतच्या विवेचनावरून आतां असें म्हणण्यास जागा झाली कीं वेद हे अर्थगर्भ आहेत; म्हणून त्यांचें अध्ययन करावयाचें तें सार्थच झालें

**अर्थज्ञानाचें महत्त्व**

पाहिजे. अर्थ न समजतां केलेलें अध्ययन हें वंध्या मैथुनासारखें निष्फळच होय. अर्थज्ञानरहित वेदा-ध्ययन केल्यानें अंतरंगांत वेदमंत्राचा दिव्य प्रकाश उजळत नाहीं आणि तसा प्रकाश उजळला नाहीं तर बुद्धींत सत्यज्ञान—विश्वज्ञान-आत्मज्ञान-स्फुरत नाहीं. आणि बुद्धींत तें ज्ञान स्फुरलें नाहीं—चमकलें नाहीं—तर मग उदंड सुखशांतीचें—नित्य आनंदसाम्राज्याचें—सच्चि-दानंद परब्रह्माचें-मंगल धाम गांठण्याची गोष्ट काढा कशाला! तें नुसत्या

वेदपठणानें मिळत असेल तर मग पोपटालाहि मोक्ष मिळेल असें म्हणावें लागेल. पण तें खरें काय ? तसा वेद सांगतो काय ? अर्थशून्य वेदपठणानें मोक्ष मिळतो अशी ज्याची समजूत असेल, तर ती त्याची शुद्ध आत्मवंचना आहे ! निव्वळ भ्रम आहे !

हें आम्ही कांहीं पदरचें सांगत नाहीं. याविषयीं प्रत्यक्ष वेदनारायणाचाच कौल काय आहे तो पाहिला म्हणजे आमच्या वरील म्हणण्याची सत्यता कोणालाहि सहज पटेल. म्हणून ऋग्वेदाचे प्रत्यक्ष बोलच येथें उद्धृत करतों म्हणजे झालें. ' ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः । यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते ॥ ऋ. १-१६४-३९ ॥. अत्युच्च अशा स्वर्गलोकीं वास करणाऱ्याप्रमाणेंच ऋचांच्या अक्षरांत सर्व देवांनीं वास केला आहे. तर असें जें ऋचेचें अक्षर ज्याला समजत नाहीं, त्याला वेद नुसता तोंडानें पाठ म्हणून काय लाभावयाचें आहे ? ज्यांनीं तें अक्षरगत तत्त्व अर्थतः ओळखिलें ते ज्ञानीच पूर्ण सुखी होतात.

या वेदमंत्रांत वेदनारायणानें स्पष्ट व स्वच्छ बोलून दाखविलें आहे कीं वेदाध्ययन-वेदाभ्यास-हा ज्ञानपूर्वकच म्हणजे सार्थच झाला पाहिजे. तरच तें वेदाध्ययन होय. दुसरी याच अर्थाची आणखी एक ऋचा आहे. ती म्हणजे हीः—' उतत्वः पश्यन्न ददर्श वाचमुतत्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् । उतो त्वस्मै तत्वं वि सस्त्रे जायेव पत्य उशती सुवासा ॥ ' १०-७१-४ ॥ जे वेदार्थ न जाणणारे वेदपाठक आहेत, अशांपैकीं कोणाला मनानें विचार करूनहि त्यांतील तत्त्व समजत नाहीं व कोणाला वेद कानांनीं ऐकूनहि न ऐकल्यासारखेंच होतें ! कामोत्सुक पत्नी सुंदर वस्त्र परिधान करून पतीपुढें आपलें शरीर जसें उघडें करून दाखविते, तद्वत जो अर्थज्ञ आहे त्यालाच वेदवाणी ही आपलें दिव्य अंतरंग उघड करून दाखविते. ज्याप्रमाणें पुष्ट पण वांझ गाय दुधाची भ्रांति उत्पन्न करते, अथवा अकालीं पालवलेला वृक्ष जसा फुलांची व फळांची भ्रांति उत्पन्न करतो, तद्वत अर्थ न समजतां केवळ वेदपठण करणाराची गत आहे ( अधेन्वा चरति माययैष वाचं शुश्रुवाँ अफलामपुष्पाम् ' १०-१७१-५ ) अशा अर्थशून्य वेदपाठकांना हा

लोकहि नाहीं व परलोकहि नाहीं. त्यांना यज्ञकार्यात ऋत्विजाचा मानहि मिळत नाहीं. असे हे लोक लौकिक म्हणजे प्राकृत भाषेचा आश्रय करून, त्या क्षुद्र भाषेनें युक्त होत्साते नांगर घेऊन शेतकी करूं लागतात. (१०-७१-९). एवंच अर्थशून्य वेदपाठकांची ही अशी शोचनीय स्थिति होते !

**अर्थज्ञानाचा प्रभाव**

वरील विवेचनाचाच भावार्थ यास्काचार्य निरुक्तांत स्पष्ट करून सांगतात तो असा.– ' स्थाणुरयं भारहारःकिलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् । यो अर्थज्ञ इत् सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥' भावार्थ— जो वेद शिकतो पण त्याचा अर्थ जाणत नाहीं, तो शुद्ध भारवाहक असा खांब होय. जो त्यांचा अर्थ समजतो, त्याचेंच परम कल्याण होतें. आणि ज्ञान-गंगेंत अवगाहन करून निष्पाप झालेला तो मरणोत्तर स्वर्गाप्रत जातो. हें वाक्य वेद-ज्ञानेच्छु साधकांस अत्यंत मननीय आहे.

**वेदार्थ लावण्याची पद्धत**

वेदमंत्राचा अर्थ लावतांना केवळ त्यांतील शब्दांचा अर्थ लावला म्हणजे तेवढ्यानें भागत नाहीं. शब्दाचा अर्थ लावावयाचा झाला तर त्याचा शब्दकोश पुढें घेऊन तेवढ्यावरच निर्वाह लागत नाहीं. मंत्रांतील शब्दाचा-पदाचा-योग्य अर्थ लावण्याला अर्थाबरोबरच इतर कांहीं आनुषंगिक गोष्टींचाहि विचार करावा लागतो. वेदार्थ लावण्याची भारतीय पंडितांची ही अशी तऱ्हा आहे. ' अर्थात्प्रकरणाल्लिंगादौचित्याद्देशकालतः ॥ मन्त्रेष्वर्थविवेकः स्यादितरेष्विति च स्थितिः ॥ (बृ. दे. २-११८). मंत्राचा भाव, त्याचप्रमाणें चालू विषय, लिंग, औचित्य, देश व काल या सर्व गोष्टी विचारांत घेऊन मग त्या वाक्याचा अर्थनिर्णय करावा. इतरत्रहि अर्थ लावण्याची हीच पद्धत ठरलेली आहे. याप्रमाणें वाक्याचा अर्थनिर्णय करावयाचा म्हणजे मागचा-पुढचा संदर्भ व चालू प्रकरण हें सर्व ध्यानांत घेऊन मग अर्थाची जुळणी करावयाची. तसें करतांना हा खालील नियम डोळ्यांपुढें ठेविला पाहिजे.

मंत्रांत शब्दाची मांडणी गद्याप्रमाणें सरळ नसते. कारण मंत्र हे पद्यात्मक असल्यामुळें-छंदोबद्ध असल्यामुळें-प्रास साधण्यासाठीं म्हणून वाक्यां-

तील शब्द-रचना मागेपुढें झालेली असते. कोठें कोठें तुटकच म्हणजे अपूर्णच असते. अशा प्रसंगीं पदरचे योग्य शब्द घालून वाक्य पुरें करावें लागतें. या बाबतींत नियम आहे तो असा:-' अतिरिक्तं पदं त्याज्यं हीनं वाक्ये निवेशयन् । विप्रकृष्टं च संदध्यादानुपूर्व्यंच कल्पयेत् ॥ (बृ. दे. २-१०० ) मंत्रामध्यें प्रास जुळविण्यासाठीं एखादा फालतु शब्द असला तर तो अर्थ करतांना हिशोबांतून काढून टाकावा. उदाहरणार्थ-' इमा नु कं भुवना सीषधामिन्द्रश्च विश्वे च देवाः ' ( ऋ. १०-१५७-१ ) या मंत्रांतील ' कं ' हा शब्द फालतु आहे. त्याला येथें अर्थ नाहीं. अशा निरर्थक शब्दांना निपात असें म्हणतात. असे जे अतिरिक्त शब्द असतील त्यांना अर्थांतून गाळून टाकावयाचें असतें. 'च' 'वै' 'तु' 'हि' हे असे शब्द या मासल्याचे असून, त्यांना अर्थस्थान फारसें नाहीं.

त्याचप्रमाणें कमी असलेले शब्द पदरचे घालून अर्थाला पूर्णता द्यावी. जसें:-' अस्मादन्नादिति भागमवेक्षते ' या मंत्रांत ' अधस्तनो ' हा शब्द पदरचा घालून मंत्राचा अर्थ पूर्ण करावा. केव्हां केव्हां एकच शब्द तोडून ते एकमेकापासून मंत्रांत अलग ठेविलेले असतात. अशा प्रसंगीं अर्थ करतांना तो नीट एकत्र जुळवून मग त्याचा अर्थ करावा. जसें-' सं ते मनो मनसा सं प्राणः प्राणेन गच्छताम् ' ( य. वे. ६-१८ ) या वाक्यांत ' संगच्छताम् ' हा एकच शब्द असून, प्रास जुळविण्यासाठीं म्हणून त्यांतील 'सं' एकीकडे व ' गच्छताम् ' एकीकडे घालण्यांत आला आहे. तर अर्थ करतांना ते दोन्ही भाग एकत्र करून ' संगच्छताम् ' या शब्दाचा अर्थ लावावा.

केव्हां केव्हां असेंहि होतें कीं मंत्रांतील पूर्व वाक्य शेवटीं घालून उत्तर वाक्य प्रारंभीं घालण्यांत आलेलें असतें. पण अर्थ लावतांना ती अदलाबदल करून मग त्यांचा अर्थ लावावा, म्हणजे तो अर्थ सरळ होतो. जसें:-' मा नो मित्रो वरुणोअर्यमायुरिन्द्र ऋभुक्षा मरुतः परिख्यत् । यद्वाजिनो देवजातस्य सप्तेः प्रवक्ष्यामो विदथे वीर्याणि ॥ (ऋ. १-१६२-१). या मंत्रांत उत्तरार्ध आधीं आला असून पूर्वार्ध नंतर आला आहे. पण मंत्रार्थ लावतांना शेवटीं आलेला पूर्वार्ध प्रथम घेऊन, प्रथम आलेला उत्तरार्ध शेवटीं घ्यावा, म्हणजे अर्थाची जुळणी बरोबर होईल. असो.

वेदांतील मंत्रांचा अर्थ लावतांना हे सर्व नियम डोळ्यापुढें ठेवून मग अर्थ लावण्याच्या भरीस पडावें. नाहींतर ‘ विनायकं विकुर्वाणो रचयामास वानरम् ’ अशी गत व्हावयाची ! हे सर्व नियम व्यवस्थित पाळून जो मंत्राचा अर्थ करूं पाहतो, त्याला काय फळ मिळतें हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे. ‘ इति नानान्वोपायैर्नैरुक्ते यो यजेत सः । जिज्ञासु ब्रह्मणो रूपमपि दुष्कृतपरं व्रजेत् ॥ ’ ( बृ. दे. २-११९ ). जो याप्रमाणें शब्द–व्युत्पत्ति शास्त्राचा अभ्यास करून नाना उपायांनीं मंत्राचा अन्वयार्थ ठाकठीक जुळविण्याचा प्रयत्न करतो, असा ब्रह्मस्वरूपजिज्ञासु तो वेदाभ्यासक कितीजरी दुराचरणी असला तरी तो सर्व पापांतून मुक्त होऊन, शेवटीं श्रेष्ठ स्थानाप्रत-म्हणजे परब्रह्माप्रत-जाऊन पोंचतो ! आज वेदमंत्राचा नवीन अर्थ काढण्याच्या हव्यासास पडलेले आधुनिक विद्वान या सर्व गोष्टी लक्षांत घेण्याची तसदी घेतील तर फार मोठा कार्यभाग होईल, असें म्हटलें तर तें शोभणार नाहीं का ? असो.

**अर्थ परंपरेला धरून असावा.**

वेदाचा अर्थ कसा लावावा याविषयीं भारतीय पंडितांची एक विशिष्ट तऱ्हा अगर पद्धति आहे. त्या अनुरोधानेंच वेदमंत्रांचा अर्थ लावला पाहिजे. ती पद्धति म्हणजे परंपरा ही होय. म्हणजे मंत्रार्थ जो लावावयाचा तो परंपरेला धरून लावला पाहिजे. विषय व प्रसंग इकडे दृष्टि ठेवून अर्थ लावला तरच तो अर्थ युक्त ठरतो. ‘ न तु पृथक्त्वेन मंत्रानिर्वक्तव्याः प्रकरणश एव निर्वक्तव्याः ’-मंत्राचा अर्थ मागचा पुढचा संदर्भ लक्षांत न घेतां, तो स्वतंत्र लावूं पाहिला तर तो मंत्र योग्य अर्थ देऊं शकत नाहीं. प्रकरण काय चाललें आहे याचा विचार करून म्हणजे चालू विषयाकडे लक्ष देऊन, मंत्रार्थ लावला, तरच तो विविक्षित अर्थ देऊं शकतो. म्हणून परंपरागत अर्थाचें श्रवण करून व तर्क चालवून मंत्रार्थ लावला पाहिजे असा भारतीय पंडितांचा परिपाठ आहे. ( अयं मंत्राभ्यूहोऽभ्यूहोऽपि श्रुतितोऽतितर्कतः ’ निरुक्त, १३-११ ).

कारण जे ऋषि म्हणजे सूक्ष्मद्रष्टे ज्ञानी नाहींत, अगर तपस्वी नाहींत, अशांना त्या मंत्राचें प्रत्यक्ष ज्ञान म्हणजे साक्षात्कार होत नाहीं ( ‘ नह्येषु

प्रत्यक्षमस्ति अनृषेरतपसो वा' ) कारण पूर्वापर विचाराला अगर संदर्भाला सोडून केलेला अर्थ सत्यज्ञान करून न देतां विपरीत ज्ञान-अन्यथा ज्ञान-करून देणारा आहे, असें स्पष्ट वैदिक पंडितांचें मत आहे. ( 'पौर्वापर्यापरामृष्टः शब्दोऽन्यां कुरुते मतिम् ' ). म्हणून पूर्वापार संदर्भ विचारांत न घेतां व प्रस्तुत विषयाकडे लक्ष न देतां त्रुटक मंत्राचा स्वतंत्र अर्थ केवळ व्युत्पत्ति-शास्त्रदृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्या लावूं पाहण्याची जी आधुनिक पंडितांची अभिनव तऱ्हा व पद्धति आहे ती सर्वस्वीं अयोग्य व अनर्थमूलक आहे, इतकें सांगितल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं.

**देवताज्ञानाची अवश्यकता.**

वेदांत जे मंत्र आहेत, त्या प्रत्येक मंत्राला कोणती तरी एकादी देवता असतेच असते; देवतेला सोडून स्वतंत्रपणें मन्त्राला अस्तित्व नाहीं व महत्त्वहि नाहीं. म्हणून मंत्राची देवता न जाणतां त्याचा कोरडा जप केल्यास तो मंत्र सिद्धिदायक होत नाहीं. म्हणून आपलें इष्ट ध्येय साध्य करून घेऊं इच्छिणाऱ्यानें स्वतः त्या मंत्रदेवतेचें ज्ञान करून घेऊन मग मंत्रोच्चार करावा, असा नियम घातला गेला आहे. ' वेदितव्यं दैवतं हि मन्त्रे मन्त्रे प्रयत्नतः । दैवतज्ञो हि मन्त्राणां तदर्थमवगच्छति ॥ ' ( बृ. दे. १-२ ) प्रत्येक मंत्रांतील दैवत हें मंत्रोपासकानें प्रयत्नें करून स्पष्ट जाणलेंच पाहिजे.

कारण जो त्या मंत्राची देवता जाणतो तोच त्या मंत्राचा अर्थ जाणूं शकतो. पण ज्याला मंत्रांतील देवताचें ज्ञान नाहीं त्याला लौकिक काय अगर वैदिक काय कोणत्याहि कर्माचें फल मिळत नाहीं. ( ' न हि कश्चिदविज्ञाय यथातथ्येन दैवतम् । लौक्यानां वैदिकानां वा कर्माणां फलमश्नुते॥ ( बृ. दे. १-४ ). म्हणून आपलें इष्ट मनोरथ साधूं पाहणाऱ्या देवोपासकानें मंत्राची देवता जाणणें हें इष्ट व तसेंच अवश्यहि आहे. आणि तो जर तसें न जाणतां कर्मानुष्ठानास बसेल तर ती देवता त्यानें अर्पण केलेला हविर्भाग स्वीकारूं इच्छीत नाहीं. अर्थात् तें कर्मानुष्ठान व देवोपासना व्यर्थच होय. म्हणून नियम करण्यांत आला कीं मंत्राची देवता जाणून तिला हविर्द्रव्य अर्पण केल्यास, तें ती ग्रहण करते. एरवी नाहीं.

( 'मन्त्राणां देवताविद्यः प्रयुङ्क्ते कर्म कार्हिचित् । जुषन्ते देवता स्तस्य हविर्नादेवताऽविदः ॥ ' बृ. दे. ८-१३१ )

अतएव देवतेला प्रसन्न करून तद्द्वारा आपले मनोरथ पूर्ण करून घेऊं इच्छिणाऱ्या देवोपासकानें मंत्रांतील देवतेचें स्वतः ज्ञान करून घेऊन मग देवतानुष्ठानास प्रारंभ करावा. हें काम जो इतरांवर सोपवील तर त्याला फलसिद्धि प्राप्त न झाली तर तो दोष वेदाचा नव्हे, तर आळशी व अज्ञान देवोपासकाचा आहे, ही गोष्ट देवोपासकांनीं अवश्य लक्ष्यांत ठेविल्यास, त्यांत त्यांचेंच हित व कल्याण आहे, हें आतां उघड सांगितलें पाहिजे असें नाहीं.

पुनः आणखी, मंत्राच्या दैवताचें ज्ञान झालें म्हणजे तेवढ्यावर भागलें असें होत नाहीं. तर त्या दैवताबरोबरच त्या मंत्राचा ऋषि व छंद यांचेंहि ज्ञान तितकेंच अवश्यक आहे. ' नियमोऽयं जपे होमे ऋषिश्छन्दोऽथ दैवतम् । अन्यथा चेत्प्रयुञ्जानस्तत्फलाच्च हीयते ॥ ( बृ. दे. ८-१३४ ). जपहोमादिकांत मंत्र म्हणतांना त्या मंत्राचा ऋषि, छंद व देवता यांचा यथार्थ विनियोग करणें, हा देवोपासनेचा नियमच होऊन बसला आहे; आणि त्याचें जो अतिक्रमण करील त्याला त्या देवोपासनेचें फल मिळणार नाहीं. आणि जो हे नियम धुडकावून देऊन, ऋषि-छंद-देवतादिकांचें यथार्थ ज्ञान करून न घेतां, वेदाचें दुसऱ्यास शिक्षण देतो अथवा स्वतः जप करतो, तो पापी होतो. ( ' अविदित्वा ऋषिं छन्दो दैवतं योगमेव च योऽध्यापयेऽजपेच्चापि पापीयाञ्जायते तु सः ॥ बृ. दे. ८-१३६ )

**त्याचप्रमाणें ऋषि व छंद यांचेंहि ज्ञान अवश्यकच आहे.**

म्हणून वैदिक देवतानुष्ठान करणाऱ्या देवोपासकानें मंत्रोच्चाराच्या पूर्वी त्या मंत्राचा ऋषि, छंद व देवता यांचें अनुक्रमानें नांव घेऊन मग मंत्र म्हणण्यास सुरवात करावी. कर्मानुष्ठानांत असा नियम आहे असें शास्त्र सांगतें. ( ' ऋषिं तु प्रथमं ब्रूयाच्छन्दस्तु तदनंतरम् । देवतामथ मन्त्राणां कर्मस्वेवमिति श्रुतिः ॥ ' बृ. दे. ८-१३८ ). यावरून हें स्पष्ट झालें कीं

मंत्रार्थाबरोबर त्या त्या मंत्राचा ऋषि, छंद व देवता यांचें ज्ञान असणें हेंहि जरूर आहे.

वेदार्थाचें यथार्थ ज्ञान होण्याला कोणकोणत्या विषयांचें ज्ञान अगत्यानें करून घेतलें पाहिजे म्हणजे कोणकोणत्या शास्त्राचें ज्ञान अवश्य आहे, हें आतां थोडक्यांत सांगतों. वेदाचें संपूर्ण ज्ञान फलप्रद होण्याला कोणकोणत्या विषयाचें ज्ञान अवश्य आहे, त्याला वेदाचें अंग अशी संज्ञा आहे. हे असे अंगभूत विषय एकंदर सहा आहेत. ते म्हणजे शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं सहा होत. यांना वेदांग असें म्हणतात. यांचा वेदार्थ लावण्याकडे फार मोठा उपयोग होतो. ' अतिगंभीरस्य वेदस्यार्थमवबोधयितुं शिक्षादीनी षडंगानि प्रवृत्तानि ' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

**शिक्षा**

पैकीं शिक्षा हें त्यांत पहिलें अंग आहे. वर्ण व स्वर यांचा उच्चार कसा करावा, हें ज्यांत सांगितलेलें असतें त्याला शिक्षा असें म्हणतात. मंत्रोच्चार करावयाचा तो या शिक्षेच्या नियमाला धरून करावा. नाहींतर फायदा न होतां, उलट हानि होण्याचा मात्र संभव आहे. ' वर्णानुच्चारणप्रकारो यत्रोपदिश्यते सा शिक्षा ' असें शिक्षेचें सायणाचार्य लक्षण करतात. या शिक्षेचें तैत्तिरीय उपनिषदांत थोडक्यांत व्याख्यान करण्यांत आलें आहे तें असेः—ॐ शीक्षां व्याख्यास्यामः । वर्णः स्वरः मात्रा बलं साम संतानः । इत्युक्तः शीक्षाध्यायः॥' (तै. उ. १-२) वर्ण, स्वर, मात्रा, बल, साम व संतान हे असे सहा या शिक्षेचे विषय आहेत.

अकारादि अक्षरांना वर्ण असें म्हणतात. हे वर्ण ' अ 'पासून 'ज्ञ'पर्यंत एकंदर ५२ आहेत. स्वर हे तीन आहेत. उदात्त, अनुदात्त व स्वरित. मात्राहि तीन आहेत—ह्रस्व, दीर्घ व प्लुत. बल म्हणजे स्थान व प्रयत्न, साम म्हणजे अति जलद नव्हे, अति सावकाश नव्हे, गळा काढून नव्हे, तर मध्यम व मधुर अशा आवाजांत सरळ व स्वच्छ वर्णोच्चार करणें यास साम म्हणतात. ' अतिद्रुतातिविलम्बितगीतादिदोषराहित्येन माधुर्यादिगुणयुक्तत्वेनोच्चारणं साम्यम् ' असें पाणिनीनें साम शब्दाची व्याख्या केली आहे. आतां शेवटचें जें संतान तें म्हणजे संतति-अर्थात् संहिता. शिक्षेमध्यें शिकाविणेचा हाच अर्थ आहे.

मंत्रोच्चार करण्यांत स्वरांत अगर अक्षरांत चूक झाली तर अर्थात फरक होऊन कव्हां केव्हां भलताच प्रसंग ओढवतो.

**उच्चारदोषापासून होणारा अर्थ**

म्हणून मंत्र म्हणण्याची स्पष्ट कल्पना असल्याशिवाय मंत्रपठण करणें हें धोक्याचें आहे. 'मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोपराधात् ॥' पा. शि. ५२ ). मंत्र स्वरहीन अगर वर्णहीन म्हटला गेला अगर त्याचा चुकीचा उपयोग करण्यांत आला, तर त्या मंत्रांतून आपणास हवा तसा अर्थ निघत नाहीं. इतकेंच नव्हे तर आपलें कल्याण व्हावें म्हणून म्हटला गेलेला तो मंत्र वाग्वज्र होऊन उलट आपल्या अहितासच कारणीभूत होतो. जसें 'इन्द्र-शत्रु' हा शब्द उच्चारतांना स्वरांत अगर वर्णांत चूक झाली अथवा उच्चार चुकीचा केला गेला तर तो प्रत्यक्ष यजमानावरच उलटून पडतो आणि त्याचे अहित करावयास चुकत नाहीं. 'स्वाहेन्द्रशत्रुः' या शब्दो-च्चारणाचा हेतु इंद्राचा जो शत्रु त्याचा घात करण्याचा आहे. त्याची अग्नींत आहुति देण्याचा आहे. 'इंद्र शत्रु' हा सामासिक शब्द असून, त्याच्या उच्चारांत स्वराचा बदल झाला तर विपरीत अर्थाचा बोध होतो, तो अंतोदात्त केला तर त्याचा अर्थ 'इंद्राचा शत्रु' असा षष्ठीतत्पुरुष वाचक समास होतो. आणि आद्युदात्त केला तर तो बहुव्रीहि समास होऊन, 'इंद्र' आहे शत्रु म्हणजे घातक ज्याचा असा बोध होतो. आणि याप्रमाणें स्वरोच्चारांत चुकीचा आघात होऊन त्याचा परिणाम भलताच होतो. मंत्र म्हणण्यांत असा हा धोका आहे. म्हणून स्वरवर्णादि अपराधदोष–आघातदोष–टाळ-ण्यासाठीं व शास्त्रोक्त स्वरांत मंत्र म्हणून तो सिद्ध होण्यासाठीं शिक्षा-ग्रंथाचा उपयोग व अवतार आहे.

वाटेल तेव्हां, वाटेल तो मंत्र म्हणावयाचा नाहीं.तर तो योग्य वेळीं व योग्य ठिकाणींच म्हटला पाहिजे.आणि याचा उपदेश करण्यासाठीं

**कल्प**

कल्पाचा अवतार आहे. कल्प म्हणजे ज्यांत कर्मांचें प्रयोगविधि सांगितले आहेत तीं आश्वलायन, आपस्तंब, बोधायन, कात्यायन इत्यादि श्रौतसूत्रें व गृह्यसूत्रें होत. ( 'कल्पस्तु आश्वलायनापस्तंबबोधायनादि

सूत्रम्') हीं श्रौतसूत्रें असून, यांत यज्ञयागादिकांचे प्रयोग सांगितलेले आहेत. म्हणजे यज्ञानुष्ठान कसें करावें, कोणत्या वेळीं कोणती क्रिया करावी, कोणते मंत्र कोठें व केव्हां म्हणावे, या सर्वांचें दिग्दर्शन या सूत्रग्रंथांत केलें जातें. हीं श्रौतसूत्रें झालीं. हीं श्रौतकर्में—म्हणजे यज्ञयाग—त्रेताग्नीवर करण्यांत येतात. गृह्यसूत्रें जीं आहेत तीं विवाहादि संस्कार समयीं उपयोगांत आणलीं जातात आणि हीं स्मार्त कर्में एकाग्नीवर चालतात. अर्थात् हीं कल्पसूत्रें वैदिक कर्मानुष्ठान प्रसंगीं फार उपयुक्त आहेत, म्हणून त्यांचा वेदांगांत समावेश करण्यांत आला आहे.

व्याकरण

त्याचप्रमाणें व्याकरण हेंहि वेदांगांत मोडतें. कारण प्रकृति-प्रत्ययादिकांच्या उपदेशानें पदाचें व वाक्याचें स्वरूप समजून, त्यापासून अर्थनिर्णय करण्याला चांगली मदत होते. 'व्याकरणमपि प्रकृतिप्रत्ययाद्युपदेशेन पदस्वरूपतदर्थनिश्चयायोपयुज्यते' अशी व्याकरण शब्दाची व्याख्या आहे. वर्णविकार, नाम, लिंग, वचन, विभक्ति, संधि, समास, काल, क्रिया इत्यादिकांचें यथार्थ ज्ञान व्याकरण परिचयानें होऊन, मंत्रार्थ बरोबर लावण्यास त्यापासून बरीच मदत होते. शुद्ध शब्द कोणता, अशुद्ध कोणता, अपभ्रंश शब्द कोणता, याचें ज्ञान अवश्य आहे. कारण शुद्ध शब्दज्ञानानें धर्म घडतो व अशुद्ध व अपशब्द ज्ञानानें अधर्म घडतो. म्हणून ज्याला व्याकरणाचें ज्ञान नाहीं, त्याला मंत्राचा अर्थ बरोबर करतां येत नाहीं. ही उणीव घालविण्यासाठीं व्याकरणाचें ज्ञानहि तितकेंच अवश्य आहे.

निरुक्त

जितकें म्हणून शब्दजात आहे—पदजात आहे—त्याचा स्वतंत्रपणें सिद्ध अर्थ लावण्याचें जें शास्त्र तें निरुक्त होय. 'अर्थावबोधे निरपेक्षतया पदजातं यत्रोक्तं तन्निरुक्तम्' अशी निरुक्त शब्दाची व्याख्या आहे. शब्दाच्या अर्थज्ञानापासून तदुक्त पदार्थांचा बोध होतो. अर्थज्ञान नसेल तर भाषाशास्त्र सर्व व्यर्थ आहे. म्हणून अर्थज्ञानप्राप्तीकरतां निरुक्ताचा अभ्यास अपरिहार्य आहे. या निरुक्ताचें अनुक्रमणिका भाष्यांत लक्षण सांगितलें आहे, तें असें:—'आद्यं नैघंटुकं काण्डं द्वितीयं नैगमं तथा। तृतीयं दैवतं चैति समाम्नायास्त्रिधा स्थितः ॥'—

निरुक्ताचें पहिलें कांड निघंटु, दुसरें निगम, व तिसरें दैवतकांड असे निरुक्ताचे तीन प्रकार आहेत.

एकाच अर्थाचे पर्याय शब्द तेवढे जेथें एकत्र करून सांगण्यांत आले आहेत, त्याला निघंटु असें नांव आहे. ('एकार्थवाचिनां पर्यायशब्दानां संघो यत्र प्रायेणोपदिश्यते तत्र निघंटुशब्दः प्रसिद्धः ॥'). दुसरें जें कांड तें निगम होय. त्या कांडांत वेदांतील विविध पदाचा व क्लिष्ट व कठीण अशा दुर्बोध मंत्राचा अर्थ स्पष्ट व विशद करून सांगितला आहे. तिसऱ्या कांडांत दैवतांचें स्वरूप व लक्षण कथन करण्यांत आलें आहे. तेथें तेथें शब्दाचा अर्थ स्पष्ट करतांना व्याकरणाची मदतहि घेण्यांत आली असल्यामुळें या दृष्टीनें निरुक्त हें व्याकरणाचेंहि विद्यास्थान आहे, असें म्हटल्यास त्यांत कांहीं अपराध घडला असें आम्हांस वाटत नाहीं. 'तदिदं विद्यास्थानं व्याकरणस्य' असें निरुक्तांतच चोख म्हटलें आहे. (नि. १-१५). म्हणून निरुक्त हें व्युत्पत्ति व अर्थज्ञानशास्त्र असल्यामुळें वेदाचा अर्थ लावण्याच्या कामीं त्याचा अत्यंत उपयोग आहे, हें आतां निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

**छंद**

आतां वेदाचें पांचवें अंग म्हणजे छंद हें होय. 'ऋचां नियताक्षरपादावसानानामावश्यकं छंदः' असें कात्यायन सूत्रकारांनीं छंद शब्दाचें व्याख्यान केलें आहे. ऋग्वेदांतील ऋचा या सर्व पद्यमय असून, त्यांची म्हणावयाची धाटीसुद्धां निरनिराळी आहे. अर्थात् ऋचांचें म्हणजे मंत्राचें स्वरूप त्यांतील अक्षरसंख्येप्रमाणें निरनिराळें होतें. म्हणजे मंत्राची म्हणावयाची धाटी तिला छंद हें नांव असून, त्याचें लक्षण त्याच्या अक्षरसंख्येवरून निश्चित केलें जातें. 'यदक्षरपरमितं तच्छंदः' असें हें छंदाचें लक्षण आहे. वेदांत अशीं छंदें पुष्कळ आहेत. पण मुख्य आहेत तीं हीं—गायत्री, उष्णिक अनुष्टुप, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप, जगति इत्यादि होत. आणि या प्रत्येक, छंदाचीं अक्षरें ठरलेलीं आहेत. उदाहरणार्थ गायत्री छंदाला चोवीस अक्षरें असतात. उष्णिकमध्यें त्याच्यापेक्षां चार अधिक म्हणजे अठ्ठावीस असतात. याप्रमाणें उत्तरोत्तर छंदांत अधिकाधिक अक्षरांचा समावेश असतो.

वेद मंत्राच्या धाटीचें ज्ञान होण्याला छंदशास्त्राचा अभ्यास जरूर आहे. कारण जो मंत्राचा छंद न जाणतां तो दुसऱ्यास शिकवितो वा यज्ञयाग करवितो तो पापी होतो. याविषयीं आर्ष ब्राह्मणांत वचन आहे तें असें:– 'यो ह वा अविदित्वार्षेय छन्दोदैवतब्राम्हणेन मन्त्रेण याजयति वाऽध्यापयति वा स्थाणुं वर्च्छेति गर्तं वा पद्यति प्र वा मीयते पापीयान् भवति ॥' आर्षेय ब्रा. १-१ ) जो मंत्राचा ऋषि, छंद, दैवत व विनियोग योग्य प्रकारें न जाणतां दुसऱ्याकडून यजनादि करवितो अथवा दुसऱ्यांना मंत्र शिकवितो तो खांबाशीं टक्कर देतो अथवा खड्ड्यांत जाऊन पडतो आणि पापी होतो. ही आपत्ति टाळण्यासाठीं म्हणून छंदाचें ज्ञान अवश्य आहे.

**ज्योतिष**

वेदांतील कर्मानुष्ठान वाटेल तेव्हां करतां येत नाहीं. त्याला काळ-वेळ साधायची असतो. यासाठीं ज्योतिषाचा उपयोग आहे. वेदाचा अवतार यज्ञकार्यासाठीं आहे. (' वेदा हि यज्ञार्थमभि प्रवृत्ताः ') आणि त्या यज्ञकार्याची-धर्मानुष्ठानाची-वेळ साधण्यासाठीं ज्योतिष शास्त्र आहे. कोणतें कर्मानुष्ठान कोणत्या वेळीं करावें, याविषयीं कांहीं नियम आहेत. त्या वेळीं तें साधलें तरच त्याला सिद्धि लाभते. म्हणून ' यज्ञ कालार्थसिद्धये ज्योतिषस्य प्रयोजनम् ' असें वेदांग ज्योतिषामध्यें म्हटलें आहे.

या विषयावरचीं हीं पुढील वचनें मननीय आहेत. एक व्रत असें आहे कीं तें संवत्सरपर्यंत पाळावयाचें असतें. तेव्हां येथें तो नियम पाळावयाला कोणत्या कालविशेषाला संवत्सर हें नांव आहे, त्याचें ज्ञान पाहिजे. आणि तें ज्योतिष शिकल्यानें समजतें. ' संवत्सरमेतद्व्रतं चरेत् ' तै. आ. १-३२-१ ). या वचनावरून संवत्सराचें ज्ञान सूचित होतें. तसेंच ' वसन्ते ब्राह्मणोऽग्निमादधीत, ग्रीष्मे राजन्य आदधीत, शरदि वैश्य आदधीत ' ( तै. ब्रा. १-१-२ ). या वाक्यांवरून वसंत ऋतु, ग्रीष्म ऋतु व शरदृतु हे तीन ऋतु केव्हां प्रारंभ होतात हें समजावयाला ज्योतिषाची अवश्यकता आहे. या वचनांत अग्निआधानासाठीं ऋतुकाल सांगितला आहे. दोन महिन्यांचा एक ऋतु होत असून, एका संवत्सरांत निरनिराळे कालदर्शक असे सहा ऋतु असतात. ' मासि मासि पृष्ठान्युपयन्ति ' या वचनांत महिन्याचा उल्लेख आला आहे. ' यं कामयेत वसीयानस्यादिति तं पूर्वपक्षे

याजयेत् ' या वाक्यांत पक्षाचा निर्देश करण्यांत आला आहे. पंधरा दिवसांचा एक पक्ष होतो, असे महिन्यांत दोन पक्ष असतात हें लोकप्रसिद्धच आहे. ' फल्गुनीपूर्णमासे दीक्षेरन् ' येथें तिथीचा उल्लेख आला आहे. ' प्रातर्जुहोति, सायं जुहोति ' या वाक्यांत दिवसाचे प्रारंभीचे व शेवटचे कालविशेष सांगितले आहेत. ( तै. ब्रा. १-१-२-१ ). ' कृत्तिकास्वग्निमादधीत ' या वचनांत नक्षत्राचा नामनिर्देश केला आहे.

यावरून हें सूचित होतें कीं, वैदिकांचीं सर्व धर्मकर्में ज्योतिषावर अवलंबून असल्यामुळें त्याशिवाय कोणतेंहि कर्मानुष्ठान चालण्यासारखें नाहीं. ज्योतिषाचें महत्त्व पतंजलि सांगतात तें असें– ' वेदा हि यज्ञार्थमाभिप्रवृत्ताः कालानुपूर्व्या विहिताश्च यज्ञाः । तस्मादिदं कालविधानशास्त्रं यो ज्योतिषं वेद स वेद यज्ञः ॥ '-असो. ज्योतिषाचें हें विवेचन अधिक न वाढवितां येथेंच त्याला पूर्णविराम देतों.

**षडंगें हीं अपराविद्येंतच मोडतात**

शिक्षाव्याकरणादि हीं जीं षडंगें आहेत, तीं वैदिकांची जी विद्या आहे, त्या विद्येंतच मोडतात. वेद विद्येचे दोन भाग असून, पहिल्यास अपराविद्या व दुसऱ्यास पराविद्या असें म्हणतात. अपराविद्येंत कशाचा समावेश होतो व पराविद्येंत काय येतें याचा विचार या पुढील वचनांत आढळतो तो असा–' द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च । तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति, अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ' ( मुंडक, १-१-४ व ५ ). विद्येचे दोन प्रकार आहेत असे ब्रह्मवेत्ते सांगतात. एक परा विद्या व दुसरी अपरा विद्या. अपरा विद्येंत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष यांचा समावेश होतो व पराविद्येंत जिच्या योगानें अक्षर ब्रह्माची प्राप्ति होते तिचा समावेश होतो. यावरून शिक्षादि षडंगांचें वेदविद्येइतकेंच महत्व आहे, असें वरील मुंडकवचनावरून म्हणावयास हरकत नाहीं.

या षडंगांचें महत्त्व इतकें आहे कीं, त्यांना वेदमहापुरुषाच्या निरनिराळ्या अवयवाची उपमा देण्यांत आली आहे. तो तपशील म्हणजे असा:-

**षडंगें हीं वेदपुरुषाचे अवयव होत**

'छन्दः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते। ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥ शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् । तस्मात्सांगमधीत्येव ब्रह्मलोके महीयते ॥' (पा. शि. ४१-४२) वेदाच्या पादस्थानीं छंद असून, कल्प त्याच्या हस्तस्थानीं आहे. ज्योतिषाचें अयन हें नेत्रस्थानीं असून, निरुक्त हें त्याचे त्याचे श्रोत्रस्थानीं आहे. शिक्षा हीं त्याच्या घ्राणस्थानीं असून, व्याकरण हें त्या वेदपुरुषाचे मुखस्थानीं आहे. म्हणून वेदाचें सांग अध्ययन करावें. असें झालें म्हणजे तो वेदाभ्यासक ब्रह्मलोकांत श्रेष्ठता पावतो.

**इतिहासपुराणें हीं वेदाचीं पूरक आहेत**

या षडंगांप्रमाणेंच इतिहास-पुराणांचें अध्ययन व ज्ञानहि अवश्यच मानलें आहे. कारण वेदांतील संदर्भ जाणण्याला या ग्रंथाचा फार उपयोग होतो. म्हणून इतिहास–पुराणांस पूरक वेद असें म्हटलें आहे. 'इतिहास पुराणाभ्यां वेदं समुपबृंहेत् । बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरिष्यति' इति ॥ इतिहास व पुराण यांनीं वेदाला पुष्टि द्यावी; कारण जो अल्पविद्य आहे-अल्पश्रुत आहे-अर्धवट ज्ञानी आहे–त्यापासून हा मला मारतो असें म्हणून वेदनारायण हा भयग्रस्त होतो. म्हणून इतिहास पुराणाचा अभ्यासहि अवश्यच आहे.

या सर्व निरूपणाचा हा एवढा विस्तार केला, त्याचें कारण इतकेंच कीं आजकाल संस्कृताचा जुजबी अभ्यास करून, त्या अल्पज्ञानानें हुरळून जाऊन, वेदाचा स्वकपोलकल्पित स्वतंत्र व नवीन अर्थ लावण्याच्या भरीस पडून आधुनिक नवशिक्षित पंडित लोक वेदार्थ लावण्याच्या फंदांत शिरतात व शिरले आहेत, पण वेदार्थ लावण्यास केवढी तपश्चर्या लागते व ज्ञानाचा डोंगर केवढा चढावा लागतो, याची आज त्यांना यथार्थ कल्पना द्यावी म्हणून.

सायणाचार्य, माधवाचार्य, उवटाचार्य, महीधराचार्य, विश्वरूपाचार्य, वेंकटमाधवाचार्य, श्रीशंकराचार्य, रामानुजाचार्य, इत्यादि प्राचीन पंडितांच्या ग्रंथांकडे जरा निरखून पहा म्हणजे त्यांचें संस्कृत भाषेवरील प्रचंड प्रभुत्व, तशीच त्यांची अगाध विद्वत्ता, अलौकिक प्रतिभा, व अवर्णनीय बहुश्रुत-पणा पाहून खरा वेदाजिज्ञासु आनंदानें मान डोलवून आश्चर्यानें तोंडांत बोट घातल्याशिवाय रहावयाचा नाहीं ! ज्यांना खरोखरच स्वतंत्र अर्थ लावण्याची लहर लागली असेल, त्यांनीं प्रथम या पंडित कुलशेख-रांनीं लिहलेल्या महाग्रंथांत अवगाहन करून, तेथील दिव्य ज्ञानामृत प्राशन करून, व संस्कृत भाषेचा सखोल अभ्यास करून बुद्धीला सुतेजस्वी केल्यावर मग त्या कार्यांत पडावें म्हणजे त्यांच्या विद्येचें व श्रमाचें खरें सार्थक होईल. या वेदाविषयीं पुष्कळ लिहिण्यासारखें आहे; पण स्थलाभावीं ही इतकी चर्चा झाल्यावर लेखणी आखडती घेणें याशिवाय दुसरा उपाय नाहीं. असो.

**मंत्राचा कर्मांत विनियोग करावा**

'नुसतें वेदांतील मंत्र शिकून भागण्यासारखें नाहीं. कारण त्या मंत्राचा विनियोगहि जाणावा लागतो. मंत्राबरोबर कर्मानुष्ठा-नाचीहि अवश्यकता आहे, आणि तें कर्मानुष्ठान समृद्ध व्हावयाला-सफल व्हावयाला-तें मंत्रयुक्त केलें गेलें पाहिजे. म्हणजे कर्माशिवाय नुसत्या मंत्राला व मंत्राशिवाय नुसत्या कर्माला फलनिष्पत्तिदृष्ट्या कांहींच महत्त्व नाहीं. म्हणून मंत्राबरोबर कर्म व कर्माबरोबर मंत्र यांची सांगड घातली पाहिजे तरच फलसिद्धि प्राप्त होते. 'तत्र तत्र यथावच्च मन्त्रान्कर्मसु योजयेत् । देवातायाः परि-ज्ञानात्तद्धि कर्म समृध्यते ॥ (बृ. दे. १-२१ )—प्रत्येक वेळीं मंत्राची देवता जाणून त्याप्रमाणें त्या मंत्रांचा प्रयोगांत उपयोग करण्यांत यावा. कारण देवताच्या यथार्थ ज्ञानानेंच तें कर्मानुष्ठान यशस्वी होऊन फलदायक होतें. म्हणून 'वेदितव्यं दैवतं हि मन्त्रे मन्त्रे प्रयत्नतः' असें म्हटलें आहे. एवंच भावार्थ हा कीं मंत्र व कर्म यांचा सहयोग जुळल्यास फलसिद्धि प्राप्त होते.

वेदाध्ययन हें जें आहे, तें जीवनार्थ–उदरंभरणार्थ-करावयाचें नाहीं. ज्याला पोट भरावयाचें आहे, त्यानें वेदाचा नाद सोडावा; इतर विद्या शिकून अगर इतर उद्योगधंदा करून प्रपंचाचा चरितार्थ चालवावा. उदरंभरणार्थ जो वेदविद्येचा आश्रय वा उपयोग करील अगर याजनादिक प्रयोग करील, तो

**वेदविद्या ही जीवनार्थ नाहीं**

खरा पतित होय ! त्याचा त्यापासून कधींहि उत्कर्ष व्हावयाचा नाहीं. अशा पोटभरू वेदपाठकावर वेदनारायण केव्हांहि कृपाप्रसाद करणार नाहीं. ' जीवनार्थे प्रयोगस्तु मन्त्राणां प्रतिषिध्यते वेदतत्त्वार्थविज्ञानं प्रायेणात्र हि दृश्यते ।।(बृहद्देवता ७-११०). मंत्रांचा उदरंभरणार्थ प्रयोग करणें हें सर्वथैव निषिद्ध आहे, म्हणजे सर्वस्वीं त्याज्य आहे. वेदांतील तत्त्वज्ञान समजून घेऊन त्याचा साक्षात्कार करून घेणें व जगदुद्धारार्थ त्याचा प्रसार करणें हाच त्याचा बहुतेक हेतु आहे. प्राचीन ऋषींचें चरित्रहि हीच गोष्ट सांगते; व जे अमर कीर्तीचे शंकराचार्य, सायणाचार्य, माधवाचार्य यांसारखे आचार्यकुलशेखर होऊन गेले त्यांचें चरित्र झालें तरी तोच बोध देतें. वेदामृत प्राशन केल्यावर उदरंभरणार्थ ज्याला भिकेचे डोहाळे होतात, त्याच्यासारखा दुर्दैवी प्राणी नाहींच असें म्हटल्यास त्यांत कसलाच अपराध नाहीं आणि जें अशा पोटभरू वेदपाठकाद्वारें देवोपासना करूं पाहतात, तेहि तितकेंच दोषी ठरतात.

वेदविद्या ही सर्व विद्येंत अत्यंत श्रेष्ठ विद्या आहे. परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें, हें जसें खरें, तसें या वेदज्ञानानें 'नरा' चा साक्षात् 'नारायण' बनतो व त्याला या जन्मींच ब्रह्मानंदाचा दिव्य अनुभव लाभतो. ' अत्रैव ब्रह्म समश्नुते ' असें जें योगीश्वर

**ही वेदविद्या कुशिष्यास देऊं नये**

याज्ञवल्क्यांनीं म्हटलें आहे, त्यांत त्यांचा स्वानुभव प्रतीत होतो.

अशी ही जी विद्या ती दुष्ट शिष्यास–कुशिष्यास देऊं नये, आणि तशी विद्यादेवीची वेदसंपन्न आचार्यास कळकळीची प्रार्थना आहे. हें पुढील वचन पहा–विद्यादेवी ही विद्यासंपन्न ब्राह्मणाजवळ येऊन म्हणते ती अशी:–विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि । असूयकायानृजवेऽयतनाय

न मा ब्रूया वीर्यवती यथा स्याम्, इति ॥ विद्याभिमानी देवता वेदोपदेश करणाऱ्या आचार्याजवळ येऊन त्यास म्हणते कीं हे आचार्यदेव ! जो शिष्य योग्य अधिकारी नाहीं अशाला माझा उपदेश करूं नकोस. अशा अनधिकारी शिष्यापासून माझें रक्षण कर ! मी तुझी निधीप्रमाणें सर्वार्थ-सिद्ध करणारी–सर्व पुरुषार्थ तडीस नेणारी–अशी पवित्र व मंगल देवता आहे. अशा प्रकारची जी मी, त्या माझी व त्याचप्रमाणें उपदेष्टा जो तूं, त्या तुझी जो दुष्ट पुरुष असूया करतो–म्हणजे माझी व तुझी मागें व पुढें निंदा करतो, टवाळी करतो, कुचेष्टा करतो, मत्सर करतो, द्वेष करतो, अवहेलना करतो, जो व्रतनिष्ठ राहून अभ्यास करीत नाहीं अशा फटकळ, आळशी व निंदाखोर शिष्याला माझें दान करूं नकोस ! त्याचप्रमाणें जो स्नानपानादि आचरणानें परिशुद्ध नाहीं–शुचिर्भूत नाहीं–अशा आळशी व भ्रष्ट शिष्यालाहि मला देऊं नकोस ! तसें जर करशील तरच मी तुझ्या हृदयांत राहून आपला प्रभाव गाजवीन. म्हणजे तुला इहपरलोकीचें दिव्यफलसुख प्राप्त करून देईन !

ही विद्यादेवीची प्रार्थना सर्व सूज्ञ व विद्वान् ब्राह्मण व वेदोपासक पाळीत आले आहेत. भगवान श्रीकृष्णानीं गीतेच्या शेवटीं गीताभक्तांस हीच इशारत दिली आहे. ' इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ! न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ' ( भ. गी. १८-६७ ) हें वचन तंतोतंत वरील विद्यादेवीच्या वचनाचा जवळजवळ अनुवादच नव्हे काय ? याज्ञवल्क्यांचा अभिप्रायहि याच ठशाचा आहे. ते स्पष्ट सांगतात कीं ही जी विद्या–अर्थात् वेद विद्या–आहे ती जो पुत्र नाहीं व जो सच्छिष्य नाहीं, अशाला सांगूं नये. ( ' तमेतं नापुत्राय वानन्तेवासिने वा ब्रूयात् ' (श. प. १४-९-३-२० ) याप्रमाणें वैदिक संस्कृतींत वाढलेल्या सर्व श्रेष्ठ व ज्ञानी विभूतींचें कंठरवानें सांगणें आहे.

पण त्याचा अर्थ आज भलताच करण्यांत येतो, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. ब्राह्मणांनीं ही विद्या इतरांपासून मुद्दाम लपवून ठेविली. ते स्वार्थी, लोभी, लबाड, लुच्चे व मतलबी आहेत, असे आधुनिक परकीय शिक्षणानें बहकलेले कांहीं मूढ व मूर्ख लोक वैदिक धर्माचा मुळींच गंध नसतां बिचाऱ्या

ब्राह्मणांवर निरर्गल व निराधार आरोप करण्यांत आपणांस मोठे धन्य मानीत असतात. बुद्धाचें उदाहरण पुढें करून वैदिक ऋषींची निंदा ते करण्यास मुळींच लाजत व कचरत नाहींत. या लोकांना धड वैदिक धर्महि माहीत नसतो व धड बुद्ध धर्महि माहीत नसतो. पण या मतस्वातंत्र्याच्या दिवसांत वाटेल त्याला वाटेल ते तारे तोडण्याची मुभा आहे. तेव्हां अशा बहकलेल्या कोंकरांची कींव करण्यापलीकडे आम्ही तरी काय करणार? असो.

आतां कोणता शिष्य विद्यार्ह आहे व कोणता नाहीं याविषयीं यापुढील तीन वचनांत तीच देवता याप्रमाणें सांगतेः—'य आतृणत्त्यवितथेन कर्णावदुःखं कुर्वन्तममृतं संप्रयच्छन्। तं मन्येत पितरं मातरं च तस्मै न द्रुह्येत्कतमच्चनाह ॥ २ ॥' अध्यापिता ये गुरुं नाद्रियन्ते वाचा मनसा कर्मणा वा। यथैव ते न गुरोर्भोजनीयास्तथैव तान्न भुनक्ति श्रुतं यत् ॥३॥ यस्ते न द्रुह्येत्कतमच्चनाह तस्मै मा ब्रूया निधिपाय ब्रह्मन् ॥ ' ॥४॥— जो आचार्य देव म्हणजे विद्यागुरु शिष्याला सदा वेद वाक्याचें श्रवण करवितो आणि आळस अगर त्रास न करतां मंद शिष्यालाहि प्रेमानें जवळ घेऊन त्याला हळुहळू व थोडेंथोडें विद्यादान करीत जातो व त्याबरोबरच त्याचा अर्थहि समजावून सांगतो अशा आचार्य देवाला जो सच्छिष्य असेल त्यानें मातृपितृरूप मानावें. अशा गुरुदेवाचा द्रोह, निंदा, द्वेष, टवाळी, इत्यादि निंद्य गोष्टी त्यानें केव्हांहि मुळींच करूं नयेत. पण जे अधम शिष्य आहेत, जे गुरूकडून विद्या शिकून त्यांच्याशीं कायावाचामनें नम्र व आदरयुक्त होऊन वागत नाहींत, अशा कृतघ्न शिष्यांवर त्या गुरुदेवांनीं मुळींच कृपा करूं नये व ते जसे गुरूकडून पोसिले जात नाहींत तद्वत् ती त्यांनीं गुरूकडून शिकलेली विद्याहि त्यांचें पालन करीत नाहीं. अर्थात् ती विद्या प्रभावी व फलप्रद होत नाहीं. पुनः ती विद्यादेवी म्हणते-हे गुरुदेवा! जो

**सत्पात्रीं विद्यादान**

शिष्य शुचिर्भूत आहे, अध्ययनदक्ष आहे, बुद्धिमान आहे, ब्रह्मचर्य व्रतनिष्ठ आहे, व जो तुझा व माझा कायावाचामनें द्रोह व निंदा करीत नाहीं, अशा सच्छिष्यालाच-वेदविद्यानिधि-पालकालाच-तूं माझें दान कर!

वेदविद्या ही अत्यंत पवित्र विद्या आहे. तशीच ती मोठी तेजस्वी आहे. सूर्याप्रमाणें तिचें ज्ञानतेज मोठें प्रखर आहे आणि प्रभाव तितकाच दांडगा आहे. पण ती दुर्बोध असल्यामुळें सहजासहजीं प्राप्त होण्यासारखी नाहीं. त्यासाठीं तपश्चर्येसारखें भयंकर दिव्यच करावें लागतें. तेवढी शक्ति, बुद्धि व कृतज्ञता ज्याच्यांत आहे, त्यानेंच तिचा नाद धरावा. इतरांनीं तिच्या-नादीं लागल्यास त्यांची फसगत होते. म्हणून जो बुद्धीनें तीक्ष्ण आहे, स्मर-णानें धड आहे, आचरणानें शुद्ध आहे, स्वभावानें सात्विक आहे, गुणानें कृतज्ञ आहे, मनानें सश्रद्ध आहे अशा कर्तव्यदक्ष सच्छिष्यानेंच तें व्रत घ्यावें, म्हणजे त्याचा मानवजन्म सफल व धन्य होईल.

अर्थात् या विद्येला तसा अधिकारी लागतो. अनधिकारी मनुष्याला ती देण्यांत कोणाचाच फायदा नाहीं. म्हणून शिष्याचा स्वभाव, गुण, बुद्धि व अधिकार पाहून, माझें त्याला दान करा, असें विद्यादेवीनें सांगितलें त्यांत चुकलें कोठें ? व ब्राह्मणांनीं तो नियम कर्तव्यबुद्धीनें पाळला म्हणून त्यांना नांव ठेवण्यांत काय शहाणपणा आहे ? ‘ अधिकार तैसा करूं उपदेश ’ हें संत शिरोमणि तुकारामाचें वाक्य ब्राह्मणांना नांव ठेवणाऱ्यांनीं खूप लक्षांत ठेवावें. असो.

**वेदाध्ययनाची फलश्रुति**

वेदांत जी उपासना सांगितली आहे ती यज्ञोपासना असून यज्ञोपासनेंत देवांना स्तुतिस्तोत्र गाऊन व हविर्भाग अर्पण करून तद्द्वारा त्यांना प्रसन्न करावयाचें असतें. तशी देवोपासना प्रभावी व्हावयाची झाली तर ती एकाग्रचित्तानें, मोठ्या दक्षतेनें, इंद्रियनिग्रहानें, विचारानें, बहुश्रुतपणानें व तपाचरणानें केली पाहिजे. ( ‘ योगेन दक्ष्येण दमेन बुध्द्या बहुश्रुतेन तपसा नियोगैः । उपास्यास्ताः कृत्स्नशो देवता’ ) ( बृहद्दे. ८-१३० ). अशा रीतीनें जो वेदाध्ययन करून वेदोक्त देवांची विधियुक्त उपासना करतो, त्याच्यावर ते प्रसन्न होऊन, त्यावर कृपाप्रसाद करतात व त्यांच्या कृपा-प्रसादानें त्या देवतांच्या मुळाशीं असणाऱ्या दिव्य तत्त्वज्ञानाचा प्रकाश उजळून व साक्षात्कार होऊन, तो देवोपासक भवचक्रांतून-संसारबंधनांतून-सुटून, अखंड आनंदमय अशा प्रकाशमय ब्रह्मस्वरूपांत लीन होतो !

याविषयीं हें पुढील वचन मननीय आहे. 'स ब्रह्मामृतमत्यन्तं योनिं सदसतोध्रुवम्। महच्चाणु च विश्वेशं विशति ज्योतिरुत्तमम्॥ (बृ. दे. ८-१४०). ज्याला वैदिक देवतांचें यथार्थ व संपूर्ण ज्ञान झालें, तो अमर, अनंत, सदसत् यांचें उगमस्थान, अत्यंत विशाल व अत्यंत सूक्ष्म, विश्वेश व सर्वोत्कृष्ट प्रकाशस्वरूप अशा परममंगल ब्रह्मस्वरूपांत विलीन होतो! वैदिकांचा मोक्ष तो हाच! वैष्णवांचें वैकुंठ तें हेंच! आणि शैवांचा कैलासहि पण हाच!! वेदविद्येची ही अशी फलश्रुति आहे! व वेदोपासकांची ती कामधेनु आहे! इतकी पूर्वपीठिका सांगून, आतां प्रस्तुत विषयांकडे वळतों.

---



## प्रकरण २ रें

# ऋग्वेदाचें बहिरंग परीक्षण

आतां यानंतर ऋग्वेदाच्या अंतरंगांत शिरावयाच्या आधीं प्रथम ऋग्वेदाचें बहिरंग म्हणजे त्याची रचना व मांडणी कशी करण्यांत आली आहे, याविषयीं धावतें परीक्षण करून, मग त्याच्या अंतरंगांत शिरणें हें इष्ट व योग्य वाटल्यावरून अगोदर येथें बहिरंगाचें धावतें दिग्दर्शन करतों. ऋग्वेदाची अष्टक व मंडलें अशा दुहेरी पद्धतीनें मांडणी करण्यांत आली आहे. अष्टकाची रचना पुढीलप्रमाणें आहे. सबंध ऋग्वेदाचीं आठ अष्टकें असून, प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय आहेत. आणि या प्रत्येक अध्यायाचे पुनः वर्ग पाडण्यांत येऊन, प्रत्येक वर्गांत अनेक सूक्तांचा समावेश करण्यांत आला आहे. याची तपशीलवार माहिती पुढील कोष्टकांत देण्यांत आली असून, ही व्यवस्था अध्ययन व अध्यापन यांच्या सोयीसाठीं करण्यांत आली आहे.

आतां दुसरी जी याची मांडणीं आहे, ती मंत्रदृष्ट्या ऋषींनीं रचलेल्या मंत्रावरून करण्यांत आली असून, त्याचे दहा भाग झाले आहेत. प्रत्येक भागास मंडल अशी संज्ञा आहे. प्रत्येक मंडलाचे अनुवाकांत भाग पाडले असून, प्रत्येक अनुवाकांत अनेक सूक्तांचा व प्रत्येक सूक्तांत अनेक मंत्रांचा संग्रह करण्यांत आला आहे. या पद्धतीनें ऋग्वेदाची मांडणी सांगावयाची झाली तर त्यांत दहा मंडळें, पंच्याऐशी अनुवाक, दहाशें अठ्ठावीस सूक्तें व दहा हजार पांचशें बावन ऋचा ( मंत्र ), असें सांगतां येईल.

शिवाय आणखी, या मंडळांचे गोत्रमंडळें व मिश्रमंडळें असे पुनः दोन गट झालेले असून, त्यांत दुसरें, तिसरें, चौथें, पांचवें, सहावें, सातवें

व आठवें हीं गोत्रमंडळें व पहिलें, नववें व दहावें हीं मिश्रमंडळें होत. पहिल्या गटास गोत्रमंडळें म्हणण्याचें कारण असें कीं, हीं मंडळें फक्त एकेका ऋषीच्या नांवावरच मोडतात. दुसऱ्या मंडळाचा ऋषि गृत्समद हा असून, तिसऱ्याचा विश्वामित्र, चौथ्याचा वामदेव, पांचव्याचा अत्रि, सहाव्याचा भरद्वाज, सातव्याचा वसिष्ठ, व आठव्याचा कण्व व अंगिरस हे आहेत. म्हणजे या मंडळांतील सूक्तें त्या त्या मंडळाच्या ऋषींनीं अगर त्यांच्या वंशजांनीं अगर त्यांच्या शिष्यांनीं किंवा त्यांच्या परंपरेंतील इतर अनुयायांनीं रचलेलीं आहेत. एक, नऊ व दहा हीं मिश्रमंडळें होत. कारण यांत निरनिराळ्या अनेक ऋषींचा समावेश होतो. असो. आतां ही ऋग्वेदाची मांडणी अष्टक, अध्याय, वर्ग, सूक्त व ऋचा आणि मंडळ, अनुवाक, सूक्त व ऋचा अशा उभयविध पद्धतीनें करण्यांत आली असून ती पुढील-प्रमाणें आखण्यांत आली आहे.

---

# अष्टकवार वर्गीकरण

## अष्टक पहिलें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | अग्निमीळे | ३७ | (मं१ ते १९ | (१९) | १९४ |
| २ | अयं देवाय | ३८ | ,, २० ते ३२ | (१३) | १८९ |
| ३ | एतायामोप | ३५ | ,, ३३ ते ४६ | (१४) | १७३ |
| ४ | अयं वां मधु | २९ | ,, ४७ ते ६१ | (१५) | १५२ |
| ५ | प्र मन्महे | ३१ | ,, ६२ ते ८० | (१९) | १८५ |
| ६ | इन्द्रो मदाय | ३२ | ,, ८१ ते ९४ | (१४) | १६३ |
| ७ | द्वे विरूपे | ३७ | ,, ९५ ते ११२ | (१८) | १७९ |
| ८ | इदं श्रेष्ठं | २६ | ,, ११३ ते १२१ | (९) | १३५ |
| एकूण ८ | | २६५ | | १२१ | १३७० |

## अष्टक दुसरें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्र वः पान्तं | २६ | ,, (१२२-१३६) | १५ | १३७ |
| २ | सुषुमा यातं | २७ | ,, (१३७-१५७) | २१ | १४३ |
| ३ | वसू रुद्रा | २६ | ,, (१५८-१६५) | ८ | १३२ |
| ४ | तनु वोचाम | २९ | ,, (१६६-१८३) | १८ | १४२ |
| ५ | ता वामघ | २९ | ,, (१८४-१९१ मं., २, १-८) | १६ | १५९ |
| ६ | नि होता | ३२ | (मं. २, ९-२३) | १५ | १५७ |
| ७ | सेमामविड्ढि | २५ | ( ,, २४-३६) | १३ | १३७ |
| ८ | मन्दस्व होत्रा | २७ | (,, ३७-४३ मं ३, १-६) | १३ | १४० |
| एकूण ८ | | २२१ | | ११९ | ११४७ |

## अष्टक तिसरें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्र य आरुः | ३४ | (मं ३ ७-२९) | २३ | १७६ |
| २ | इच्छन्ति त्वा | २६ | ( ,, ३०-३९) | १० | १३७ |
| ३ | इन्द्र त्वा | ३१ | ( ,, ४०-५५) | १६ | १५८ |
| ४ | न ता मिनन्ति | २५ | (,, ५६-६२ | ७ | ६४ |
| | | | मं ४, १-४) | ४ | ७१ |
| ५ | वैश्वानराय | २६ | ( ,, ५-१८) | १४ | १४८ |
| ६ | एवा त्वामिन्द्र | ३० | ( ,, १९-३२) | १४ | १५९ |
| ७ | प्र ऋभुभ्यो | २७ | ( ,, ३३-५०) | १८ | १४४ |
| ८ | इदमु त्यत् | २६ | ( ,, ५१-५८) | ८ | ६७ |
| | | | (मं ५-१-८) | ८ | ८५ |
| एकूण ८ | | २२५ | | १२२ | १२०९ |

## अष्टक चौथें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | त्वामग्ने हवि | ३३ | (मं ५, ९-३२) २४ | १६८ |
| २ | महि महे | २८ | ( ,, ३३-४६) १४ | १४६ |
| ३ | प्रयुञ्जती | ३१ | ( ,, ४७-६२) १६ | १६४ |
| ४ | ऋतस्य गोपा | ३६ | ( ,, ६३-८७) २५ | १६४ |
| | | | (मं ६, १—) १ | १३ |
| ५ | त्वं हि क्षैतवत् | ३० | ( ,, २-१६) १५ | १६० |
| ६ | पिबा सोममभि | २५ | ( ,, १७-२८) १२ | १३२ |
| ७ | इन्द्रं वो | ३५ | ( ,, २९-४७) १९ | १७६ |
| ८ | यज्ञायज्ञा | ३२ | ( ,, ४८-६१) १४ | १६६ |
| एकूण ८ | | २५० | १४० | १२८९ |

## अष्टक पांचवें

| अध्याय | मंत्र प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | स्तुषे नरा | २७ | (मं ६, ६२-७५) १४ | ११८ |
| | | | (मं ७-१) १ | २५ |
| २ | जुषस्व नः | ३० | (,, २-१९) १८ | १६६ |
| ३ | उग्रो जज्ञे | ३० | (,, २०-३५) १६ | १५५ |
| ४ | प्र ब्रह्मैतु | ३० | (,, ३६-५९) २४ | १५६ |
| ५ | यदद्य सूर्य | २७ | (,, ६०-८०) २१ | १५० |
| ६ | प्रत्यु अदर्श्या | २५ | (,, ८१-१००) २० | १४५ |
| ७ | तिस्रो वाचः | ३३ | (,, १०१-१०४) ४ | ४४ |
| | | | (मं ८, १-४) ४ | १२१ |
| ८ | दूरादिहेव | ३६ | (,, ५-११) ७ | १८३ |
| एकूण ८ | | २३८ | १२९ | १२६३ |

## अष्टक सहावें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्त संख्या | | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | य इन्द्र | ४० | (मं ८, १२ ते २०) | ९ | २०६ |
| २ | वयमु त्वाम् | ४० | (,, २१-३१) | ११ | २०४ |
| ३ | प्र कृतान्यृत्तीषिण: | ४९ | (,, ३२-४५) | १४ | २५८ |
| ४ | त्वावतः | ५४ | (,, ४६-६७) | २२ | २६८ |
| ५ | आ त्वा रथं | ३८ | (,, ६८-८१) | १४ | १९५ |
| ६ | आ प्र द्रव | ३८ | (,, ८२-९७) | १६ | १९७ |
| ७ | इन्द्राय साम | ३९ | (मं ८, ९८-१०३) | ६ | ८४ |
| | | | (मं ९, १-१२) | १२ | ११४ |
| ८ | सोमः पुनानो | ३३ | (,, १३-४३) | ३१ | २०४ |
| एकूण ८ | | ३३१ | | १३५ | १७३० |

## अष्टक सातवें

| अध्याय | मंत्र-प्रारंभ | वर्ग | सूक्तसंख्या | | मंत्रसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्र ण इन्दो | ४१ | (मं ९, ४४-६४) | २१ | २०० |
| २ | हिन्वन्ति | ३३ | (,, ६५-७५) | ११ | १६३ |
| ३ | धर्ता दिवः | २६ | (,, ७६-९०) | १५ | १३५ |
| ४ | असर्जि वक्वा | २८ | (,, ९१-१००) | १० | १३८ |
| ५ | पुरोजिती वो | ३३ | (मं ९, १०१-११४) | १४ | १५४ |
| | | | (मं १०, १-५) | ५ | ३५ |
| ६ | अयं स यस्य | २८ | (,, ६-१८) | १३ | १४१ |
| ७ | नि वर्तध्वं | ३० | (,, १९-३२) | १४ | १५३ |
| ८ | प्र मा युयुज्रे | २९ | (,, ३३-४५) | १३ | १४४ |
| एकूण ८ | | २४८ | | ११६ | १२६३ |

## अष्टक आठवें

| अध्याय | मंत्रप्रारंभ | वर्ग | सूक्तसंख्या | | मंत्रसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्र होता | ३० | (मं १०, ४६-६१) | १६ | १६१ |
| २ | ये यज्ञेन | २४ | (,, ,, ६२-७१) | १० | १३३ |
| ३ | देवानां नु | २८ | (,, ७२-८५) | १४ | १४८ |
| ४ | वि हि सोतोः | ३१ | (,, ८६-९४) | ९ | १६० |
| ५ | हये जाये | २७ | (,, ९५-१०५) | ११ | १४९ |
| ६ | उभा उनूनं | २७ | (,, १०६-११९) | १४ | १४० |
| ७ | तदिदास | ३० | (,, १२०-१४२) | २३ | १७२ |
| ८ | त्यं चिदत्रिमृ | ४९ | (,, १४३-१९१) | ४९ | २१८ |
| एकूण ८ | | २४६ | | १४६ | १२८१ |

## अष्टकवार तपशील

| अष्टक | अध्याय | वर्ग | सूक्त संख्या | मंत्र संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | ८ | २६५ | १२१ | १३७० |
| २ | ८ | २२१ | ११९ | ११४७ |
| ३ | ८ | २२५ | १२२ | १२०९ |
| ४ | ८ | २५० | १४० | १२८९ |
| ५ | ८ | २३८ | १२९ | १२६३ |
| ६ | ८ | ३३१ | १३५ | १७३० |
| ७ | ८ | २४८ | ११६ | १२६३ |
| ८ | ८ | २४६ | १४६ | १२८१ |
| एकूण ८ | ६४ | २०२४ | १०२८ | १०५५२ |

ही वरील मांडणी अष्टक, अध्याय, वर्ग, सूक्तसंख्या व मंत्रसंख्या अशा पद्धतीनें दाखविण्यांत आली आहे. आतां मंडलवार मांडणी पुढील-प्रमाणें आहे.

# मंडलवार वर्गीकरण

## मंडल पहिलें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | अग्निमीळे | (१-३) | ३ | ३० |
| २ | सुरूपकृत्नुमूतये | (४-७) | ४ | ४० |
| ३ | एन्द्र सानसिं | (८-११) | ४ | ४० |
| ४ | अग्निं दूतं | (१२-१७) | ६ | ६६ |
| ५ | सोमानं स्वरणं | (१८-२३) | ६ | ७७ |
| ६ | कस्य नूनं | (२४-३०) | ७ | ९७ |
| ७ | त्वमग्ने प्रथमो | (३१-३५) | ५ | ७१ |
| ८ | प्र वो यव्हं | (३६-४३) | ८ | ९६ |
| ९ | अग्ने विवस्वद् | (४४-५०) | ७ | ८२ |
| १० | अभि त्यं मेषं | (५१-५७) | ७ | ७२ |
| ११ | नू चित् सहोजा | (५८-६४) | ७ | ७४ |
| १२ | पश्वा नु तायुं | (६५-७३) | ९ | ९१ |
| १३ | उपप्रयन्तो | (७४-८४) | ११ | ९८ |
| १४ | प्र ये शुम्भन्ते | (८५-९३) | ९ | १०६ |
| १५ | इमं स्तोममर्हते | (९४-१०५) | १२ | १२५ |
| १६ | इन्द्रं मित्रं | (१०६-११५) | १० | १०७ |
| १७ | नासत्याभ्यां | (११६-१२०) | ५ | ८३ |
| १८ | कदित्था नॄँः | (१२१-१२६) | ६ | ७० |
| १९ | अग्निं होतारं | (१२७-१३३) | ७ | ६० |
| २० | आ त्वा जुवो | (१३४-१३९) | ६ | ४० |
| २१ | वेदिषदे | (१४०-१५६) | १७ | ११९ |
| २२ | अबोध्यग्नि | (१५७-१६४) | ८ | १२३ |
| २३ | कया शुभा | (१६५-१७९) | १५ | १२४ |
| २४ | युवो रजांसि | (१८०-१९१) | १२ | ११५ |
| एकूण २४ | | | १९१ | २००६ |

## मंडल दुसरें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| २५ (१) | त्वमग्ने द्युभिः | (१-११) | ११ | ११० |
| २६ (२) | यो जात एव | (१२-२२) | ११ | १०५ |
| २७ (३) | गणानां त्वा | (२३-३२) | १० | १०५ |
| २८ (४) | आ ते पितः | (३३-४३) | ११ | १०९ |
| एकूण ४ | | | ४३ | ४२९ |

## मंडल तिसरें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| २९ (१) | सोमस्य मा | (१-१२) | १२ | १४० |
| ३० (२) | प्र वो देवाय | (१३-२९) | १७ | ११८ |
| ३१ (३) | इच्छन्ति त्वा | (३०-३८) | ९ | १२८ |
| ३२ (४) | इन्द्रं मतिर्हृद | (३९-५३) | १५ | १२३ |
| ३३ (५) | इमं महे | (५४-६२) | ९ | १०८ |
| एकूण ५ | | | ६२ | ६१७ |

## मंडल चौथें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ३४ (१) | त्वां ह्यग्ने | (१-१०) | १० | १३२ |
| ३५ (२) | भद्रं ते अग्ने | (११-२१) | ११ | १२० |
| ३६ (३) | यन्न इन्द्रो | (२२-३२) | ११ | १२६ |
| ३७ (४) | प्र ऋभुभ्यो | (३३-४५) | १३ | १११ |
| ३८ (५) | अग्रं पिबा | (४६-५८) | १३ | १०० |
| एकूण ५ | | | ५८ | ५८९ |

## मंडल पांचवें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ३९ (१) | अबोध्यग्निः | (१-१४) | १४ | १२३ |
| ४० (२) | प्र वेधसे | (१५-३२) | १८ | १३० |
| ४१ (३) | महि महे | (३३-४४) | १२ | १२७ |
| ४२ (४) | विदा दिवो | (४५-५६) | १२ | १२३ |
| ४३ (५) | आ रुद्रासः | (५७-७२) | १६ | ११० |
| ४४ (६) | यदद्य स्थः | (७३-८७) | १५ | ११४ |
| एकूण ६ | | | ८७ | ७२७ |

## मंडल सहावें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ४५ (१) | त्वं ह्यग्ने | (१-१५) | १५ | १२५ |
| ४६ (२) | त्वमग्ने यज्ञानां | (१६-२३) | ८ | १३७ |
| ४७ (३) | वृषा मदः | (२४-४३) | २० | ११७ |
| ४८ (४) | यो रयिवो | (४४-४९) | ६ | १३९ |
| ४९ (५) | हुवे वो | (५०-६१) | १२ | १२९ |
| ५० (६) | स्तुषे नरा | (६२-७५) | १४ | ११८ |
| एकूण ६ | | | ७५ | ७६५ |

## मंडल सातवें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ५१ (१) | अग्निं नरो | (१-१७) | १७ | १४५ |
| ५२ (२) | त्वे ह यत् | (१८-३३) | १६ | १६१ |
| ५३ (३) | प्र शुक्रैतु | (३४-५५) | २२ | १४६ |
| ५४ (४) | क ईं व्यक्ता | (५६-७०) | १५ | १४४ |
| ५५ (५) | अप स्वसुः | (७१-८९) | १९ | ११९ |
| ५६ (६) | प्र वीरया | (९०-१०४) | १५ | १२६ |
| एकूण ६ | | | १०४ | ८४१ |

## मंडल आठवें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र संख्य |
|---|---|---|---|---|
| ५७ (१) | मा चिदन्यत् | (१-५) | ५ | १६० |
| ५८ (२) | महाँ इन्द्रो | (६-१२) | ७ | १७७ |
| ५९ (३) | इन्द्रः सुतेषु | (१३-२०) | ८ | १७३ |
| ६० (४) | वयमु त्वाम् | (२१-३०) | १० | १८६ |
| ६१ (५) | यो यजाति | (३१-४२) | १२ | १७१ |
| ६२ (६) | इमे विप्रस्य | (४३-४८) | ६ | १७१ |
| | वाल खिल्य सूक्ते | (४९-५९) | ११ | ८० |
| ६३ (७) | अग्न आ | (६०-६९) | १० | १५९ |
| ६४ (८) | यो राजा | (७०-८०) | ११ | १४९ |
| ६५ (९) | आ तून | (८१-९३) | १३ | १४९ |
| ६६(१०) | गौर्धयति | (९४-१०३) | १० | १४१ |
| एकूण १० | | | १०३ | १७१६ |

## मंडल नववें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ६७ (१) | स्वादिष्ठया | (१-२४) | २४ | २०४ |
| ६८ (२) | पवस्व दक्ष | (२५-६०) | ३६ | १९४ |
| ६९ (३) | अया वीती | (६१-६७) | ७ | २१२ |
| ७० (४) | प्र देवमच्छा | (६८-८५) | १८ | १२८ |
| ७१ (५) | प्र त आशव: | (८६-९६) | ११ | १२९ |
| ७२ (६) | अस्य प्रेषा | (९७-१०३) | ७ | ११७ |
| ७३ (७) | सखाय आ | (१०४-११४) | ११ | १२४ |
| एकूण ७ | | | ११४ | ११०८ |

## मंडल दहावें

| अनुवाक | मंत्र-प्रारंभ | सूक्त-संख्या | | मंत्र-संख्या |
|---|---|---|---|---|
| ७४ ( १ ) | अग्ने बृहन्नु | ( १-१६ ) | १६ | १४८ |
| ७५ ( २ ) | त्वष्टा दुहित्रे | ( १७-२९ ) | १३ | १४६ |
| ७६ ( ३ ) | प्र देवत्रा | ( ३०-४२ ) | १३ | १४५ |
| ७७ ( ४ ) | अच्छा म | ( ४३-६० ) | १८ | १६८ |
| ७८ ( ५ ) | इदमित्था | ( ६१-६८ ) | ८ | १२६ |
| ७९ ( ६ ) | भद्रा अग्ने: | ( ६९-८४ ) | १६ | १३५ |
| ८० ( ७ ) | सत्येनोत्तभिता | ( ८५-९० ) | ६ | १४२ |
| ८१ ( ८ ) | सं जागृवद्भि: | ( ९१-९९ ) | ९ | १४३ |
| ८२ ( ९ ) | इन्द्र दृह्य | (१००-११२) | १३ | १४२ |
| ८३ (१०) | तमस्य द्यावा | (११३-१२८) | १६ | १४६ |
| ८४ (११) | नासदासीन्नो | (१२९-१५१) | २३ | १४४ |
| ८५ (१२) | शास इत्था | (१५२-१९१) | ४० | १६९ |
| एकूण १२ | | | १९१ | १७५४ |

## मंडलवार तपशील

| मंडल | मंत्रप्रारंभ | अनुवाक | सूक्त-संख्या | मंत्र-संख्या |
| --- | --- | --- | --- | --- |
| १ | अग्निमीळे | २४ | १९१ | २००६ |
| २ | त्वमग्ने द्युभिः | ४ | ४३ | ४२९ |
| ३ | सोमस्य मा | ५ | ६२ | ६१७ |
| ४ | त्वां ह्यग्ने | ५ | ५८ | ५८९ |
| ५ | अबोध्यग्निः | ६ | ८७ | ७२७ |
| ६ | त्वं ह्यग्ने | ६ | ७५ | ७६५ |
| ७ | अग्निं नरो | ६ | १०४ | ८४१ |
| ८ | मा चिदन्यद् | १० | १०३ | १७१६ |
| ९ | स्वादिष्ठया | ७ | ११४ | ११०८ |
| १० | अग्ने बृहन्तु | १२ | १९१ | १७५४ |
| एकूण १० | | ८५ | १०२८ | १०५५२ |

# ऋग्वेदाची ग्रंथसंपत्ति

ही जी आम्ही येथें माहिती दिली आहे, ती शौनकाचार्यकृत सर्वानुक्रमणीला धरून दिली आहे. याविषयीं शौनकाचार्य माहिती देतात ती अशीः—अध्यायानां चतुःषष्टिर्मंडलानि दशैव तु। वर्गाणां तु सहस्रे द्वे संख्याते च षळुत्तरे ॥ ३८ ॥ सहस्रमेतत्सूक्तानां निश्चितं खैलकैर्विना। दश सप्त च पठ्यन्ते संख्यातं वै पदक्रमम् ॥ ३९ ॥ शाकलोक्त ऋग्वेदांत एकंदर ६४ अध्याय, दहा मंडलें, दोन हजार सहा वर्ग व दहाशें सतरा सूक्तें असून, त्यांत खिलांचा समावेश झालेला नाहीं. आठव्या मंडळांत खैलिक अठरा वर्ग म्हणजे अकरा सूक्तें आहेत. हे वर्ग व सूक्तें वरील वर्गांत व सूक्तांत मिळविलीं म्हणजे २०२४ वर्ग व १०२८ सूक्तें अशी संख्या बरोबर जुळते.

इतकेंच नव्हे, तर ऋग्वेदांत किती ऋचा, किती पदें व किती अक्षरें आहेत याची सुद्धां मोजदाद करून ती नक्की करण्यांत आली असून, तेथें इतरांस हस्तक्षेप करून नसती ढवळाढवळ करण्याला मुळीं वावच ठेवण्यांत आली नाहीं ! तेथें ऋचांची, पदांची व अक्षरांची संख्या देण्यांत आली आहे ती अशीः—‘ ऋचां दशसहस्राणि ऋचां पंचशतानि च । ऋचामशीतिः पादश्च पारणं सम्प्रकीर्तितम् ॥ ४३ ॥ शाकल्यदृष्टे पदलक्षमेकं सार्धंच वेदे त्रिसहस्रयुक्तम् । शतानि चाष्टौ दशकं द्वयं च पदानि षट् चेति हि चर्चितानि ॥ ४४ ॥ चत्वारि वाव शतसहस्राणि द्वात्रिंशच्चाक्षर सहस्राणि द्वात्रिंशच्चाक्षर सहस्राणि ॥४५॥ शाकल्योक्त ऋग्वेदांत १०५८० ऋचा, १५३८२६ पदें (शब्द), व ४३२००० अक्षरें आहेत! इतक्या व्यवस्थित रीतीनें मोजदाद करून आजपर्यंत सुरक्षित राखलेला, प्राचीन, सुंदर व विशाल असा ज्ञानगर्भ ग्रंथराज या भूमंडलावर हा एवढा एकच आहे !! म्हणून त्याचें अलौकिकत्व व अद्वितीयत्व जगमान्य झालें असल्यास त्यांत नवल तें काय ?

याप्रमाणें अशी ही वर्गवार व मंडलवार ऋग्वेदाची मांडणी आहे. आतां त्यांत जीं सूक्तें आहेत, त्यांचे द्रष्टे कोण, कोणाला उद्देशून तीं गायिलीं आहेत व त्यांची धाटी कशी आहे, याविषयीं दोन शब्द लिहिल्यास तें अप्रस्तुत होणार नाहीं. म्हणून त्या सूक्तांची ऋषिवार, देवतावार, व छंदोवार माहिती पृथक्करण करून येथें देत आहें. येथें ऋषि हा शब्द मंत्रद्रष्टा या अर्थीं वापरलेला असून, त्याचा भावार्थ मंत्रकर्ता असें धरून चालण्यास हरकत नाहीं. ‘ यस्य वाक्यं स ऋषिः ’ ज्याचें वाक्य तो त्याचा ऋषि-असें सर्वानुक्रमाणिकेंत (२-४) म्हटलें आहे. अर्थात् तो मंत्र ज्याच्या नांवावर प्रथम प्रसिद्ध झाला म्हणजे ज्यानें तो गाऊन प्रथम प्रसिद्ध केला, तो त्याचा ऋषि होय. तसेंच त्या सूक्तांतील अगर सूक्तांतील ऋचेंतील वर्ण्य विषय ती त्या सूक्ताची अगर ऋचेची देवता. (‘या तेनोच्यते सा देवता’, २-५) आणि अक्षरांनीं परिमित असें जें पद्य, तें त्याचें छंद (धाटी) होय. (‘ यदक्षरपरिमितं तच्छन्दः’, २-६ ) मंत्राचा अर्थ समजून घ्यावयाचा असेल तर त्या मंत्राची देवता व छंद यांचें ज्ञान अवश्य हवें. त्याशिवाय

मंत्रार्थ सरळ व स्पष्ट समजूं शकत नाहीं. म्हणून ' अर्थेप्सवो ऋषयो देवताश्छन्दोभिरुपाधावन् ' (२-७), असें सर्वानुक्रमणींत कात्यायन ऋषींनीं चक्क सांगून ठेविलें आहे. ही एवढी प्राथमिक माहिती अगोदर देऊन, आतां सूक्तांचे ऋषिवार वर्गीकरणाकडे वळतों.

## ऋषिवार वर्गीकरण

ऋग्वेदांत सूक्तद्रष्टे म्हणून अनेक ऋषींचा उल्लेख असून, त्यांतील कांहीं महत्त्वाचीं नांवें तेवढींच येथें देत आहें. ऋषींच्या नांवांपुढें कंसांत जे आकडे दिले आहेत, ते त्या ऋषींची पूर्ण सूक्तांची संख्या समजण्यास हरकत नाहीं. ज्या सूक्तांचे ऋषी एकापेक्षां अधिक आहेत, अशा मिश्र-सूक्तांचा समावेश वरील सूक्तांत करण्यांत आला नाहीं.

( १ ) वसिष्ठ मैत्रावरुणि ( १०४ ), २ भरद्वाज बार्हस्पत्य ( ५९ ), ३ वामदेव गौतम, ( ५४ ), ४ विश्वामित्र गाथी ( ४६ ), ५ गृत्समद शौनक ( ३६ ), ६ दीर्घतमा औचथ्य ( २५ ), ७ अगस्त्य मैत्रावरुण ( २४ ), ८ गोतम राहूगण ( २१ ), ९ असित देवल ( २० ), १० कुत्स आंगिरस ( २० ), ११ मेधातिथि काण्व ( १८ ), १२ श्यावाश्व आत्रेय ( १७ ), १३ अत्रि भौम ( १४ ), १४ परुच्छेप दैवोदासि (१३), १५ त्रित आप्त्य ( १२ ), १६ कक्षीवान औशिज (११), १७ मधुच्छंद वैश्वामित्र ( ११ ), १८ अवत्सार काश्यप ( ९ ), १९ कण्व घौर (९), २० नोधा गौतम ( ९ ), २१ पराशर शाक्त ( ९ ), २२ प्रस्कण्व काण्व ( ९ ), २३ कवि भार्गव ( ८ ), २४ शुनःशेप आजीगर्ति (८), २५ कश्यप मारीच ( ७ ), २६ विमद ऐन्द्र ( ७ ), २७ सव्य आंगिरस ( ७ ), २८ हिरण्यस्तूप आंगिरस ( ७ ), २९ कृष्ण आंगिरस (६), ३० नृमेध आंगिरस ( ६ ), ३१ अयास्य आंगिरस ( ५ ), ३२ ऋजिश्वा भारद्वाज ( ५ ), ३३ कवष एलूष ( ५ ), ३४ मनु वैवस्वत ( ५ ), ३५ सोभरि काण्व ( ५ ), ३६ उशना काव्य ( ४ ), ३७ नाभाक काण्व ( ४ ), ३८ प्रजापति वैश्वामित्र ( ४ ), ३९ गाथी कौशिक (४), ४०

प्रभूवसु आंगिरस (४), ४१ वसुश्रुत आत्रेय ( ४ ), ४२ विश्वमना वैयश्व ( ४ ), ४३ शंयु बार्हस्पत्य ( ४ ), ४४ श्रुतबंधु गोपायन ( ४ ), ४५ सुतंभर आत्रेय ( ४ ), ४६ सोमाहुति भार्गव ( ४ ), ४७ इंद्र वैकुंठ (३), ४८ इरिम्बिठी काण्व (३), ४९ उचथ्य आंगिरस (३), ५० ऋजिश्वा भारद्वाज (३), ५१ ऋषभ वैश्वामित्र (३), ५२ कुरुसुति काण्व (३), ५३ कुसीदी काण्व (३), ५४ नारद काण्व (३), ५५ प्रजापति वैश्वामित्र (३), ५६ प्रियमेघ आंगिरस (३), ५७ बंधु गोपायन (३), ५८ बृहदुक्थ वामदेव्य (३), ५९ वत्सप्रि भालनंदन (३), ६० वसु भारद्वाज (३), ६१ वसुश्रुत आत्रेय (३), ६२ विरूप आंगिरस (३), ६३ हविर्धान आंगिरस (३), ६४ अम्बरीष (२), ६५ अग्नि सौचिक (२), ६६ अर्चनाना आत्रेय (२), ६७ अवस्यु आत्रेय (२), ६८ उत्कील कात्थ (२), ६९ उरुचक्रि आत्रेय (२), ७० कत वैश्वामित्र (२), ७१ गय आत्रेय (२), ७२ गय प्लात (२), ७३ गोपवन आत्रेय (२), ७४ गौरवीति शाक्त (२), ७५ घोषा कक्षीवती (२), ७६ जमदग्नि भार्गव (२), ७७ तिरश्री आंगिरस (२), ७८ नर भारद्वाज (२), ७९ नाभानेदिष्ठ मानव (२), ८० पवित्र आंगिरस (२), ८१ पायु भारद्वाज (२), पावक अग्नि (२), ८३ पुरुमीळ्ह सौहत्र (२), ८४ पौर आत्रेय (२), ८५ बभ्रु आंगिरस (२), ८६ बाहुवृक्त आंगिरस (२), ८७ बिंदु आंगिरस (२), ८८ बृहन्मति आंगिरस (२), ८९ भर्ग प्रगाथ (२), ९० मन्यु तापस (२), ९१ यजत आत्रेय (२), ९२ रातहव्य (२), ९३ रहूगण आंगिरस (२), ९४ रेभसूनु काश्यप (२), ९५ लुश धानाक (२), ९६ वत्स काण्व (२), ९७ वसुक्र ऐंद्र (२), ९८ वसुकर्ण वासुक्र (२), ९९ विश्वकर्मा भौवन (२), १०० वेन भार्गव (२), १०१ शंयु बार्हस्पत्य (२), १०२ शुनहोत्र भारद्वाज (२), १०३ सत्यश्रव आत्रेय (२), १०४ संवरण प्राजापत्य (२), १०५ सुतंभर आत्रेय (२), १०६ सुमित्र आत्रेय (२), १०७ सुहोत्र भारद्वाज (२), १०८ स्यूमरश्मि (२), १०९ हिरण्यस्तूप आंगिरस (२).

या प्रमाणें या सर्व ऋषींच्या नांवांवर मिळून एकूण ७२४ सूक्तें खर्ची पडलीं असून, इतर ऋषींचीं व मिश्रऋषींचीं मिळून बाकीचीं ३०४ सूक्तें आहेत. दोहोंची बेरीज केल्यास १०२८ ही सूक्तसंख्या ऋग्वेदांतील एकंदर सूक्तसंख्येशीं बरोबर जुळते.

वर ऋषींच्या नांवापुढें दिलेली संख्या ही पूर्ण सूक्तांचीं संख्या आहे. आतां येथें खालीं जे आंकडे देण्यांत आले आहेत, ते पूर्ण व मिश्र सूक्तांत मिळून येणाऱ्या त्या त्या ऋषींच्या एकंदर मंत्रसंख्येचे आहेत. कौंसांतील आंकडे हे मंत्रसंख्या दाखवितात.

### मंत्रसंख्यांचा तपशील

१ वसिष्ठ (८४८), २ भरद्वाज (५३२), ३ विश्वामित्र (५०१), ४ गृत्समद (३६६), ५ मेधातिथि (२७०), ६ दीर्घतमा (२४२), ७ वामदेव (२३९), ८ कुत्स (२२६), ९ अगस्त्य (२२०), १० गौतम (२१३), ११ श्यावाश्व (१८६), १२ असित (१६४), १३ कक्षीवान (१५१), १४ अत्रि (१३०), १५ सोभरि (११३), १६ मधुच्छंद (११२), १७ विश्वमना (१०९), १८ त्रित (१०६), १९ पराशर (१०५), २० कण्व (१०१), २१ परुच्छेप (१००), २२ प्रस्कण्व (९७), २३ शंयु (९३), २४ हिरण्यस्तूप (९१), २५ प्रियमेध (८९), २६ नोधा (८५), २७ विरूप (७९), २८ ऋजिश्वा (७७), २९ कश्यप (७१), ३० प्रजापति (७१). ३१ जमदग्नि (७०), ३२ सुकक्ष (६७), ३३ प्रजापति वैश्वामित्र (६६), ३४ विमद (६६), ३५ मनु (५९), ३६ कवष (५८), ३७ वत्स (५८), ३८ कृष्ण (५३), ३९ इरिंबिठि (४९), ४० अवत्सार (४७), ४१ नारद (४५), ४२ नृमेध (४५), ४३ पर्वत (४५), ४४ पायु (४४), ४५ वसुश्रुत (४४), ४६ अयास्य (४२), ४७ कवि (४०), ४८ बंधु (४०), ४९ विप्रबंधु (४०), ५० श्रुतबंधु (४०), ५१ नाभाक (३८), ५२ नाभानेदिष्ठ (३८), ५३ भर्ग (३८), ५४ भृगु (३८), ५५ प्रगाथ घौर (३६), ५६ कूर्म (३५), ५७ प्रगाथ घौर काण्व (३६), ५८ गय प्लात (३४), ५९ गौरवीति (३४), ६० उशना (३३), ६१ कुरुसुति (३३), ६२ बृहन्मति (३२), ६३ वत्सप्रि (३२), ६४ वसुक्त (३२), ६५ अंबरीष (३१), ६६ सोमाहुति (३१), ६७ तिरश्री (३०),

६८ वसुकर्ण (३०), ६९ इंद्र वैकुंठ (२९), ७० घोषा (२८), ७१ पावक (२८), ७२ लुश (२८), ७३ कुसीदी (२७), ७४ अग्नि सौचिक (२६), ७५ प्रभूवसु (२६), ७६ पवित्र (२५), ७७ सुतंभर (२४), ७८ ऋषभ (२३), ७९ हविर्धान (२३), ८० अवस्यु (२२), ८१ बृहदुक्थ (२१), ८२ अर्चनाना (२०), ८३ गाथी (२०), ८४ पौर (२०), ८५ वेन (२०), ८६ संवरण (१९), ८७ त्रिशिर (१८), ८८ बिंदु (१८), ८९ वसूयव (१८), ९० सत्यश्रव (१६), ९१ उचथ्य (१५), ९२ बभ्रु (१५), ९३ रेभसूनु (१५), ९४ वसु (१५), ९५ गय (१४), ९६ पुरुमीळ्ह (१४), ९७ मन्यु (१४), ९८ विश्वकर्मा (१४), ९९ उत्कील (१३), १०० (१३), १०१ पुरुमेध रहूगण (१२), १०२ कत (१०), १०३ नर १० (१०४), पुरु (१०), १०५ यजत (१०), १०६ शुनहोत्र (१०), १०७ सुहोत्र (१०).

दहाच्या खालीं असलेली संख्या विस्तारभयास्तव येथें देण्यांत आली नाहीं. याप्रमाणें वरील ऋषींच्या नांवावर मोडणारी मंत्र-संख्या ८२५५ भरते व इतर ऋषींची २२९७ असून, दोहोंची बेरीज ऋग्वेद मंत्रसंख्येशीं जुळते.

## देवतावार वर्गीकरण

आतां देवतावार वर्गीकरण देतों. १ इंद्र (१९९), २ अग्नि (१६८), ३ पवमान सोम (१११), ४ विश्वेदेव (६५), ५ अश्विन् (५७), ६ मरुत् (३०), ७ मित्रावरुण (१९), ८ उषा (१२), ९ ऋभु (१०), १० इंद्राग्नी (१०), ११ वैश्वानर अग्नि (१०) १२ वरुण (९), १३ पूषा (८), १४ आप्री (८), १५ द्यावापृथ्वी (८), १६ सविता (८), १७ सूर्य (६), १८ बृहस्पति (५), १९ इंद्रावरुण (५), २० वायु (४), २१ आदित्य (४), २२ आप (४), २३ भांववृत्त (४), २४ रुद्र (३), २५ विष्णु, (३), २६ ब्रह्मणस्पति (३), २७ सोम (३), २८ श्येन (३), २९ रक्षोहा अग्नि (३), ३० सरस्वती (३), ३१ आप (२), ३२ इंद्रा विष्णु (२), ३३ पर्जन्य (२), ३४ बृहस्पति (२), ३५ प्रजापति (२), ३६ मन्यु तापस (२), ३७ राजा (२), ३८ विश्वकर्मा (२), ३९ शकुंत (२).

याप्रमाणें देवतांची एकूण सूक्तसंख्या ७९९ असून इतर देवता व मिश्र देवता यांची मिळून २२९ आहेत. या दोहोंची बेरीज ऋग्वेदांतील एकंदर सूक्तसंख्येशीं म्हणजे १०२८ या संख्येशीं जुळते.

## छंदोवार वर्गीकरण

ऋग्वेदांत छंदांची संख्या पुढीलप्रमाणें आहे.

१ त्रिष्टुप् (३४१), २ गायत्री (१६१), ३ जगती (५४), ४ अनुष्टुप् (३८), ५ प्रगाथ (२४), ६ उष्णिक् (१३), ७ द्विपदाविराट (१०), ८ पंक्ति (९), ९ अत्यष्टि (६), १० महापंक्ति (३), ११ अस्तारपंक्ति (२), १२ बृहती (२), १३ विराट (२). एकूण ६५६ व इतर किरकोळ छंद व मिश्र छंद मिळून ३७२. दोन्हींची बेरीज ही १०२८ या सूक्तसंख्येशीं जुळते.

## विषयवार वर्गीकरण

यानंतर सूक्तांतील विषय वा विनियोग या अनुरोधानें जे त्याचे निरनिराळे वर्ग पडतात त्यांचेंहि याच हातानें थोडक्यांत दिग्दर्शन करून, मग अंतरंग निरीक्षणाकडे वळतों. ऋग्वेद हा मुख्यतः यज्ञांतील देवतांचा वर्णनपर, स्तवनपर व प्रार्थनापर असा महाग्रंथ असून, त्यांत मानवी जीवनोत्कर्षक व जीवनोपकारक अशा सुंदर व तेजस्वी प्रार्थना, जगाच्या बीजशक्तीचें विविध रूपांत वर्णन, प्रपंचांतील त्रस्त व ग्रस्त मनाला उत्साहवर्धक व शांतिदायक असे स्तवनपर सुंदर व तेजस्वी मंत्र मनोहर काव्यमय भाषेंत व्यवस्थित रीतीनें ग्रथित करून ठेवण्यांत आले आहेत. मधूनमधून वैदिक आर्यांच्या श्रेष्ठ तत्त्वज्ञानाचे व जागतिक अनुभवाचे सुरस व अर्थपूर्ण विचारहि ठिकठिकाणीं पेरून ठेवण्यांत आल्यामुळें, त्याला अधिकच मनोहर व मननीय स्वरूप प्राप्त झालें आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं. त्याचप्रमाणें कोठें कोठें मांत्रिक विषयहि आलेले असून, मधून मधून सृष्टिवर्णन, स्वभाववर्णन, प्रसंगवर्णन इत्यादिकांवरहि हळुवार हात फिरविण्यांत आला आहे. असो. या सर्वांचें सविस्तर वर्णन करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें, सूक्तांचें विषयवारीनें थोडक्यांत नामनिर्देश करीत जातों. या दृष्टीनें त्यांचें पृथक्करण अगर वर्गीकरण करावयाचें

झाल्यास तें पुढीलप्रमाणें करतां येईल. १ देवता सूक्तें, २ ध्रुपद सूक्तें, ३ कथा सूक्तें, ४ संवाद सूक्तें, ५ तत्त्वज्ञान सूक्तें, ६ संस्कार सूक्तें, ७ मांत्रिक सूक्तें, ८ लौकिक सूक्तें वगैरे वगैरे. यांची क्रमानें माहिती द्यावयाची म्हणजे ती अशी:—

१ **देवता सूक्तें**:—यांत ऋग्वेदांतील विविध देवदेवता म्हणजे इंद्र, अग्नि, वरुण, सूर्य, सविता, वायु, उषा, पूषा, आप, आश्विन, रुद्र, भग, विष्णु, मरुत्, विश्वेदेव, सरस्वती, वाक्, द्यावापृथिवी इत्यादिकांचीं रूप-स्वभाव, महात्म्य, वर्णनपर, स्तवनपर व प्रार्थनापर सूक्तें यांचा समावेश होतो. हीं सूक्तेंच फार आहेत. त्यांची संख्या फार मोठी असल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख स्थलाभावामुळें देण्याचें टाळलें आहे.

२ **ध्रुपद सूक्तें**:—ऋग्वेदांत ध्रुपद असलेलीं कांहीं सूक्तें आहेत. त्यांचा तपशील थोडक्यांत असा:—

**मंडल पहिलें**:—सूक्त १९ ( मरुद्भिरग्न आ गहि ), २८ ( उलूखलसुतानामवेदिन्द्र जल्गुलः), २९ (गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ), ७८ ( द्युम्नैरभि प्र णोनुमः ), ८० (अर्चन्ननु स्वराज्यम् ), ८२ (योजा न्विन्द्र ते हरी ) ९४ ( अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ), ९६ ( देवा अग्निं धारयन् ), ९७ ( अप नः शोशुचदघम् ), १०० (मरुत्वान्नो भवत्विन्द्रऊती), १०१ ( मरुत्वन्तं सख्याय हवामहे ), १०५ ( वित्तं मे अस्य रोदसी ), १०६ ( विश्वस्मान्नो अंहसो निष्पपर्तन), १०८ ( सोमस्य पिबतं सुतस्य), ११२ (ऊतिभिरश्विना गतम्), १८५ (द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात्), १८७ (वातापे पीव इद् भव), १९१ (हरिष्ठा मधु त्वा मधुला चकार ).

**मंडल दुसरें**:—सूक्त १२ ( स जनास इंद्रः ), १३ ( यस्ताकृणोः प्रथमं सास्युक्थ्यः ), १५ ( सोमस्य ता मद इंद्रश्चकार ), २२ ( सत्यमिन्द्रं सत्य इन्दुः ), २५ ( यंयं युजं कृणुते ब्रह्मणस्पतिः ).

**मंडल तिसरें**:—सूक्त ५५ ( महद्देवानामसुरत्वमेकम् ).

**मंडल पांचवें**:—सूक्त ६ ( इषं स्तोतृभ्य आभर ), ७२ ( नि बर्हिषि सदतं सोमपीतये ), ७५ ( माध्वी मम श्रुतं हवं ), ७८ ( हंसाविव पततमा सुताँ उप ), व ७९ ( सुजाते अश्वसूनृते ).

**मंडल ६ वें**:—सूक्त ४३ ( अयं स सोम इन्द्र ते सुतः पिब ).

**मंडल ७ वें**:—सूक्त ४९ ( आपो देवीरिह मामवन्तु ), ५० ( मा मां पद्येन रपसा विदत् त्सरुः ), व ८९ ( मृळा सुक्षत्र मृळय ).

**मंडल ८ वें**:—सूक्त ३६ ( मरुत्वाँ इन्द्र सत्पते ), ३९ ( नभन्तामन्यके समे ), ४० व ४१ ( नभन्तामन्यके समे ), ४७ ( अनेहसो व ऊतयः सुऊतयो व ऊतयः ), ६२ ( भद्रा इन्द्रस्य रातयः ), ७३ ( अन्ति षद्भूतु वामवः ), व ८५ ( मध्वः सोमस्य पीतये ).

**मंडल ९ वें**:— सूक्त ४ ( अथा नो वस्यसस्कृधि ) १८ ( मदेषु सर्वधा असि ), ११२, ११३ व ११४ ( इन्द्रायेन्दो परिस्रव ).

**मंडल १० वें**:—सूक्त २५ ( विवक्षसे ), ३६ ( तद्देवानाममवो अद्या वृणीमहे ), ४७ ( अस्मभ्यं चित्रं वृषणं रयिं दाः ), ५८ ( तत् त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ), ८६ ( विश्वस्मादिन्द्र उत्तरः ), १०० ( आ सर्वतातिमदितिं वृणीमहे ), ११९ ( कुवित् सोमस्यपामिति ), १२१ ( कस्मै देवाय हविषा विधेम ), १२६ ( अति द्विषः ), १३४ ( देवी जनित्र्यजीजनद्भद्रा जनित्र्यजीजनत् ), १५४ ( ताँश्चिदेवापि गच्छतात् ), १८२ ( अथाकरद्यजमानाय शं योः ) व १८७ ( स न पर्षदति द्विषः ).

या प्रमाणें अशीं हीं पालुपद असलेलीं अनेक सूक्तें ऋग्वेदांत इतस्ततः विखुरलेलीं असून, त्यांत कित्येक सुंदर व वाचनीय आहेत.

**३ कथा सूक्तें**:—प्राचीन काळांतील कथागोष्टींची त्रोटक माहिती देणारीं अशीं कांहीं सूक्तें इतस्ततः विखुरलेलीं असून, त्या पायावर पुढें ब्राह्मण ग्रंथांत सविस्तर आख्यायिका व उद्बोधक कथागोष्टी रचण्यांत आल्या आहेत. उदाहरणार्थ, दहाव्या मंडळांतील ९५ व्या सूक्तांत पुरूरवा-उर्वशी यांची संवादरूपानें त्रोटक हकीगत आली असून, त्या पायावर पुढें शतपथांत त्याचें सुंदर आख्यान गुंफण्यांत आलें आहे. ( श. प. ११-५-१ ते ९). त्याचप्रमाणें नाभानेदिष्ठाचें एक सूक्त(सू. ६२) त्याच मंडळांत आलें असून, त्यावर अधिक प्रकाश पाडणारी एक गोष्ट ऐतरेय ब्राह्मणांत संपूर्ण आली आहे. ( ऐ. ब्रा. ५-१४ ) शुनःशेपाची कथाहि पहिल्या मंडळांतील सूक्तांत अगदीं अल्पांशानें आली असून

तिचाच विस्तार ऐतरेय ब्राह्मणांत उत्तम रीतीनें करण्यांत आला आहे. पहिल्या मंडळांतील १५४व्या विष्णूच्या सूक्तावरून शतपथ ब्राह्मणांत वामनावताराची कथा सांगण्यांत आली आहे. (श.प. १-२-५-१ ते ७). त्याचप्रमाणें च्यवन-सुकन्या यांची गोष्ट झाली तरी ती अशीच आहे. (श.प.४-१-५-७) म्हणजे वेदांत बीजरूपानें आलेल्या कथागोष्टींचा ब्राह्मण ग्रंथांत विस्तार झालेला दिसून येतो. शिवाय इतिहास पुराणांतहि अशा गोष्टींचा विस्तार झालेला आढळून येतो. ऋग्वेदांत पुढील सूक्तें कथाआख्यानपर आहेत.

**मंडळ पहिलें**––सूक्त २४ (शुनःशेप कथा), सूक्त ८५ (गोतम कथा,) सूक्त १०५ (त्रित कथा). **मंडळ चौथें**––सूक्त १८ (अदिति-इन्द्र-वामदेव कथा ), सूक्त २६ व २७ ( वामदेव कथा ), **मंडळ ५ वें**—सूक्त ६१ ( श्यावाश्वाची कथा ), सूक्त ७८ ( सप्तवध्रीची कथा ), **मंडल ७ वें**—सूक्त १८, ३३ व ८३ ( दाशराज्ञयुद्ध कथा ), **मंडळ ८ वें**—सूक्त १४ ( नमुचि-वध कथा ), सूक्त ७८ ( वराहवध कथा ), ९६ ( कृष्णासुरवध कथा ), **मंडळ १० वें**—सूक्त १० ( यमयमी कथा ), सूक्त १७ ( सरण्यू कथा ), सूक्त ६१ ( नाभानेदिष्ठ कथा ), सूक्त ८५ ( सूर्याविवाह-कथा ) व सूक्त ९५ ( उर्वशी-पुरूरवा कथा ), वगैरे. अशीं हीं कथासूक्तें असून तीं अगदीं त्रुटक व अपूर्ण आहेत. तथापि संशोधनाच्या कामीं त्यांचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे. वरील कांहीं कथांचा ब्राह्मणांत व पुराणांत संपूर्ण विकास झालेला दिसतो.

४ **संवाद सूक्तें**:—ऋग्वेदांत कांहीं कांहीं संवाद सूक्तेंहि आढळतात. उदाहरणार्थ, पहिल्या मंडळांतील सूक्त १२६ ( रोमशाभावयव्य-संवाद, ) सूक्त १६५ ( अग्नि-मारुत-संवाद ), ( इंद्र-अगस्त्य-संवाद ), सूक्त १७९ ( अगस्त्य-लोपामुद्रा-संवाद ), तिसऱ्या मंडळांतील सूक्त ( विश्वामित्र-नदी-संवाद ), दहाव्या मंडळांतील सूक्त १० ( यम-यमी-संवाद ), सूक्त २८ ( इंद्रवसुक्रपत्नी-संवाद), सूक्त ५१ (देव-अग्नि-संवाद), सूक्त ८६ ( इंद्र-इंद्राणी-वृषाकपि-संवाद ), सूक्त ९५ ( उर्वशी-पुरूरवा-संवाद ), सूक्त १०२ ( इंद्र-मुद्गल-संवाद ), सूक्त १०८ (सरमापणी-संवाद ). इत्यादि.

अशीं हीं संवादसूक्तें असून त्यांत अगस्त्य-लोपामुद्रा-संवाद, यम-यमी संवाद, इंद्र-इंद्राणी-वृषाकपि-संवाद, उर्वशी-पुरूरवा-संवाद, सरमा-पणी-संवाद हीं विशेष उद्बोधक व मननीय आहेत.

५ **तत्त्वज्ञान सूक्तें:**—ऋग्वेदाचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करीत गेल्यास त्यांत उत्तरकालीन उपनिषद्-विद्येचीं सुंदर तत्त्वें बीजरूपानें गर्भित असलेलीं सहज व स्पष्ट आढळून येतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदांत अनेक देव असून त्यांचीं वर्णनेंहि निरनिराळीं आहेत आणि वरवर पाहणाऱ्याला त्यावरून वैदिक धर्म अनेक-देवतात्मक आहे अशी भावना होते. आणि अशीच गोष्ट पाश्चिमात्य पंडितांचीहि झाली आहे. पण जरा सूक्ष्म दृष्टीनें शोधूं लागल्यास तो समज अन्यथा ठरून वेदांतील अंतिम देव हा एकच एक आहे–'द्यावा पृथिवी जनयन् देव एकः'–अशी खात्री पटल्यावांचून रहात नाहीं. आतां प्रत्यक्ष उदाहरण देऊनच हें स्पष्ट सांगावयाचें झाल्यास ही पुढील ऋचा मननीय आहे. 'इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्। एकं सद् विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः' (१-१६४-६) भावार्थ, इंद्र, मित्र, वरुण, अग्नि, अशा निरनिराळ्या नांवांनीं संबोधिला जाणारा असा तो सुंदर पंखाचा एक दिव्य गरुड पक्षी आहे. हा वस्तुतः एकच असून सूज्ञ लोक त्यालाच अग्नि, यम, मातरिश्वा अशा निरनिराळ्या नांवानें आळवितात. असाच प्रकार 'यो देवेष्वधि देव एक आसीत्' (१०-१५८-८), 'एक इत् राजा जगतो बभूव' (१०-१२१-३), 'यो देवानां नामधा एक एव' (१०-८२-३), 'द्यावा पृथिवी जनयन् देव एकः' हीं व अशा प्रकारचीं वचनें डोळे उघडून पाहणाऱ्याला ऋग्वेदांत कितीतरी दिसतील. पण इतक्या खोल पाण्यांत शिरण्याची तसदी घेतो कोण! वेदनारायण स्पष्ट व चक-चकीत बोलून गेला आहे कीं जो चांगला डोळस आहे, तोच मला पाहूं म्हणजे जाणूं शकतो. आंधळ्याला–अज्ञान्याला–तें शक्य नाहीं. ('पश्यदक्षण्वान् न वि चेतदन्धः' १-१६४-१६).

हीं पुढील तत्त्वज्ञानपर सूक्तें १-१६४, ४-२६ व २७, १०-७२, १०-९०, १०-१२१, १०-१२५, १०-१२९, १०-१९०, ऋग्वेदांत असून तीं

विचारवंतांना मोठीं मार्गदर्शक व विचारप्रवर्तक अशीं आहेत. हीं सर्व सूक्तें आमच्या 'ऋग्रत्न भांडारां'त सार्थ दिलेलीं आहेत. वाचकांनीं त्यावरून नजर फिरविल्यास त्यांचा दूषित ग्रह खास वितळून जाईल अशी आमची खात्री आहे. हीं सूक्तें इतकीं ज्ञानगर्भ आहेत कीं, आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें त्यांचा विस्तार करूं गेल्यास एकेका सूक्तावर एकेक सुंदर ग्रंथच होणार आहे. असो.

६ **संस्कार सूक्तें**:—वेदाचा अवतार वस्तुतः व प्रमुखत: श्रौत म्हणजे त्रैताग्नि कर्मानुष्ठानाप्रीत्यर्थंच झालेला असला तरी त्यांतील कांहीं सूक्तें व मंत्र गृह्यसंस्कारांतहि समाविष्ट करण्यांत आलीं आहेत. उदाहरणार्थ दहाव्या मंडळांतील ८५ वें सूक्त आज आमच्या विवाहसंस्कारांत प्रामुख्यानें उपयोगण्यांत येत आहे. मूळ ग्रंथांत तें सूक्त सूर्याविवाह वर्णन करण्यासाठीं म्हणून घातलेलें असून त्यांतील अनेक मंत्र आज आमच्या विवाहाच्या निरनिराळ्या प्रसंगीं म्हणण्यांत येतात. वधूचें पाणिग्रहण, लाजाहोम, ध्रुवदर्शन, गृहप्रवेश, चतुर्थीकर्म इत्यादि प्रसंगांत म्हणावयाचे मंत्र सगळे या सूक्तांतीलच आहेत. अशीं सूक्तें ऋग्वेदांत पुढीलप्रमाणें आहेत. दहाव्या मंडळांतील सूक्त ९ (स्नान व मार्जन), सूक्त १५ (श्राद्धप्रयोग), सूक्त १६ व १८ (प्रेतकर्म), सूक्त १९ व ६२ (उपनयन), सूक्त ८५ (विवाह), सूक्त १८४ (गर्भाधान), सूक्त १९० (अघमर्षण) इत्यादि सूक्तांचा गृह्यसंस्कारांतहि विनियोग करण्यांत आला आहे. या सर्व सूक्तांचा अर्थ व विनियोग आमच्या ऋग्रत्न भांडारांत यथास्थानीं दिलाच आहे. शिवाय गृहकृत्यांत विविध प्रसंगीं म्हणावयाच्या मंत्रांची लांब लचक यादीहि ग्रंथाच्या शेवटीं देण्यांत आली असून, ती वेदप्रेमी व वेदजिज्ञासू वाचकांना मोठी मननीय व उपयुक्त अशी आहे.

७ **मांत्रिकी-सूक्तें**:—मनुष्याच्या जीवनांत नाना तऱ्हेचे दुष्ट व अनिष्ट प्रसंग उद्भवून ते त्यास केव्हां केव्हां रात्रंदिवस बैचेन व बेजार करीत असतात. लौकिक उपायानें त्यांचा परिहार होण्यासारखा नसतो. अशा वेळीं अलौकिक उपायांचा अवलंब करणें अपरिहार्य होऊन बसतें. तशा प्रसंगीं उपयोगावयाचीं अशीं कांहीं सूक्तें ऋग्वेदांत आहेत. उदाहरणार्थ, नाना

प्रकारचे रोग, आधिव्याधि, पीडाबाधा, यांचा परिहार व्हावा, अपशकुन व दुष्ट स्वप्नें यांची बाधा टळावी, जारण-मारण, चेटूक-माटूक, भूत-पिशाच इत्यादिकांचें निवारण व्हावें, तसेंच शत्रूचा पराजय व्हावा, सर्पादि विषारी प्राण्यांची विषबाधा टळावी, आपल्या वाईटावर टपलेल्या व्यक्तीचा नाश व्हावा, एतदर्थ अशा सूक्तांचा उपयोग करण्याचा प्राचीन परिपाठ असावा असें दिसतें. अशीं सूक्तें ऋग्वेदांत कांहीं पुढीलप्रमाणें आहेत. पहिल्या मंडळांतील सूक्त १९१, (विषबाधा), दुसऱ्या मंडळांतील सूक्तें ४२ व ४३ ( अपशकुन-नाश व शुभशकुन होणें ), दहाव्या मंडळांतील सूक्त १४५ ( सपत्नी-बाधा ), सूक्त १५५ ( अलक्ष्मी नाश ), सूक्त १६१ ( राजयक्ष्मा नाश ), सूक्त १६३ ( यक्ष्मा नाश ), सूक्त १६४ ( दुःस्वप्न-नाश ), व सूक्त १६६ ( सपत्न म्हणजे शत्रु नाश ). हीं अशीं सूक्तें मांत्रिकांत गणलीं जातात. या सर्व सूक्तांचा समावेश आमच्या ' ऋगरत्न-भांडारांत करण्यांत आला आहे.

**८ लौकिक सूक्तें**:—केवळ प्रपंचांतील लोकव्यवहाराला अनुसरून असलेला सूक्तांचा संग्रहहि ऋग्वेदांत झालेला दिसून येतो. त्यांतील हीं पुढील सूक्तें विशेष मननीय आहेत. दहाव्या मंडळांतील सूक्त १७३ व १७४ हीं सूक्तें राजकारणांत मननीय आहेत. वैदिक आर्यांची राजाविषयीं कोणती भावना होती व त्याला राज्यपदावर कोणी चढविलें याची त्या सूक्तांवरून स्पष्ट कल्पना येते. ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें आहे कीं राजाला प्रजेनें उदयास आणलें आहे. ('आ त्वाहार्षम् '-हे राजा ! तुला आम्हीं म्हणजे प्रजेनें येथें राज्यपदावर आणलें आहे. कशाकरतां तर आमचें रक्षण करण्याकरतां. इंद्राप्रमाणें त्यानें राज्यांत स्थिर राहून राष्ट्राचें रक्षण करावें. (' इन्द्र इवेह ध्रुवस्तिष्ठेह राष्ट्रमुधारय' १०-१७३-२; व 'राष्ट्रं धारयतां ध्रुवम्' १-१७३-५) आणि आमच्या रक्षणासाठीं आम्ही तुला बलि म्हणजे कर देत जाऊं असें इंद्र देव करो ! ( 'अथो त इन्द्रः केवलीर्विशो बलिहृतस्करत् ' १०-१७३-६). राजा होण्याला प्रजेची अनुमति पाहिजे अशी स्पष्ट घोषणा शतपथांत चक्क सांगण्यांत आली आहे. ('यस्मै वै राजानो राज्यमनुमन्यन्ते स राजा भवति। न स यस्मै न ' श. प. ९-४-१-१) असो.

आतां दुसरें जें सूक्त आहे तें तितकेंच महत्त्वाचें आहे. त्यांत स्त्री-स्वभावाचें वर्णन आहे. तें सूक्त म्हणजे पुरूरवा व उर्वशी यांचें संवादात्मक असून तेथें उर्वशीनें स्त्रियांचा यथार्थ स्वभाव ' न वै स्त्रैणानि सख्यानि' ( स्त्रीचें सख्य हें सख्यच नव्हे ! ) व ' सालवृकाणां हृदयान्येता ' ( या स्त्रिया म्हणजे लांडगीच्या हृदयाच्या आहेत. १०-९५-१५ ) या शब्दांत स्पष्ट केला आहे. त्याचप्रमाणें इंद्रानेंहि या स्त्रियांना उद्देशून आपला कौल दिला आहे कीं स्त्रीचें मन ताब्यांत ठेवणें हें अशक्य आहे ! ( स्त्रिया अशास्यं मन: ' ८-३३-१७ ) आणि त्यांची बुद्धीहि तितकीच पण कोती आहे. ( ' उतो अह ऋतुं लघुम् ' ८-३३-१७ ). हा जो स्त्री-स्वभाव सांगितला तो सामान्य स्त्रियांचा असून, त्याला अपवादात्मक अशाहि स्त्रिया असतात. एके ठिकाणीं स्त्रीला गृहदेवताहि म्हटलें आहे. ( ' जायेद् अस्तम्,' जाया म्हणजेच घर होय !) 'न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते-हें मनुजीचें वचन प्रसिद्धच आहे. असो.

यानंतर तिसरें लौकिक सूक्त म्हणजे जुगाराचें. या सूक्तांत जुगाऱ्याची हीनदीन स्थिति व दुर्दशा ही अगदीं बेमालूमपणें वर्णन करण्यांत आली आहे. तें सूक्त सांगतें कीं जुगाऱ्याला फांशाशिवाय कांहींच प्रिय वाटत नाहीं, तो आपल्या सुशील पत्नीचा छळ करावयास कचरत नसून तिचा पदोपदीं अपमान करतो. त्याची ही विरही स्त्री बिचारी रात्रंदिवस सारखी झुरत असते व शेजारच्या बायका सुखानंदांत नांदत असलेल्या पाहून, तिचें मन दुःखानें करपून जातें. जुगाऱ्याला कोणीच पुसत नाहींत व सर्वच त्याचा द्वेष करतात. आईबापसुद्धां त्याचा तिरस्कार करून त्याला दूर लोटून देतात. हें जुगाऱ्याचें व्यसन इतकें दुर्दम्य असतें कीं कितीहि त्यास पश्चात्ताप झालेला असला तरी रात्र झाली कीं, जुगाऱ्याच्या अड्याकडे धांवण्याचा मोह तो आवरूं शकत नाहीं. अखेर तो पैसे संपले म्हणजे रात्रीं लोकांच्या घरीं शिरून चोऱ्या करावयासहि कमी करीत नाहीं ! ( १०-३४ ). हें अक्षक्रीडेचें वर्णन इतकें यथार्थतया रेखाटलें आहे कीं, त्याची सत्यता आज देखील जुगाऱ्याच्या घरीं पहावयास मिळते. असो.

आणखी एक सूक्त असेंच मननीय आहे. तें म्हणजे दहाव्या मंडळां-

तील यम-यमी-संवाद हें होय. या सूक्तांत स्त्रीपुरुषांच्या अनिर्बंध लैंगिक व्यवहाराविषयीं मानवी अंतःकरणांत उदय पावलेली संयमात्मक नीति-भावना स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेली दिसून येते. तेथें यमी ही आपल्या भावाला म्हणजे यमाला आपल्याशीं एकांत करण्यास परोपरीनें विनवून पाहते. पण यम हा मनाचा संयम करून तिच्या प्रेमयाचनेचा तितक्याच तीव्रतेनें धिक्कार करतो. या सूक्तांत यमाचें मन वळविण्याकरतां यमीनें केलेली विचारसरणी मोठी ठसकेबाज असून ती कामविव्हल स्त्री-हृदयाची स्वाभाविक कल्पना करून देण्यास पुरेशी आहे. पुरुषांत विवेक जागृत झाल्यावर तो संयमी कसा होतो याचें यम हें उत्कृष्ट उदाहरण आहे. ऋ. १०-१०).

त्याच्याच जोडीला आणखी एक येथें नमूद करण्यासारखें सूक्त म्हणजे 'सरमा-पणी-संवाद' हें होय. सेवाधर्माचें सुंदर प्रतीक म्हणून तें निस्पृह सेवा वृत्तीचें अत्यंत मननीय असें सूक्त आहे. पणींनीं बृहस्पतीच्या गाई चोरून नेऊन त्या त्यांनीं आपल्या येथें एका डोंगराच्या गुहेंत दडवून ठेविल्या. बृहस्पतीनें ही गोष्ट इंद्रास कळविल्यावरून इंद्रानें त्या गाईंचा पत्ता लावण्यासाठीं सरमेची योजना केली. ती शोधत शोधत पणींनीं गायी लपवून ठेविलेल्या जागीं गेली. तेथें पणींनीं तिला परत इंद्राकडे पाठवूं नये म्हणून तिला तेथेंच बहीण होऊन राहण्यासाठीं पुष्कळ आर्जवून पाहिलें व तिला कांहीं लांचहि देण्याचें आमिष दाखविलें. पण सरमा ही हाडाची प्रामाणिक व सेवावृत्तींत पूर्ण दक्ष व जागृत असल्यामुळें तिनें कसल्याहि आमिषाला-लांचलुचपतीला-भीक घातली नाहीं. तिनें त्या वेळीं काढलेले उद्गार मोठे मननीय आहेत. ती म्हणाली, पणींनो! मी भाऊपणाहि जाणत नाहीं व बहीणपणाहि जाणत नाहीं! ( नाहं वेद भ्रातृत्वं नो स्वसृ-त्वम्' १० १०८-१० ) आणि अखेर तिनें स्वकर्तव्यास जागून इंद्रास जाऊन वर्दी दिली.

आतां जातां जातां आणखी एक महत्त्वाच्या सूक्ताचा उल्लेख करून या विषयास पूर्णविराम देतों. तें सूक्त म्हणजे अन्नदान सूक्त होय. त्या सूक्ताचा भावार्थ असाः—अन्नाची इच्छा धरून घरीं आलेल्या अन्नार्थी

मनुष्याला जो अन्नदान करतो तोच खरा दाता होय! असा जो दाता आहे त्यालाच देव वश होतात व शत्रु त्याचे मित्र बनतात! जो आपल्या मित्रास घरीं जेवूंखावूं घालीत नाहीं, तो मित्र तरी कसला ! (' न स सखा यो न ददाति सख्ये ') १०-११७-४ आणि अशा कृपणाचें घर तें घर तरी कसलें ! जो संपन्न व धनवान् आहे, अशा भाग्यवंतानें द्रव्याची याचना करीत घरीं आलेल्या धनार्थीला यथाशक्ति धनदान करून त्यास संतुष्ट करावें. पहा, धांवत्या रथाचीं चाकें जशीं वरखालीं फिरत असतात तद्वत् ही लक्ष्मी झाली तरी एकाला सोडून दुसऱ्याकडे, त्याला सोडून तिसऱ्याकडे अशी सारखी फिरत असते. ' ओ हि वर्तन्ते रथ्येव चक्राऽन्यमन्यमुप तिष्ठन्त रायः॥' १०-११७-५ जो कृपण स्वभावाचा खाष्ट पुरुष आहे, त्याला संपत्ति मिळणें हें खरोखर व्यर्थ आहे. त्याचें तें अन्न म्हणजे केवळ त्याचा मृत्युच होय ! ('मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य' १०-११७-६) आणि जो साधुसंतांना, इष्ट मित्रांना, गोरगरीबांना मुळींच मदत करीत नाहीं, तो कवडीचुंबक केवळ पापी चांडाळच होय ! ( ' नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी' १०-११७-६) जो आज गरीब आहे तो उद्योग करून उद्यां श्रीमंत होतो व जो आज श्रीमंत आहे तोच कालांतरानें आळशीं होऊन व दैव फिरून दरिद्री बनतो ! म्हणून मीच काय तो श्रीमंत असा शहाण्यानें गर्व वाहूं नये ' अशा प्रकारच्या माहितीनें पूर्ण रंगलेलें हें सूक्त धनिकांनीं पूर्ण लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वरील सर्व सूक्तांचा संग्रह आमच्या ऋग्रत्न भांडारांत केला असून, तीं मूळ सूक्तें वाचकांनीं आपल्या नजरेखालून घालावींत अशी आमची सूचना आहे. असो. अशीं अनेक सूक्तें माहितीनें पूर्ण भरलेलीं ऋग्वेदांत ठिकठिकाणीं आढळून येतात. असा हा प्राचीन वैदिक आर्यांचा महान् ग्रंथराज, तो उदयोन्मुख महाराष्ट्रानें अवश्य संग्रहीं ठेवण्यास योग्य आहे, हें उघड सांगण्याचें कारणच नाहीं. भारतीय प्राचीन व प्रभावी संस्कृतीचा हा ऋग्वेद म्हणजे दिव्य असा एक महान् ज्ञानकोशच होय ! असें म्हटल्यास त्यांत चूक ती काय झाली ?



प्रकरण ३ रें

# ऋग्वेदाचें अंतरंग समालोचन

## देवता नामें

१ अग्नि १-१-१
२ अग्निमारुत १-१९-१
३ अग्निषोम १-९३-१
४ अदिति १-९४-१६
५ अपान्नपात २-३५-१
६ अर्यमा १-४१-७
७ अश्विन् १-२२-१
८ अश्विनौ १-३-१
९ आत्मा ४-४२-१
१० आदित्य २-२७-१
११ आप १०-९-१
१२ इन्द्र १-७-१
१३ इन्द्र वायु १-२-४
१४ इन्द्राग्नी १-२१-१
१५ इन्द्राणी १-२२-१२
१६ इन्द्रापूषन् ६-५५-१
१७ इन्द्रावरुण १-१७-१
१८ इन्द्राविष्णु ७-९९-४
१९ इन्द्रासोम १-१८-४
२० इळा ५-५-८
२१ उर्वशी १०-९५-२
२२ उषस् १-९४-१
२३ ऋत ४-२३-८
२४ ऋतु ३-२७-१
२५ ऋभू १-२०-१
२६ क १०-१२१-१
२७ क्षेत्रपति ४-५७-१
२८ गन्धर्व १०-१३९-४
२९ गौ १०-१६९-१
३० चन्द्रमस् १०-८५-१९
३१ जातवेद १-९९-१
३२ तनूनपात ३-२९-११
३३ तार्क्ष्य १०-१७८-१
३४ त्र्यम्बक ७-५९-१२
३५ त्वष्टा १-१५-३
३६ दधिक्रावन् ७-४४-१
३७ द्यु ६-५१-५
३८ द्यावापृथिवी १-२२-१३
३९ द्रविणोदस् १-१५-७
४० नदी १०-७५-१
४१ नराशंस ५-५-२
४२ नासत्य ४-४४-४
४३ निर्ऋती १०-५९-१
४४ परमात्मा १०-१२९-१

४५ **पर्जन्य** ५-८३-१
४६ पितर १०-१५-१
४७ पुरुष १०-९०-१
४८ **पुरुरवा** १०-९५-१
४९ **पूषन्** १०-२६-१
५० पृथिवी ५-८४-१
५१ पृश्नि ६-४८-२०
५२ प्रजापति १-२४-१
५३ **बृहस्पति** १-१३९-१०
५४ ब्रह्मणस्पति १-१८-१
५५ भग १-२४-५
५६ **मरुत्** १-३८-१
५७ मातरिश्वन् १-१६४-४६
५८ मित्र १-१५१-१
५९ मित्रावरुण १-२-७
६० यम ( यमीचा भाऊ ) १०-१०-२
६१ यम (देव) १०-१३५-१
६२ यमी १०-१०-१
६३ राका २-३२-४
६४ रात्रि १०-१२७-१
६५ **रुद्र** १-११४-१
६६ **वरुण** १-२५-१
६७ वरुणानी १-२२-१२
६८ वाच् ८-१००-१०
६९ **वायु** १-२-१
७० वास्तोष्पति ७-५४ १
७१ विश्वकर्मा १०-८१-१
७२ विश्वेदेव १-३-७
७३ **विष्णु** १-१५५-१
७४ वृषाकपि १०-८६-२१
७५ वैश्वानर ४-५-१
७६ सदसस्पति १-१८-६
७७ **सरण्यू** १०-१७-१
७८ **सरस्वती** १-३-२०
७९ सरस्वान १-१६४-५२
८० **सवितृ** १-२२-५
८१ सिंधु १-९४-६
८२ सिनीवालि २-३२-४
८३ सुपर्ण १-१६४-२०
८४ **सूर्य** १-५०-१
८५ सूर्या १०-८५-१६
८६ सृष्टि १०-१३०-१
८७ **सोम** १-९१-१
८८ सोमापूषन् २-४७-१
८९ सोमारुद्र ६-७४-१
९० हिरण्यगर्भ १०-१२१-१
वगैरे वगैरे

## देवता—वर्णन

(१) **अग्निः**—वैदिक धर्मांत अग्नीचें महत्त्व व प्राधान्य जितकें प्रामुख्यानें आहे, तितकें इतर देवांचें क्वचितच आढळून येतें. इन्द्राची गोष्ट तेवढी बाजूस ठेवली तर अग्नीचाच क्रमांक पुढें येतो. याचें कारणहि पण

उघडच आहे. मानवी जीवनाशीं नित्य संबंध असलेला असा देव म्हणजे हा अग्नि नारायणच होय. तो कौटुंबिक जीवनाचा मुख्य केंद्र म्हटला तरी चालेल. ‘ तपो वा अग्निः ’ व ‘ तेजो वा अग्निः ’ हीं अग्नीचीं शतपथांत वर्णिलेलीं दोन रूपें लक्षांत घेतल्यास, त्याचें महत्त्व जागतिक जीवनांत केवढें व किती आहे, हें निराळें सांगावयास नकोच. तो या भूमीवरचा प्रत्यक्ष देव आहे ! इतर कोणत्याहि देवापेक्षां त्याचा मानवी जीवनाशीं अति निकट संबंध येत असल्यामुळें, त्याच्यासारखा हितकारक व उपकारक असा या मर्त्यलोकांत दुसरा देवच नाहीं असें म्हटल्यास, त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं. ऋग्वेदांत तर त्याची स्तुति व वर्णन ऋषींनीं मोठ्या प्रेमानें व भक्तीनें केलेलें पावलोपावलीं आढळून येतें. त्याच्या प्रीत्यर्थ तेथें संपूर्ण अशीं कमी अधिक पावणे-दोनशें सूक्तें खर्ची पडलीं असून, शिवाय इतर देवतांबरोबरहि त्याचें गुणगान मुक्तकंठानें करण्यांत आलेलें आहे.

केवळ मनुष्यांचाच तो हितकर्ता आहे असें नसून, देवांचाहि तो तितक्याच प्रमाणांत उपकारकर्ता आहे. देवयजनांत प्रत्यक्ष संबंध त्याच्याशींच येतो. म्हणजे देवताप्रीत्यर्थ होणारीं होमहवनादि कार्यें त्याच्याशिवाय होत नसल्यामुळें त्याला वगळून कोणतीच देवतोपासना सिद्धीस जाऊं शकत नाहीं. आणि मानवमात्राच्या प्रापंचिक जीवनाशीं तर त्याचा नित्य व निकट संबंध असल्यामुळें वैदिक ऋषींनीं त्याला ‘ गृहपति ’ हा किताब दिला आहे तोहि यथायोग्यच आहे. आणि त्याच्याशिवाय कोणतेंहि धर्मकार्य होत नसल्यामुळें मनुष्याच्या धार्मिक जीवनांतहि त्याचा प्रत्यक्ष संबंध येतोच येतो. कारण देवांना अर्पण केलेला हविर्भाग त्या त्या देवांना अचूक नेऊन पोंचविणारा देव म्हणजे तो हा अग्नि एकच होय. शिवाय यज्ञशालेंत देवांना घेऊन येण्याची कामगिरी देखील त्याचीच आहे.

अर्थात् देव व मनुष्य यांचेमध्यें दूतकर्म करून दोघांचेंहि हित व कल्याण करणारा देव म्हणजे हा अग्निनारायणच होय, असें म्हटल्यास त्यांत कांहीं बिघडणार नाहीं. एवंच तात्पर्य काय तर या मृत्युलोकामध्यें वस्तीस येऊन राहिलेला असा जर कोणी स्वर्गीय देव असेल तर तो हा एक अग्निनारायणच होय ! इंद्र हा जसा मोठा योद्धा तसा अग्नि हा

गृहस्थांचा मोठा पुरोहित आहे. अर्थात् इंद्र हा राष्ट्रीय देव मानला तर अग्नि हा कौटुंबिक देव मानला पाहिजे. असो. याचें वर्णन ऋग्वेदांत आढळतें तें असें:—

**जन्म:**—अग्नीचा नैसर्गिक व कृत्रिम जन्म ऋग्वेदांत पुढीलप्रमाणें वर्णन करण्यांत आला आहे. अग्नीला आकाशानें जन्म दिला ('एनं अग्निं द्यौर्जनयत्' १०-४५-८ ) त्याला देवांनीं उत्पन्न केला. ( 'तं देवासो अग्निं जनयन्त' ३-२-३ ). तो द्यूचा पुत्र आहे ( दिवः सूनुः' ३-२७-८ ). तो पृथ्वीचा पुत्र आहे ( 'इळायास्पुत्रः' ३-२९-३ ). तो वनस्पतीचा पुत्र आहे ( 'सूनं वनस्पतीनां ८-२३-२५). तो बलाचा पुत्र आहे ('सहसस्पुत्रः'३-१४-१). त्याला माता उदकांनीं जन्म दिला ( 'तमापो अग्निं जनयन्त मातरः' १०-९१-६). तो घृतापासून जन्मतो ( 'घृतमस्य योनिः' २-३-११). त्याला मनुष्यांनीं निर्माण केला ('अग्निं नरो जनयता सुशेवम्' ३-२९-५). त्याला अरणीनें मंथनापासून उत्पन्न केला ( 'जनिष्टारणी धर्तारं मनुष्याणां विशामग्निम्' ५-९-३). तो सत्यापासून जन्मला ( 'ऋतजातः' १-१८९ -६). त्याला यज्ञांत ऋत्विजांनीं अरणींतून बोटांनीं घुसळून उत्पन्न केला ( 'अग्निं नरो दीधितिभिररण्योर्हस्तच्युती जनयन्त प्रशस्तम्' ७-१-१). त्वष्ट्याच्या दहा अंगुलींनीं त्याला जन्म दिला ( 'दशेमं त्वष्टुर्जनयन्त गर्भम्' १-९५-२). गुप्त असलेल्या अग्नीला मातरिश्वानें मंथन करून उत्पन्न केलें ( 'गुहा सन्तं मातरिश्वा मथायति' १-१४१-३ ). एकंदरींत त्याला स्वर्गानें, पृथ्वीनें, उदकानें, त्वष्ट्यानें, भृगूंनीं, मातरिश्व्यानें, देवांनीं मनूकरतां उत्पन्न केला. ( 'द्यावा यमग्निं पृथिवी जनिष्टामापस्त्वष्टा भृगवो यं सहोभिः। ईळेन्यं प्रथमं मातरिश्वा देवास्ततक्षुर्मनवे यजत्रम्' १०-४६-९). त्याचप्रमाणें तो पाण्यापासून, दगडापासून, लांकडापासून व ओषधी-पासूनहि जन्म पावतो ( 'त्वमद्भ्यस्त्वमश्मनस्परि । त्वं वनेभ्यस्त्वमोषधी-भ्यस्त्वं नृणां नृपते जायसे शुचिः'२-१-१). याप्रमाणें थोडक्यांत ही अशी ऋग्वेदांत अग्नीची उत्पत्ति सांगितली आहे. ती सर्वस्वी सत्य व शास्त्रशुद्ध नाहीं, असें कोण म्हणेल ?

**स्वरूप:**—( नैसर्गिक )—तो सूर्यासारखा प्रकाशतो. त्याला ज्वालारूपी केंस आहेत. ( 'शोचिष्केशः' ३–१७–१ ) त्याच्या ज्वाला

उर्ध्वमुख आहेत. ( ' उर्ध्वशोचिषम् ' ६-१५-२ ) त्याचा धूर आकाशांत उंच जातो ( ' अच्छा द्यामरुषो धूम एति ' ७-३-३ ). त्याला ज्वालारूपी केंस आहेत ( ' शोचिष्केशः ' ३-१७-१ ). तो अंधार नष्ट करतो ( ' तिरस्तमांसि दर्शतम् ' ८-७४-५ ) त्याचें अन्न लांकूड आहे. ( ' द्रून्नः' २-७-६ ). तो पर्जन्याप्रमाणें कडकडाट करणारा आहे ('पर्जन्य-क्रन्द्यः ' ८-९१-५ ) तो तेजोरूपवस्त्र पांघरतो ( 'शोचिर्वसानः' ३-१-६ ) तो निष्कलंक आहे ('अनेहसः' ३-९-१ ) तो सर्वभक्षक आहे ('विश्वादः' ८-४४-२६ ). तो ज्वालांनीं वनांचीं वनें खाऊन गट्ट करतो ( ' तक्षद्व-नेव शोचिषा ' १-१२७-४ ). तो आपल्या जिव्हेनें दगडाचे दगड फोडून टाकतो ( ' दृपद् जिव्हया अवधीत् ') व पर्वत भंग करतो ('अद्रिमाभिनद्' १०-४५-६ ).

**स्वरूप:**—( मानव ). तो सर्व बाजूनें सुंदर आहे. ('विश्वतः सुप्रतीकः' २-९४-७ ) त्याला सर्व बाजूंनीं मुखें आहेत. ('विश्वतोमुखः' १-९७-६ ) त्याला तीन जिव्हा आहेत. (' तिस्रस्ते जिव्हा ' ३-२०-२ ). चार नेत्र आहेत. ( ' चतुरक्षः ' १-३१-१३ ). हजार नेत्रहि आहेत. ( 'सहस्राक्षः' १-७९-१२ ) त्याचे दांत सुवर्णासारखे चकचकीत आहेत. ( ' हिरण्य-दन्तः ' ५-२-३ ). त्याचा वर्ण शुभ्र आहे. ( ' शुचिवर्णः ' ५-२-३ ) त्याचे केस पिंगट आहेत. ('हरिकेशं ' ३-२-१३ ). त्याच्या दाढा तीक्ष्ण आहेत ('तिग्मजम्भः ' ४-५-४ ). त्याचे दांत शुभ्र आहेत. ( ' शुचिदन् ' ५-७-७ ). त्याची जीभ तेजस्वी आहे. ( ' शुचिजिव्हः ' २-९-१ ) त्याच्या मिशा सुवर्णाप्रमाणें आहेत. ('हिरिस्मश्रुः ' ५-७-७ ). त्याची पाठ नीळसर आहे. ( ' नीलपृष्ठः ' ३-७-३ ). तो नानारूपाचा आहे. ( ' पुरुरूपः ' ५-८-२ ). तो चित्रविचित्र रंगाचा आहे. ( ' चित्रभानुः ' १-२७-६ ). त्याला तीन मस्तकें आहेत. ( ' त्रिमूर्धानं ' १-१४६-१ ). व तीन पाद आहेत. ( ' त्रयो अस्य पादाः ' ४-५८-३ ) आणि त्याच-प्रमाणें चार शिंगें आहेत. ( ' चत्वारिशृंगा ' ४-५८-३ ) त्याचें तेज अत्यंत तीक्ष्ण आहे. ( ' तिग्मभृष्टिः ' ४-५-३ ). तो अत्यंत तरुण आहे. ( ' यविष्ठः ' १-१८९-४ ). तो घृत खाऊन पुष्ट झाला आहे. ( ' घृत-पुष्टः ' ५-४-३ ). वगैरे वगैरे.

**वसतिस्थानः**—तो उदकाच्या उदरांत असतो. ('गर्भो यो अपां' १-७०-२) तो अरण्यांत असतो. ( 'गर्भो वनानां ' १-७०-२ ). तो स्थावरामध्यें असतो. ( 'गर्भश्च स्थातां ' १-७०-२ ). त्याचप्रमाणें तो प्राणिमात्रांतहि असतो. ( 'गर्भश्चरतां ' १-७०-२ ). तो भुवनांत असतो. ( 'भुवनस्य-गर्भः ' १०-४५-६ ) तो द्यावा पृथ्वीमध्यें असतो. ( 'गर्भो असि रोद-स्योरग्ने ' १०-१-२ ) तो सर्व नद्यांतील उदकांत असतो. (श्रितो विश्वेषु सिंधुषु ' ८-३९-८ ) तो वनस्पतींत म्हणजे लांकडांत असतो. ( 'विभृत ओषधीषु ' १०-१-२ ) तो समुद्रांतील पाण्यांत असतो. ( 'समुद्रे त्वा नृमणा अप्स्वन्तः ' १०-४५-३ ) तो आकाशांत असतो. ( 'तृतीये त्वा रजसि तस्थिवासं ' १०-४५-३ ' अर्थात् तो सर्वत्र वास करून असतो. तो नाहीं असें विश्वांत ठिकाणच्च नाहीं ! अर्थात् तो विश्वव्यापी आहे.

**गुणवर्णनः**—तो यज्ञाचा पालक आहे. ( 'पिता यज्ञानां ' ३-३-४ ). तो देवांचें अन्न वाहून नेणारा आहे ( 'हव्यवाहनः ' १-३६-१० ). तो यज्ञाचा नायक आहे. ( 'पतिर्ह्यध्वराणां ' १-४४-९ ). तो यज्ञप्रसंगीं देवांना यज्ञशालेंत बोलावून आणणारा आहे ( 'अग्निर्होता ' १०-१२२-१) तो देवांचा दूत आहे. ( 'दूतो देवानामसि ' १०-४-२ ) व मनुष्यांचा प्रतिनिधि आहे. ( 'दूतो विशां ' १-४४-९ ) तो यज्ञाचें मुख आहे. ( 'अध्वराणामनीकं ' १०-२-६ ) तो देवांचा पुढारी आहे. ( 'अग्नि-र्देवो देवानामभवत्पुरोहितः' १०-१६०-४ ) देवांनीं त्याला आपलें मुख केलें. ('त्वामग्न आदित्यास आस्य चक्रिरे २१-१३). आणि ते देव त्या अग्निद्वाराच अन्न भक्षण करतात. ('त्वे देवा हविरदन्त्याहुतम्'२-१-१३) तो अमृतत्वाचा केन्द्र आहे. ( 'अमृतस्य नाभिः ' ३-१७-४) तो सर्व देवांमध्यें पूज्य देव आहे. ( 'देवो देवेषु यज्ञियः' १-१४२-३ ) तो यज्ञाचें साधन आहे. ('यज्ञस्य साधनः' ३-२७-८). तो यज्ञाचा बांधव ('यज्ञबन्धुः' ४-१-९ ) व मनुष्यांचा पुरोहित ('अग्निर्देवानाम-भवत्पुरोहितः' ३-२-८) आहे. तो देवांचा मित्र ( 'देवो देवानामसि मित्रो अद्भुतः' १-९४-१३ ) असल्यामुळें त्याला सोडून देव यज्ञांत आनंद पावत नाहींत. ( 'न ऋते त्वदमृता मादयन्ते ' ७-११-१ ).

तो ज्ञानी लोकांचा परमेश्वर आहे. ( 'असुरो विपश्चितां' ). तो सृष्टि-

जात जाणणारा आहे. (‘ जातवेद: ’ १-४४-१) तो विश्वांतील सर्व कांहीं जाणतो. (‘ विश्ववेदः ’ १-४४-७ ) तो सर्वसाक्षी आहे. (‘ विचर्षणिः ’ १-७८-१) तो अमर आहे. (‘ अमर्त्यः ’ ३-२-११ ) तो जरारहित आहे (‘अजरः’१-१४६-२) तो कवि म्हणजे क्रांतदर्शी आहे.(‘कविः’८-३९-१) तो अमृताचा केन्द्र आहे. (‘ अमृतस्य नाभिः ’ ३-१७-४ ) तो अखंडित आहे. (‘ अदब्धः ’ १-१२८-१ ). तो सर्व मानवांना हितकारक आहे. (‘ वैश्वानरः’ ३-२-११ ). तो उदार आहे. ( ‘मघवा’ ६-१०-१५) तो परम चतुर आहे. (‘ सुदक्षः ’ १-१५-४ ) तो तेजाचें मूळ आहे. (‘ रायो बुध्नः ’ १-९६-६ ). तो संपत्तीचें भांडार आहे. (‘ संगमनो वसूनां ’ १-९६-६ ) तो यज्ञाचा ध्वज आहे (‘ यज्ञस्य केतुः’ १-९६-६) तो सर्व विश्वाचा प्राण आहे. (‘ विश्वायु: ’ १-६८-३ ) तो द्युलोकाचें मस्तक आहे. (‘ मूर्धा दिवः ’ १-५९-२ ) तो पृथ्वीचा मध्य आहे. (‘नाभिरग्निः पृथिव्याः ’ १-५९-२ ). तो देवांचा देव आहे. (‘ देवो देवानां ’ १-३१ १ ). तो ज्ञानी लोकांचा त्राता आहे. (‘ त्राता विप्रस्य’ १-१२९-११ ). तो गृहस्थांचा पालक आहे. (‘ गृहपतिः ’ १-३६-८ ) तो सज्जनांचा रक्षक आहे. (‘ सत्पतिः ’ १-१३०-१ ) तो सर्व मानवांचा पालक आहे. ( विश्वासां विशां पतिः ’ १-१२७-८ ) तो मनुष्यांचा अतिथि आहे. (‘ अतिथिर्मनुष्याणां ’ १-१२७-८ ) तो पृथ्वीचा रक्षणकर्ता आहे. (‘ पतिः पृथिव्याः ’ ८ ४४-१६ ). तो ग्रामांचा रक्षक आहे (‘ ग्रामेष्यविता’) १-४४-१० ). तो जगाचा ईश्वर आहे. ( ‘ईशे यो विश्वस्य ’ १०-६-३ ). तो धर्मांचा अध्यक्ष आहे. (‘ अध्यक्षं धर्मणामिमम् ’ ८-४३-२४ ) तो प्रजेचा राजा आहे. (‘ विशां राजानं ’ ८-४३-२४ ). त्याला कोणताहि शत्रु पराभूत करूं शकत नाहीं. (‘ न हि त्वा शत्रुस्तरते ’ ) उलट तोच पापी राक्षसांचा नाश करणारा आहे. (‘ हन्ता पापस्य रक्षसः ’ १-१२९-११ ) तसाच तो विप्राचा त्राता आहे (‘ त्राता विप्रस्य ’ १-१२९-११ ).

**नातें**:—तो आमचा पिता आहे (‘ त्वमग्ने पितासि नः’ १-३१-१०) तो आम्हां मानवांची माता आहे (‘ (त्वं)माता मनुष्याणाम्’ ६-१-५ ) तो भ्राता आहे (‘ अग्निं मन्ये भ्रातरम् ’ १०-७-३ ) तो पुत्र आहे.

( ' त्वं पुत्रो भवसि ' २-१-९ ) तो सखा आहे ( ' त्वं सखा' २-१-९) तो अगदीं जवळचा आप्त आहे. ( ' तो नेदिष्ठमाप्यम् ' ७-१५-१ ) तो लोकांचा आप्त आहे. ( ' त्वं जामिर्जनानाम् ' १-७५-४ ) तो आमचा गृहरक्षक आहे ( ' त्वंमग्ने गृहपतिः ' ७-१६-५ ). तो आमचा प्रियमित्र आहे. ( ' अग्ने मित्रो असि प्रियः ' १-७५-४ ) तो मनुष्यांचें हित करणारा आहे. ( ' वैश्वानरः ' ६-७-४ ) तो मनुष्याचा पुरोहित आहे. ('मनुषः पुरोहितः ' ३-३-२ ) तो मनुष्यांचा दूत ( प्रतिनिधि ) आहे. ('अग्ने दूतो विशामसि' ११-४४-९) तो देवांचा पुरोहित आहे ('अग्निर्देवानामभवत् पुरोहितः ' ३-२-८ ).

**इतर उपमाः**—याप्रमाणें अग्नीला मनुष्य कल्पून त्या आधारावर त्याचें वरीलप्रमाणें विवेचन करण्यांत आलें आहे. तरी पण त्याला कोठें कोठें मनुष्येतर प्राण्याचीहि उपमा दिलेली मधून मधून आढळून येते. उदाहरणार्थ–अग्नि हा बैल असून तो मोठ्यानें डरकाळ्या फोडतो. ( ' ऋषभोरोरवीति ' ४-५८-३ ) तो आकाशांतील श्येन पक्षी आहे. ( ' दिवः श्येनः ' ७-१५-४ ). तो पाण्यांत बसलेल्या राजहंसाप्रमाणें आहे. ( ' अप्सु हंसो न सीदन् ' १-६५-९ ) तो सापासारखा आहे ( ' अहिः इव ' १-७९-१ ) तो अश्व आहे.

**अग्नीचें अन्नः**—अग्नीचें अन्न लाकूड आहे. ('द्रुन्नः' २-७-६) त्याचें अन्न घृत आहे. ( ' घृतान्नः ' ७-१-३ ) तो समिधा खातो ('जुषस्वनः समिधं जातवेद ' ५-४-४ ) त्याच्या अन्नांत पशूच्या मेदाचाहि अंतर्भाव होतो. ( ' स्तोकानामग्ने मेदसो घृतस्य होतः प्राशान प्रथमो निषद्य' ३-२१-१ पुरोडाश हेंहि त्याचें अन्न आहे. ('अग्ने जुषस्व नो हविःपुरोळाशं जातवेदः' ३-२८-१ त्याला वपाहि अर्पण करण्यांत येते. ( ५-४-३७ ) सोमहि त्याचा हवि आहे. (१-९४-१४ ) अर्थात् तो सर्वभक्षक आहे. ( 'विश्वादं' ८-४४-२६ )

**अग्नीचा रथः**—अग्नीचा रथ सोन्याचा आहे ('हिरण्यरथः' ४-१-८) विद्युतहि त्याचा रथ आहे. ( 'विद्युद्रथः' ३-१४-१ ) तो रथ अप्रतिहत आहे. ( 'द्रळभो रथः' ) व चंद्राप्रमाणें सुंदर आहे. ( 'चन्द्ररथः'

१-१४१.१२ ) त्या रथाला रक्तवर्णाचे अश्व जोडलेले आहेत. ( 'रोहिदश्वः' ४-१-८) ते अश्व घृतास्त्रावी, लाल रंगी, सरळगामी, सुगामी, तेजस्वी व बलशाली आहेत. ( 'तव ते अग्ने हरितो घृतस्ना रोहितास ऋज्वञ्चः स्वञ्चः । अरुषासो वृषणः' ४-६-९ )

**अग्नीची भक्तवत्सलता**:—जे भक्त यज्ञ, समिधा व स्तोत्र अर्पण करून अग्नीची उपासना करतात ते मनुष्यांत अमर होतात. ऐश्वर्यानें व पराक्रमानें मंडित होऊन जगविख्यात होतात. ( 'यस्ते यज्ञेन समिधा य उक्थैरर्केभिः सूनो सहसो ददाशत् । स मर्त्येष्वमृत प्रचेता राया द्युम्नेन श्रवसा वि भाति' ६-५-५ ) जो भक्त समिधासह आहुती अर्पण करतो तो अग्नीच्या कृपेनें शंभर वर्षे आयुष्य व सुसमृद्ध घर प्राप्त करून घेतो.('समिधा यस्त आहुतिं निशितिं मर्त्यो नशत् । वयावंन्तं स पुष्यति क्षयमग्ने शतायुषम्' ६-२-५ )

**अग्नीची प्रार्थना**:—संपत्ति देण्याबद्दल ( 'रयिमस्मासु धेहि' २-२-६ ) अन्न देण्याबद्दल ('अस्मे धेहि जातवदो महिश्रवः' १-७९-४ ) सुख देण्याबद्दल ( 'मार्डिकं धेहि जीवसे' १-७९-९ ) दीर्घायुष्य देण्याबद्दल ( 'अस्मा कमायुः प्र तिरेह देव' १-९४-१६) यश देण्याबद्दल ('यशो अस्मासु धेहि' ५-४-१० ), लढाईत रक्षण करण्याबद्दल ( 'पाहि नृतमो वाजे अस्मान्' ५-४-६ ), रक्षण करण्याबद्दल ( 'पाह्यस्मान्' १-९५-९ ), सर्व संकटांतून पार पाडण्याबद्दल ( 'विश्वान्यग्ने दुरिताति पर्षि' ५-३-११ ), मुलाबाळांस सुखारोग्य देण्याबद्दल ('भवा तोकाय तनयाय शं योः' १-१८९-२), पशूंचें रक्षण करण्याबद्दल ( 'पशूञ्चपाहि' १-७२-६ ), लढाईत बचाव करण्याबद्दल ('अग्ने पाहि नृतमो वाजे अस्मान्' ५-४-६), पापापासून रक्षण करण्याबद्दल ( 'त्वं नः पात्वंहसो जातवेदः' ६-१६-१० ), हिंसकापासून रक्षण करण्याबद्दल ( 'त्वं नः पात्वघायतः' ६-१६-१० ), रोग घालवून देण्याबद्दल ( 'अग्नेत्वमस्मद् युयोध्यमीवा' १-१८९-३ ) आणि त्याचप्रमाणें राक्षसापासून व धूर्त शत्रूपासून रक्षण करण्याबद्दल त्याची विनवणी करण्यांत आली आहे. ( 'पाहि नो अग्ने रक्षसः' 'पाहि धूर्तेरराव्णः' १-३६-१५ )

आतां शेवटीं जातां जातां या अग्नीविषयीं आणखी कांहीं सांगावयाचें म्हणजे ऋग्वेदांत व्यक्तीच्या नांवावर कांहीं अग्नि प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थः—भरतांचा अग्नि, दिवोदासाचा अग्नि, देववाताचा अग्नि, व वध्र्यश्वयाचा अग्नि, त्रसदस्यूचा अग्नि, इत्यादि इत्यादि. शिवाय आणखी कार्यपरत्वें अग्नीचे तीन प्रकार आहेत. आहवनीय अग्नि, गार्हपत्य अग्नि व दक्षिणाग्नि. आवहनीय अग्नींत यज्ञकार्यांत देवांना हवि अर्पण करतात. गार्हपत्य अग्नींत देवांप्रीत्यर्थ हविरन्न तयार केलें जातें. पितारांना उद्देशून करावयाचें अन्नसंतर्पण दक्षिणाग्नींत करण्याचा संप्रदाय आहे. अर्थात् हे तीन अग्नी यांना त्रैताग्नि असें म्हणतात. हे यज्ञानुष्ठानांत योजिले जातात. त्याचप्रमाणें प्रेत दहन करणाऱ्या अग्नीला क्रव्याद, देवांना हवि पोंचविणाऱ्या अग्नीला हव्यवाहन व पितरांना अन्न पोंचविणाऱ्या अग्नीला कव्यवाहन अशी संज्ञा आहे. याप्रमाणें प्रसंगानुसार व कार्यपरत्वें अग्नीला निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. हें एवढें अग्नीचें वर्णन आम्हांस वाटतें येथें पुरेसें आहे.

## अग्नीची व्याख्या

जातो यदग्रे भूतानामग्रणीरध्वरेच यत् ।
नाम्ना संनयतें वाङ्गं स्तुतोग्निरिति सूरिभिः ॥
—( बृहद्देवता २·२४)

**(२) अश्विन्** :—इन्द्र, अग्नि, सोमप्रभृति देवतांइतकेंच आश्वि देवांचेंहि महत्त्व असून ऋग्वेदांत त्यांच्या नांवावर एकंदर ५७ सूक्तें खर्ची पडलीं आहेत. शिवाय इतर मिश्रसूक्तांतहि त्यांचा मधून मधून उल्लेख येतोच येतो. सूक्तसंख्येच्या दृष्टीनें बोलावयाचें झालें तर त्यांचा क्रमांक पांचवा लागतो. असे हे आश्विन् हे जुळे भाऊ असून ('वपूंषि जाता मिथुना सचेते' ३-३९-३), ते विवस्वानाचे पुत्र आहेत. सरण्यू ही त्यांची माता आहे. ('उताश्विनाभरद्यत् तदासीदजहादु द्वा मिथुना सरण्यूः' १०-१७-२), त्यांच्यांत एकाचें नांव नासत्य व दुसऱ्याचें दस्र असें असून, ते तरुण ('युवाना' १-११७-१४), वीर्यशाली ('वृषणा' १-११७-३) दानशूर

('सुदानू' १-११७-१०), विद्वान् ('विद्वांसा' १-१२०-३), संपत्तिमान ('वसुविदा' १-४६-२) मंगलाधिपति ('शुभस्पती' १-४७-५) असे आहेत. व रथांत बसून तिन्ही लोकांत त्यांचा संचार होत असतो.

त्यांचा रथ सोनेरी असून, त्यास तीन चाकें व तीन खांब आहेत. ('त्रिवन्धुरेण त्रिवृता रथेन त्रिचक्रेण सुवृता' १-११८-२). त्याला गरूड जोडलेला असून ('आ वां श्येनासो अश्विना वहन्तु रथे युक्तासः' १-११८-४) तो शीघ्रगामी रथ एका दिवसांत स्वर्ग व पृथ्वी यांच्या सभोंवती फिरून जातो ('रथो ह वामृतजा अद्रिजूतः परि द्यावापृथिवी याति सद्यः' ३-५८-८). ते उषःकाल झाल्यावर पण सूर्योदय व्हावयाच्यापूर्वी उदय पावतात ('उद्वां पृक्षासो मधुमन्त ईरते रथा अश्वास उषसो व्युष्टिषु' ४-४५-२). सूर्यकन्या जी उषा तिचे ते पति असून ('पती भवथः सूर्यायाः' ४-४३-६), सवित्यानें त्यांस तिला लग्न करून दिलें ('सूर्यां यत् पत्ये शंसन्तीं मनासा सविताददात्' १०-८५-९).

अश्विन् हे आधिव्याधि बरे करणारे दिव्य धन्वंतरी असून ('उत त्या दैव्या भिषजा शं नः करतो अश्विना' ८-१८-८), त्यांनीं अनेक दुःखग्रस्तांना दुःखमुक्त केलें आहे. त्यांपैकीं कांहींचा खालीं उल्लेख करतों.

(१) कोणी दुष्टांनीं रेभ ऋषीला छिन्नविच्छिन्न करून समुद्रांत फेंकून दिलें होतें. त्यावेळीं रेभानें त्यांचा धांवा केला असतां ते नावेंत बसून, त्याला बाहेर आणून, त्याचे तुटलेले अवयव पुनः पूर्वीप्रमाणें सांधून त्यांनीं त्यास बरें केलें ('अश्वं न गूळ्हमश्विना दूरेवैर्ऋषिं नरा वृषणा रेभमप्सु सं तं रिणीथो विप्रुतं दंसोभिर्न वां जूर्यन्ति पूर्व्या कृतानि' १-११७-४).

(२) जख्खड म्हातारा झालेल्या च्यवनाला पुनः तारुण्य देऊन ('युवं च्यवानमश्विना जरन्तं पुनर्युवानं चक्रथुः शचीभिः' १-११७-१३), शिवाय त्यास सुंदर तरुण सुकन्या ही पत्नी म्हणून मिळवून दिली ('पतिमकृणुतं कनीनाम्' १-११६-१०).

(३) लांडगीला शंभर मेंढे खावयास दिल्यामुळें ऋज्राश्वाचा बाप रागावून त्या क्रोधभरांत त्यानें त्याचे दोन्ही डोळे फोडून त्यास अंध करून टाकलें. तेव्हां त्या ऋज्राश्व्यानें अश्वींची करुणा भाकल्यावरून त्यांनीं त्याच्या

जवळ येऊन त्यास पुनः दृष्टी देऊन प्रकाश दिसेल असें केलें ( 'शत मेषान् वृक्ये मामहानं तमः प्रणीतमशिवेन पित्रा। आक्षी ऋज्राश्वे आश्विनावधत्तं ज्योतिरन्धाय चक्रथुर्विचक्षे ॥' १.११७-१७ ).

(४) अथर्वण पुत्र दध्यङ ऋषीचें शिर तोडून तेथें घोड्याचें बसवून त्यापासून मधुविद्या शिकली ( 'आथर्वणायाश्विना दधीचेऽश्व्यं शिरः प्रत्यैरयतम्। स वां मधु प्र वोचदृतायन्' १-११७-२२).

(५) खेल राजाची बायको विश्पला ही नवऱ्याबरोबर रणांगणावर जाऊन लढत असतां शत्रूंनीं तिच्यावर हल्ला करून तिचा पाय तोडून टाकला. तेव्हां अगस्तीच्या मदतीनें तिनें अश्वींचा धावा केला. तेव्हां ते प्रसन्न होऊन दुसरा एक तसलाच लोखंडाचा पाय करून,तो तुटलेल्या जागीं पुनः बसवून, तिचें व्यंग घालवून दिलें ('चरित्रं हि वेरिवाच्छेदि पर्णमाजा खेलस्य परितक्म्यायाम्। सद्यो जङ्घामायसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम्' ॥ १-११६-१५ ).

(६) कुष्टरोगानें ग्रस्त झालेल्या वृद्ध घोषेला तिचा रोग घालवून तिला तेजस्वी तारुण्य देऊन चांगला पति मिळवून दिला ( 'युवं नरा स्तुवते कृष्णियाय विष्णाप्वं ददथुर्विश्वकाय। घोषायै चित् पितृषदे दुरोणे पतिं जूर्यन्त्या अश्विनावदत्तम् ॥' १-११७-७ )

( ७ ) अत्रिऋषीला असुरांनीं पकडून मोठा ताप दिला. तेव्हां अत्रीनें तो दाह सहन न झाल्यामुळें मोठ्या काकुळतीनें अश्वींचा धावा केल्यावरून त्यांनीं तेथें प्रगट होऊन त्यास शांत केलें ( 'युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावदत्तम्' १-११८-७ ).

( ८ ) पेटींत कोंडून ठेविलेल्या सप्तवध्रीला पेटींतून काढून जीवदान दिलें ( 'ओमवन्तं चक्रथुः सप्तवध्रये' १०-३९-९).

( ९ ) दिवोदासाला संपत्ति देऊन समर्थ केलें(१-११६-१८).

(१०) वध्रमतीला हिरण्यहस्त पुत्र दिला ( 'वध्रिमत्या हिरण्यहस्तमश्विनावदत्तम्' १-११६-१३ ).

(११) म्हातारा झालेल्या वंदन ऋषीला विहिरींतून बाहेर काढून त्यास दीर्घायुष्य दिलें ( ' प्र दीर्घेण वन्दनस्तार्यायुषा ') १-११९-६ ).

(१२) श्यावाश्वाला गोरी स्त्री मिळवून दिली ( ' युवं श्यावाय रुशती-मदत्तम् ' १-११७-८ ).

(१३) विमदाला पुरुमित्राची कन्या शुध्यु इजला बायको म्हणून मिळवून दिली ( युवं शचीभिर्विमदाय जायां न्यूहथुः पुरुमित्रस्य योषाम् ' १-११७-२० ).

(१४) पेदूला उत्तम जयशाली घोडा दिला ( ' यमश्विना ददथुः श्वेतमश्वमघाश्वाय शश्वदित् स्वस्ति ' १-११६-६ ).

(१५) शंयूची वांझोटी गाय दुभती करून दिली ( ' अधेनुं दस्रस्तर्यं विषक्तामपिन्वतं शयवे अश्विना गाम् ' १-११७-२० ).

याप्रमाणें अश्विदेवांनीं अनेकांना संकटांतून पार केलें आहे व अनेक रोगग्रस्त व दुःखग्रस्त लोकांचे रोग व दुःख हरण केलें. कारण ते अभाग्याला भाग्य, आंधळयाला दृष्टि, दुबळ्याला शक्ति, भुकेल्यांना अन्न देऊन व गरीबांचें दारिद्र्य. आधिव्याधिग्रस्तांची पीडा नष्ट करून, भक्तांना सुखी करणारे असे मोठे दयाळु देव आहेत ('अमाराश्चिदवथो युवं भगोऽनाशोश्चिदवितारापमस्य चित् । अन्धस्य चिन्नासत्या कृशस्य चिद्युवामिदाहुर्भिषजा रुतस्य चित् ।। ( १०-३९-३ ).

यास्तव ऋषींनीं आपणास संपत्ति देण्याबद्दल (' त्रिर्नोरयिं वहतमश्विना' १-३४-५),सौभाग्य देण्याबद्दल ('त्रिः सौभगत्वम्'१-३४-५), उत्तम औषध देण्याबद्दल ('त्रिर्नो अश्विना दिव्यानि भेषजा ' १-३४-६ ), सुख देण्याबद्दल ( ' त्रिधातु शर्म वहतं ' १-३४-६ ), कुरणावर पाऊस पाडण्याबद्दल ( ' घृतैर्गव्यूतिमुक्षतम् ' ८-५-६ ), रत्नें देण्याबद्दल ( ' धत्तं रत्नानि दाशुषे ' ८-३५-२२ ), सुरक्षित घर देण्याबद्दल ( ' छर्दिर्यन्तमदाभ्यम् ' ८-८५.५ ) इत्यादि मानवी जीवनोपकारक वस्तु देण्याबद्दल त्यांची प्रार्थना केली आहे.

## अश्विनी कुमाराची जन्मकथा

‘ सृष्ट्वा भर्तुः परोक्षं तु सरण्यूः सदृशीं स्त्रियम् ।
निक्षिप्य मिथुनं तस्यां अश्वा भूत्वापचक्रमे ॥ ७-१ ॥
अविज्ञानाद्विवस्वांस्तु तस्यामजनयन्मनुम् ।
राजर्षिरभवत्सोऽपि विवस्वानिव तेजसा ॥ ७-२ ॥
स विज्ञाय त्वपक्रान्तां सरण्यूमश्वरूपिणीम् ।
त्वाष्ट्रीं प्रति जगामाशु वाजी भूत्वा सलक्षणः ॥ ७-३ ॥
सरण्यूश्च विवस्वन्तं विदित्वा हरिरूपिणम् ।
मैथुनायोपचक्राम तां च तत्रारुरोह सः ॥ ७-४ ॥
ततस्तयोस्तु वेगेन शुक्रं तदपतद्भुवि ।
उपजिघ्रच्च सा त्वश्वा तच्छुक्रं गर्भकामया ॥ ७-५ ॥
आघ्रातमात्राच्छुक्रात्तु कुमारौ संबभूवतुः ।
नासत्यश्चैव दस्रश्च यौ स्तुतावश्विनाविति ॥ ७-६ ॥

( बृहद्देवता, ७-१ते६ )

---

( ३ ) आदित्यः---आदित्य हे गणदेव असून त्यांची संख्या ऋग्वेदांत सहा सांगण्यांत आली आहे. त्यांचेसाठीं चार सूक्तें देण्यांत आलीं असून, त्यांतून पुढील माहिती उपलब्ध होते. आदित्य म्हणून ज्या देवगणांना संबोधतात त्यांत मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष व अंश अशा सहा देवांचा समावेश होतो ( २-२७-१ ). आदित्य हे अदितीचे पुत्र ( ‘ आदित्यासः ’ २-२७-२ ) असून ते विशाल, गंभीर, अजिंक्य, शत्रुघातक व चांगले-वाईट पाहणारे आहेत (‘ त आदित्यास उरवो गभीरा अदब्धासो दिप्सन्तो भूर्यक्षाः । अन्तः पश्यन्ति वृजिनोत साधु सर्वे ’ २-२७-३ ). ते सर्व स्थावर जंगम पदार्थांचे धारणकर्ते असून सर्व भुवनाचें रक्षण करणारे आहेत ( ‘ धारयन्त आदित्यासो जगत् स्था देवा विश्वस्य भुवनस्य गोपाः ’ २-२७-४ ), सत्याच्या योगानें त्यांचा महिमा मोठा आहे ( ‘ ऋतेनादित्या महि वो महित्वं ’ २-२७-८ ). ते सुवर्णमय,

कांतिमान, पवित्र, सदैव जागृत, अनिमिष, अहिंस्य व लोकप्रसिद्ध असे असून, सरळ मार्गानें चालणाऱ्या मनुष्यासाठीं तेजस्वी असे तीन दिव्य लोक धारण करतात ( ' त्री रोचना दिव्या धारयन्त हिरण्ययाः शुचयो धारपूताः । अस्वप्नजो अनिमिषा अदब्धा उरुशंसा ऋजवे मर्त्याय ' २-२७-९ ). जो आदित्यांच्या मर्जीत असतो त्याला जवळून अगर दुरून कोणीहि ठार करूं शकत नाहीं ( ' नकिष्टं घ्नन्त्यन्तितो न दूराद् य आदित्यानां भवति प्रणीतौ ' २-२७-१३ ). तो पवित्र, अहिंस्य, दीर्घायुषी, वीरपुत्रयुक्त, अन्न व धनसंपन्न असा होऊन राहतो ( ' शुचिरपः सूयवसा अदब्ध उप क्षेति वृद्धवयाः सुवीरः ' २-२७-१३ ).

अविनाशक सुख देण्याबद्दल ('यच्छता नो दुष्परिहन्तु शर्म' २-२७-६), अभयरहित ज्ञानरूपी प्रकाश देणेबद्दल ('ऊर्वश्यामभयं ज्योतिरिन्द्र' २-२७-१४), दीर्घरात्र न येण्याबद्दल ('मा नो दीर्घा अभि नशन्तमिस्राः' २-२७-१४), सुखकारक घर देण्याबद्दल (सक्षीमहि शर्मणा शंतमेन) ( ७-५२-१ ), संपत्ति देण्याबद्दल (७-५२-३), दुसऱ्याचें पातक आपणास न भोवण्याबद्दल ( ' मा वो भुजेमान्यजातमेनः ' ७-५२-२ ), आदित्यांची प्रार्थना करण्यांत आली आहे.

---

**(४) आपोदेवताः**—आप या उदक देवता असून ऋग्वेदांत त्यांच्या प्रीत्यर्थ पांच सूक्तें देण्यांत आलीं आहेत. त्यांत चार सूक्तें केवळ आपवर्णनपर असून एक सूक्त आप अगर गो आणि एक सूक्त आप अगर अपानपात यांचे वर्णनपर आहे. उदक हें शुद्ध (शुचिं), निर्दोष (अरिप्रं) व मधुर ('मधुमन्तं' ७-४७-१) असें असून, ते इंद्रपानार्थ योग्य आहे. तें अत्यंत पवित्र ('शतपवित्राः') असून तें देवमार्गानें जाणारें आहे. ('देवानामपि यन्ति पाथः' ७-४७-३). सूर्य आपल्या किरणांनीं त्याला उत्पन्न करतो ('याः सूर्यो रश्मिभिराततान' ७-४७-४) व इंद्र त्याला खालीं येण्यास योग्य मार्ग करून देतो (७-४७-४). तें समुद्रांत राहणारें ('समुद्रज्येष्ठाः'), आकाशांतून बाहेर पडणारें ('सलिलस्य मध्यात्'), शुद्ध करणारें (पुनानाः) असून समुद्राकडे वाहत जातें ('समुद्रार्था' ७-४९-२). वरुण हा त्यांचा

राजा असून तो मनुष्यांची खरींखोटीं कृत्यें पाहात मध्य लोकांत फिरत असतो (यासां राजा वरुणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यञ्जनानाम्' ७-४९-३). तें मधुर कांतिमान व दोषनाशक आहे (मधुश्चुतः शुचयो याः पावकाः ' ७-४९-३ ). तेथें राजा वरुण आहे व सोम आहे, ( यासु राजा वरुणो यासु सोमो विश्वेदेवा यासूर्जं मदन्ति' ७-४९-४), अग्नि हा त्या उदकांत प्रविष्ट होऊन राहिला आहे (वैश्वानरो यास्वग्निः प्रविष्टः' ७-४९-४). तें सुखदायक ('मयोभुवः' १०-९-१), बलदायक ('उर्जे दधातन') असून, त्याचा रस अत्यंत कल्याणकारक आहे ('यो वः शिवतमो रसः' १०-९-१). तें प्रजोत्पादनसमर्थ करणारें ('जनयथ') असून पिण्यास सुखकर आहे ( शं नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये' १०-९-४). तें सर्व रोगनिवारक ( 'आपश्च विश्वभेषजीः' १-२३-२० ) व सर्व पाप वाहून नेणारें ( ' इदमापः प्रवहत यत् किं च दुरितं मयि'१-२३-२२) असून त्यांत सर्व औषधें आहेत ( अन्तर्विश्वानि भेषजा' १०-९-६). तें उदकच सर्व स्थावर जंगम सृष्टीला उत्पन्न करतें झालें ('विश्वस्य स्थातुर्जगतो जनित्रीः' ६-५०-७).

आई जशी आपल्या बालकास स्तनपान करविते तद्वत आपला कल्याण-कारक रस प्यावयास देण्यास आपो देवीची प्रार्थना करण्यांत आली आहे. ( १०-९-२ ) आणि सर्व पातकें, दुसऱ्यांचा केलेला द्रोह, दिलेले शिव्या-शाप, केलेलें असत्य भाषण यांपासून मुक्त करण्याबद्दल विनंती करण्यांत आली आहे ( ' इदमापः प्रवदत यत् किंच दुरितं मयि । यद्वाहमभिदु-द्रोह यद्वा शेप उतानृतम् '( १०-९-८ ). प्रजोत्पादनसमर्थ करण्याबद्दल ( १०-९-३ ) व शरीरांत रोगनिवारक औषधांचा भरपूर सांठा ठेवण्या-बद्दल (' आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वेमम' १०-९-७ ) विनवणी करण्यांत आली आहे.

---

( ५ ) **इन्द्रः**—भगवान इंद्र हें वैदिक आर्यांचें प्रमुख आराध्य दैवत असून, ऋग्वेदांत सूक्तांच्या मानानें त्याचा क्रमांक पहिला लागतो. त्याच्या

नांवावर एकंदर २०० सूक्तें खर्ची पडलीं असून, वैदिक आर्यांचा तो प्रमुख राष्ट्रदेव आहे. वेदग्रंथांत इंद्राचें महत्त्व सर्वश्रेष्ठ असून, राष्ट्र संकटांत पडल्यावेळीं त्याचाच धांवा केला जातो. त्यानें जसा रणांत पराक्रम गाजविला, तसा दुसरा कोणताच देव करूं शकला नाहीं. युद्धकौशल्य हें त्याचें वैशिष्ट्य असून हजारों शत्रु त्यानें रणभूमीवर लोळविले आहेत. त्याचें चरित्र पुढीलप्रमाणें आहे.

इन्द्र हा कश्यपाचा पुत्र असून त्याची माता अदिति आहे. ( 'वृषा जनान वृषणं रणाय तमु चिन्नारी नर्यं ससूव' ७-२०-५ ) हें बाळ इतकें चिवट होतें कीं आईच्या उदरांत गर्भ रूपानें दहा नव्हे, वीस नव्हे, पन्नास नव्हे शंभर नव्हे तर चांगलें भर भक्कम एक हजार महिने ठाण मांडून बसलें होतें ! ( 'यं (इन्द्र) सहस्रं मासो जभार ' ४-१८-४). तो इतका बलवान व धिप्पाड होता कीं स्वारी जन्मल्याबरोबर गिरीदुर्ग, जलप्रवाह, स्वर्ग व पृथ्वी हीं सर्व कंपायमान झाली ! ( 'विश्वा रोधांसि प्रवतश्च पूर्वीर्द्यौर्ऋष्वाज्जनिमन रेजतः क्षाः' ४-२२-४ ). जन्मल्याबरोबर त्यानें आईचें स्तनपान केलें नाहीं, तर प्रखर सोमरसाचें आकंठपान केलें ! ( 'सद्यो यज्जातो अपिबो ह सोमम्' ३-३२-९ ) आणि पुढें त्याच्या जीवनांत सोमरस हेंच त्याचें मुख्य व प्रिय पान होऊन बसलें. तो पुढें जो इतका बलवान व पराक्रमी निघाला, त्याला कारण त्याची ती प्रबल सोमपानेच्छा हेंच होय.

इन्द्र हा रूपानें अत्यंत सुंदर आहे. ( 'सुसंदृशं' १-८२-३ ), त्याची मान भरीव ( 'तुविग्रीवो'), पोट विशाल ('वपोदरः' ), व भुजदंड पिळदार आहेत ('सुबाहुः' ८-१७-८ ). त्याचे बाहु सुंदर असून ते उत्तम कसलेले व म्हणून शत्रूंना संग्रामांत लोळविणारे व सत्यधर्मानें परिपुष्ट असे आहेत ( 'उभा ते बाहू रण्या सुसंस्कृत ऋदूपे चिदृदूवृधा' ८-७७-११ ). याचे हात लांब म्हणजे तो आजानबाहू ( 'महाहस्ती' ) असून, त्याचा तळहात अत्यंत उदार आहे ('सुकृतोतपाणी' ६-१९-३). त्याचें शरीर खणकर म्हणजे बळकट हाडापेराचें आहे ('वृषपर्वा' ६-३६-२). तो वज्रबाहु

आहे ('वज्रबाहुः' ३-३३-६). तो अत्यंत तेजस्वी आहे ('ओजिष्ठः' १-१२९-१०). हा इंद्र एवढा मोठा आहे कीं स्वर्ग व पृथ्वी हे दोन्ही लोक पार त्याच्या एका मुठींतच मावून गेले !('इमे चिदिन्द्र रोदसी अपारे । यत् सं गृभ्णा मघवन् काशिरित्ते' ३-३०-५). हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे तो पर्वताहून मोठा आहे. देवाहून मोठा आहे. स्वर्गाहून मोठा आहे, आकाशाहून मोठा आहे; आणि म्हणून या पृथ्वीहून तर मोठा आहेच आहे ! ('प्र मात्राभी रिरिचे रोचमानः प्र देवेभिर्विश्वतो अप्रतीतः । प्र मज्मना दिव इंद्रः पृथिव्याः प्रोरोर्महो अन्तरिक्षादृजीषि' ३-४६-३). तसाच तो भव्य, सुंदर, अजर व म्हणून नित्य तरुण असा आहे ('बृहन्तमृष्वमजरं युवानम्' ३-३२-७). त्याला वर्षे काय, महिने काय अथवा दिवस तरी काय यांपैकीं कोणीहि क्षीण व दुर्बल करूं शकत नाहींत ('न यं जरन्ति शरदो न मासा न द्याव इन्द्रमवकर्शयन्ति' ६-२४-७). अर्थात् त्यावर कालाची अगर यमाची मात्रा चालूं शकत नाहीं. म्हणजे तो अमर आहे ! ('अमर्त्यः' ५-३३-६).

इन्द्र हा जसा शरीरानें भव्य व विशाल आहे, तद्वतच तो बुद्धीनें अत्यंत श्रेष्ठ व तीक्ष्ण आहे.तो महा बुद्धिमान आहे ('क्रतुमान्' १-६२-१२), धैर्यवान आहे ( 'धीरः' १-६२-१२ ), कांतिमान आहे ( 'द्युमान्' १-६२-१२ ), अत्यंत बलवान आहे ( 'शविष्ठः' ८-९०-४ ). तो मोठा पराक्रमी आहे ( 'तुविक्रतुः' ९-५७-२ ), अत्यंत रागीट आहे ( 'उग्रः' ९-५४-६ ), तो वज्रबाहु आहे ( 'वज्रबाहुः.' ३-३३-६ ), अनंतवीर्य आहे ( 'शतक्रतुः' ९-५०-८ ), तो अजातशत्रु आहे ( 'अजातशत्रुः' ८-९३-१५ ), अत्यंत पाणीदार आहे ( 'ओजिष्ठः' १-१२९-१० ). तो शूरांतला शूर आहे ( 'रथीतमम् रथीनाम्' १-११-१ ), तसाच तो सत्यस्वरूप आहे ( 'सत्यः' ८-९०-४ ), सर्वद्रष्टा आहे ( 'विचर्षणिः' ), संपत्तीचा स्वामी आहे ( 'वसु-पतिः' ३-३०-१९ ), सामर्थ्याचा अधिपति आहे ( 'शवसस्पतिः' ८-९७-६ ). तो अभीष्टदाता आहे ( 'मीढ्वः' ८-७६-७ ), धनदाता आहे.

('धनदाः' ६-१९-५). तो सर्व बाजूंनीं निष्कलंक ('अनवद्यः' १-१२९-१) असून, उदारांतला मोठा उदार आहे! ('मघोनां मंहिष्टः' ५-३९-४)! याप्रमाणें तो सर्व गुणांनीं संपन्न असून, सर्व बाजूंनीं परिपूर्ण आहे!

तो एवंगुणविशिष्ट असल्यामुळें विश्वाचा तो अधिपति झाला व व्हावा यांत आश्चर्य नाहीं. होय, तो तसा झाला व आहे. तो स्वर्गाधिपति आहे ( पतिर्दिवः' ८-१३-८ ). तो नृपति आहे ('विश्पतिः' ३-४०-३'), त्यानेंच ही पृथ्वी धारण केली व स्वर्गहि धारण केला. ('दाधार यः ( इन्द्रः ) पृथिवीं द्यामुतेमाम्' ३-३२-८ ), तो विश्वकर्मा आहे ('विश्वकर्मा' ८-९८-२). थोडक्यांत म्हणजे तो सकल विश्वाचा नियंता आहे ('विश्वस्य दमिता' ५-३४-६ ), इतकेंच नव्हे तर तो ब्रह्मा आहे. ८-१६-७) तो ऋषि आहे. (८-१६-७) तो विप्र आहे ('विप्रः' ८-७९-१) तो विश्वांतील सर्व गोष्टी ऐकतो व घडामोडी पाहतो ('विश्वं शृणोति पश्यति' ८-७७-५) आणि तशांत आश्चर्य हें कीं त्याचा अंत मात्र कोणा-सच्च लागत नाहीं व आतांपर्यंत लागला नाहीं! देवांनाहि नाहीं आणि मनुष्यांना तर नाहींच नाहीं. ('न त्वा देवास आशत न मर्त्यासः' ८-९७-९ ). त्याचे कायदे इतके कडक आहेत कीं ते देवांना देखील मोडतां येत नाहींत ('यस्य') व्रतानि देवा न मिनन्ति विश्वे' ३-३२-८). एवढा मोठा वरुण देव, पण तो देखील त्याच्या आज्ञेंत राहतो! सूर्यहि राहतो! नद्यासुद्धां त्याचीच आज्ञा अनुसरतातः ('यस्य व्रते वरुणो यस्य सूर्यः। यस्येन्द्रस्य सिन्धवः सश्चति व्रतम्' १-१०१-३ ). त्याचा राग एवढा भयंकर आहे कीं तो रागावला म्हणजे सर्व भुवनें, स्वर्ग व पृथ्वी भीतीनें गांगरून थरथर कांपूं लागतात! ('त्वत् विश्वा भुवनानि वज्रिन् द्यावा रेजेत पृथिवीच्च भीषा' ८-९७-१४ ). त्याच्यासारखा लढाईत परा-क्रमी दुसरा वीर नसल्यामुळें युद्धप्रसंगीं देवांनीं एकमतानें त्यालाच आपला पुढारी केला ('अध त्वा विश्वे पुर इन्द्र देवा एकं तवसं दधिरे भराय' ६-१७-८). असें जरी असलें तरी तो भक्तवत्सल असून सज्जनांचा पालक आहे ('सत्पतिः' ३-४०-४ ), आणि तसाच भक्तांचा अभीष्ट वर्षाव

करणारा आहे ( 'वृषा' ५-३५-४ ). या त्याच्या श्रेष्ठ दैवी गुणामुळें तो स्वर्गाचा व पृथ्वीचा एकमेव राजा झाला व व्हावा यांत आश्चर्य तें काय? होय तो तसा झाला. ( 'जनस्य दिव्यस्य राजा पार्थिवस्य जगतः' ६-२२-९). हें सर्व एकाच वाक्यांत सांगावयाचें म्हणजे तो सर्व भुवनांचा एकमेव राजा आहे !! ('एको विश्वस्य भुवनस्य राजा' ३-४६-२).

इंद्राला हें जें एवढें अपार व अजिंक्य सामर्थ्य प्राप्त झालें, त्याला मुख्य कारण म्हणजे सोमपान हें होय. तो या सोम रसावर अत्यंत लुब्ध आहे. तो इतका कीं, त्याला तो मिळाला नाहीं तर, तर त्याच्यांत चैतन्यच मुळीं स्फुरत नाहीं ! त्याचें तें अत्यंत आवडतें पेय आहे. याचें कारणहि पण तितकेंच महत्त्वाचें आहे. हा सोमरस म्हणजे अत्यंत स्वादिष्ट आहे, अत्यंत मधुर आहे आणि अत्यंत कडक आहे ! ('स्वादु किलायं मधुमाँ उतायं तीव्रः किलायं रसवाँ उतायम्' ६-४७-१). तसाच तो रुचिकर असून अत्यंत आल्हादप्रद आहे ('अयं स्वादुरिह मदिष्ठ आस' ६-४७-२). त्याचप्रमाणें तो बुद्धीला तरतरी देणारा असून काव्याला स्फूर्तिहि पण त्याच्यापासूनच मिळते ('अयं मे पीत उदयर्ति वाचमयं मनीषामुशतीमजीगः' ६-४७-३). हें सर्व एकाच शब्दांत सांगावयाचें म्हणजे तो प्रत्यक्ष अमृतच आहे ! ('अयं पीयुषं' ६-४७-४). असा हा दिव्य व श्रेष्ठ रस इंद्राला परमप्रिय होऊन तो त्याचें आवडतें मुख्य पेय बनावा हें साहजिकच आहे. आणि त्याचें मन या सोमपानाविषयीं सदैव उत्सुक असतें ('सोमकामं हि ते मनः' ८-५०-२), असें जें ऋषींनीं म्हटलें आहे तेंहि पण योग्यच आहे. ज्या वेळीं लढाईचा प्रसंग उपस्थित होतो, त्या वेळीं तर त्यास सोमपान हें अवश्य हवेंच हवें ! त्याशिवाय त्याचा वज्रावर हातच वळत नाहीं ! सोमपान झालें तरच त्याच्यांत स्फूर्ति चमकते. तो सोमपान करावयास बसला म्हणजे काय सांगावें ? एकेका घोटांत तो सोमरसाचे हंडेचे हंडे गट्ट करून टाकतो ! ('एकया प्रतिधाऽपिबत् साकं सरांसि त्रिंशतम् ! इंद्रः सोमस्य काणुकां' ८-७७-४). म्हणून त्याला प्रसन्न करावयाचें तर त्याला सोम अर्पण करूनच त्याची मर्जी संपादन केली पाहिजे. हें सर्व थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्याच्या स्वरूपाचें वर्णन

पुढीलप्रमाणें करतां येईल. त्याच्या पोटांत सोम, शरीरांत सामर्थ्य, हातांत वज्र, व मस्तकांत ज्ञान आहे. ('जठरे सोमं तन्वीं सहो महो हस्ते वज्रं भरति शीर्षणि क्रतुम्' २-१६-२).

इंद्राला सोमामुळें अजिंक्य शक्ति प्राप्त झाली हें खरें; पण त्याच वेळेस त्याला जें अलोट ऐश्वर्य व दिगंत कीर्ति लाभली, त्याला कारण म्हणजे तें त्याचें महा भयंकर व अत्यंत प्रभावी असें तें विश्वविजयी उग्र नि प्रखर वज्र होय ! त्याच्याजवळ इतर शास्त्रास्त्रें आहेत, नाहींत असें नाहीं. त्याच्याजवळ महाविशाल, सर्वोत्कृष्ट व अत्यंत सुंदर असें सुवर्णबुंध्याचें धनुष्य आहे ( 'तुविक्षतं ते सुकृतं सुमयं धनुः साधुर्बुन्दो हिरण्मयः' (८-७७-११). त्याचप्रमाणें भाला व खड्गहि आहे('स्वायुधं' ६-१७-१३). शिवाय दधीचि ऋषीच्या अस्थींचीं बनविलेलीं तीक्ष्ण शस्त्रेंहि आहेत. (इन्द्रो दधीचो अस्थभिर्वृत्राण्यप्रतिष्कुतः । जघान नवतीर्नव ' १-८४-१३ ) पाण्याचा फेस व विद्युल्लता हीं सर्व त्याचीं शस्त्रास्त्रें होत ('अपां फेनेन नमुचे शिर इंद्रोदवर्तयः' ८-१४-१३). पण या सर्वांत प्रामुख्यानें गाजणारें त्याचें मुख्य व प्रिय आयुध म्हणजे तें हें अमोघ वज्रच होय. हें वज्र पोलादी असून त्यास एक हजार धारा आहेत ( वज्र आयसः सहस्रभृष्टिः'१-८०-१२ ). तें शुभ्र चकचकीत आहे('शुभ्रं वज्रं' २-११-४). तें प्रसिद्ध त्वष्ट्यानें तयार केलें असून, त्यास हजार धारा व शंभर टोकें आहेत ! ('अध त्वष्टा ते मह उग्र वज्रं सहस्रभृष्टिं ववृतच्छताश्रिम्' ६-१७-१०). हें वज्र इतकें प्रखर व भयंकर आहे कीं, इंद्रानें जेव्हां त्याचा वृत्रासुरावर प्रयोग केला, तेव्हां त्याचा एवढा मोठा कडकडाट झाला कीं तो ऐकून द्यावापृथिवी घाबरून भयानें थरथर कांपून गेलीं ! ('अरेजतां रोदसी भियानें कनिक्रदतो वृष्णो अस्य वज्रात्' २-११-९). अशा प्रकारचें हें वज्र इंद्राला म्हणूनच शोभलें !

तसाच तो रथ ! तोहि तितकाच बळकट व धडकट आहे ! तो त्वष्ट्यानें तयार केला असून बांध्यानें चांगला मजबूत आहे. तो वेगांत अत्यंत वेग-वान् म्हणजे उपमा देऊनच सांगायचें तर मनापेक्षांहि वेगवत्तर आहे ! ( 'यस्ते रथो मनसो जवीयान्' १०-११२-२ ). तो सुदृढ असून बसाव-

यास सुखकर आहे ('स्थिरं रथं सुखमिन्द्राधितिष्ठन्' ३-३५-४), तो सोन्याचा असून इन्द्र त्यांत बसून जातो ('रथे हिरण्यये रथेष्ठः' ६-२९-२). एकंदरींत तो इन्द्राला शोभेल असाच सुंदर आहे ('विश्व-वारं' ६-३७-१), आणि त्याला जोडावयाचे घोडे झाले तरी काय? तेहि तितकेच सुंदर व समर्थ आहेत. इन्द्राच्या रथाला शोभतील अशीच त्यांची ठेवण आहे. ते प्रसिद्ध कलाकुशल ऋभूंनीं तयार करून दिले असून, त्यांचें नांव हरी असें आहे. ते रथास जोडण्यास अत्यंत सुलभ ('सुधुरा' ३-४३-४) असून, शरीरावयवांनीं सर्वोत्कृष्ट ('स्वङ्गा' ३-४३-४) आहेत. त्यांचे डोळे सूर्याप्रमाणें तेजस्वी व चकचकीत ('सूरचक्षसः' १-११-१) असून, त्यांचें शेपूट मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें सुंदर आहे ('आ त्वा रथे हिरण्यये हरी मयूरशेप्या' ८-१-२५). त्यांचे केंस सुवर्णाप्रमाणें पीतवर्णीय व तकतकीत असून ('हरी हिरण्यकेश्या' ८-३२-२९) पाठ पांढरी शुभ्र आहे ('शितिपृष्ठा' ८-१-१५). या घोड्यांचें वैशिष्ट्य तें हें कीं केव्हांहि ते सज्जच असतात व कधींहि थकत नाहींत. त्यांना मारावयाचें चाबूक आहे, तें सोन्याचें आहे ('वृषा कशा हिरण्ययी' ८-३३-११). एकंदरींत इन्द्राच्या वज्राचें, त्याच्या रथाचें, घोड्यांचें आणि शस्त्राचें थोडक्यांत वर्णन करावयाचें तर –'वृषा ते वज्र उत ते वृषा रथो वृषणा हरी वृषभाण्यायुधा' २-१६-६– हे इन्द्रा, तुझें वज्र वीर्यशाली, तुझा रथ वीर्यशाली, तुझे घोडे वीर्यशाली आणि तुझीं आयुधेंहि वीर्यशाली आहेत' आणि 'वृषा त्वं शतक्रतो' ८-३३-१३) तूंहि पण वीर्यशालीच आहेस! असें जें इन्द्रभक्तांनीं त्यांचें स्तुतिस्तोत्र गाईलें आहे, तें यथायोग्य नाहीं असें कोण म्हणेल?

आतां जातां जातां इन्द्रभगवंताचा तेवढा महिमा थोडक्यांत वर्णन करून, प्रस्तुत विषयाला पूर्णविराम देतों. इन्द्रानें सूर्य उत्पन्न केला ('अज-नयत् सूर्यं' २-१९-३), त्यानें हलत्या व उडत्या पर्वतांना स्थिर केलें ('प्राचीनान् पर्वतान् दृंहत्' २-१७-५), स्वर्गांतील उदकाला खालीं पृथ्वीवर वाहतें केलें (अधराचीनमकृणोदपामपः' २-१७-५), पृथ्वीला आधार दिला ('आधारयत् पृथिवीं विश्वधायसम्' २-१७-५), आणि

द्युलोकाला खालीं पडूं न देतां आपल्या अचिंत्य माया शक्तीनें अंतराळींच तोलून धरलें. ( 'अस्तभ्नान्मायया द्यामवस्रसः' २-१७-५ ). त्याचप्रमाणें नक्षत्रेंहि जेथल्यातेथें स्थिर केलीं. ('इन्द्रेण रोचना दिवो दृळ्हानि दृंहितानि' ८-१४-९ ) मेघांना फोडून पाण्याच्या धारा वाहत्या केल्या. ( 'महान्तमिन्द्र पर्वतं वि यद् वः सृजो वि धारा' ५-३२-१).

देव व दानव यांच्यांत वितुष्ट येऊन लढाईचा प्रसंग आला, त्या वेळीं सर्व देवांनीं मिळून इन्द्रालाच युद्धांत आपला पुढारी नेमला. ( 'अध त्वा विश्वे पुर इन्द्र देवा एकं तवसं दधिरे भराय'६-१७-८). इन्द्रानें देवद्वेष्टे व वेदनिंदक अशा असंख्य असुरांशीं व दस्यूंशीं टक्कर देऊन, त्या सर्वांना रणभूमीवर एकजात आपल्या वज्राचें प्रखर पाणी पाजलें. वेदभक्त आर्यांचा पक्ष घेऊन अनेक असुरांशीं व आर्य शत्रूंशीं झुंज देऊन त्या सर्वांचा रणांत चक्काचूर केला व आर्यांची पाठ राखली. त्यांपैकीं कांहीं प्रसिद्ध प्रसंगांचा येथें धांवता उल्लेख करतों. पुरुकुत्साकरतां महा बलाढ्य व महा कपटी अशा वृत्रासुराशीं मोठ्या पराक्रमानें लढून त्यास जमिनीवर लोळविलें ! ( 'यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः' १-१७४-२ ) कुत्सराजाचा पक्ष घेऊन दैत्याग्रणी शुष्णाला धूळ चारली ! ( 'कुत्साय शुष्णमशुषं नि बर्हीः' ४-१६-१२ ), दभीती राजाची बाजू धरून महा बलाढ्य अशा चुमुरी दैत्याचा निःपात केला ! ('दभीतये चुमुरिमिन्द्र सिष्वप्'६-२६-६); मनूचा कड घेऊन दासाग्रणी नमुचीचें डोकें उडविलें ! ( 'अत्रा दासस्य नमुचेःशिरो यदवर्तयो मनवे गातुमिच्छन्' ५-३०-७ ); ऋजिश्वा राजाला आश्रय देऊन पिप्रूचा धुव्वा उडविला ! ( 'अस्य स्तोमोभिरोशिज ऋजिश्वा व्रजं दरयद्वृषभेण पिप्रोः' १०-९९-११ ); दिवोदासाला पाठीशीं घेऊन मायावी शंबरासुराला पर्वतावरून खालीं खेंचून त्याची चांगली मुसंडी वळली ! ( 'उत दासं कौलितरं बृहतः पर्वताधि। अवाहन्निन्द्र शम्बरम्' ४-३०-१४ ); अंगिरसाच्या गाई चोरून नेऊन गुहेंत लपवून ठेवणाऱ्या पर्णींना खडे चारून अंगिरसाच्या गाई शोधून त्यांच्या त्यांना परत दिल्या ('स विद्वाँ अंगिरोभ्य इन्द्रो गा अवृणोत्' ८-६३-३). त्याचप्रमाणें पाण्यांत पडून बसलेल्या मस्त अहीला बाहेर ओढून त्याचे तुकडे तुकडे करून

टाकले ! ('अहिं चिदुग्र प्रत्युतं शयानं जघन्वाँ '); त्याचप्रमाणें अर्बुद व मृगय यांना धूळ चारली. ( 'निरर्बुदस्य मृगयस्य मायिनो अस्फुरः' ८-३-१९). तसेंच सृबिंद, अनर्शनि, दास, अहिशु यांनाहि ठार केलें ('यः सृबिंदमनर्शनिं पिप्रुं दासमहीशुवम् । वधीदुग्रो रिणन्नपः' ८-३२-२) आणि उरणाचीहि पण रग जिरविली. ('य उरणं जघान' २-१४-४). तसेंच अर्बुदालाहि मारलें. ( ' यो अर्बुदमव नीचा बबाधे' २-१४-४ ). दासवर्चींचे लक्षावधि लोक ठार मारले. ( ' उतदासस्य वर्चिनः सहस्राणि शतावधीः।'४-३०-१५) आणि दभीतीसाठीं तीस हजार दासांचा चक्काचूर केला, ('अस्वापयद् दभीतये सहस्रा त्रिंशतं हथैः । दासानामिन्द्रो मायया' ४-३०-२१ ). तसेंच कृष्णासुरालाहि मारलें (८-९६-१३).

ही झाली असुर व दस्युदासादिकांची कथा. आतां मानवांपैकीं त्यानें कोणाकोणाला मारलें याचा थोडक्यांत निर्देश करतों. सुदासशत्रु चायमान कवि यास दाशराज्ञ युद्धांत ठार मारलें ! ( ७-१८-८ ) त्याचप्रमाणें श्रुत कवष, वृद्ध व द्रुह्यु यांना पाण्यांत बुडवून जलसमाधि दिली ! (' अध श्रुतं कवषं वृद्धमप्स्वनुं द्रुह्युं नि वृणग्वज्रबाहुः' ७-१८-१२). नास्तिकाग्रणी भेदाचा सप्पा उडविला. ('अत्र भेदं सर्वतातामुषायत्' ७-१८-१९ ) आणि मन्यमानपुत्र देवकाची गठडी वळली ('देवकं चिन्मान्यमानं जघन्थ' ७-१८-२०). तसेंच शिम्यूलाहि आपल्या तीक्ष्ण वज्राचें पाणी पाजलें (' दस्यूञ्छिम्यूँश्च पुरुहूत एवैर्हत्वा पृथिव्यां शर्वा नि बर्हीत्' १-१००-१८). अर्थात् इंद्राला सोडून कोणालाच जय मिळत नाहीं (' यस्मान्न ऋते विजयन्ते जनासः' २१२-९ ) म्हणून शूर योद्धे रक्षणार्थ त्यालाच हाक मारतात (' यं युद्धमाना अवसे हवन्ते' २-१२-९ ).

याप्रमाणें इंद्र भगवंतानें अनेक दिव्य व लोकोत्तर पराक्रम गाजवून वैदिक आर्यांवर अनंत उपकार करून ठेविले आहेत. त्याच्या कृपाप्रसादानेंच आर्यांचे पाय भारत भूमींत टिकून स्थिर झाले ही गोष्ट भारतमातेचे सुपुत्र विसरतील तर त्यांच्या कृतघ्नपणाला दुसरी तोडच नाहीं, असेंच म्हणावें लागेल ! स्पष्टच बोलावयाचें म्हणजे आपणच आर्यांना ही पुण्यभूमि मिळवून दिली, ही गोष्ट 'अहं भूमिमददामार्याय'-मीच आर्यांना भूमि मिळवून

दिली (४-२६-२) या वचनांत इंद्र भगवंतानें स्पष्ट बोलून दाखविली आहे. आणि हे त्याचे महदुपकार स्मरूनच वैदिक ऋषींनीं त्याला ऋग्वेदांत राष्ट्र-देव बनवून, त्याला प्रमुख स्थान दिलें आणि त्याला अनेक सूत्रांतून नाना-परीनें आळविलें व यज्ञसमारंभांत नाना तऱ्हेचें हविरन्न अर्पण करून आपली स्वामिनिष्ठा व कृतज्ञता व्यक्त केली. त्यांनीं स्वच्छ व स्पष्ट म्हटलें कीं "हे इंद्रा! तुझ्यासारखा सुखविणारा दुसरा देव नाहीं. ('नहि त्वदन्यः पुरुहूत कश्चन मघवन्नस्ति मर्डिता' ८-६६-१३). आणि म्हणून तुझ्यासारखा देवांत खरोखर देव नाहीं व मानवांत मनुष्य नाहीं व मागें झाला नाहीं व पुढें होणार नाहीं." ('न त्वा वाँ अन्यो दिव्यो न पार्थिवो न जातो न जनिष्यते' ७-३२-२३) आणि हें त्याचें स्तोत्र अक्षरशः सत्य व युक्त नाहीं असें आतां कोणी व कसें म्हणावें? या इन्द्र देवाच्या शौर्यकथा व औदार्यप्रसंग ऋग्वेदांत पावलोपावलीं आढळतात. त्या सर्वांचा येथें उल्लेख करणें इष्ट असलें तरी शक्य नाहीं. त्याला निराळा ग्रंथच लिहावा लागेल. असो. एकंदरींत सांगायचा मुद्दा काय तर इन्द्र हा लढाऊ वृत्तीचा वैदिक आर्यांचा महाबलाढ्य व मोठा आवडता राष्ट्रीय देव आहे! त्याचा अतुल पराक्रम, विलक्षण धाडस, अपार कौशल्य, अजिंक्य सामर्थ्य, सूक्ष्म दृष्टि, धूर्त बुद्धि, भक्तवात्सल्य, अगाध औदार्य या सर्वांचा विचार केल्यास प्रगमनशील व प्रसरणप्रवण वैदिक आर्यांचा तो प्रिय व प्रमुख देव बनला व बनावा यांत आश्चर्य तें काय? आणि हा त्याचा अगाध महिमा व त्याचे अनंत उपकार स्मरण करून इन्द्रभक्त आर्यांनीं त्याच्या स्तुतिस्तोत्रगानभरांत 'त्वं हि नः पिता वसो त्वं हि माता शतक्रतो' (८-९८-११) 'स न इन्द्रः शिवः सखा (८-९३-३). असें कृतज्ञतापूर्वक आळवून म्हटलें हें युक्त नव्हे असें कोण म्हणेल? थोडक्यांत इन्द्र म्हणजे विश्वावर स्वामित्व चालवणारा—'ईष्टे चैवास्य सर्वस्य तेनेन्द्र इति स स्मृतः'-अशी बृहद्देवतेंत इन्द्र शब्दाची व्युत्पत्ति सांगितली आहे (२-३५).

**प्रार्थना**:—या देवदेवेश्वर इन्द्राजवळ देवभक्तांची थोडक्यांत मागणी आहे ती अशीः— हे इन्द्रदेवा, आम्ही तुझ्या कृपेनें ऐश्वर्य-संपन्न व्हावें!

अन्नसंपन्न व्हावें ! मनोहर व तेजस्वी सामर्थ्यांनीं युक्त असावें ! दिव्य तेजानें व तीक्ष्ण बुद्धीनें संपन्न असावें ! सुंदर व दुभत्या गायींनीं व चलाख व उमद्या घोड्यांनीं सुसंपन्न होत्साते सदैव आनंदांत जीवन खुलवीत असावें ! ('समिन्द्र राया समिषा रभेमहि सं वाजेभिः पुरुश्चन्द्रैरभि द्युभिः। सं देव्या प्रमत्या वीरशुष्मया गोअग्रयाश्वावत्या रभेमहि' ॥ १-५३-५). या एका मंत्रांत सर्व जीवनोपकर्णांची व जीवनोत्कर्षाची अत्यंत मार्मिकपणें मागणी करून, देवभक्तांनीं जें प्रार्थना-कौशल्य दाखविलें आहे, तसें इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल !

## इंद्र शब्दाची व्याख्या

**' चतुर्विधानां भूतानां प्राणो भूत्वा व्यवस्थितः । '**
**' ईष्टे चैवास्य सर्वस्य तेनेन्द्र इति स स्मृतः '**
( बृहद्देवता २-३५ )

---

६ उषाः—ऋग्वेदांत देवदेवतांचें जें वर्णन आहे त्यांत उषेचें वर्णन फारच बहारीचें आहे. त्यांत काव्य व प्रतिभा यांचें मधुर मिश्रण झालेलें असल्यामुळें तीं सूक्तें वाचावयास मोठीं सुंदर व मनोहर अशीं झालीं आहेत. ऋग्वेदांत तिच्या नांवावर एकंदर वीस सूक्तें खर्चीं पडलीं असून, शिवाय इतर देवांबरोबरहि तिचें अनेक ठिकाणीं मार्मिक वर्णन आलें आहे. तिचा क्रमांक सातवा लागतो. तिचें वर्णन थोडक्यांत पुढील-प्रमाणें आहे.

उषा ही द्युलोक कन्या आहे (' दुहितर्दिवः' १-४८-१) आणि तशीच नित्य तरुण-युवति आहे (' युवतिः' १-११३-७). ती प्रकाशरूपी शुभ्र वस्त्र परिधान करते (' शुक्रवासाः' १-११३-७). ती मंगलस्वरूप('सुमंगली' १-११३-१२) असून, झगझगीत वस्त्र परिधान करून, रात्रीचा अंधार नष्ट करीत, निश्चेष्ट जगाला नव चैतन्य देत, धीट तरुणीप्रमाणें रोज प्रातःकालीं पूर्वेस झळकूं लागते. ती वैदिक कर्मानुष्ठानाची पालन करणारी ('ऋतपा' १-११३-१२) व यज्ञोपासनार्थच प्रगट झालेली ( 'ऋतेजा'

१-११३-१२ ) अशी असून, सर्व प्रकाशगोलांमध्यें अत्यंत श्रेष्ठ प्रतीची मंगल तेजोराशि आहे ('इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिः' १-११३-१). ती आपल्या दिव्य तारुण्यकांतीनें सर्व जगास मोह पाडून मनुष्याचें आयुष्य दिने दिने क्षीण करीत जाते ('मर्तस्य देवी जरयन्त्यायुः' १-९२-१०). माता आपल्या कन्येला न्हाऊ घालून सुंदर वस्त्रालंकारांनीं विभूषित करून तिला आकर्षक करते, तद्वत् ही उषा देवी झाली तरी आपलें दिव्य स्वरूप सुंदर अरुणकांतीनें मोहक व मनोहर करून, जगद्दर्शनार्थ पृथ्वीवर प्रगट होते (सुसंकाशा मातृमृष्टेव योषा विस्तन्वं कृणुषे दृशे कम्' १-१२३-११). प्रेमोत्सुक तरुण स्त्री सुंदर वस्त्रालंकारांनीं विभूषित होऊन हास्यमधुर मुखानें जशी आपल्या पतीपुढें येऊन उभी राहते, तद्वत् ही तारुण्यमंडित उषादेवी सुंदर रूप धारण करून जगापुढें उपस्थित होते ('जायेव पत्य उशती सुवासा उषा हस्रेव नि रिणीते अप्सः'१-१२४-७). ती इतक्या थोर मनाची आहे कीं, स्वकीयांना व परकीयांना, लहानांना व थोरांना, कोणाचाहि पक्षपात न धरतां सर्वांना सारखाच प्रकाश देते. ती उदय पावतांच सर्व प्राणिजाताला आपापला व्यवहार करण्यासाठीं निद्रेंतून उठवून जागृत करते ('विश्वं जीवं चरसे बोधयन्ती' १-९२-९). ती रात्रीचा काळाकुट्ट अंधःकार नष्ट करणारी असून ('अप कृष्णां निर्णिजं देव्यावः' १-११३-१४), विस्तीर्ण अशा सर्व दिशांमध्यें दिव्यकांतीनें प्रकाशत राहते ('व्यञ्जिभिर्दिव आतास्वद्यौत्' १-११३-१४). ती अरुण कांतियुक्त अश्वांच्या रथांत बसून इकडे येते ('अरुणेभिरश्वैरोषा याति सुयुजा रथेन' १-११३-१४) आणि झोंपी गेलेल्या सर्व जगाला सावध करते ('प्रबोधयन्ती' १-११३-१४), अर्थात् सर्व प्राणिमात्रांचें चलन-वलन व प्राणधारण हें सर्व या उषेमुळेंच होतें ('विश्वस्य हि प्राणनं जीवनं त्वे वि यदुच्छसि सूनरि' १-४८-१०), आणि जगांतील सर्व धनांचें स्वामित्व हें तिचेंच आहे ('विश्वस्येशाना पार्थिवस्य वस्वः' १-११३-७).

ती द्युलोकाची दुहिता आहे ('दिवो दुहिता' १-११३-७). देवांची माता आहे ('माता देवानाम्' १-११३-१९ ). यज्ञाचा ध्वज आहे

( ' यज्ञस्य केतुः ' १-११३-१९ ). अदितीचें मुख ( ' आदितेर-नीकम् ' १-११३-१९ ). त्याचप्रमाणें भगाची व वरुणाची बहीण आहे ('भगस्य स्वसा' 'वरुणस्य जामिः' १-१२३-५). तशीच ती सूर्याची पत्नी ('स्वसरस्य पत्नी' ३-६१-४) व अश्विनांची सखी आहे ('उत सखास्याश्विनः' ४-५२-३).

ती तांबडे घोडे जोडलेल्या दिव्य रथांत बसून, रात्रीला मागें हटवीत हटवीत व पुढें सरकत सरकत सूर्याला मार्ग मोकळा करून ठेविते. तिचा उदय होतांच भक्तजन अग्नि व सूर्य यांना हविर्द्रव्य अर्पण करतात. सर्व देवांना सोमपानार्थ यज्ञगृहांत घेऊन येण्याबद्दल ( 'विश्वान् देवाँ आवह सोमपीतयेऽन्तरिक्षादुषस्त्वम्' १-४८-१२). गोसंपन्न, अश्वसंपन्न, प्रशस्य व बलवर्धक असें अन्न देण्याबद्दल (सास्मासु धा गोमदश्वावदुक्थ्यमुषो वाजं सुवीर्यम्' १-४८-१२). सर्व लोक–अभिलषित असें सुंदर व सुखकारक धन देण्याबद्दल ('सा नो रयिं विश्ववारं सुपेशसमुषा ददातु सुग्म्यम्' १-४८-१३ ), आम्हां भक्तांप्रत सर्व सौभाग्य घेऊन येण्याबद्दल ('अथा नो विश्वा सौभगान्यावह' १-९२-१५) आणि विविध प्रकारचें धन आणण्याबद्दल ('उषस्तच्चित्रमा भरास्मभ्यं वाजिनीवति' १-९२-१३), तिची प्रामुख्यानें प्रार्थना करण्यांत आली आहे.

---

(७) ऋभू–हा ऋभूंचा इतिहास मोठा मननीय आहे. 'नरा'चा 'नारा-यण' होण्याची किमया त्यांच्या चरित्रांत गर्भित झाली असून, ती विचारी मानवास मोठी बोधप्रद आहे. ऋभुदेव हे जन्मानें प्रथम मनुष्यच होते. पण आपल्या कौशल्यपूर्ण कलाकृतीनें पुढें मनुष्याचेच देव बनले ! इतकेंच नव्हे, तर यज्ञांत देवांबरोबरच आपणासाठींहि खास हविर्भाग मिळविते झाले ! हें दिव्य भाग्य व श्रेष्ठ मान मनुष्यांत आतांपर्यंत फक्त या ऋभूंच्याच वांटणीस आला असून, तो कथासंदर्भ पुढीलप्रमाणें आहेः—

ऋभु हे सुधन्व्याचे पुत्र असून ( 'सौधन्वना ऋभवः १-११०-४) ते मर्त्यांचे अमर झाले('मर्तासः सन्तो अमृतत्वमानशुः' १-११०-४). हे ऋभु, विभु व वाज या नांवाचे असे तीन बंधु असून ते आपल्या कौशल्यपूर्ण दिव्य

कलाकृतीनें मनुष्यांतून देवत्व पावले. तो प्रसंग असाः— त्वष्ट्यानें देवाकरतां सोमपान करण्यासाठीं म्हणून एक सुंदर चमसपात्र तयार केलें. तें देवांना फारच आवडलें. या अनुपम कलाकृतीमुळें व देवांनीं त्याची फार वाहवा केल्यामुळें त्वष्ट्यास फार अभिमान चढला. या ऋभूंचें कौशल्य अग्नीस माहित असल्यामुळें त्यानें त्यांस बोलावून तसलेंच दुसरें एखादें पात्र जुळल्यास तयार करण्याची त्यांस सूचना दिली. तेव्हां त्या सूचनेनें प्रोत्साहित होऊन तसेंच एक पात्र हुबेहूब तयार करण्याचा मोह त्यांना सुटला. त्यांपैकीं एकजण म्हणाला कीं आपणहि तसलींच दोन पात्रें तयार करून दाखवूं या. दुसरा म्हणाला, छे, छे, दोनच कां, तीन केलीं तर काय बिघडेल ? ( ' कनीयान् त्रीन् कृणवामेत्याह ' ४-३३-५ ). त्यावर तिसरा भाऊ म्हणाला कीं करायचींच तर तीनच कां, चार करूं या कीं ! ('कनिष्ठ आह चतुरस्कर' ४-३३-५ ). पुढें हे तीन बंधु मिळून बोलल्याप्रमाणें आपली सर्व अक्कल व कौशल्य खर्च करून त्यांनीं त्वष्ट्याच्या चमसाबरहुकूम चार सुंदर चमसपात्रें तयार केलीं, ( निष्कृतम् । अकर्त चतुरःपुनः १-२०-६). ('उत त्यं चमसं नवं त्वष्टुर्देवस्य' ४-३३-६). आपल्यासारखींच मनुष्यांनीं तयार केलेलीं चार चमसपात्रें पाहून गुणग्राहक त्वष्टा फारच संतोषला व त्यांची ती कलाकृति पाहून त्यांची खूप प्रशंसा केली. ('विभ्राजमानांश्चमसाँ अहेवाऽवेनत्त्वष्टा चतुरो ददृश्वान्' ४-३३-६) आणि देवांसहि तें पाहून फार आनंद झाला.

यानंतर त्यांनीं अश्वीकरतां आंसासभोंवती फिरणाऱ्या चाकांचा एक सुंदर रथ तयार करून, त्यांस अर्पण केला ('तक्षन् नासत्याभ्यां परिज्मानं सुखं रथम्' १-२०-३). त्याचप्रमाणें बृहस्पतीकरतां एक सुंदर दुभती गाय तयार केली ('तक्षन् धेनुं सबर्दुघाम्' १-२०-३), व इंद्रासाठीं म्हणून हरी नांवाचे सुंदर घोडे तयार करून त्यास दिले ('य इंद्राय वचोयुजा ततक्षुर्मनसा हरी' १-२०-२). यामुळें त्यांनीं इंद्राच्या कृपेस पात्र होऊन त्याचें सख्य मिळविलें ('इंद्रस्य सख्यमृभवः समानशुः' ३-६०-३). शिवाय आपल्या विद्येच्या व कौशल्याच्या बळावर उदार सूर्य देवाच्या घरीं जाऊन पाहुणचारहि घेतला ('सौधन्वनासश्चरितस्य भूमनागच्छत

सवितुर्दांशुषो गृहम्' १-११०-२). यांचा आणखी एक सांगावयाचा चमत्कार म्हणजे त्यांचे मातापितर जरठ होऊन खांबाप्रमाणें ताठ होऊन निश्चेष्ट पडून होते. त्यांनीं त्यांचें तें जरठपण घालवून त्यांना पुनः तारुण्य प्राप्त करून दिलें ('पुनर्ये चक्रुः पितरा युवाना सना यूपेव जरणा शयाना' ४-३३-३).

हे ऋभुबंधु महाबुद्धिमान, प्रतिभावान व जाडे विद्वान पंडित असून, ('धीरासो हि ष्ठा कवयो विपश्चितः' ४-३६-७), सत्यवक्ते व सरळमार्गी आहेत ('सत्यमंत्रा ऋजुयवः' १-२०-४). त्यांनीं आपल्या बुद्धिचातुर्यानें व हस्तकौशल्यानें देवांना दिपवून व संतोषवून, त्यांच्यामध्यें त्यांच्याबरोबरच यज्ञांत आपणांस हविर्भाग प्राप्त करून घेतला! ('अभजन्त सुकृत्यया। भागं देवेषु यज्ञियम्' १-२०-८). ते तेजस्वी आहेत, वैभवशाली आहेत, लढाईत अत्यंत बलवान आहेत, एकत्र राहणारे आहेत, इन्द्रयुक्त आहेत व अत्यंत उदार आहेत ( ४-३७-५ ). त्यांच्यांपैकीं वाज हा देवांचा झाला, ऋभुक्षिन् हा इन्द्राचा झाला, व विभ्वा हा वरुणाचा झाला ( ' वाजो देवानामभवत् सुकर्मेन्द्रस्य ऋभूक्षा वरुणस्य विभ्वः ' ४-३३-९ ). त्यांचा रथ अत्यंत तेजस्वी ( ' शुचद्रथः ' ) असून त्याला जोडावयाचे घोडे पुष्ट ('पीवो अश्वाः') आहेत. ते डोक्याला शिरस्त्राण घालतात ( ४-३७-४ ). ते आतां आकाशांत राहणारे असून, देवांमध्यें प्रतिष्ठा मिळवून, यज्ञांत त्यांच्या बरोबरीनें हविर्भाग प्राप्त करून घेतलेले असे हे मानवांतील फक्त ऋभुच होत ! ( ' अधारयन्त सुकृत्यया। भागं देवेषु यज्ञियम् ' १-२० ८ ). हे तिघेहि बंधु त्वष्ट्याचे शिष्य असून त्याचेकडूनच त्यांनीं आपली विद्या घेतली होती. ज्याचे हे ऋभु रक्षण करतात, तो संग्रामांत बलवान योद्धा होतो, शूर धनुर्धारी बनतो, ब्रह्मतेजानें तळपणारा ऋषि होतो, तसाच संपत्तिमान व सुप्रजावान होतो ( 'स ऋषिर्वर्चस्यया स शूरो अस्ता पृतनासु दुष्टरः। स रायस्पोषसं सुवीर्यं दधे यं वाजोविभ्वाँ ऋभवो यमाविषुः ॥' ४-३६-६ ). तारुण्य व बल देण्याविषयीं त्यांची प्रार्थना करण्यांत आली आहे.

त्यांच्याविषयीं बृहद्देवतेंत माहिती आढळते ती अशी !—

सुधन्वन आंगिरसस्यासन्पुत्रास्त्रयः पुरा ।
ऋभुर्विभ्वाच वाजश्च शिष्यास्त्वष्टश्च तेऽभवन् ।। ३-८३ ।।
शिक्षयामास तांस्त्वष्टा त्वाष्ट्रं यत्कर्म किंचन ।
परितिष्ठित कर्माणो विश्वेदेवा उपाव्हयन् ।। ३-८४ ।।
विश्वेषां ते ततश्चक्रुकुर्वाहनान्यायुधानि तु ।
धेनुं सबर्दुधां चक्रुरमृतं सबरुच्यते ।। ३-८५ ।।
बृहस्पतेरथाश्विभ्यां रथं दिव्यं त्रिवन्धुरम् ।
इन्द्राय च हरी देवप्रहितेनाग्निनापि यन् ।। ३-८६ ।।
एकं चमसमित्युक्ते ज्येष्ठ आहेत्यथो दिवि ।
उक्त्वा ततक्षुश्चमसान् यथोक्तं तेन हर्षिता ।। ३-८७ ।।
त्वष्टाच सविता चैव देवदेवः प्रजापतिः ।
सर्वान्देवान् समामन्त्र्य अमृतत्वं ददुश्च ते ।। ३-८८ ।।

(बृहद्देवता, ३-८३ ते ८८)

---

(८) **त्वष्टाः**—ऋग्वेदांत त्वष्ट्याचें स्वतंत्र असें एकहि सूक्त नाहीं. तथापि त्याचा उल्लेख मात्र त्रोटक त्रोटक असा ठिकठिकाणीं करण्यांत आला आहे. विश्वरचनेच्या कार्यांत सर्वोत्तम असा तो एक कुशल कारागीर ('अपसामपस्तमः' १०-५३-९) असून, देवांच्यासाठीं उपयोगास येणारीं विविध पात्रोपपात्रें तयार करण्याची कामगिरीहि त्याचेकडेच आहे ('त्वष्टा माया वेदपसामपस्तमो बिभ्रत्पात्रा देवपानानि शंतमा' १०-५३-९). त्यानें एक अत्यंत तेजस्वी वज्र तयार करून, तें इन्द्रास दिलें ('तक्षन् त्वष्टा वज्रं पुरुहूत द्युमन्तम्'५-३१-४). तें उत्तम पोलादाचें बनविलेलें-('वज्र आयसः' १-८०-१२)-असून, त्यास एक हजार प्रखर धारा व शंभर तीक्ष्ण टोकें होतीं ('अध त्वष्टा ते मह उग्रं वज्रं सहस्रभृष्टिं ववृत्च्छताश्रियम्' ६-१७-१०). या वज्राच्या सहायानेंच इन्द्रानें रणसंग्रामांत असंख्य शत्रूंचा फडशा पाडल्यामुळें त्या दिव्य शस्त्राला 'श्रेष्ठायुध' ('वृषा ते वज्र'

२-१६-६) असा किताब देण्यांत आला आहे. या आयुधश्रेष्ठ वज्राच्या सहायानेंच इन्द्राला विश्वविजयी होऊन, विश्वाधिपति म्हणवून घेण्याचें भाग्य व श्रेय लाभलें. त्याचप्रमाणें त्यानें ब्रह्मणस्पतीला तीक्ष्ण धारेचा एक सुंदर पोलादी परशु तयार करून दिला ('शिशीते नूनं परशुं स्वायसं येन वृश्चादेतशो ब्रह्मणस्पतिः ' १०-५३-९ ). या द्यावा पृथ्वीला व्यवस्थित आकार त्यानेंच दिला व अखिल भुवनजातास विविध प्रकारांनीं रूपयुक्त त्यानेंच केलें ( 'य त्वष्टा इमे द्यावापृथिवी जनित्री रूपैरपिंशद्भुवनानि विश्वा' १०-११०-९). तो अत्यंत कुशल कारागीर असून, हस्तकौशल्यांत अत्यंत तरबेज होता. तसाच तो सामर्थ्यसंपन्न असून सत्यनिष्ठहि होता ( 'सुकृत् सुपाणिः स्ववाँ ऋतवा देवस्त्वष्टा ' ३-५४-१२ ). त्यानेंच विविध प्रजा निर्माण करून, त्यांचें पोषण केलें (देवस्त्वष्टा सविता विश्वरूपः पुपोष प्रजाः पुरुधा जजान' ३-५५-१९ ).

दिव्य मधु-विद्या ही प्रथम फक्त त्याचे जवळच होती. ती त्यानें पुढें आथर्वण दध्यङ् ऋषीला सांगून वर त्यास असें बजावलें कीं, ही विद्या तूं कोणासहि देऊं नयेस म्हणून. जर दिल्यास तुझें डोकें उडविलें जाईल. अश्वींना ती विद्या शिकून घेण्याची इच्छा झाली, म्हणून दध्यङ् ऋषीजवळ येऊन ती विद्या आपणास देण्याविषयीं त्यांनीं त्याची विनंति केली. तेव्हां त्यानें त्यांना ती विद्या देण्यास कोणती अडचण आहे हें सांगितल्यावरून आपला हेतु साध्य करून घेणेकरतां अश्वींनीं त्याचें डोकें छाटून तेथें दुसरें घोड्याचें सांधून, तो विद्या साध्य करून घेतली ( 'अथर्वाणायाश्विना दधीचेऽश्व्यं शिरः प्रत्यैरयतम् । स वां मधु प्रवोचदृतायन्त्वाष्ट्रं यद्दस्रावपिकक्ष्यं वाम्॥ ' १-११७-२२). ही बातमी त्वष्ट्यास समजतांच त्यानें म्हटल्याप्रमाणें दधीचीचें तें शिर उडविलें पण पुढें अश्वींनीं तेथें येऊन त्याचें तें पूर्वींचें मानुष शिर पुनः तेथें पूर्ववत् बसवून नीट केलें.

त्वष्ट्याची सांगण्यासारखी येथें आणखी एक गोष्ट म्हणजे देवांना सोमपान करण्यासाठीं त्यानें एक सुंदर चमसपात्र तयार केलें. तें इतकें सुंदर होतें कीं त्याच्यासारखें सुंदर म्हणजे त्याचें तेंच ! देवांना तें फार

आवडलें. या दिव्य कलाकृतीमुळें त्या त्वष्ट्यास फार मोठा अभिमान चढला व तो एका अर्थी यथार्थहि होता. पुढें कांहीं प्रसंगानें तें चमसपात्र सहज ऋभूंच्या दृष्टीस पडलें. ऋभु हे तसे म्हणजे मनुष्यच होते; तरीपण मोठे कुशल कारागीर होते. तें पात्र पाहून त्यांनाहि तसेंच एक करण्याचा मोह सुटला. त्यांपैकीं एकजण म्हणाला कीं आपणहि असलेंच दोन चमस तयार करूं या. दुसरा म्हणाला, छे छे, दोनच कां तीन केले तर काय बिघडेल? तिसरा म्हणाला, करायचेंच तर तीन का, चार करूं कीं! (४-३३-५). पुढें हे तीन बंधु बोलले इतकेंच नव्हे, तर तसें त्यांनीं करूनहि दाखविलें! ( 'सत्यमूचुर्नर एवा हि चक्रुः ' ४-३३-६ ). मनुष्यांनीं केलेले हे चार तेजस्वी चमस पाहून त्वष्टा फारच संतोषला व त्यांची ती कलाकृति पाहून त्यांची त्यानें फारच वाहवा केली (विभ्राजमानांश्चमसाँ अहेवावेनत्त्वष्टा चतुरो ददृश्वान्' ४-३३-६). असो.

अग्नि हा त्वष्ट्याचा पुत्र (त्वष्टा यं (अग्निं) सुजनिमा जजान' १०-२-७) आणि वायु हा त्याचा जामात होय ( 'तव वायवृतस्पते त्वष्टूर्जामातरद्भुत' ८-२६-२१ ). याशिवाय त्याचा आणखी एक जामात असून त्याचें नांव विवस्वान असें होतें. त्याला यानें आपली मुलगी सरण्यू इजला लग्न करून दिली होती. तिच्यापासून यम व यमी हीं जुळीं भावंडें व त्याचप्रमाणें अश्विनी कुमारहि झाले (१०-१७-१ व २). एकदा इंद्रानें या त्वष्ट्याचा पराभव करून त्याच्या पात्रांतील सोमरस तो बलात्कारानें प्याला (३-४८-४) आणि कांहीं प्रसंगावरून त्याच्या त्रिशिर नांवाच्या पुत्रास ठार मारता झाला ( ' त्रिशीर्षाणं सप्तरश्मिं जघन्वान् ' १०-८-८ ). असो. त्वष्टा हा संपत्ति देणारा आहे ( 'त्वं हि रत्नधा असि' १-१५-३ ).

**प्रार्थना:—**पराक्रमी, बलिष्ठ, देवभक्त व शूर पुत्र देण्याबद्दल (७-२-९), यज्ञांत येऊन यजमानाचें रक्षण करण्याबद्दल ( ५-५-९ ) व संपत्ति देण्याबद्दल ( १-५३-३ ) त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे.

---

**(९) द्यावा-पृथ्वी:—**द्यावा-पृथ्वी या जोड देवतांना उद्देशून ऋग्वेदांत एकंदर सहा सूक्तें असून त्यांत त्यांचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे. द्यावापृथ्वी

या देवपुत्री असून यज्ञवर्धक, विशाल व आश्चर्यकारक कृत्य करणाऱ्या आहेत ( 'ऋतावृधा' 'मही' 'सुदंससे' १-१५९-१ ). आईबापाप्रमाणें त्यांचें मन द्रोहशून्य व उदार व अमोघवीर्य आहे ( 'पितुरद्रुहो मनो मातुर्महि' 'सुरेतसा' १-१५९-२). त्या तरुण देवता असून एकत्र राहणाऱ्या अशा बहिणी आहेत ( 'युवती' 'स्वसारा' 'जामी' १-१८५-५ ). त्या महाव्यापक, अत्यंत थोर, विभक्त, आईबापाप्रमाणें भुवनाचें रक्षण करणाऱ्या, अत्यंत धैर्यशाली अशा असून ( 'उरुव्यचसा महिनी असश्चता' 'पितामाताच भुवनानि रक्षतः' 'सधृष्टमे' १-१६०-२ ), उदकपूर्ण व सर्व प्राणिमात्राचें आश्रयस्थान अशा आहेत ( ' घृतवती भुवनानामभिश्रिया ' ६-७०-१ ). त्या मधुर उदक देणाऱ्या असून सुस्वरूप, जरारहित व सामर्थ्यवान् अशा आहेत ( 'मधुदुघे सुपेशसा' 'अजरे भूरिरेतसा' ६-७०-१). त्या अचर व पादरहित असून चालणाऱ्या व उडणाऱ्या प्राणिमात्रांचें धारण करतात (भूरिं द्वे अचरन्ती चरन्तं पद्वन्तं गर्भमपदी दधाते ' १-१८५-२). त्या सुस्वरूप असून अमृत धारण करणाऱ्या आहेत ( 'दधाते ये अमृतं सुप्रतीके १-१८५-६ ). त्या भाग्यशाली व दानशील आहेत ( 'दधाते ये सुभगे सुप्रतूर्ती ' १-१८५-७ ).

संपत्ति देण्याबद्दल ( ' अस्मभ्यं द्यावापृथिवी सुचेतुना रयिं धत्त ' १-१५९-५), कीर्ति व बल देण्याबद्दल ( ' महि श्रवः क्षत्रं द्यावापृथिवी धासथो बृहन् ' १-१६०-५), अन्न देण्याबद्दल ('ऊर्जं नो द्यौश्च पृथिवी च पिन्वताम् ' ६-७०-६ ), वीर्य देण्याबद्दल ( ' अस्मे रेतः सिञ्चतम् ' ६-७०-२ ), मुलेंबाळें देण्याबद्दल ( ६-७०-२ ), कल्याण करण्याबद्दल (' यूयं पात स्वस्तिभिः सदा नः' ७-५३-१ ), देवांचे, मित्रांचे व जावयाचे केलेले अपराध दूर करण्याबद्दल (१-१८५-८) व पाप नाहींसें करण्याबद्दल (' पातावद्याद् दुरितात् ' १-१८५-१० ) त्यांची ठिकठिकाणीं प्रार्थना करण्यांत आली आहे.

---

(१०) **पर्जन्यः**—पर्जन्य म्हणजे मेघ. त्याला ऋग्वेदांत चार सूत्रांतून आळविलें आहे. तो द्यूचा पुत्र ('दिवास्पुत्रः' ७-१०१-१) असून बलवान

('तवसं'५-८३-१),गर्जना करणारा व उदक वर्षाव करणारा व वनस्पतीमध्यें जलरूप गर्भ घालणारा असा आहे ( 'कनिक्रदत् वृषभो जीरदानू रेतो दधात्योषधीषु गर्भम्'५-८३-१). तो ओषधीचें संवर्धन करतो, पाण्याची सुबत्ता करतो आणि सर्व जगावर सत्ता चालवितो ('यो वर्धन ओषधीनां यो अपां यो विश्वस्य जगतो देव ईशे'७-१०१-२), तो जलवर्षाव करून ओषधीमध्यें गर्भ घालणारा ('स रेतोधा वृषभः'७-१०१-६)असून, स्थावर जंगम सृष्टीचा आत्मा आहे ( 'आत्मा जगतस्तस्थुषश्च'७-१०१-६). त्याचीं दोन रूपें असून एक वांझ गार्यासारखें व दुसरें उत्पादक आहे ( 'स्तरीरु त्वद् भवति सूत उ त्वद्' ७-१०१-३). जेव्हां पर्जन्य पावसाच्या रूपानें पृथ्वीवर उतरूं लागतो, तेव्हां वारा जोरानें वाहूं लागतो, विजा चमकूं लागतात, ओषधी अंकुरूं लागतात, आकाश पाझरूं लागतें व पृथ्वी सर्व जगाकरतां सस्यवती होते ( 'प्र वाता वान्ति पतयन्ति विद्युत उदोषधीर्जिहते पिन्वते स्वः । इरा विश्वस्मै भुवनाय जायते यत् पर्जन्यः पृथिवीं रेतसावति ।। ' ५-८३-४). तो वृक्षावर आघात करतो, राक्षसांना ठार मारतो. जेव्हां तो गडगडत दुष्टाचा वध करतो, तेव्हां सर्व जग त्याच्या गडगडाटाला व तडाख्याला भयभीत होऊन जातें ( 'वि वृक्षान् हन्त्युत हन्ति रक्षसो विश्वं बिभाय भुवनं महावधात् । यत् पर्जन्यः स्तनयन् हन्ति दुष्कृतः'५-८३-२).

सुख देण्याबद्दल ( 'मयोभुवः'७-१०१-५ ), ओषधी फलयुक्त करण्याबद्दल (' सन्त्वस्मे सुपिप्पला औषधी' ७-१०१-५), गाईमध्यें, घोड्यांमध्यें, स्त्रियांमध्यें गर्भ उत्पन्न करण्याबद्दल (' यो गर्भमोषधीनां गवां कृणोत्यर्वताम्'। पर्जन्यः पुरुषीणाम्'७-१०२-२), संरक्षण करण्याबद्दल ('स्वरितभिः पात सदा नः' ७-१०१-६), अन्न देण्याबद्दल (७-१०२-१), द्यावापृथ्वी पाण्यानें भरून काढण्याबद्दल त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे.

## बृहद्देवता

' यदिमां प्राजयत्येको रसेनाम्बरजेन गाम् ।
कालेऽत्रिरौर्वशश्चर्षी तेन पर्जन्यमाहतुः ।। २-३७

---

(११) पूषन्:—पूषन् म्हणजे संरक्षण करणारा किंवा भरभराट करणारा असा होतो. याच्या हिश्याला आठ सूक्तें आलीं असून, तितकींच सूक्तें वरुण, सविता व इंद्रावरुण यांच्या पदरांत पडलीं आहेत. हा मेघपुत्र ( 'विमुचो नपात्' १-४२-१) असून, त्याला जटा ( 'कपर्दिनं' ६-५५-२ ) व मिशा ( 'स्मश्रु' १०-२६-७ ) आहेत. तो शक्तिमान ( 'तव्यसो' ५-४३-९ ) व सर्व सत्ताधीश ('ईशानः'६-५४-८) आहे. तो अन्नाचा पालक ( ' वाजानां पतिः' १०-२६-७) व प्राण्यांचा मित्र ( 'पुष्टीनां सखा' १०-२६-७ ) असून, शत्रूला अजिंक्य ('अदाभ्यः'१०-२६-७) असा आहे. त्याच्या हातांत सोन्याचा भाला ( 'हिरण्यवाशीमत्तम' १-४२-६ ) व अंकुश (' या ते अष्ट्रा'६-५३-९) असून, त्यानें तो कंजुष लोकांचीं हृदयें टोंचतो ('परि तृन्धि पणीनामारया हृदया कवे' ६-५३-५ ). तो सूर्याचा दूत ( 'यासि दूत्यां सूर्यस्य' ६-५८-३ ) असून तो द्यावापृथ्वीचा बांधव आहे ( 'पूषा सुबंधुर्दिव आ पृथिव्याः' ६-५८-४ ). त्याच्या रथाला बोकड ( 'अजाश्व' ६-५५-३ ) जोडलेले असून, तो मार्गरक्षक ('पथस्पते' ६-५३-१ ) आहे. तो उषेचा (बहिणीचा) व रात्रीचा (आईचा) प्रियकर आहे. ('मातुर्दिधिषुमब्रवं स्वसुर्जारः शृणोतु नः' ५-५५-५ ).

पूषाचें वैशिष्ट्य म्हणजे हें आहे कीं तो पशुपालक आहे. तो गाईगुरांचा व अश्वादिकांचा रक्षक आहे ('पूषा गा अन्वेतु नः पूषा रक्षत्वर्वतः' ६-५४-५ ). तसाच तो मार्गाचाहि संरक्षक व संकटांतून पार नेणारा आहे ( 'सं पूषन्नध्वनस्तिर्व्यंहो विमुचो नपात्' १-४२-१ ). म्हणून मार्गांतील धोके, लांडगे, चोर, लुटारू इत्यादि दुर्जन यांपासून रक्षण करण्याविषयीं त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे (१-४२-१ ते ३). शत्रूंना दूर ठेवून मार्ग सुरक्षित राखून चांगल्या कुरणाकडे घेऊन जाण्यास त्याची विनवणी करण्यांत आली आहे (१-४२-७ व ८). शिवाय अन्न व संपत्ति देण्याविषयीं त्याला आळविलें आहे.

### बृहद्देवता

पुष्यन् क्षितिं पोषयति प्रणुदन् रश्मिभिस्तमः ।
तेनैनमस्तौत्पूषेति भरद्वाजस्तु पञ्चभिः ॥ २-६३ ॥

---

**(१२) बृहस्पतिः**—बृहस्पति हा देव ऋग्वेदांत महत्त्वाचा देव म्हणून गणला गेला असून, त्याच्या नांवावर फक्त पांचच सूक्तें खर्ची पडलीं असलीं तरी त्याचें स्थान उच्च आहे, हें कांहीं खोटें नाहीं. तो द्यावापृथ्वीचा पुत्र आहे ( 'देवी देवस्य रोदसी जनित्री बृहस्पतिं वावृधतुर्महित्वा' ७-९७-८ ). तो आकाशांतील महातेजापासून उत्पन्न झाला, असाहि एके ठिकाणीं उल्लेख आहे ( 'बृहस्पतिः प्रथमं जायमानो महो ज्योतिषः परमे व्योमन्' ४-५०-४ ). तो अत्यंत शुद्ध आहे ( 'स हि शुचिः' ७-९७-७). त्याच्याजवळ अनेक प्रकारचीं वाहनें आहेत ( 'शतपत्रः' ७-९७-७ ). तो सर्वांचा पावन कर्ता आहे ( 'शुन्ध्युः' ७-९७-७ ), त्याचें आयुध सुवर्णाचें आहे ( 'हिरण्यवाशीः' ७-९७-७ ); त्याचें निवासस्थान मोठें सुंदर आहे ( 'स्वावेशः' ७-९७-७ ), तो अत्यंत देखणा आहे ( 'ऋष्वः' ७-९७-७), आणि तो आपल्या स्तुतिपाठकांना विपुल अन्न देणारा आहे ('पुरू सखिभ्य आसुतिं करिष्ठः' ७-९७-७ ). तो मनुष्यांना सन्मार्ग दाखवितो व त्यांचें रक्षण करतो ( ' सुनीतिभिर्नयसि त्रायसे जनम्' २-२३-४ ), जो त्याला हविर्भाग देतो त्याला दुःख प्राप्त होत नाहीं ( 'न तमंहो अश्नवत्' २-२३-४) व त्याला पापहि लागत नाहीं ( ' न दुरितं कुतश्चन ' २-२३-५ ). जे ब्रह्मद्वेष्टे असतील त्यांना तो परोपरीनें ताप देतो ( 'ब्रह्मद्विषस्तपनः' २-२३-४ ). अत्यंत तेजःपुंज अशा सूर्यापासून किरण जसे उत्पन्न होतात तद्वत् सर्व स्तोत्रें त्याच्यापासूनच उत्पन्न झालीं आहेत ( 'उस्रा इव सूर्यो ज्योतिषा महो विश्वेषामिज्जनिता ब्रह्मणामसि' २-२३-२). तो यज्ञपुरोहित असून त्याच्याशिवाय यज्ञ कर्म सिद्धीस जात नाहीं ( 'यस्मादृते न सिध्यति यज्ञो विपश्चितश्चन' १-१८-७ ). देवांनीं हविर्भाग त्याच्यापासूनच प्राप्त करून घेतला ( 'देवाश्चित्ते असुर्य प्रचेतसो बृहस्पते यज्ञियं भागमानशुः' २-२३-२ ), म्हणून त्याची कीर्ति स्वर्गांत व पृथ्वीवर सर्वत्र पसरून राहिली आहे ( ' अस्य श्लोको दिवीयते पृथिव्याम् ' १-१९०-४ ) आणि त्याचीं स्तुतिस्तोत्रें देव काय, मनुष्य काय अत्यंत आवडीनें ऐकत असतात ( 'गाथान्यः सुरुचो यस्य देवा आशृण्वन्ति नवमानस्य मर्ताः' १-१९०-१ ).

बृहस्पतीच्या गायी पणीनें चोरून नेऊन त्या पर्वत गुहेंत लपवून ठेविल्या होत्या. त्या सोडविण्यासाठीं त्यानें पणींवर इंद्राच्या सहायानें हल्ला करून, त्यांचा नायक जो वल त्यास ठार मारून छिन्नविच्छिन्न केलें ( 'वलं रुरोज' ४-५०-५) व त्याचे अनुयायी जे पणी त्यांना धायधाय रडावयास लावलें ('अरोदयत् पणिम्'१०-६७-६). नंतर त्या गुहेंत कोंडून ठेविलेल्या गायी बाहेर काढल्या आणि त्या स्वर्गात नेऊन वांटून टाकल्या('गा उदाजत् स दिवे वि चाभजन्'२-२४-१४).अमंगलाचा नाश करण्याबद्दल, दुष्टबुद्धीचें निवारण करण्याबद्दल आणि भक्ताला सुखशांति देण्याबद्दल त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे ( 'क्षिपदशस्तिमप दुर्मतिं हन्नथा करद्यजमानाय शं योः' १०-१८२-१ ).

## बृहद्देवता

**बृहन्तौ पाति यल्लोकावेष द्वौ मध्यमोत्तमौ ।**
**बृहता कर्मणा तेन बृहस्पतिरितीळितः ॥ २-३९ ॥**

---

(१३) **मरुत्ः**—ऋग्वेदांत मरुतांचें स्थान बरेंच वर आहे. ते मुख्य देवांपैकीं एक असून, त्यांचा क्रमांक त्यांमध्यें सातवा लागतो. त्यांच्या प्रीत्यर्थ सबंध चौतीस सूक्तें विनियोगिलेलीं असून, इतर देवतांबरोबरहि त्याचें वर्णन आलें आहे. हे गणदेव म्हणजे गटानें एकत्र राहणारे असून, नेहमीं त्यांचा बहुवचनांत उल्लेख करण्यांत येतो. ते रुद्रपुत्र ( 'रुद्राः' १-६४-३) असून, त्यांची माता पृश्नि ही आहे.('पृश्निमातरः'१-३८-४). ते संख्येनें एकवीस असून ('त्रिसप्तैः'१-१३६-६),सर्व समानवयस्क आहेत. म्हणजे त्यांत लहान मोठा असा भेदभाव नाहीं. ('अज्येष्ठासो अकनिष्ठास एते सं भ्रातरो वावृधुः सौभगाय' ५-६०-५ ). अर्थात् ते सर्व एकाच वेळीं व एकाच ठिकाणीं जन्मले व एकत्रच वाढले. त्यांच्या खांद्यावर हत्यारें ('अंसेषु व ऋष्टयः'), पायांत सांखळ्या ('पत्सु खादयः'), छातीवर तेजस्वी हार ('वक्षःसु रुक्मा' ), हातांत लखलखणारें विद्युतास्त्र ( 'अभ्रि-भ्राजसो विद्युतो गभस्त्योः') व डोक्यावर सुवर्णाचें किरीट ('शिप्राः शीर्षसु

रवितता हिरण्ययीः'५-५४-११), धारण केलें आहे. त्यांचा रथ सोन्याचा असून, तो व त्याचीं चाकें व तसेच ते घोडे हे तेजस्वी व बळकट आहेत ('स्थिरा वःसन्तु नेमयो रथा अश्वास एषां सुसंस्कृत अभीशवः'१-३८-१२). ते यमराजाप्रमाणें सुंदर रूपवान असून, मोठे देखणे आहेत ( 'यमा इव सुसंदृशः सुपेशसः' ५-५७-४ ) व मुलाप्रमाणें खेळकर आहेत ( 'शिशूला न क्रीळयः' १०-७८-६ ). ते बलवान असून निष्पाप, पवित्र व सूर्या-प्रमाणें तेजस्वी आहेत (' असुरा अरेपसः । पावकासः सुचयः सूर्या इव ' १-६४-२ ). ते शत्रूंना अति भयंकर आहेत ('घोरवर्पसः' १-६४-२). ते तरुण असून जरारहित आहेत ( 'युवानो रुद्रा अजरा' १-६४-३ ). ते बरच्या, भाले, धनुष्य बाण व भाते इत्यादि आयुधांनीं सुसज्ज आहेत ('वाशीमन्त ऋष्टिमन्तो मनीषिणः सुधन्वान इषुमन्तो निषंगिणः'५-५७-२). ते चालूं लागले म्हणजे त्यांच्या गतीनें पर्वत हादरतात व झाडें मोडून पडतात (' प्र वेपयन्ति पर्वतान् वि विञ्चन्ति वनस्पतीन् ' १-३९-५ ). ते वाऱ्याप्रमाणें वेगवान् (' वातासः ' १०-७८-३ ) असून, चालूं लागले म्हणजे धुळीचे लोळचे लोळ वर आकाशांत उडवितात. एकंदरींत ते अत्यंत बलवान, महापराक्रमी, सर्वश्रेष्ठ, अजिंक्य, सुसंघटित व महाप्रतापी आहेत ('प्रत्वक्षसः प्रतवसो विरप्शिनोऽनानता अविथुरा ऋजीषिणः ' १-८७-१ ).

ते मरुद्देव गडगडाट करणाऱ्या व अक्षय अशा मेघाचे दोहन करणारे असून ( 'उत्सं दुहन्ति स्तनयन्तमक्षितम् ' १-६४-६ ), पृथ्वीवर जल-वर्षाव करतांना वर नभोमंडळांत दिवसा अंधकार पसरवितात ( 'दिवा चित् तमः कृण्वन्ति पर्जन्येनोदवाहेन । यत् पृथिवीं व्युन्दन्ति'१-३८-९). ते पृथ्वीवर जलवर्षाव करीत असतांना आकाशांत विजा कडकडाट करीत चमकूं लागतात ( ' अव स्मयन्त विद्युतः पृथिव्यां यदी घृतं मरुतः प्रष्णुवन्ति' १-१६८-८ ) व आकाशरूपी रक्तवर्ण वृषभ कर्कश डरकाळ्या फोडूं लागतो ( अवोस्त्रियो वृषभः क्रन्दतु द्यौः ' ५-५८-६ ).

ते मोठे गवयी असून वाण नांवाचें त्यांचें प्रिय वाद्य आहे ( 'गोभिर्वाणो अज्यते सोभरीणां' ८-२०-८ ). त्यांनीं इंद्राला वृत्रहननाच्या वेळीं सहाय

केलें ( 'ये (मरुतः) त्वाऽन्वहन् वृत्रमदधुस्तुभ्यमोजः' ३-४७-७ ). त्यांच्या मदतीनेंच इंद्रास गायी मिळाल्या ( 'अविन्द उस्रिया अनु' १-६-५ ). वृत्रासुराच्या लढाईत इंद्राचा पक्ष घेऊन त्यांनीं वृत्राचे सांधे तोडले ( 'वि वृत्रं पर्वशो ययुः' ८-७-२३ ) व पर्वताचा भंग केला ( ' नि पर्वताँ अराजिनः' ८-७-२३ ).

ते मोठे उदार आहेत. ऋत्विज यज्ञांत तूप ओततात त्याप्रमाणें दानशूर मरुत् मधुर उदकाचा वर्षाव करून पृथ्वीला पुष्ट करतात ( 'पिन्वन्त्यपो मरुतः सुदानवः पयो घृतवद् विदथेष्वाभुवः' १-६४-६ ) म्हणून ऋषींनीं त्यांच्याजवळ स्थिर राहणारी, वीरयुक्त व शत्रुनाशक अशी सुंदर संपत्ति देण्यास कळकळीची प्रार्थना केली आहे ( 'नू ष्ठिरं मरुतो वीरवन्तमृतीषाहं रयिमस्मासु धत्त' १-६४-१५). ते सर्पाप्रमाणें मोठे रागीट ( 'अहिमन्यवः' १-६४-८ ) व सिंहाप्रमाणें गंभीर गर्जना करणारे असल्यामुळें गायी व माणसें यांचा संहार करणारा आपला शूल त्यांनीं दूर ठेवावा म्हणून त्यांची करुणा भाकण्यांत आली आहे ( 'आरे गोहा नृहा वधो वो अस्तु' ७-५६-१७ ).

---

(१४) रुद्रः—आज हिंदूंमध्यें रुद्रदेवास जें श्रेष्ठ व मान्य स्थान आहे, तेवढें महत्त्वाचें स्थान ऋग्वेदांत आढळून येत नाहीं. ऋग्वेदांतील १०२८ सूक्तांपैकीं फक्त तीनच सूक्तें त्याच्या नांवावर मोडतात. इतर ठिकाणीं त्याचा क्वचित् उल्लेख असलेला आढळतो व तो बहुतेक विश्वेदेव सूक्तांत प्रत्ययास येतो. रुद्र हा शब्द 'रुत्' या धातूपासून झाला असून, त्याचा अर्थ रडविणें असा आहे.शत्रूला अगर पाप्याला रडविणारा तो रुद्र. अथवा दुःख देणारा तो रुद्र. शिवाय 'रुत्' शब्दाचा ज्ञान असाहि अर्थ होतो. भक्ताला ज्ञान देणारा तो रुद्र. याप्रमाणें रुद्र शब्दाचे विविध अर्थ होतात.

या रुद्र देवाचें ऋग्वेदांत वर्णन आढळतें तें साररूपानें पुढीलप्रमाणें आहे. तो शरीरानें सुदृढ असून ('स्थिरेभिरङ्गैः' २-३३-९ ), त्याचे बाहू वज्राप्रमाणें कठीण आहेत ( 'वज्रबाहुः' २-३३-३). तो बलिष्ठांतला बलिष्ठ असून ( 'तवस्तमस्तवसां' २-३३-३ ) सर्व जीवजातींत अत्यंत श्रेष्ठ आहे

('श्रेष्ठो जातस्य' २-३३-३). तो सुंदर मुकुट धारण करणारा असून('सुशिप्रः' २-३३-५ ), मोठा देदीप्यमान आहे (२-३३-९). त्याचा रंग पिंगट असून ( 'बभ्रुः' ), तो बहुरूपी व उग्र आहे ( 'पुरुरूप उग्रो' २-३३-९). तो रथांत बसणारा असून (' गर्तसदं' २-३३-११), हातांत स्थिर धनुष्य धारण करतो व बाणांचा सारखा वर्षाव करतो ( ' स्थिरधन्वने क्षिप्रेषवे'७-४६-१). तो नित्य तरुण ('युवानं') असून सिंहाप्रमाणें भयंकर आहे ('मृगो न भीमः'२-३३-११).तो भक्तांचा मनोरथ पुरविणारा असून ( वृषभः' ), उपासकांना विपुल संपत्ति देणारा आहे ( 'भूरेर्दातारम्' २-३३-१२ ). त्याप्रमाणें त्याची मंगल कृपादृष्टि अत्यंत सुख देणारी आहे ( 'भद्रा हि ते सुमतिर्मृळयत्तमा' १-११४-९ ). त्याला तीन नेत्र असून तो मरणधर्मरहित व धनधान्य संवर्धक आहे ( 'त्र्यम्बकं सुगन्धिं पुष्टिवर्धनं' ७-५९-१२ ). त्याच्या हातांत चकाकणारें त्रिशूळ असून ( 'तिग्मायुधाय' ७-४६-१) तो शत्रूचा पार फडशा पाडून सोडतो ( 'सह-मानाय' ). तो मरुतांचा पिता असून ( 'पितर्मरुताम्' २-३३-१ ) या विशाल भूलोकांचा स्वामी आहे ( 'ईशानादस्य भुवनस्य' २-३३-९ ). तो महाज्ञानी, अत्यंत उदार व बलशाली आहे ( 'प्रचेतसे मीळ्हुष्टमाय तव्यसे' १-४३-१), तसाच तो शिवस्वरूप आहे ( 'शिवः' १०-९२-९), तो जटाधारी असून स्वर्गांत राहणारा तांबूस रंगाचा वराह आहे ( 'दिवो वराहमरुषं कपर्दिनं' १-११४-५ ).

तो श्रेष्ठ वैद्यराज असून ( ' भिषक्तमं त्वा भिषजां ' २-३३-४ ), त्याच्या जवळ रोग बरे करणाऱ्या औषधी आहेत ( 'जलाषभेषजं रुद्रं ' १-४३-४ ). तो सर्व रोगनिवारक असल्यामुळें माणसांना, गाईगुरांना, घोड्यांना व मेषादिकांना सुख देण्याबद्दल प्रार्थना करण्यांत आली आहे (' सुगं मेषाय मेष्यै नृभ्यो नारिभ्यो गवे' १-४३-६ ). तो सर्व औषधांचा प्रभु आहे ( यो विश्वस्य क्षयति भेषजस्य' १-४२-११ ).

रुद्र हा सर्व देवांत अत्यंत रागीट देव असल्यामुळें त्याचा कोप होऊन मुलाबाळांस, मातापितरांस, नोकरचाकरांस व गाईघोड्यांस उपद्रव होऊं नये म्हणून त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे ( ' मा नस्तोके तनये '

' मा नो वधीः पितरम् ' ' मा नो महान्तमुत मा नो अर्भकं ' ' मा नो गोषु ' ' मा नो अश्वेषु रीरिषः ' १-११४-७ व ८ ). मनुष्यांस व पशूंस सुखशांति लाभावी व गांवांत रोगराईची बाधा न होऊन सर्वजण निरोगी व पुष्ट असावेत, अशी त्याच्याजवळ मागणी करण्यांत आली आहे ('यथा शमसद् द्विपदे चतुष्पदे विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन्ननातुरम् ' १-११४-१ ), आणि आपणा सर्वांस सुखी राखण्यास व निरोगी ठेवण्यास त्याची विनवणी केली जाते (' मृळा नो रुद्रोत नो मयस्कृधि ' १-११४-१ ). येणेंप्रमाणें हें असें रुद्रदेवाचें ऋग्वेदांत थोडक्यांत पण सुंदर वर्णन आहे.

## रुद्राची व्याख्या.

अरोदीदन्तरिक्षे यद् विद्युद्वृष्टिं ददन्नृणाम् ।
चतुर्भिर्ऋषिभिस्तेन रुद्र इत्यभिसंस्तुतः ॥ २-३४ ॥

---

(१५) **वरुणः**—इंद्र हा वैदिक आर्यांचा जसा लढाऊ राष्ट्रीय देव आहे आणि अग्नि हा जसा त्यांचा जागृत गृहपति आहे, तसाच वरुण हा विश्व-व्यवस्थापक व धर्मसंरक्षक देव आहे. मनुष्यमात्राच्या पापपुण्याचा —न्याय-अन्यायाचा—हिशोब ठेवून, त्याप्रमाणें त्यांना बक्षीस वा शिक्षा देणें हें काम विश्वव्यवस्थेंत त्याच्याकडे सोंपविण्यांत आलें आहे. अर्थात् तो न्यायान्याय निर्णयाचा अधिदेव आहे. सूक्तांच्या मानानें त्याचा क्रमांक इंद्राच्या अगर अग्नीच्या मानानें बराच खालीं लागत असला तरी त्याची योग्यता, महिमा व सामर्थ्य इंद्राइतकींच श्रेष्ठ आहेत, असें म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. जलदेवतेचा प्रमुख मान त्याच्याकडेच असून, विश्वाची व्यवस्था लावणारा व पाहणारा देवहि तोच आहे. शिवाय मनुष्यांच्या बऱ्यावाईट कृत्यांवर म्हणजे पापपुण्यावर व नीतिमत्तेवर स्वतंत्र अशी त्याचीच सत्ता चालते. मनुष्यांचीं कसलींहि बरीं वाईट कृत्यें-त्यांच्या मनांतील विचार सुद्धां—त्याला दिसत व कळत असून, त्यांच्या कृतकर्मांचीं सुष्ट अगर दुष्ट फळें त्यांस तो भोगावयास लावतो. दुष्ट व पापी लोकांना आपल्या पाशांत पकडून, त्यांना यथायोग्य शासन करण्यांत त्याच्यासारखा

निष्ठुर देव नाहीं. पण त्याच वेळेस ज्यास पश्चात्ताप झाला असेल, त्यास दया दाखविण्यांतहि तो तितकाच उदार व तत्पर देव आहे. त्याचा जो भक्त आहे म्हणजे त्याचे नियम जो चोख पाळतो, त्याच्याशीं तो मित्रत्वानें वागतो. तो रोग उत्पन्न करतो आणि त्याचप्रमाणें ते दूरहि करूं शकतो. त्याची मित्रावरुण या जोडदेवता नांवानेंहि चांगली प्रसिद्धि आहे. त्याच्याच नांवावर मोडणारीं स्वतंत्र अशीं सूक्तें ऋग्वेदांत फक्त दहा बाराच आहेत. शिवाय मिश्र सूक्तांतहि त्याचा उल्लेख बारंवार करण्यांत आला आहे. आणि त्यांतून त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें.

वरुण हा अदितीचा पुत्र आहे ( 'आदित्यः' २-२५-१२ ). सूर्य हा त्याचा नेत्र आहे ( 'चक्षुः मित्रस्य वरुणस्य' १-११५-१ ) आणि वायु हा त्याचा आत्मा होय ( 'आत्मा ते (वरुणस्य) वातो' ७-८७-२ ). त्यानें द्युलोक स्थिर केला व पृथ्वीच्या विस्तारास मर्यादा घातली ( 'अस्तभ्नात् द्यामसुरो विश्ववेदा अमिमीत वरिमाणं पृथिव्याः' ८-४२-१ ). तो सम्राट् होऊन सर्व भुवनांत अधिष्ठित झाला आहे ( 'आसीदद् विश्वा भुवनानि सम्राड्' ८-४२ १ ). त्यानें अरण्यावर आकाश, घोड्यांत सामर्थ्य, गाईंत दूध, अंतःकरणांत सद्बुद्धि, उदकांत अग्नि, आकाशांत सूर्य व पर्वतावर सोम यांची स्थापना केली ( 'वनेषु व्यन्तरिक्षं ततान वाजमर्वत्सु पय उस्रियासु। हृत्सु क्रतुं वरुणो अप्स्वग्निं दिवि सूर्यमदधात् सोममद्रौ' ५-८५-२). त्याचप्रमाणें त्यानें स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष या लोकत्रयाच्या हितार्थ व सुखार्थ मेघांना अधोमुख करून, त्या उदकानें ही सर्व भूमि भिजवून चिंब करून सोडली ( 'नीचीनबारं वरुणः कवन्धं प्र ससर्ज रोदसी अन्तरिक्षम्। तेन विश्वस्य भुवनस्य राजा यवं न वृष्टिर्व्युनत्ति भूम' ५-८५-३ ). इतकेंच नव्हे, तर सूर्यास सुखानें प्रवास करण्यासाठीं म्हणून त्यानें आकाशांत रस्ता रुंद करून दिला व जेंथें पाऊल ठेवण्याची सोय नव्हती तेथें सरळ जाण्याचा मार्ग आंखून ठेविला ( 'उरुं हि राजा वरुणश्चकार सूर्याय पन्थामन्वेत वा उ। अपदे पादा प्रतिधातवेऽकः' १-२४-८ ). आपल्या अचिंत्य मायाशक्तीच्या योगानें त्यानें सर्व विश्वाला सांवरून धरलें आहे ( 'मायया दधे स विश्वं परि दर्शतः' ८-४१-३ ).

त्यानेंच पृथ्वीवर दिशा उत्पन्न केल्या. ( ' यः ककुभो निधारयः पृथिव्यामधि दर्शतः ' ८-४१-४ ). आकाशांतील नक्षत्रांना तोच धारण करतो. ( ' द्यामधारयन् ' ८-४१-१० ). सूर्याप्रमाणें तो तेजस्वी असून त्यानेंच समुद्राला मर्यादा घालून दिली ( ' अव सिन्धुं वरुणो द्यौरिव स्थात् ' ७-८७-६ ).

तो देखणा आहे ( ' दर्शतः ' ८-४१-३ ). त्याचें कवच सुवर्णाचें असून तो झगझगीत वस्त्रें धारण करतो ( ' बिभ्रद् द्रापिं हिरण्मयं वरुणो वस्त निर्णिजम् ' १-२५-१३ ). त्याला हजार डोळे आहेत ('सहस्रचक्षाः' ७-३४-१०). तो मोठा तेजस्वी आहे ( 'उग्रः ' ७-३४-१० ), तसाच दूरदृष्टि आहे ( 'उरुचक्षः' १-२५-५ ). तो सर्वसमर्थ आहे ( 'असुरः' ८-४२-१ ). तो विश्ववेत्ता आहे ('विश्ववेदा' ८-४२-१ ). तो जन्मरहित असून ('अजः' ८-४१-१० ) सकल भुवनांचा राजा आहे. ('विश्वस्य भुवनस्य राजा' ५-८५-३) तो सद्विचारी आहे ('सुक्रतुः' १-२५-१०).

त्याचें घर स्वर्गात असून तें मोठें बळकट आहे व त्याला हजार खांब आहेत. तेथें मित्रावरुण राहतात. ('ध्रुवे सदस्युत्तमे । सहस्रस्थूण आसाते' (२-४१-५). त्या घराला हजार दरवाजे आहेत ('सहस्रद्वारं जगमा गृहं ते'७-८८-५). अशा घरांत बसून आपल्या नियमाचें पालन करीत सामर्थ्य-संपन्न असा तो वरुण देव सर्व विश्वाचें साम्राज्य चालवितो ( 'नि षसाद धृतव्रतो वरुणः पस्त्या३स्वा । साम्राज्याय सुक्रतुः' १-२५-१० ). तेथें बसून तो ज्ञानी देव जगांतील झालेलीं व होणारीं सर्व कृत्यें पहात असतो ( 'अतो विश्वान्यद्भुता चिकित्वाँ अभि पश्यति । कृतानि या च कर्त्वा' १-२५-११). त्याचे जे दूत आहेत, ते त्याच्या सभोंवती बसलेले असतात ( 'परि स्पशो निषेदिरे' १-२५-१३ ). ते द्युलोक व पृथ्वीलोक या दोन्ही लोकांचें बारकाईनें निरीक्षण करीत असतात ( परि स्पशो वरुणस्य स्मदिष्टा । उभे पश्यन्ति रोदसी सुमेके' ७-८७-३ ). ते अजिंक्य असून, कधींहि फसत नाहींत ('सन्ति स्पशो अदब्धासो अमूराः' ६-६७-५ ).

वरुण हा सकल नीतिमत्तेचा—सदाचाराचा—धारणकर्ता आहे ( 'धृतव्रतः' १-२५-६). म्हणून मनुष्याच्या बऱ्यावाईट कृत्यावर—सत्यासत्य गोष्टींवर-

न्याय-अन्याय वर्तनावर—त्याची सक्त व सतत नजर असते ( 'सत्यानृते अवपश्यञ्जनानाम्' ७-४९-३ ). याचसाठीं त्याला हजार डोळे परमेश्वरानें दिलेले आहेत ( 'सहस्रचक्षाः' ७-३४-१० ). अर्थात् तो सर्व भुवनांत व्यापून राहिला आहे ( 'आसीदद् विश्वा भुवनानि सम्राड्' ८-४२-१ ). तो सर्व भुवनांचा सम्राड् असून, ( 'सम्राजो वरुणः' ७-३८-४ ), तो सृष्टिधर्मांचा—नीति नियमांचा—प्रमुख नेता आहे ( 'अयं हि नेता वरुण ऋतस्य' ७-४०-४ ). अर्थात् जे त्याचे नियम मोडून आडमार्गानें जाणारे आहेत—म्हणजे नैतिक गुन्हेगार आहेत—त्यांना तो पाशांत पकडून योग्य शिक्षा करतो. कारण त्याचे जे नियम आहेत, ते अनुल्लंघनीय आहेत ( 'अदब्धानि वरुणस्य व्रतानि' १-२४-१० ). पण जे त्याचे उपासक आहेत, त्यांनीं कदाचित् कांहीं अपराध केला असला तरी त्यांना त्याची क्षमा करून, तो त्यांना सुखांत ठेवितो ( 'यो मृळयति चक्रुषे चिदागो' ७-८७-७ ), असा तो इतका उदार मनाचा आहे. त्याचप्रमाणें मनुष्याचें आयुष्य वाढविणें हें हि त्याच्या हातांत आहे ( 'प्र ण आयूंषि तारिषत्' १-२५-१२). यासाठीं त्याच्याजवळ शेंकडो म्हणजे असंख्य औषधि आहेत ( 'शतं ते राजन् भिषजः' १-२४-९ ).

**प्रार्थना:**—दारिद्र्य घालवून देण्याविषयीं त्याची प्रार्थना करण्यांत येते ( 'बाधस्व दूरे निर्ऋतिम्' १-२४-९ ). आयुष्य हरण न करण्याविषयीं त्याची विनवणी केली जाते ( 'मा न आयुः प्र मोषीः' १-२४-११ ). केलेल्या पापापासून—अपराधापासून—मुक्त करण्याविषयीं त्याचा धांवा केला जातो ( 'कृतं चिदेनः प्र मुमुग्ध्यस्मत्' १-२४-९ ), आणि त्याच्या जखडलेल्या तीन पाशांतून मुक्त करण्याविषयीं त्याची दया भाकिली जाते ( 'उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय' १-२४-१५ ). एकंदरींत तात्पर्य काय तर सर्व पापदुरितांतून मुक्त करून येथील योग व क्षेम सुसूत्र चालविण्याविषयीं त्याची प्रार्थना करण्यांत येते ( 'शं नः क्षेमे शमु योगे नो अस्तु' ७-८६-८ ).

### बृहद्देवता

त्रीणीमान्यावृणोत्येको मूर्तेन तु रसेन यत् ।
तयैनं वरुणं शक्त्या स्तुतिष्वाहुः कृपण्यवः ॥ २-३३ ॥

१६ वायुः—वायूला ऋग्वेदांत सहा संपूर्ण सूक्तें देण्यांत आलीं असून, शिवाय इतर देवतांच्या जोडीनेंहि त्याचें इतरत्र वर्णन करण्यांत आलें आहे. त्याचें चित्र तेथें रेखाटण्यांत आलें आहे तें एकंदरीनें असें:—त्याला द्यावापृथ्वीनें निर्माण केलें असून ( 'राये नु यं (वायुं) जज्ञतू रोदसीमे' ७-९०-३ ), त्याला त्वष्ट्याचा जामात आहे असें म्हटलें आहे ('त्वष्टुर्जामातरं' ८-२६-२१ ). तो अत्यंत रूपसंपन्न आहे ( 'सुप्सरस्तमं' ८-२६-२४ ). त्याला हजार डोळे असून ('सहस्राक्षा' १-२३-३ ), तो मनाच्या गतीनें धांवतो ('मनोजवा' १-२३-३ ). तो देवांतला अग्रेसर असून 'अग्रियः' , उदकांचा सखा आहे ('अपां सखा १०-१६८-३ ), तो सोमरक्षक असून ('वायुः सोमस्य रक्षिता' १०-८५-५ ), मरुतांचा जनक आहे ('अजनयो मरुतः' १-१३४-४ ). सर्व प्राणिमात्रांच्या आधीं तो जन्मला असून ('प्रथमजा' १०-१६८-३ ), तो मनास येईल तिकडे जातो. अर्थात् तो स्वैरसंचारी आहे. ('यथावशं चरति देव एषः' १०-१६८-४). तो देवांचा आत्मा असून ('आत्मा देवानां'१०-१६८-४) सर्व भूतमात्रांचा प्राण रूपानें हृदयस्थहि आहे('भुवनस्य गर्भः'१०-१६८-४). त्याचा संचारमार्ग आकाशांतून असून ( 'अंतरिक्षे पथिभिरीयमानः' १०-१६८-३),तो सतत भ्रमण करीत असतो.अर्थात् त्याला विसावा म्हणून एक दिवसाचा देखील नाहीं ('न नि विशते कतमच्चनाहः' १०-१६८-३). त्याचा रथ देदीप्यमान असून ('वायवा चंद्रेण रथेन याहि' ४-४८-४ ), त्याला एक हजार घोडे जोडलेले आहेत ('उत वा ते सहस्रिणो रथ आ यातु पाजसा ' ४-४८-५ ). वायु हा सर्व भुवनांचा राजा असून ('अस्य विश्वस्य भुवनस्य राजा' १०-१६८-२,), तो मोठा विचित्रकर्मा आहे ('अद्भुतः' ८-२६-२१ ). काय सांगावा त्याचा प्रभाव ! तो एकदा भडकून जोरानें वाहूं लागला म्हणजे त्याचा घनगंभीर घोष गिरिकंदरांत दुमदूमन जातो ('स्तनयन्नस्य घोषाः' १०-१६८-१ ) व स्थावरजंगमादिकांचा तो पार फन्ना उडवून देतो ('रुजन्नेति' १०-१६८-१). त्याचप्रमाणें पृथ्वीवरील धुरळा उंच आकाशांत उडवीत दाही दिशा तो धुंद करून सोडतो ('अरुणानि कृण्वन्नुतो एति पृथिव्या रेणुमस्यन्' १०-१६८-१).

पण चमत्कार हा कीं त्याचा शब्द तेवढा ऐकू येतो पण त्याचें रूप मात्र कोणालाच दिसत नाहीं ! ('घोषा इदस्य शृण्विरे न रूपं' १०-१६८-४). असा हा वायु देव आमचा पिता आहे, भ्राता आहे व सखाहि आहे ! ('उत वात पितासि न उत भ्रातोत नः सखा' १०-१८६-२). त्याच्या घरीं अमृताचा निधि आहे ('यददो वात ते गृहेऽमृतस्य निधिर्हितः' १०-१८६-३). रोगनाशक व सुखकारक असें हितकर उदक देण्याबद्दल ('वात आ वातु भेषजं शंभु मयोभु नो हृदे' १०-१८६-१ ), आयुष्य वाढविण्याबद्दल ('प्र ण आयूँषि तारिषत्' १०-१८६-१), निजलेल्या भक्ताला जागृत करण्याबद्दल ('प्र बोधया पुरन्धिं १-१३४-३), उषेला प्रकाशित करण्याबद्दल ('वासयोषसः' १-१३४-३), त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे.

कांहीं कांहीं देवांचीं विशिष्ट अशीं वेगवेगळीं वाहनें आहेत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—इंद्राचें वाहन घोडा असून, त्याला हरि हें नांव आहे. सूर्याचें वाहनहि घोडा असून, त्याला हरित् हें नांव आहे. वायूचें वाहनहि पण घोडाच असून त्याला नियुत् हें नांव आहे. पूषाचें वाहन बोकड, अश्विनींचें गरुड, मरुतचें ठिपके असलेला सारंग, उषेचें वाहन गाय, विष्णूचें गरुड, रुद्राचें नंदी, सरस्वतीचें मोर, यमाचें रेडा आणि चंद्राचें हरिण, अशीं हीं कांहीं विशिष्ट देवतांचीं विशिष्ट वाहनें आहेत.

**बृहद्देवता**

**' अणिष्ठ एष यत्तु त्रीन्व्याप्यैकोऽयोन्नि तिष्ठति ।**
**तेनैनमृषयोऽर्चन्तः कर्मणा वायुमब्रुवन् ' ॥ २-३२ ॥**

---

(१७) **विष्णुः—**ऋग्वेदांत सूक्तांच्या मानानें विष्णूचा क्रमांक फारच खालीं लागतो. त्याच्या वाटणीस स्वतंत्र अशीं फक्त तीनच सूक्तें आलीं आहेत आणि इन्द्राच्या जोडीला मधून मधून त्याच्या कांहीं ऋचा आढळतात. त्याचें वर्णन हें असें आहे—हा विष्णु देव इतका मोठा आहे कीं, त्यानें तीनच पावलें चालून तेवढ्यांत हें त्रैलोक्य व्यापून सोडलें, ( य इदं दीर्घं प्रयतं सधस्थमेको विममे त्रिभिरित् पदेभिः' १-१५४-३). ही विशाल पृथ्वी, हा तेजस्वी अंतरिक्ष लोक, व हीं सर्व चौदा भुवनें—अर्थात् हें सर्व

स्थिरचर जात–तो एकटाच्च आपल्या महिम्यानें धारण करून राहिला आहे, ( 'य उ त्रिधातु पृथ्वीमुत द्यामेको दाधार भुवनानि विश्वा' १-१५४-४). त्याच्या पादतलांत मधुर अन्नाचा अक्षय सांठा असून, त्यामुळेंच लोकांना तृप्तियुक्त आनंद प्राप्त होतो. ('यस्य त्री पूर्णा पदान्यक्षीयमाणा स्वधया मदन्ति' १-१५-४ ). त्याचें जें परम सुखात्मक असें सुविख्यात निवासस्थान आहे, तेथें सुमधुर असा अमृताचा झरा आहे. ( विष्णोः पदे परमे मध्व उत्सः'१-१५४-५). तेथें गेल्यावर विष्णुभक्त त्याचा यथेच्छ उपभोग घेऊन आनंदित होतात, ('नरो यत्र देवयवो मदन्ति'१-५४-५). त्याचीं जीं तीन पावलें आहेत, त्यांपैकीं फक्त दोनच म्हणजे पृथ्वी व अंतरिक्ष–हीं एवढींच काय तीं मनुष्यास दिसतात. तिसरें पाऊल–म्हणजे स्वर्ग–तें मात्र कोणालाच दिसत नाहीं, (' द्वे इदस्य क्रमणे स्वर्दृशोऽभिख्याय मर्त्यो भुरण्यति । तृतीयमस्य नकिरा दधर्षति' १-१५५-५ ). हा विष्णु देव जगाचा प्रभु आहे, तारक आहे व तसाच मोठा उदार असून त्याला शत्रु कोणीच नाहीं ('तत्तादितदिदस्य पौंस्यं गृणीमसीनस्य त्रातुरवृकस्य मीळ्हुषः' १-१५५-४ ). त्याचप्रमाणें तो भक्तास सुखदायक आहे, घृतप्रिय आहे, मोठा कीर्तिमान व भक्तरक्षक आहे ( ' भवा मित्रो न शेव्यो घृतासुतिर्विभूतद्युम्न एवया उ सप्रथाः' १-१५६-१ ). या विष्णुदेवाचा महिमा इतका मोठा आहे, कीं तो सर्वच्या सर्व मनुष्याला कळणें शक्यच नाहीं, ( ' न ते महित्वमन्वश्नुवन्ति ' ७-९९-१ ). जो त्याचें पूजन करतो व स्तुतिस्तोत्र गातो, त्याला इहलोकीं कीर्ति मिळून मरणोत्तर तो त्याच्या सुखैक श्रेष्ठ धामाप्रत जातो. ( ' यः पूर्व्याय वेधसे नवीयसे सुमज्जानये विष्णवे ददाशति । यो जातमस्य महतो महि ब्रवत् सेदु श्रवोभिर्युज्यं चिदभ्यसत्' १-१५६-२ ). जो मनुष्य या विष्णु देवाला श्रद्धापूर्वक हविर्भाग देतो, त्याला ताबडतोब धनलाभ होतो, ( ' नू मर्तो दयते सनिष्यन् यो विष्णव उरुगायाय दाशत्'७-१००-१); फार काय, या विष्णुदेवाचा महिमा इतका मोठा नि इतका अगाध आहे कीं,त्याचा परमपार मागचे ऋषि झाले काय, अगर पुढें जन्मणारे तरी काय, कोणीच अजमावूं शकत नाहींत ! ('न ते विष्णो जायमानो न जातो देव महिम्नः परमन्तमाप ' ७-९९-२ ).

आतां या विष्णु देवानें आपल्या तीन पादांनीं ही सबंध पृथ्वी कशी व कां आक्रमण केली याचा थोडक्यांत इतिहास सांगून, हें विष्णु-चरित्र संपवितों. ही कथा शतपथांत आली आहे ती अशी—देव व असुर हे दोघेहि प्रजापतीचे पुत्र असून, त्या दोघांमध्यें वर्चस्वासाठीं स्पर्धा लागली व त्या चुरशींत देवांचा पराभव झाला. अर्थात् असुर विजयी झाल्यामुळें ते पृथ्वीचे एकमेव स्वामी झाले. तेथें देवांना टीचभर देखील भूमि राहिली नाहीं. पुढें ती पृथिवी आपापसांत वांटून घेण्याचें ठरवून त्याप्रमाणें ते उद्योगास लागले. तेव्हां देवांना मोठा विचार पडला. असुरांनीं जर सबंध पृथ्वी वाटून घेतली तर मग आपलें कसें होणार ? कोठें राहावें नि काय करावें ? याची त्यांस फार मोठी विवंचना लागून राहिली.

तेव्हां आतां स्वस्थ बसून चालावयाचें नाहीं, कांहीं तरी शक्कल लढवून आपली कशी तरी सोय लावून घेतली पाहिजे, असा विचार करून विष्णूला यज्ञेश्वराचें लहान रूप देऊन, त्याला डोकीवर घेऊन ते देव जेथें वांटणीचें काम चाललें होतें तेथें असुरांजवळ आले व आपणास पृथ्वीमध्यें कांहीं भाग देण्याविषयीं त्यांना विनवूं लागले. तेव्हां असुरांनीं थोर मन करून त्यांना म्हटलें—आतां तुम्हीं तोंड काढून मागतच आहां, तेव्हां आम्ही नाहीं म्हणत नाहीं. ठीक आहे. मात्र आम्ही देऊं तितकेंच तुम्हीं घेतलें पाहिजे. अधिक मिळणार नाहीं. देवांनीं त्याला मान हलवून आपली सम्मति दिली. तेव्हां ते म्हणाले—तर आतां असें करा. हा जो तुमच्या डोक्यावर वामनमूर्ति विष्णु आहे, त्याच्या तीन पावलांत मावेल एवढीच भूमि आम्ही तुम्हांस देऊं ! 'बरें आहे' असें म्हणून विष्णूला खालीं उतरवून त्यास त्यांनीं तीन पावलें टाकण्यास सांगितलें. तेव्हां विष्णूनें विराट स्वरूप धारण करून आपल्या तीन पावलांतच ही सबंध पृथ्वी व्यापून टाकली. तेव्हां असुरांचीं तोंडें पाहण्यासारखीं होतीं. बिचारे करतात काय ? वचनांत सांपडल्यामुळें आपल्या शब्दास जागून त्यांनीं सबंध पृथ्वी देवांना देऊन, आपण पाताळांत चालते झाले ! अशी ही विष्णु देवाच्या ऋग्वेदांतील त्रिविक्रमाची अद्भुत कथा आहे.

आतां हे जे वैदिक देव आहेत त्यांचीं निवासस्थानें तीन ठिकाणीं

म्हणजे स्वर्ग, अंतरिक्ष व पृथ्वी या तीन लोकांत असून, कोण कोठें राहतात त्याचा तपशील म्हणजे तो असाः—वरुण, मित्र, आदित्य, सूर्य, सविता, पूषा, विष्णु, विवस्वान, आश्विन् , उषा व चंद्र इत्यादि देव स्वर्गात राहणारे देव आहेत. त्याचप्रमाणें इंद्र, त्रित आप्त्य, अपांनपात्, अहिर्बुध्न्य, अज एकपाद, मातारिश्वा, वायु, पर्जन्य, आप, रुद्र व मरुत् हे अंतरिक्षांत राहणारे देव आहेत, आणि अग्नि, बृहस्पति, सोम, नद्या, पृथ्वी व समुद्र यांचें निवासस्थान म्हणजे ही पृथ्वीच होय. असें जरी असलें तरी प्रसंगोपात हे सगळे देव तीनहि लोकांत जाऊं येऊं शकतात. अर्थात् ते त्रैलोक्य-संचारी आहेत, हें विसरूं नये.

विष्णूची बृहद्देवतेंत व्याख्या करण्यांत आली आहे ती अशीः—

**‘ विष्णोतेर्विशतेर्वा स्याद् वेवेष्टे र्व्याप्तिकर्मणः ।**
**विष्णुर्निरुच्यते सूर्यः सर्वे सर्वान्तरश्च यः ’** ।। २-६९ ।।

---

(१८) **सरस्वतीः**—नदीला देवता समजून तिची प्रार्थना करण्याचा प्रधात फार प्राचीन कालापासून असून, त्याप्रमाणें ऋग्वेदांत तिचें स्तवन करण्यांत आलें आहे. तिला ऋग्वेदांत फक्त दोनच सूक्तें देण्यांत आलीं असून इतर देवतांबरोबरहि तिला क्वचित् ठिकाणीं स्थान मिळालें आहे. वेदकालीं सिंधु, सरस्वती व शरयू यांची गणना महानद्यांत होत असून, त्यांत सरस्वती ही ऋषींच्या पूर्ण मर्जीतली होती. तिचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतेंः— पर्वतापासून समुद्रापर्यंत वाहणाऱ्या नद्यांमध्यें ही सरस्वती तेवढीच पवित्र व शुद्ध आहे. ( ‘एकाचेतत् सरस्वती नदीनां शुचिर्यती गिरिभ्य आ समुद्रात्’ ७-९५-२ ) व आपल्या अफाट सामर्थ्यानी व जोरकस लाटांनीं कमलाचें मूळ उपटावें त्याप्रमाणें पर्वताचे कडेचेकडे उलथून बाजूस सारते ( ‘इयं शुष्मेभिर्बिसखा इवारुजत् सानु गिरीणां तविषेभिरूर्मिभिः’ ६-६१-२ ). तिचें सामर्थ्य अपार असून ती अजिंक्य अशी आहे ( यस्या अनन्तो अन्हुतस्त्वेषश्चरिष्णुरर्णवः । अमश्चरति रोरुवत्’ ६-६१-८ ). ती तेजस्वी, प्रसरणशील व उदकपूर्ण असून, तिचा प्रवाह खळखळ आवाज करीत

जोरानें वाहतो ( ६-६१-८ ). ती वेगवानांतली अत्यंत वेगवती असून (' या अपसामपस्तमा ' ६-६१-१३ ), सर्व मोठ्या नद्यांत महात्म्यानें श्रेष्ठ आहे ('प्र या महिम्ना महिनासु चेकिते' ६-६१-१३). मातांमध्यें ती श्रेष्ठ माता, नद्यांमध्यें श्रेष्ठ नदी व देवींमध्यें श्रेष्ठ देवी अशी ही सरस्वती असून ( 'अम्बितमे नदीतमे देवीतमे सरस्वति' २-४१-१६ ), ती जीवन शक्तीचा लाभ करून देणारी आहे ( 'त्वे विश्वा सरस्वति श्रितायूंषि देव्याम्' २-४१-१७ ). तिनें भक्त वध्र्यश्व्याला दिवोदास नांवाचा पुत्र प्राप्त करून दिला ( 'इयमदाद् रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे' ६-६१-१ ). ती शुद्ध करणारी ( 'पावका' १-३-१० ), मधुर गायनाची प्रेरणा करणारी ( 'चोदयित्री सूनृतानां' १-३-११ ) व सद्बुद्धीला तजेला देणारी ( 'चेतन्ती सुमतीनाम्' १-३-११ ) अशी आहे. ती अखिल बुद्धिमत्तेची अधिष्ठात्री आहे ( 'धियो विश्वा विराजति' १-३-१२ ). ती सात नद्यांची बहीण ( 'सप्तस्वसा' ६ ६१-१० ) असून, ती सर्वांच्या लाडक्यांतली लाडकी आहे ('प्रिया प्रियासु' ६-६१-१०). ती त्रैलोक्यांत राहणारी असून ('त्रिषधस्था'), तिला सात शाखा म्हणजे भगिनी आहेत ('सप्तस्वसा' ६-६१-१०). ती पंचजनांची उत्कर्ष करणारी असून ( 'पञ्च जाता वर्धयन्ती' ६-६१-१२), देव निंदकांचा नाश करणारी आहे ( 'देवनिदो नि बर्हय' ६-६१-३ ). तिनें वृत्राला ठार मारलें व पणींचा नाश केला ( 'वृत्रघ्नी' ६-६१-७ व 'आचखादावसं पणिम्' ६-६१-१ ).

ती स्तोतृजनांची रक्षणकर्त्री असून ( 'धीनामवित्री' ६-६१-४ ) अन्नानें सुसमृद्ध आहे ( 'वाजिनीवती' ६-६१-४ ). ती सर्व जलसंपन्न नद्यांत अत्यंत जलपूर्ण आहे ( 'अपसमपस्तमा' १०-६१-१३ ). संपत्ति देण्याबद्दल ( ' वार्यं दात् ' १०-१७-७ ), आरोग्यवर्धक अन्न देण्याबद्दल, ( 'अनमीवा इष आ धेह्यस्मे' १०-१७-८ ), सामर्थ्य देण्याबद्दल ( 'रासि वाजान्' ७-९५-६ ), कल्याणपूर्वक रक्षण करण्याबद्दल ( 'स्वस्तिभिः पात सदा नः' ७-९५-६ ) व लढाईंत रक्षण करण्याबद्दल ( 'अवा वाजेषु वाजिनि' ६-६१-६ ) व शत्रूंस ठार मारण्याबद्दल ( 'विश्वा अति द्विषः (नयतु) ६-६१-९ ) व निंदकापासून रक्षण करण्याबद्दल ( 'निदस्पातु' ६-६१-११ ) तिची प्रार्थना करण्यांत आली आहे.

---

(१९) **सविता**—सविता देवाप्रीत्यर्थ ऋग्वेदांत पूर्ण नऊ सूक्तें देण्यांत आलीं असून, इतर देवतांबरोबरहि त्याचें वर्णन इतर सूक्तांतहि आलें आहे. सवितृ हा शब्द 'सू' धातूपासून झाला असून, त्याचा अर्थ प्रेरणा करणें, चेतना देणें, उद्दीपित करणें, उठविणें असा असून जगाच्या प्रेरक शक्तीला सविता हें नांव देण्यांत आलें आहे. यास्काचार्यांनीं 'सविता' म्हणजे 'प्रसविता' असा अर्थ दिला आहे. प्रसविता म्हणजे प्रेरणा करणारा, चैतन्य देणारा असा अर्थ होतो. हल्लींच्या सांप्रदायिक भाषेंत सविता व सूर्य एकच मानण्यांत येत असले तरी ऋग्वेदांत ते निराळे गणले गेले आहेत. सायणाचार्यांनीं सूर्य उदय पावण्यापूर्वीं सविता व सूर्योदयानंतर सूर्यास्तापर्यंत त्यालाच सूर्य असें म्हटलें आहे. वैदिकाचा प्रसिद्ध गायत्री मंत्र या सवितृ देवतेला उद्देशूनच म्हणण्यांत आला आहे. अर्थात् सविता देव हा मनुष्यमात्रांचा स्फूर्तिदायक असा प्रत्यक्ष देव आहे.

या सविता देवाचें वर्णन ऋग्वेदांत पुढीलप्रमाणें आहेः—तो हिरण्यनेत्र ( 'हिरण्याक्षः' १-३५-८ ), हिरण्यहस्त ('हिरण्यपाणिः' १-३५-९), हिरण्यजिव्ह ( 'हिरण्यजिव्हः' ६-७१-३ ) आहे. त्याचे केंस पिवळे ( 'हरिकेशः' १०-१३९-१ ) व झगा पिंगट ( 'पिशंगं द्रापि' ४-५३-२) आहे. त्याचा रथ सोन्याचा असून ( 'हिरण्ययेन सविता रथेनाऽऽदेवो याति' १-३५-२ ), त्याला तेजस्वी घोडे जोडलेले आहेत ( 'आ वहमानो अश्वैः' ७-४५-१ ). तो उषेच्या पूर्वीं अश्विदेवांच्या रथाला पाठवितो ( 'पूर्वं सवितोषसो रथमृताय चित्रं घृतवन्तमिष्यति' १-३४-१० ) आणि आपण उषेच्या नंतर प्रकाशूं लागतो ( 'सविता वेरण्योऽनु प्रयाणमुषसो विराजति' ५-८१-२ ). तो उदय पावल्यावर अंतरिक्ष, द्यु व पृथ्वी यांना तेजानें भरून काढतो ( आ-प्रा रजांसि दिव्यानि पार्थिवा' ४-५३-३ ) व सर्व प्राण्यांचीं कृत्यें पाहत फिरतो ( 'देवो याति भुवनानि पश्यन्' १-३५-२). तो असुर म्हणजे सर्व समर्थ असून राक्षसांना पिटाळून लावणारा आहे ( १-३५-१० ). तो ऐश्वर्यवान् असून, चैतन्यदाता व स्थितिकर्ता आणि सर्व स्थावर जंगम सृष्टीचा स्वामी आहे ( 'बृहत्सुम्नः प्रसवीता निवेशनो जगतः स्थातुरुभयस्य यो वशी' ४-५३-६ ). तो द्युलोकाचा आधार व जगाचा अधिपति आहे ( 'दिवो धर्ता भुवनस्य प्रजापतिः'

४-५३-२ ). तो सुवर्णहस्त व सर्वद्रष्टा असून आकाश व पृथ्वी यांमधून मार्ग आक्रमीत असून रोगाचा नाश करीत सूर्याला चालविणारा आहे ( 'हिरण्यपाणिः सविता विचर्षणिरुभे द्यावापृथिवी अन्तरीयते । अपामीवां बाधते वेति सूर्यम्' १-३५-९ ). त्या सवित्यापासूनच पृथ्वी उत्पन्न झाली व अंतरिक्षहि झालें ( 'अतो भूरत आ उत्थितं रजः' १०-१४९-२ ). त्याप्रमाणेंच द्यावापृथ्वी विस्तृत झाली ( 'अतो द्यावापृथिवी अप्रथेताम्' १०-१४९-२ ).

सविता हा सकाळीं जगाला उठवितो व संध्याकाळीं निजवितो. तो अस्तास गेला म्हणजे प्रवासी लोक प्रवास थांबवितात ( 'अरीरमदतमानं चिदेतोः' २-३८-३ ), योद्धे युद्ध थांबवितात. ( 'समाववर्ति विष्ठितो जिगीषुः' २-३८-६ ). जगांत बाहेर वावरणाऱ्या मनुष्यांचें मन परत घराकडे वळतें ( 'विश्वेषां कामश्चरताममाभूत्' २-३८-६). कामकरी लोक मधेंच काम थांबवून घराकडे परतरतात ( शश्वाँ अपो विकृतं हित्व्यागात्' २-३८-६ ) आणि पक्षी घरट्यांकडे व गाई गोष्ठ्यांकडे वळतात ('विश्वो मार्ताण्डो व्रजमा पशुर्गात्' २-३८-८ ). त्याचे हे कायदे कोणी मोडत नाहींत ( ' नकिरस्य तानि व्रता देवस्य सवितुर्मिनन्ति' २-३८-७).

हा सविता देव भक्तांना श्रेष्ठ धन देणारा, (श्रेष्ठं नो अत्र द्रविणं ददत्' ४-५४-१ ), विविध प्रकारचें अन्न देणारा ( चित्रं वयोऽस्मे दधातु' ७-४५-४ ), उत्कृष्ट घर देणारा ( 'छर्दिर्येन दाशुषे यच्छति' ४-५३-१ ), कल्याण करणारा ( 'भद्रं तन्न आसुव' ५-८२-५ ), रोग बरे करणारा ( 'अपामीवां बाधते' १-३५-९ ), पाप हरण करणारा ( 'दुरितानि परासुव' ५-८२-५ ), दुःस्वप्न नाश करणारा ( 'परा दुष्वप्न्यं सुव' ५-८२-४ ), सर्व संकटें दूर करणारा ( 'दुरितानि परा सुव' ५-८३-५ ), राक्षस व चेटके यांना हाकून लावणारा ( 'अपसेधन् रक्षसो यातुधानान्' १-३५-१०). व सुख देणारा ( शर्म यच्छ' ४-५३-६ ) व अन्न व संतति देणारा ( 'दधातु नः सविता सुप्रजामिषम्' ४-५३-७ ) असा आहे व तशी त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे.

## बृहद्देवता

‘ संवर्तयंस्तमः सूर्यादुषसं च प्रवर्तयन् ।
दिवाकरं प्रसौत्येकः सविता तेन कर्मणा ॥ २-६१ ॥

---

(२०) सूर्यः—सूर्य ही देवता अग्निप्रमाणेंच वैदिक ऋषींना फार प्रिय असून, त्याच्यासाठीं सात ऋचा गाण्यांत आल्या आहेत व त्या अत्यंत अर्थपूर्ण आहेत. सूर्य हें देवांचें सुंदर मुख (‘ चित्रं देवानामुदगादनीकं ’ १ ११५-१ ) व वरुण, मित्र नि अग्नि यांचा डोळा (‘चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः’ १-११५-१ ) आहे. तो सर्व जगावर देखरेख करणारा ( विश्वदर्शतः १-५०-७ ) असल्यामुळें त्याला मनुष्यांचीं चांगलीं-वाईट अशीं सर्व कृत्यें दिसतात ( ‘ ऋजु मर्त्येषु वृजिना च पश्यन् ’ ६-५१-२ ). तो सर्व स्थावर जंगम सृष्टीचा आत्मा ( ‘ सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ’ १-११५-१ ) असून, जगाचा रक्षक ( ‘ जगतश्च गोपा ’ ७-६०-२ ) आहे. सर्व जनाला जागें करणारा तोच असून निद्रेंतून उठल्यावर ते आपापल्या धनोत्पादक कार्यास लागतात ( ‘ नूनं जना सूर्येण प्रसुता अयन्नर्थानि कृणवन्नपांसि ’ ७-६३-४ ). अर्थात् सूर्य उगवला म्हणजे जग जागें होतें व मावळला म्हणजे निद्रित होतें ( ‘ यस्य ते विश्वा भुवनानि केतुना प्र चेरते नि च विशन्ति अक्तुभिः ’ १०-३७-९ ). सूर्याचें तेज सर्वोत्तम असून सर्व प्रकाशणाऱ्या गोलांमध्यें तें श्रेष्ठ तेज आहे (‘इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरुत्तमं ’ १०-१७०-३ ).

सूर्य हा अदितीचा पुत्र (‘आदित्यः ’ १-१९१-९ ) असून, उषा त्याची पत्नी ( सूर्यस्य योषा, ७-७५-५ ) आहे. द्यौ हा त्याचा बाप ( ‘ दिवस्पुत्राय ’ १०-३७-१ ) असून पूषा हा त्याचा दूत ( यासि दूत्यां सूर्यस्य ’ ६-५८-३ ) आहे. तो आकाशाचा अलंकार (‘ दिवो रुक्म ’ ७-६३-४ ) असून, अंतरिक्षांतून जाणारा पक्षी (‘ पतंग ’ १०-१७७-१) आहे. त्याच्या रथाला सात घोडे ( सप्त त्वा हरितो रथो वहन्ति देव सूर्य’ १-५०-८ ) असून उषा ही त्याला मार्ग मोकळा करून देते. ( ‘ आरेक्

पन्थां यातवे सूर्याय ' १-११३-१६ ). शिवाय किरणहि त्यास वाहून नेतात (' जातवेदसं देवं वहन्ति केतवः ' १-५०-१ ) असेंहि अन्यत्र म्हटलें आहे.

सूर्यानें स्वर्गाला सावरून धरलें असून (सूर्येणोत्तभिता द्यौः'१०-८५-१) आपल्या तेजानें द्यावा, पृथिवी व अंतरिक्ष हीं त्यानें कोंदून टाकिलीं आहेत. (' आप्रा द्यावा पृथिवी अन्तरिक्षं वि सुर्यो रश्मिभिश्चेकितानः'४-१४-२). सूर्य हा अंधःकाराचा नाश करणारा असून, रोग व दुःस्वप्न यांचा नाश करणारा आहे (' अपामीवामप दुष्ष्वप्न्यं सुव ' १०-३७-५ ). तो सर्व अदृष्ट विषारांना व राक्षसीनां मारणारा ( 'अदृष्टान् त्सर्वाञ्जभयन् त्सर्वाश्च यातुधान्यः'१-१९१-८ ) असून, हृद्रोग म्हणजे क्षयरोग व कावीळ यांचा परिहारक आहे. शिवाय तो अमित्र घातक, वृत्रघातक, दस्यूघातक, असुर-घातक व शत्रुघातक आहे.

## बृहद्देवता

' भवद्भूतस्य भव्यस्य जंगमस्थावरस्य च ।
अस्यैक सूर्यमेवैकं प्रभवं प्रलयं विदुः ॥ १·६१ ॥

---

(२१) **सोमः**—ऋग्वेदांत सोमाचें दोन प्रकारचें वर्णन असून, एक देवता म्हणून व दुसरें सोमवल्लि म्हणून त्याची महति गाण्यांत आली आहे. या दोहींचीं मिळून एकंदर ११७ सूक्तें असून, त्या मानानें त्याचा ऋग्वेदांत तिसरा क्रमांक लागतो. शिवाय इन्द्र व अग्नि या देवतांबरोबरहि त्याचें कोठें कोठें वर्णन करण्यांत आलें आहे. पैकीं देवता म्हणून त्याचें आलेलें वर्णन प्रथम देऊन, मग वल्लीसंबंधीचें देतों. सोम देव हा स्वर्गात असतो. ('दिवि सोमो अधि श्रितः' १०-८५-१ ). अर्थात् नक्षत्रांमध्यें त्याची स्थापना झाली आहे ( 'नक्षत्राणामेषामुपस्थे सोम अहितः' १०-८५-२) आणि वायु त्याचें रक्षण करतो ('वायु सोमस्य रक्षिता' १०-८५-५ ). तो आपल्या बुद्धीनें सर्व कांहीं जाणतो ( 'त्वं सोम प्र चिकितो मनीषा' १-९१-१ ) व लोकांना सरळ मार्गानें नेतो ( 'त्वं रजिष्ठमनु नेषि पन्थाम्'

१-९१-१). तो पराक्रमानें अत्यंत वीर्यशाली असून, सामर्थ्यानें श्रेष्ठ आहे. ('त्वं सोम क्रतुभिः सुक्रतुर्भूस्त्वं दक्षैः सुदक्षः' १-९१-२ ). त्याला विश्वांतील सर्व गोष्टींचें संपूर्ण ज्ञान आहे ('विश्ववेदाः' १-९१-२ ). तो वीर्यसंपन्न असून सर्व लोकांना पहाणारा आहे ( 'त्वं वृषा वृषत्वेभिर्नृचक्षाः' १-९१-२ ). तो अत्यंत तेजस्वी असून मित्राप्रमाणें प्रिय आहे ( 'शुचिष्ट्वमसि प्रियो न मित्रो' १-९१-३ ). तो सज्जनपालक असून, शत्रुहंता राजा आहे ( 'त्वं सोमासि सत्पत्तिस्त्वं राजोत वृत्रहा' १-९१-५ ). तो मंगल बुद्धीचा आहे ( 'त्वं भद्रो असि क्रतुः' १-९१-५ ).तो सामर्थ्याचा ईश्वर आहे ('ईशिषे वीर्यस्य' १-९१-२३ ). तो मोठा कर्तृत्ववा' ( 'कृत्नुः' ८-७९-१ ) असून, तो कोणास कळण्यासारखा नाहीं ('अगृभीतःन् ८-७९-१). तो विश्वविजयी ( 'विश्वजेत्' ) असून, ज्ञानी ऋषि आहे ( ऋषिर्विप्रः' ८-७९-१ ). तो आयुर्वर्धक असून उन्मत्त शत्रूचा धुव्वा उडविणारा आहे ( 'अस्माकमायुर्वर्धयन्नभिमातीः सहमानः' ३-६२-१५ ). त्याचा सांगावयाचा मुख्य महिमा म्हणजे जें उघडें असेल त्याला झांकतो ( 'अभ्यूर्णोति यन्नग्नं' ८-७९-२ ); जो रोगी असेल त्याला औषध देऊन बरा करतो ( 'भिषक्ति विश्वं यत्तुरम्' ८-७९-२), अंधळ्याला दृष्टि देतो व पांगळ्याला चालावयास लावतो ( प्रेमन्धः ख्यन्निः श्रोणो भूत् ' ८-७९-२). इतकेंच नव्हे, तर जें सत्य व सरळ आहे त्याचें रक्षण करून असत्याचा नाश करतो ( 'यत्सत्यं यतरद्दजीयस्तदित्सोमोऽवति हन्त्यासत्' ७-१०४-१२ ). त्याचप्रमाणें तो राक्षसांचा कर्दनकाळ असून लबाड व कपटी लोकांचा फडशा उडविणारा आहे ( हन्ति रक्षो हन्त्यासद्वदन्तम्' ७-१०४-१३ ). हा सोम राजा भक्तांना धेनु देतो, चपल घोडे देतो आणि तसेच पराक्रमी पुत्र देतो ( 'सोमो धेनुं सोमो अर्वन्तमाशुं सोमो वीरं कर्मण्यं ददाति' १-९१-२० ). मनुष्यांना व पशूंना अन्न देण्याबद्दल ( 'सोमो अस्मभ्यं द्विपदे चतुष्पदे च पशवे। अनमीवा इषस्करत्' ३-६२-१४ ), अन्न देण्याबद्दल ( 'आ न इन्दो वाजे भज' १-४३-८ ) अनेकांची संपत्ति व पराक्रमी पुरुषाची थोर कीर्ति देण्याबद्दल ( 'अस्मे सोम श्रियमधि नि धेहि शतस्य नृणाम्। महि श्रवस्तुविनृम्णम्' १-४३-७),

शापापासून व पापापासून रक्षण करण्याबद्दल ('उरुष्या णो अभिशस्तेः सोम नि पाह्यंहसः' १-९१-१५ ) त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे.

आतां लतारूप सोमाचें वर्णन आढळतें तें असें:—

**सोमाचें वसतिस्थानः—**प्रथम सोम हा स्वर्गांत होता ( 'दिवि सोमो अधि श्रितः' १०-८५-१, 'आधिद्यामस्थात्' ९-८५-९ ). अर्थात् तो तेथील देवांचें सुंदर व मधुर पेय—म्हणजे दिव्य अमृत—होऊन राहिला होता ('दिवः पीयूषमुत्तमं' ९-५१-२). त्याचें तेथें गंधर्व रक्षण करीत असत ( 'गन्धर्व इत्था पदमस्य रक्षति' ९-८३-४ ). पुढें श्येन पक्षानें त्याला तेथून येथें म्हणजे पृथ्वीवर आणला ( 'अतस्त्वा रयिमभि राजानं सुक्रतो दिवः। सुपर्णोऽव्यथिर्भरत्' ९-४८-३ ). येथें आल्यावर तो पर्वतावर राहूं लागला ('गिरिष्ठाः' ९-६२-४ ) व तेथें त्याची वाढ होऊं लागली ( पर्वतावृधः' ९-४६-१ ). त्याचप्रमाणें पुढें त्याची अरण्याच्या मध्य भागांतहि वाढ होऊं लागली ( 'वनस्य जठरे सीदन्' ९-५१-१ ) व नद्यांतहि वाढूं लागला ( 'या (नद्यः) एकमक्षि वावृधुः' ९-९-४). स्वर्गांत तो चंद्र रूपांत असतो पण येथें पृथ्वीवर त्याचें वनस्पतींत रूपांतर झालें आहे. सोम हा पृथ्वीवर वाढणारा असला तरी त्यांतल्या त्यांत आर्जीक देश, कृत्वदेश, सरस्वती नदी, शर्यणावत् सरोवर, मूजवत् पर्वत येथें वाढणारा सोम फार प्रसिद्ध आहे ( य आर्जीकेषु कृत्वसु ये मध्ये पस्त्यानां (स्थिताः) ९-६५-२३ ). याप्रमाणें सोम हा मुळांत स्वर्गांतला असून तो पृथ्वीवर आल्यावर पर्वत, नद्या, सरोवर, अरण्यें येथें वाढीस लागला. तथापि मूजवत् पर्वत, आर्जीक देश व शर्यणावत् सरोवर येथील सोम अत्यंत प्रख्यात पावला असून, त्याला सर्वांत अधिक महत्त्व प्राप्त झालें आहे. या वल्लिरूप सोमाला पवमान सोम अशी संज्ञा आहे.

**सोमाचें रूपः**—सोम हा वल्लीरूप असून, तो सुंदर पर्णांचा आहे ( ' सुपर्णा ' ९-८६-१). तो हिरवट रंगाचा आहे ( 'हरिः '९-३-९). तो पिंगट रंगाचा आहे असेंहि म्हटलें आहे ( 'बभ्रुः ' ९-११-४ ). तो अरुण म्हणजे तांबूस रंगाचाहि आहे ( ' अरुणः' ९-११-४ ). तो शुभ्र आहे ( ' शुभ्रः ' ९-१४-५ ). सुवर्ण कांतीचा आहे ( ' हिरण्ययः '

९-५-१० ). तो तेजःपुंज आहे ( ' शुक्रः ' ९-२१-६ ). तसाच मोठा मनोहर आहे ( ' चारुः ' ९-३०-६ ). तो निर्मलांतला अत्यंत निर्मल आहे ( ' शुभ्राभिः शुभ्रशस्तमः ' —९-६६-२६ ) आणि यामुळें तो सर्वांना मित्राप्रमाणें प्रिय झाला आहे ( 'प्रियो न मित्रः ' १-९१-३ ).

**सोमाचे गुणः—**हा जो सोमरस आहे तो अत्यंत स्वादिष्ट आहे ( ' स्वादुः ' ६-४७-१ ). तसाच मधुर आहे ( ' मधुमान् ' ६-४७-१ ); अत्यंत कडक आहे ( ' तीव्रः ' ६-४७-१ ) आणि बलवर्धक आहे ( ' रसवान् ' ६-४७-१ ). तो स्वर्गांतील अत्यंत मधुर असें सर्व-श्रेष्ठ पेय आहे ( ' दिवः ' पीयूषमुत्तमम् ' ९-५१-२ ). तो अंतःकरणाला सुखविणारा आहे (' भवानः सोम शं हृदे ' ८-७९-७ ). तो बहुतांना हर्षकर आहे ('पुरुश्चद्रः ' ९-६२-१२ ). तो मदकरांतला अत्यंत मदकर आहे ( ' मदिन्तमः ' ९-५०-५ ). तो सर्वांना प्रिय आहे. ( ' प्रियः ' ९-२५-३ ). तो अत्यंत मधुर आहे ( 'मधुमत्तमः ' ९-१२-१ ). तो देवांना आल्हादप्रद आहे ( ' देवमादनः ' ९-८४-१ ) व मनुष्यांना सुखदायक आहे ( 'नृमादनः ' ९-२४-४ ). तो पापनाशक आहे ('अघशंसहा'९-२४-७). पावनकर्ता आहे. ('पावकः'९-२४-७). तसाच आयुष्यवर्धक आहे('आयुर्वर्धयन्' ३-६२-१५)आनंदकारक आहे('सुमृळीकः' ९-६९-१० ). परम शुद्ध आहे ( ' शुचिः ' ९-२४-६ ). कामपूरक आहे ( ' वृषा ' ९-२५-३ ). तो बलवानांतला अत्यंत बलवान आहे ( 'उग्रेभ्यश्चिदोजीयान् ' ९-६६-१७) व शूरांतला शूर आहे । ( 'शूरतरः' ९-६६-१७ ). आणि म्हणून शत्रूंचा कर्दन काळ आहे ( ' वृत्रहा ' ९-२५-३ ). तो पुष्टिवर्धक आहे ( ' पुष्टिवर्धनः' १-९-१२ ). वाक् शक्तीचा प्रेरक आहे ( ' वाचो जन्तुः कवीनाम् ' ९-६७-१३ ). तो प्याल्याबरोबर बोलावयाची स्फूर्ति होते आणि उत्कृष्ट कल्पना सुचतात ( 'अयं मे पीत उदयर्तिवाचम् ' ६-४७-३ ). सोमप्राशनाचा परिणाम उन्मत्तपणांत होत नाहीं. हा सोम पिऊनच देवराजा इंद्र हा अति बलाढ्य वृत्रासुराला ठार मारता झाला. फार काय या सोमाविषयीं किती सांगितलें तरी तें थोडेंच आहे. त्याचे दिव्य गुण अलौकिक असून, ते अनंत आहेत.

म्हणून त्याला देवांच्या सर्व हविर्द्रव्यांत श्रेष्ठ हवि म्हटलें आहे. ( 'हविर्हविषु वंद्यः ' ९-७-२ ).

**सोमाभिषवः**—सोम कुटून त्याचा रस काढण्याच्या वेदोक्त विधीस 'सोमाभिषव' हें पारिभाषिक नांव आहे. हा विधि सोमयागांतला असून तो हविर्धान नांवाच्या यज्ञमंडपांत अनुष्ठिला जातो. तो प्रकार हा असा आहे. यज्ञमंडपांत हविर्धान नांवाचा एक पोटमंडप असून, तेथें सर्व यज्ञसाहित्य संग्रहीत करून ठेवण्यांत आलेलें असतें. त्या मंडपांत उजव्या बाजूस एक हविर्धान नांवाचा शकट उभा केलेला असतो. त्या शकटाच्या अग्रभागीं जोडीनें दोन दोन असे चार खळगे हाताहाताच्या अंतरावर अमोर समोर खोदण्यांत आलेले असून, त्यास ' उपरव ' या नांवानें संबोधण्यांत येतें. त्यावर दोन लाकडी फळक घालून ते झांकले जातात; ( ' चम्वो सुतः ' ) आणि त्यावर तांबडें रंगविलेलें बैलाचें कातडें पसरण्यांत येतें. ( ' हिन्वानो गोरधि त्वचि ' ९-६५-२५ ). या उपरवाच्याजवळ त्याच्या सभोंवती अध्वर्यु प्रतिपस्थाता, नेष्टा व उन्नेता असे चार ऋत्विज चार दिशेस अमोर समोर तोंड करून बसतात व अध्वर्यूच्या मागें यजमान होतृचमस पात्रांत ' निग्राभ ' संज्ञक उदक घेऊन बसतो. नंतर ते ऋत्विज सोमवल्लि त्या फळकांवर पसरलेल्या बैलांच्या कातडीवर ठेवून दगडी बत्त्यानें कुटण्यास प्रारंभ करतात ( ' एष सोमो अधि त्वचि गवां क्रीळत्यद्रिभिः' ९-६६-२९ ). यजमान हा तेव्हां मधून मधून त्या सोमवल्लीवर चमस पात्रांतील पाणी शिंपडीत असतो ( ' आ सोता परि षिञ्चत '९-१०८-७). ऋत्विज ती सोमवल्लि बत्त्यानें कुटून कुटून त्यांतून रस काढतात ( ' ग्रावभिः सुतम् ' ३-४२-२ ), आणि तो अंतःपवित्र पात्रांत धरून ठेवितात. रस पूर्ण कुटून झाल्यावर तो द्रोणकलशांत त्यावर लोकरीचें गाळणीवजा पवित्र पसरून त्यावरून ओतण्यांत येतो. उद्देश हा कीं तो शुद्ध व स्वच्छ व्हावा ('आ कलशेषु धावति पवित्रे परि षिच्यते' ९-१७-४). तो रस त्या पवित्रांतून शुद्ध होऊन खालीं द्रोणकलशांतून पाझरून पडतो ( 'आ सोम सुवानो अद्रिभिस्तिरोवाराण्यव्यया । जनो न पुरि चम्वोर्विशत्' ९-१०७-१० ) आणि त्या कलशांतील रस वेगवेगळ्या ग्रहपात्रांत भरून ठेवण्यांत येतो.

सोमरसाचे प्रकार:—सोमरसांत निरनिराळीं द्रव्यें मिसळून त्याचे निरनिराळे प्रकार करण्यांत येऊन, त्याला निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. सोमरसांत पाणी मिसळलें म्हणजे त्याला ' अप्तुर ' ही संज्ञा प्राप्त होते ( 'अप्तुरः' ९-६१-१३ ). दूध मिसळलें म्हणजे त्याला 'गवाशिर' असें म्हणतात ( 'गवाशिरः' ३-१२-२ ). दहीं मिसळलें म्हणजे तें मिश्रण 'दध्याशिर' या नांवानें ओळखिलें जातें ( 'दध्याशिरः' ९-२२-३ ). यव मिसळले म्हणजे त्याला 'यवाशिर' असें म्हणतात ( 'यवाशिरः' ३-४२-७ ). मध मिसळल्यास तें 'मध्वाशिर' होतें ( 'मधुनाऽभ्यक्तते' ९-८६-४३ ). याप्रमाणें सोमरसांत निरनिराळे पदार्थ मिसळून तें मिश्रण निरनिराळ्या देवांप्रीत्यर्थ अर्पण करण्यांत येतें.

**सोमरसहोम व पानः**—सोमरस हा देवांना अत्यंत प्रिय असून 'देवानामसि प्रियः' ९-८५-२), त्या हवीनें ते अत्यंत प्रसन्न होतात. म्हणून सर्व हविर्द्रव्यांत सोम हाच श्रेष्ठ हविर्भाग होय ( 'हविर्हविषु वंन्द्यः' ९-७-२). असें म्हटलें आहे. सोम हें इन्द्राचें अत्यंत प्रिय पेय आहे. संग्रामाच्या वेळीं तर त्याला तें अवश्य लागतेंच लागतें. त्याशिवाय त्याच्यांत उत्साहच स्फुरत नाहीं. फार काय सर्व देवांचें तें प्रिय पान आहे ('देवमादनः' ९-८) आणि मनुष्यांनाहि त्याची अवीट गोडी आहे ( 'नृमादिनः' ९.२४-४ ) याचें कारण तें स्वर्गातील सर्वोत्कृष्ट अमृत आहे. ( 'दिवः पीयूषमुत्तमम्' ९-५१-२ ). असो. हा सोमरस निरनिराळ्या देवतांप्रीत्यर्थ निरनिराळ्या ग्रहपात्रांतून हवन करण्यांत येतो. उदाहरणार्थ शुक्रग्रह पात्रांतून सूर्याला, माहेंद्रग्रह पात्रांतून इंद्राला, आश्विनग्रहपात्रांतून अश्विनीला, आदित्यग्रहपात्रांतून आदित्याला, ध्रुवग्रहपात्रांतून वैश्वानराला, वैश्वदेवग्रहांतून विश्वेदेवाला, ऐन्द्राग्नग्रहांतून इन्द्राग्नीला, मैत्रावरुणग्रहांतून मित्रावरुणांना, ऐंद्रवायव-ग्रहांतून इन्द्रवायूंना, याप्रमाणें निरनिराळ्या ग्रहपात्रांतून निरनिराळ्या देवांना त्याचें हवन करण्यांत येतें व त्या त्या पात्रांतील अवशिष्ट राहिलेला रस ऋत्विज व यजमान हे पिऊन टाकतात.

**प्रार्थना**:—सोम हा या पृथ्वीवरचें स्वर्गातील देवान्न, चंद्राचें प्रतीक असल्यामुळें त्यालाहि देवत्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. या सोमाला उद्देशून

ऋग्वेदांत एक सबंध मंडळ—नववें मंडळ—राखून ठेवण्यांत आलें असून, त्यांत एकंदर ११४ सूक्तें व कमी अधिक ११०० मंत्र यांचा समावेश झाला आहे. त्यांत मधून मधून त्याची प्रार्थना करण्यांत आली आहे ती अशीः—दीर्घायुष्य देणेबद्दल ( 'विश्वायुमा भर' ९-४-१० ), तेज देण्याबद्दल ('सना ज्योतिः' ९-४-२), सौभाग्य देण्याबद्दल('सना')(विश्वा च सोम सौभगा' ९-४-२ ), बल देण्याबद्दल ( 'सना दक्षम्' ९-४-४), ज्ञान देण्याबद्दल ( 'सना क्रतुम्' ९-४-३ ), महान् यश देणेबद्दल ( 'सना महिश्रवः' ९-४-१ ), मोठी कीर्ति देणेबद्दल ( 'अभ्यर्ष बृहद्यशः' ९-२०-४), धन देणेसाठीं ( 'रयिम् ' आभर ९-२०-४ ), अन्न देणेबद्दल ( 'इषं स्तोतृभ्य आभर' ९-२०-४ ), भरभराट करणेसाठीं ( 'प्र प्यायस्व' ९-६७-२८ ), सुवीर्य देणेसाठीं ( 'आ पवस्व सुवीर्यं' ९-६५-५ ), जवळचें व दूरचें भय दूर करण्यासाठीं ( यदन्ति यच्च दूरके भयं विन्दति मामिह । पवमान वि तज्जहि' ९-६७-२१), शत्रूपासून रक्षण करणेसाठीं ( 'रक्षा राजन्नघायतः' १-९१-८ ), उत्कर्ष करणेसाठीं ( 'सोम त्वं नो वृधो भव' १-९१-१० ), शत्रूंना ठार मारणेसाठीं ( ' नो मृधो जहि ' ९-८५-२ ), वगैरे वगैरे. असो.

याप्रमाणें ऋग्वेदांतील कांहीं प्रमुख प्रमुख देवतांचें संक्षिप्त वर्णन या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. आतां पुढील प्रकरणांत देवशत्रु व आर्यशत्रु दस्यु, दास व राक्षस इत्यादिकांचा परामर्ष घेणेचा प्रयत्न करतों.





## प्रकरण ४ थें

# आर्यशत्रु-दस्यु, दास व पाणि.

अर्बुद २-११-२०

अनर्शनि ८-३२-२

अहि २-११-५

अहीशु ८-३२-२

उरण २-१४-४

करंज १०-४८-८

कुयव १-१०३-८

चुमुरि २-१५-९

जरूथ ७-९-६

दभीक २-१४-३

धुनि २-१५-९

नमुचि २-१४-५

पर्णय १०-४८-८

पिप्रु २-१४-५

बृसय १-९३-४

मृगय १०-४९-५

रक्षस् ४-४-१

वंगद १-५३-८

वर्चिन ६-४७-२१

वल २-१४-३

वृत्र ५-३२-३

व्यंस १-३२-५

सृबिंद ८-३२-२

शम्बर २-१२-११

शुष्ण २-१४-५

स्वर्भानु ५-४०-५

**दस्यु अथवा दास**—ऋग्वेदांत इन्द्राचे जे महत्त्वाचे युद्ध-प्रसंग व पराक्रमाच्या अद्भुत कथा वर्णिल्या आहेत, त्या सर्व इन्द्रानें आर्यांच्या वतीनें व दास व दस्यू यांच्याविरुद्ध लढून आर्यांचें रक्षण केलें अशा अर्थाच्या आहेत. एका बाजूला वैदिक देवांना चालून घेणारे यज्ञप्रकृति आर्य व दुसऱ्या बाजूला नास्तिक, वेदनिंदक व

उदरोपासक असे दास व दस्यु असा देखावा तेथें दृष्टोत्पत्तीस येतो. तेव्हां वैदिक आर्यांशीं झुंज खेळणाऱ्या महाप्रबल अशा दास व दस्यु यांची ओझरती ओळख करून दिली तर ती अप्रस्तुत व अप्रासंगिक होणार नाहीं. म्हणून त्यांच्याविषयीं येथें दोन शब्द लिहितों. दास व दस्यु हे शब्द सकृद्दर्शनीं निरनिराळे दिसले तरी त्यांच्या अर्थांत म्हणण्यासारखा फरक नाहीं, असें म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. कां कीं ज्यांस एकीकडे दस्यु म्हटलें आहे त्यासच अन्यत्र दास असेंहि संबोधण्यांत आलें आहे. उदाहरणार्थ, शंबर हा असुर घेऊं. त्याला ६-३१-४ मध्यें दस्यु म्हटलें आहे. ('त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्ताप्रतीनि दस्योः' ६-३१-४ ) व ६-४७-२१ मध्यें त्यासच दास असें म्हटलें आहे. ('अहन् दासा वृषभो वस्नयन्तोदव्रजे वर्चिनं शम्बरं च' ६-४७-२१ ). म्हणजे सांगावयाचा भावार्थ हा कीं दास व दस्यु या शब्दार्थांत म्हणण्यासारखा महत्त्वाचा फरक नसून, दोन्ही शब्द जवळजवळ समान अर्थीं उपयोगिले जातात. वैदिक आर्यांचे बहुतेक शत्रु या दास अगर दस्यु वर्गांतीलच असून त्यांपैकीं दिवोदासाचा एक मुख्य व प्रबल शत्रु जो शंबर तो दस्यु कुलांतलाच होता ( ६-३१-४ ). कुत्साचा शत्रु शुष्ण हा दासच होता (७-१९-२). दभीतीचे शत्रु चुमूरि व धुनि हे दस्यु ( ७-१९-४ ) असून, पुरुकुत्साचा मुख्य शत्रु जो वृत्र तोहि पण दस्यु कुलांतीलच होता. त्याचप्रमाणें अहि हा दास ( २-११-२ ) असून, नमीचा शत्रु नमुचि हाहि दासच म्हणावयास हरकत नाहीं ( ६-२०-६ ); त्याचप्रमाणें इलिबिष, पिप्रु, वर्चिन, व्यंस इत्यादि सर्व असुर दासकुलोद्भवच होते. एकूण वैदिककाळीं हे दस्यु अगर दास मोठे जबरदस्त व चढाईखोर असे कट्टर पुंड लोक होते. अर्थात् हे सर्व तमोगुणी व देहतर्पणप्रिय असुरप्रकृति असून, यांचीं चांगलीं बंदिस्त अशीं अनेक नगरें होतीं. त्यांतल्यात्यांत दासांचीं मोठमोठालीं सैन्यें व दगडी बंदिस्त किल्लेहि होते.

आतां यांचें स्वरूप वर्णन व गुणकथन ऋग्वेदांत कसें करण्यांत आलें आहे याविषयींहि येथें दोन शब्द लिहितों. दस्यु अगर दास हे काळ्या वर्णाचे ( 'कृष्णां त्वचं' (दस्यु) १-१३०-८) असें म्हटलें असून, त्यांसच

अन्यत्र ( 'कृष्णयोनीः' २-२०-७ ) काळ्या कुलांत जन्मलेले असें सांगण्यांत आलें आहे. आणि जसे ते रंगानें काळे तसेंच ते नाकानें नकटे ( 'अनासः' ५-२९-१० ) असाहि शेरा मारण्यांत आला आहे. आतां त्यांचा स्वभाव व आचारविचार यांविषयीं सांगावयाचें म्हटलें तर तें असें सांगतां येईल. ते लोक कपटी व नास्तिक होते ( 'मायावान् अब्रह्मा' ४-१६-९ ). ते मोठें क्रूर व कर्मलंड होते ( 'अमानुषः अकर्मा' १०-२२-८ ), त्यांना देवाची चाड नव्हती ( 'अदेवयूः' ) व ते यज्ञयागहि करीत नसत ( 'अयज्वा' ८-७०-११ ). ते श्रद्धाहीन ( 'अश्रद्धः' ७-६-३), मोठे बडबडे ( 'ग्रथिनः' ७-६-३), बोबडे बोलणारे ( 'मृध्रवाचः' ७-६-३), यज्ञद्वेष्टे ('अयज्यून्ः '७-६-३) व अट्टल कवडीचुंबक( 'अरावणः' ७-३१-५ ) असून, भलतेच नेमधर्म करणारे ( 'अन्यव्रतः' १०-२२-८ ) असे स्वैर व स्वच्छंदी वृत्तीचे पाखंडी लोक होते. हें सर्व अगदीं थोडक्यांत सांगावयाचें झालें तर ' देह तोचि देव, भोजन ते भक्ति, मरण ती मुक्ति' या पंथाचे ते पायीक होते, असें ठासून सांगण्यांत कांहींच चूक नाहीं.

आतां आर्यांकडे पाहिलें तर त्यांची गोष्ट या दस्यूंच्या अगदीं उलट असलेली दिसून येते. ते रंगानें गोरे व रूपानें सुंदर असून, कुटुंबवत्सल व शांतताप्रिय असे आढळून येतात. ते श्रद्धावान, देवभक्त, यज्ञप्रकृति, ज्ञानोपासक, नीतिमान, निग्रही, सत्यप्रिय, सत्प्रवृत्ति, उदार, दयाळु, परोपकारी, प्रामाणिक, सरळमार्गी व सालस असे दिसून येतात. त्यांच्यांत दुष्टबुद्धि व हिंसावृत्ति दिसून येत नाहीं. याप्रमाणें आर्य व दास-दस्यु यांच्या प्रकृतींत व गुणांत उत्तर-दक्षिण ध्रुवाइतका स्वभावतः फरक असल्यामुळें त्या दोघांत बेबनाव, वैमनस्य, विरोध व स्पर्धाबुद्धि उत्पन्न होऊन, त्याचा परिणाम नेहमी त्यांच्या चकमकींत दिसून आल्यास त्यांत नवल मानण्याचें कारण नाहीं.

या आर्यांना हे दस्यू लोक व दास नानापरीनें छळत व पाण्यांत पाहात; त्यांच्या यज्ञांत विघ्नें आणीत व गायी गुरें पळवून नेत; शेताचें पाणी अडवीत व वाटा मारीत; दरोडे घालीत; काय नाना तऱ्हा करीत. इकडे वैदिक आर्य हे झाले तरी कांहीं कमी तेजस्वी नव्हते. पण ते अधिक विचारी व

सहनशील असल्यामुळें दस्यूदासांसारखी क्रूर व हिंस्र व कपट वृत्ति त्यांच्यांत नव्हती. मात्र दोघांत नेहमीं चुरस चालू असे, असें चित्र ऋग्वेदांत पदोपदीं डोळ्यापुढें दिसतें. ( 'अयज्वानो यज्वभिः स्पर्धमानाः' १०-३३-५ ) ही प्रथा ऋग्वेदांत सर्वत्र आढळून येते. मात्र एवढें खरें कीं, केव्हां केव्हां या दस्यूंचा मारा आर्यांस चांगलाच जाणवत असे. अशा वेळीं ते यज्ञद्वारा देवांकडे धांव मारून त्यांची मदत मागत; आणि ते देव झाले तरी भक्तांच्या हाकेला ओ देऊन, त्यांच्या रक्षणार्थ त्यांच्या मदतीस धांवून येत.

असे प्रसंग ऋग्वेदांत अनेक आहेत. आर्यांनीं इन्द्राला दस्यू व आर्य यांना ओळखून ( 'विजानीह्यार्यान् ये च दस्यवो' १-५१-८ ), दस्यूंचा फडशा पाड ( 'जहि दस्यून्' ), अशी विनंति केली आहे. आणि आर्याभिमानी भक्तवत्सल इन्द्रानें भक्तांची ती प्रार्थना मान्य करून, आर्यांचें रक्षण व दस्यूंचा उच्छेद केला ('हत्वी दस्यून् प्रार्यं वर्णमावत्' ३-३४-९). आणि म्हणून इन्द्राला मनुष्याचा म्हणजे आर्यांचा उत्कर्षक व दस्यूंचा उच्छेदक ( 'हन्ता दस्योर्मनोर्वृधः' ८-९८-६ ) अशी पदवी प्राप्त झाली आहे. झालें हें येवढें विवेचन दस्यू व दास यांचेविषयीं पुरें आहे. असो.

आतां त्यांतील मुख्य मुख्य अशा कांहीं दास व दस्यूंची थोडक्यांत ओळख करून देऊन, मग पणीचा थोडासा इतिहास सांगून हें प्रकरण हातानिराळें करतों.

१ अहिः—ऋग्वेदांत इन्द्राच्या ज्या असंख्य चकमकी झाल्याचे ठिकठिकाणी उल्लेख आहेत, त्यांत त्याची अही दैत्याशीं झालेली चकमक ही सर्वांत पहिली चकमक होय. हा अहि मोठा प्रबल असून तो दुर्गम अशा पर्वतकुहरांत राहत असे. ( 'गुहा हितम्' २-११-५ ). तो दास म्हणजे अनार्य असून, तो आपणास अमर समजत असे. ( 'अमर्त्यं चिद् दासं मन्यमानम्' २-११-२ ). तो मोठा खादाड, अत्यंत दुष्ट, महामूर्ख आणि तसाच मोठा निद्रालु होता. ('अतृप्णुवन्तं वियतमबुध्यमबुध्यमानं सुषुपाणम्' ४-१९-३ ). त्यास आपल्या सामर्थ्याची फार मोठी घमेंड असून, आपणास कोणी प्रतिस्पर्धी नाहीं, अशी त्याची समजूत होती, आणि म्हणून तो फार उन्मत्त बनला होता. तथापि तो मोठा पराक्रमशाली होता हें मात्र खरें.

( 'अयोद्धेव दुर्मद आ हि जुव्हे महावीरं तुविबाधमृजीषम्' १·३२-६ ). तसाच तो मोठा कपटी व क्रूर होता. ( 'वृत्रतरं व्यंसम्' १-३२-५ ); तो पर्वताचा आश्रय करून राहिला असल्यामुळें ( 'अहिं पर्वते शिश्रियाणं' १-३२-२) तो आपणास निर्धास्त अजिंक्य व अमर्त्य समजत असे.(अमर्त्यं चिन्मन्यमानम् ' २-११-२ ).

त्याची सांगावयाची महत्त्वाची गोष्ट म्हणजे इन्द्रानें आकाशांत जेवढें म्हणून पाणी उत्पन्न केलें होतें, तेवढें सर्व त्यानें मोठ्या युक्तीनें अडवून ठेविलें होतें ('सृजो महीरिन्द्र या अपिन्वः परिष्ठिता अहिना शूर पूर्वीः' २-११-२)! अर्थात् पाणी खालीं वाहण्याचीं दारें त्यानें सर्व बाजूंनीं बंद करून ठेविलीं होतीं. यामुळें नदीनाले वाहण्याचे बंद पडून, पृथ्वीवर सर्वत्र पाण्याचा ठण-ठणाटच ठणठणाट पडून राहिला होता ( 'निरुद्धा आपः' १-३२-११).

आर्यांना हा अहि दाद देण्यासारखा नव्हता. त्याचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य एकट्या आर्यांत नव्हतें. म्हणून या आपत्तींतून मुक्त होण्यासाठीं अपणास इन्द्राचें सहाय मिळावें म्हणून त्यांनीं त्याच्याप्रीत्यर्थ त्रिकद्रुक याग आरंभून त्यांत त्यास बोलावून त्यांत त्याचें प्रिय प्रेय म्हणजे मधुर सोमरस त्याला अर्पण केला आणि अहीच्या जाचांतून सुटका करण्यास त्याची प्रार्थना केली. इन्द्र तो सोमरस पिऊन प्रसन्न झाला व अहीचें पारिपत्य करण्यास निघाला ( 'त्रिकद्रुकेष्वपिबत् सुतस्यास्य मदे अहिमिन्द्रो जघान' २-१५-१ ). त्या वेळीं तो आपल्या हातांत तीक्ष्ण शतधारी वज्र घेऊन बाहेर पडला. तें वज्र त्वष्टयानें मोठ्या कौशल्यानें तयार करून त्यास दिलें होतें ( 'त्वष्टास्मै वज्रं स्वर्यं ततक्ष' १-३२-२ ).

हा अहि आपणास मोठा शूर व अजिंक्य समजत असे. त्या घमेंडींत त्यानें इन्द्राला आपणाकडे चालून येतांना पाहतांच मोठी गर्जना केली व त्यास युद्धास पाचारण केलें. इन्द्राचें व त्याचें युद्ध जुंपलें. दोघेहि महा बलाढ्य, मोठे शूर व महा पराक्रमी ! मग काय करावें त्या युद्धाचें वर्णन! दोघांची झुंज लागली. देव तो अद्भुत प्रसंग दूर उभे राहून पहात होते. दोघेहि एकमेकांवर हल्ले प्रतिहल्ले करतां करतां इन्द्रानें योग्य संधी साधून मोठ्या शिताफीनें त्या अहीवर आपल्या वज्राचा असा कांहीं अचूक प्रयोग केला

कीं, त्यापासून त्या दुष्टाचे दोन्ही बाहू तुटून खालीं पडले! कुऱ्हाडीनें तोडलेल्या झाडाच्या फांद्या जशा जमिनीवर आदळाव्या तसा तो अही धाडकन् पृथ्वीवर आदळून खालीं पडला ( 'अहन् वृत्रं वृत्रतरं व्यंसमिन्द्रो वज्रेण महता वधेन। स्कंधांसीव कुलिशेना विवृक्णाऽहिः शयत उपपृक् पृथिव्याः' १-३२-५). खालीं पडतां पडतांच त्या बहाद्दर अहीनेंहि इन्द्रावर आपल्या वज्राचा प्रहार केलाच! ( 'अपादहस्तो अपृन्यदिन्द्रमास्य वज्रमधि सानौ जघान' १-३२-७ ). पण नपूंसकानें वीराची बरोबरी करावी तसा तो प्रकार झाला. इन्द्राला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. इन्द्रानें मात्र त्या अहीची चांगलीच रग जिरविली. त्यानें त्याचे दोन्ही हात व पाय तोडून धडावेगळे केले आणि त्याचें शरीर वज्रानें छिन्नविच्छिन्न करून टाकलें! त्यावेळीं त्याची आई तेथें जवळच उभी होती. आपल्या मुलाची ती दुरवस्था पाहून, ती कळवळली व त्याचे प्राण वांचविण्यासाठीं म्हणून ती त्याच्या अंगावर जाऊन धपकन् आडवी पडली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या वीरावेशांत इन्द्रानें तिलाहि ठार मारलें व अहीचाहि वध केला ( 'नीचावया अभवद् वृत्रपुत्रेन्द्रो अस्या अव वधर्जभार' १-३२-९ ). ही लढाई इतकी भयंकर झाली कीं त्या वेळचा तो अहीचा वीरावेश पाहून तेथें पाहत उभे असलेल्या देवांनीं भयग्रस्त होऊन तेथून पळ काढला! ( 'वि यदहेरध त्विषो विश्वेदेवासो अक्रमुः' ८-९३-१४ ). अहीला मारल्यावर मग पुढें त्याच्या अनुयायांना घेरून इन्द्रानें त्या सर्वांना तीच वाट दाखविली. अशी ती लढाई मोठी भयंकर झाली आणि त्यांत अखेर इंद्रच विजयी झाला! तो त्याचा प्रथम विजय होय.

अहीच्या वधानंतर इंद्रानें अहीनें अडवून ठेविलेलें पाणी मोकळें करून त्यास वाहतें केलें ( 'अपां बिलमपहितं यदासीद् वृत्रं जघन्वाँ अप तद् ववार' १-३२-११ ). त्यामुळें तें अडून राहिलेलें पाणी मोकळें होऊन नदीनाल्यांतून तुडुंब वाहूं लागलें व लोकांना तें पाहून महानंद झाला!

२ चुमुरिः—चुमुरि हा दस्यु कुलांतला एक प्रबल शत्रु असून त्याचा साथीदार जो धुनि तोहि तसाच एक प्रबल दैत्य होता. या दोघा दस्यूंनीं मिळून दभीतीला सळो का पळों करून टाकलें होतें. या बेडर पुंडांच्या

त्रासानें व पुंडाईनें दभीति राजा अगदीं मेटाकुटीस आला होता. पण त्याचें पारिपत्य करण्याइतकें सामर्थ्य त्या दभीति राजांत नसल्यामुळें त्यानें इन्द्र देवाकडे धांव मारून त्याचें सहाय्य मिळविलें. इन्द्र स्वतः त्याच्या मदतीला व रक्षणाला धांवून येऊन, चुमुरीवर हल्ला चढवून त्याच्या नगरांत शिरला. चुमुरि त्यावेळीं झोंपीं गेला होता. इन्द्राला ही संधि आयतीच पथ्यावर पडली. तो झोपेंत असतांनाच इन्द्रानें त्यावर वज्र चालवून त्याची इतिश्री केली ! त्याच्याबरोबर व त्याच वेळेला त्याचा साथीदार धुनि हा चुमुरीच्या मदतीला धांवून येऊन इन्द्रावर तुटून पडला. पण बिचारा अखेर इन्द्राच्या वज्रानें घायाळ होऊन जो जमिनीवर आदळला तो पुनः कांहीं वर उठला नाहीं ! इन्द्रानें त्याचीहि वाट लावली. ( स्वप्नेनाभ्युप्या चुमुरिं धुनिं च जगन्थ दस्युं प्र दभीतिमावः' २-१५-९ ) याप्रमाणें इन्द्रानें चुमुरीसारख्या एका महा दस्यूचें निर्दालन करून भक्त दभीतीचें रक्षण केलें.

३ **नमुचिः**—हा नमुचि झाला तरी दस्यु टोळींतला एक प्रमुख व प्रबल दास असून पाणी अडवून ठेवणाऱ्यांत तो अग्रगण्य होता. तो मोठा मायावी ( 'नमुचिं नाम मायिनं' १-५३-७ ) असून, तसाच पण दुष्ट व लुटारू होता. त्याच्याविषयीं एक आख्यायिका आहे ती अशीः—पूर्वी एकदा इन्द्रानें सर्व असुरांस जिंकलें; पण नमुचीपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. उलट नमुचीनेंच त्याला पकडून कोंडून ठेविलें ! त्या वेळीं आपणास सोडून देण्याविषयीं त्याची विनवणी केल्यावरून, नमुचीनें इन्द्राला एका अटीवर सोडून देण्याचें कबूल केलें. ती अट म्हणजे अशीः—रात्रीं अगर दिवसा, ओल्या अगर शुष्क पदार्थानें अगर इतर कसल्याहि शस्त्रानें इन्द्रानें त्यास मारावयाचें नाहीं ! इन्द्रानें ही अट एका पायावर कबूल करून, नमुचीच्या बंधनांतून निसटून स्वर्गाचा रस्ता सुधारला. ती इन्द्राची कबूली मान्य करून नमुचीनें इतर आढेवेढे न घेतां त्यास सरळ जाऊं दिलें.

पुढें कांहीं काळ लोटल्यावर त्या असुरास इन्द्राची भीति नसल्यामुळें पुनः नमीच्या राज्यांत शिरून गोंधळ घालूं लागला. अर्थात् या पुंडागिरीमुळें व त्याच्या शिरजोरपणामुळें त्याच्यांत व नमी राजांत साहजिकच शत्रुत्व माजलें, तें इतकें कीं लढाईशिवाय नमीला गत्यंतरच राहिलें नाहीं. पण

लढाई देऊन शत्रूची खोड मोडण्याची छाति व शक्ति नमींत नसल्यामुळें त्यानें इन्द्राकडे धांव मारून त्याचें साहाय्य मिळविलें. इन्द्राला नमुचीची आठवण होतीच व त्याला दिलेलें वचनहि तो विसरला नव्हता. पुढें लवकरच त्याची व नमुचीची लाढाई जुंपून त्या चकमकींत आपल्या वचनाला जागून ओलें म्हटलें तर ओलें नव्हे आणि वाळलें म्हटलें तर वाळलें नव्हे अशा पाण्याच्या फेंसानें त्या दासाचें शीर धडापासून वेगळें करून तें वर आकाशांत उंच उडवून दिलें! ( 'प्र श्येनो न मदिरमंशुमस्मै शिरोदासस्य नमुचेर्मथायन् ' ६-२०-६ ) याचाच उल्लेख ('अपां फेनेन नमुचेः शिर इन्द्रोदवर्तयः' ऋ. ८-१४-१३) या वचनांत आलेला आहे. येथें घ्यावयाचें तात्पर्य इतकेंच कीं देव हे आपल्या गुंतलेल्या वचनाला जागूनहि प्रसंगीं भक्ताचें रक्षण करण्यास चुकत नाहींत.

४ पिप्रुः—पिप्रु हा दासकुलांतील एक बलाढ्य व मायावी ('पिप्रोरसुरस्य मायिनः'१०-१३८-३) असा आर्यशत्रु असून, सर्पाप्रमाणें मोठा सूडबुद्धीचा असुर होता. तसाच तो मोठा धर्मलंड ( प्रिप्रुमव्रतम्' १-१०१-२ ) असून, वरुणाचे नीतिनियम धाब्यावर बसविण्यांत मोठा पटाईत होता. त्याचें व ऋजिश्व्याचें पटत नव्हतें. अर्थात् ते दोघे एकमेकांचे कट्टर शत्रु होते. ऋजिश्वा हा देखील मोठा शूर राजा होता. पण पिप्रु हा बळकट व अवघड अशा डोंगरी किल्ल्यांत राहत असल्यामुळें त्याचें पारिपत्य करणें हें ऋजिश्व्यास मोठें कठीण झालें. दिवसेंदिवस त्या दुष्ट दासाची पुंडाई व बंडखोरी वाढतच जाऊं लागली. लोक सर्व त्याच्या पुंडाईला त्रासून बेजारून 'त्राहि भगवन्' झाले ! पण ऋजिश्व्याला कांहीं त्या दुष्टाचा बंदोबस्त करतां येईना. अखेर राजानें हात टेकून इन्द्र भगवंताचा धांवा केला. तेव्हां इन्द्रानें त्याची कड घेऊन त्या धर्महीन पिप्रूस गांठून त्याची गठडी वळली ! ('यो (इन्द्रः) अहन् पिप्रुमव्रतम्' १-१०१-२ ). इतकेंच करून इन्द्र राहिला नाहीं तर त्या दुष्टाचे जे बळकट किल्ले होते ते सर्व वज्रानें फोडून पाडून जमीनदोस्त केले व त्याची संपत्ति लुटून ती ऋजिश्व्यास दिली. ( 'वि पिप्रोरहिमायस्य दृळ्हाः पुरो वज्रिञ्छवसा न दर्दः । सुदामन्तद्रेक्णो अप्रमृष्यमृजिश्वने दात्रं दाशुषे दाः' ६-२०-७ ).

**वर्चिन्**:—हा इन्द्राच्या शत्रूंपैकीं एक बलाढ्य शत्रु असून तो असुर होता. ( 'शतं वर्चिनः सहस्रं च साकं हथो अप्रत्यसुरस्य वीरान्' ७-९९-५) त्यास दास असेंहि म्हटलें आहे. ( 'उत दासस्य वर्चिनः' ४-३०-१५ ). त्याची व शम्बराची चांगली गट्टी होती. कारण इंद्रानें त्या दोघांस उदव्रजांत एकत्रच ठार मारलें. ('अहन् दासा वृषभो वस्नयन्तोदव्रजे वर्चिनं शम्बरं च' ६-४७-२१ ) ही जी वर्चीची इंद्राबरोबर लढाई झाली त्या लढाईत वर्चीचे एक लाख लोक प्राणास मुकले ! ( 'यो वर्चिनः शतमिंद्रः सहस्रमपावपद्' २-१४-६ ). यावरून ती लढाई किती भयंकर झाली असावी याचा नुसता तर्कच केलेला बरा.

५ **शम्बरः**—शंबर हा ऋग्वेदांतील एक अत्यंत प्रसिद्ध असा महादैत्य होता. सर्व दुष्ट गुण त्याच्यांत अत्यंत उत्कटतेनें एकवटले होते. दास व दस्यु यांच्यांतील सर्व कडवेपणा व कडवटपणा त्याच्यांत मूर्तिमंत उतरलेला होता. म्हणून त्यास ऋग्वेदांत दस्यूहि म्हटलें आहे, ( ' त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्थाप्रतीनि दस्योः ' ६-३१-४ ) आणि दासहि म्हटलें आहे ( 'अहन् दासा वृषभो वस्नयन्तोदव्रजे वर्चिनं शम्बरं च' ६-४७-२१ ). हा कुलीतराचा पुत्र असून ( 'उत दासं कौलितरं बृहतः पर्वतादधि । अवाहन्निंद्र शम्बरम्' ४-३०-१४ ). तोहि इतर दस्यूंप्रमाणेंच उंच पर्वतशिखरावर रहात असे. त्याच्या राज्यांत शंभर डोंगरी किल्ले होते. ऋग्वेदांतील भरतांचा इतिहासप्रसिद्ध दिवोदासाचा तो कट्टा दुष्मन् असून भरत लोकांस तो परोपरीनें छळत असे. दिवोदास हा कांहीं कमी शूर व पराक्रमी नव्हता. पण या डोंगरी लोकांचें पारिपत्य करणें त्यास महा दुर्घट होतें. हे दास व दस्यु लोक उघड मैदानावर येऊन लढत नसत, तर गनिमी काव्यानें लढून ते आर्यांस हैराण करीत. दिवोदासास दाद देण्याचें लक्षण कांहीं दिसेना, म्हणून त्यानें इंद्राकडे धांव घेऊन त्याची मदत मिळविली. ही बातमी शम्बरास लागतांच तो आपल्या किल्ल्यांत दडून बसून चोरटे हल्ले करूं लागला. यामुळें इंद्राला त्याला शोधून काढावयास भक्कम चाळीस वर्षें लागलीं !( 'यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत्' २-१२-११ ) ! त्याचा पत्ता काढल्यावर इंद्रानें त्याच्याशीं लढून, त्यास

किल्ल्यांतून खेचून बाहेर काढून अखेर त्यास जमिनीवर लोळवून ठार केलें ( 'उत दासं कौलितरं बृहतः पर्वतादधि। अवाहन्निन्द्र शम्बरम्' ४-३०-१४ ). त्याचेबरोबर वर्चिन्‌दास हाहि इंद्रावर चढाई करून आला. इंद्रानें त्याचाहि समाचार घेतला व त्याचे एक लाख लोक कामास आले ( 'उत दासस्य वर्चिनः सहस्राणि शतावधीः।' ४-३०-१५ ). या लढाईत पुष्कळ प्राणहानि तर झालीच. शिवाय आणखी शम्बराचे शंभर डोंगरी किल्ले पार उध्वस्त होऊन गेले ( 'त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्याप्रतीनि दस्योः' ६-३१-४ ). शम्बराची ही अशी वध-कथा आहे.

६ **शुष्णः**—हा मोठा प्रबल दैत्य असून वृत्राच्या खालोखाल हाच इंद्राचा मोठा बलाढ्य प्रतिस्पर्धी होय. तो दास टोळीचा प्रमुख नायक असून मोठा कपटी होता. तो नास्तिक असून मोठा दुःखदायक होता. प्राणिमात्राचें अन्न खाऊन चैनींत राहणारा; अत्यंत मातलेला, अंधेरांत राहणारा, अत्यंत रागीट असा दुष्ट दानव होता. ( 'त्यं चिदेषां स्वधया मदन्तं मिहो नपातं सुवृधं तमोगाम्' ५-३२-४ ). तो धुक्यापासून उत्पन्न झालेला असून त्यास शिंगें होतीं. ( 'वि शृङ्गिणमभिनच्छुष्णमिंद्रः' ( १-३३-१२ ) तो मर्म-हीन असून आपणास अजिंक्य समजत असे. तो फिरत्या नगरांत राहत असून मोठा मायावी होता.

या शुष्णाचें व अर्जुनाचा मुलगा जो कुत्स त्याचें हाडवैर होतें. कुत्स हा इंद्राचा मित्र असल्यामुळें आपणास भारी असलेल्या शुष्णाचें पारिपत्य करण्याच्या कामीं त्यानें त्याची मदत मागितली. त्याप्रमाणें इंद्रानें त्यास सहाय्य दिलें. कुत्साला आपल्या रथांत बसवून घेऊन तो शुष्णाशीं लढण्यास आला. या वेळीं कुत्सानें इंद्राचें उत्तम सारथ्य केलें ( 'स रन्धयत्सदिवः सारथये शुष्णमशुषं कुयवं कुत्साय' २-१९-६ ).

इंद्राची व शुष्णाची लढाई जुंपली आणि त्यांत शुष्णाचा पराभव झाला. या वेळीं इंद्रानें शुष्णाच्या सैन्याचा पार धुव्वा उडवून त्याची राजधानी उध्वस्त केली व तेथील सर्व धन लुटून फस्त केलें. ( 'उत शुष्णस्य धृष्णुया प्र मृक्षो अभि वेदनम्। पुरो यदस्य संपिणक्' ४-३०-१३ ) तसेंच त्या दुष्टास पकडून बेड्या ठोकून कारागृहांत कोंडून ठेविलें. ( शुष्णा

मायिनमायसो मदे दुध्र आभूषु रामयन्नि दामनि' १-५६-३) शेवटीं कुत्साच्या विनंतीवरून इंद्रानें त्या दैत्याचा वज्रानें वध केला आणि कुत्सास निर्भय केलें ( ८-९६-१७ ).

७ वृत्रः—पाऊस अडवून ठेवणाऱ्या दैत्यांमध्यें वृत्र हाहि एक प्रबल व प्रमुख दैत्य होय. महासर्पाप्रमाणें तो पाण्याला वेष्टन घालून बसलेला असल्यामुळें त्यास अहि हें टोपण नांव प्राप्त झालें होतें ( 'त्वमिन्द्र स्रवितवा अपस्कः परिष्ठिता अहिना शूर पूर्वीः' ७-२१-३ ). तो आपणांस अजिंक्य व अमर समजत असल्यामुळें ( ५-३२-३ ) तो पाण्यामध्यें स्वस्थ पडून होता ( 'अतृष्णुवन्तं वियतमबुध्यमबुध्यमानं सुषुपाणमिन्द्र' ४-१९-३). पुरुकुत्स राजाकरतां इंद्रानें त्यास ठार मारलें ( (इन्द्रः) 'वृत्रं पुरुकुत्साय रंधीः' १-१७४-२ ). इंद्र त्याच्या शोधास निघाला तेव्हां तो दानव आपणास धुक्यांत गुरफटून घेऊन छपून बसला होता. तो मोठा लढवय्या व कपटी ( 'मायिनं' २-११-१० ) असून, प्रतिपक्ष्यावर धूम्रास्त्राचा प्रयोग करी. यामुळें त्याच्या समोर जाऊन उभे राहण्यास देव भीत असत ( ४-१९-९ ). म्हणून त्यांनीं इंद्रास पुढें केलें ( 'तस्मै तवस्यमनु दायि सत्रेन्द्राय देवेभिरर्णसातौ' २-२०-८ ). पण प्रत्यक्ष लढाईला जेव्हां तोंड लागलें, तेव्हां वृत्रासुराचा वीरावेश पाहून देवांनीं समरांगणांतून भयभीत होऊन पळ काढला ! पण इंद्र मात्र मोठ्या धैर्यानें आपल्या स्थानावर राहून त्या दैत्याशीं शौर्यानें लढून अखेर त्यास जमिनीवर लोळवता झाला. हें युद्ध इंद्र व वृत्र यांच्यामध्यें इतकें तुमुल झालें कीं, त्या वेळीं पृथ्वी, आकाश व इतर सर्व चराचर थरथर कांपूं लागलीं ! ( 'आदिन्द्रः सत्रा तविषीरपत्यत वरीयो द्यावा पृथिवी अबाधत' १०-१८-५ ). वृत्र मारला गेला हें पाहून देवांनीं आनंदानें इंद्राचें स्तुतिस्तोत्र गाइलें ( विश्वे देवासो अध वृष्ण्यानि तेऽवर्धयन्त्सोमवत्या वचस्यया' १०-११३-८ ). इंद्राला हें जें सामर्थ्य व उत्साह प्राप्त झाला तो त्यावेळीं त्यानें सोमरसाचें प्राशन केलें होतें म्हणून. ( 'त्री साकमिन्द्रो मनुषः सरांसि सुतं पिबद्वृत्रहत्याय सोमम्' ५ २९-७ ) इंद्रानें वृत्राला ठार मारलें तें शस्त्र त्वष्ट्यानें तयार केलें होतें. त्या शस्त्रानें इंद्रानें वृत्राचें शीर तोडून धडापासून वेगळें केलें.

( 'विच्चिद्वृत्रस्य दोधतो वज्रेण शतपर्वणा। शिरो बिभेद वृष्णिना' ८-६-६) व त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे केले. त्या वेळीं वृत्रानें आपला बचाव करण्याकरतां पुष्कळ डावपेंच केले. पण इंद्रानें ते सर्व हाणून पाडून अखेर त्याचा फन्ना उडविला. नंतर वृत्राचे ढगांत गुरफटून गेलेले किल्ले विदीर्ण करून कोंडून ठेविलेल्या बारधींना मुक्त केलें.

८ **स्वर्भानुः**—पाणी अडवून ठेवणारे असे वृत्रादि चोरटे असुर होते, तसेच प्रकाशहि अडविणारे असे कांहीं असुर होते. त्यांत स्वर्भानु हा प्रख्यात व प्रमुख असा दैत्य होता. याला राहु असेंहि म्हणतात. यानें एकदा सूर्यासभोंवती अंधार पसरून त्यास सपशेल ग्रासून टाकलें. त्या वेळीं सर्वत्र अंधार पडून त्या काळोखांत त्रिभुवन सगळें गडप झालें! कांहींच दिसेना. जिकडे तिकडे अंधारच अंधार! लोक घाबरले! भयभीत झाले! ( 'यत्वा सूर्य स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः। अक्षेत्रविद्यथा मुग्धो भुवनान्य-दीधयुः।' ५-४०-५ ).

सूर्याला याप्रमाणें स्वर्भानूनें ग्रासल्यामुळें तो अदृश्य झाला. यामुळें अत्रीच्या धर्मकार्यांत अडथळा उत्पन्न होऊन तें स्थगित होण्याची वेळ आली. तेव्हां त्यानें योगस्थमनानें सूक्ष्म विचार करीत असतां त्याच्या अंतर्दृष्टीला असें दिसून आलें कीं स्वर्भानूनें सर्वत्र अंधार पसरून सूर्यास ग्रासून टाकिलें आहे! त्यावेळीं सूर्य अत्रीस म्हणाला कीं 'हे अत्रे! मी तुझा आहें! माझा शत्रु मला न गिळेल असें कर! ( 'मा मामिमं तव सन्तमत्र इरस्या द्रुग्धो भियसा नि गारीत्' (५-४०-७). तूं सत्यव्रत मित्र आहेस! म्हणून तूं व राजा वरुण असे तुम्ही दोघे मिळून माझें रक्षण करा!'

सूर्याची ही प्रार्थना ऐकून अत्रीनें दगड जुळवून, देवांची उपासना केली व स्तुतिस्तोत्र गाइलें. त्या योगानें त्यानें सूर्याला स्वर्भानूच्या तावडींतून मुक्त करून स्वर्गांत त्याची स्थापना केली! अर्थात् स्वर्भानूनें पसरलेलें मायाजाल नष्ट झालें व सूर्य पूर्वीप्रमाणें चमकूं लागला! 'अत्रिः सूर्यस्य दिवि चक्षुराधात्स्वर्भानोरप माया अघुक्षत्' ( ५-४०-८ ).

याप्रमाणें स्वर्भानु दैत्यानें ग्रासलेल्या सूर्याला अत्रीच्या वंशजांनीं ग्रहण-मुक्त करून मोठें यश संपादन केलें. हें कार्य इतर कोणाकडूनहि झालें नसतें.

('यं वै सूर्य स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः। अत्रयस्तमन्वविन्दन् नह्यन्ये अशक्नुवन्' ५-४०-९ ).

९ पणिः—आतां सरशेवटीं पणींचा थोडासा इतिहास देऊन हें प्रकरण आटपतें घेतों. वैदिक आर्यांना वेदकालीं छळणाऱ्या टोळ्यांपैकीं दास व दस्यू यांच्याशिवाय नांव घेण्यासारखे दुसरे जे लोक होते, त्यांत पणि हे अग्रगण्य होते. त्यांची वसाहत रसा नदीच्या तीरावर होती असें मानण्यास ऋग्वेदांत आधार आहे. देवदूती सरमा ही रसा नदी ओलांडून गेल्यावर तेथें तिला पणींनीं घेरून ती नदी कशी ओलांडून आलीस असा प्रश्न केला आहे. ( 'कथं रसाया अतरः पयांसि' १०-१०८-२ ). आणि पुढें तेथें पणींचा मोठा खजिना आहे असें त्यांनी म्हटलें आहे ( 'अयं निधि सरमे अद्रिबुध्नो गोभिरश्वोभिर्वसुभिर्न्यृष्टः' १०-१०८-७ ) यावरून पणी लोक रसा नदीच्या पलीकडे राहणारे होते असें म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. हे पणी झाले तरी दास व दस्यूंप्रमाणेंच मोठे लबाड व कवडीचुंबक व देवनिंदक लोक होते. (७-३१-५) पणी यांचें लक्षण सांगतांना सायणाचार्यांनीं 'वणिज इव लुब्धकः' असा शेरा मारला आहे व तो बरोबर आहे. हे पणी झाले तरी दासांसारखेच नास्तिक व वेदनिंदक असून, स्वभावानें मोठे चोरटे व लबाड होते. ते आर्यांच्या सुपीक प्रदेशांत शिरून त्यांचें गोधन व इतर धनधान्य संपत्ति केव्हां चोरून तर केव्हां उघड लूटमार करून पळवून नेत असत, व हा सर्व चोरीचा सगळा माल ते गुप्त जागेंत-म्हणजे पर्वताच्या पोटांत-लपवून ठेवीत. ( 'निधिं पणीनां परमं गुहाहितम्' २-२४-६ ). ते मोठे क्रूर व दगेबाज असल्यामुळें त्यांना वेदांत लांडग्याची उपमा दिली आहे ( 'वृको हि सः' ६-५१-१४ ). ते मोठे श्रीमंत असून तसेच मोठे कवडीचुंबक होते ( 'अराधसः' ८-६४-२). पणी ही जमातच मोठी चोरटी व लुटारू असून, त्या सर्वांनीं चोरून व लुटून आणलेली चीजवस्त डोंगरांतील एका चांगल्या बंदिस्त जागेंत सांठवून सुरक्षित ठेवण्यांत आली होती. तेथील खजिन्याचें वर्णन ऋग्वेदांत आढळतें तें असें—'अयं निधि सरमे अद्रिबुध्नो गोभिरश्वोभिर्वसुभिन्यृष्टः' (सरमे! दगडांनीं भक्कम बांधून काढलेल्या या खजिन्यांत

गायी, घोडे व इतर संपत्ति अगदीं खच्चून भरलेली आहे ) (१०-१०८-७) आणि त्यावर सशस्त्र पणींचा अहोरात्र खडा कडक पाहरा आहे. ('रक्षन्ति पणयो ये सुगोपाः' १०-१०८-७ ) आणि त्यांचीं तीं हत्यारें विचारशील तर मोठीं प्रखर आहेत! ( अस्माकमायुधा सन्ति तिग्मा' (१०-१०८-५). तात्पर्य हे पणी झाले तरी दासांप्रमाणेंच आर्यांना छळणारे मोठे दुष्ट व खाष्ट असे द्वाड बेरड लोक होते. त्यांनीं जेव्हां बृहस्पतीच्या गायी चोरून नेल्या, तेव्हां सरमेनें त्यांचा शोध लावून आल्यावर इंद्रानें त्यांच्यावर हल्ला करून, त्यांचा पराभव करून, त्या चोरून नेलेल्या गाई परत पुनः बृहस्पतीला देऊन शिवाय त्या पणींची संपत्तीहि त्याला बहाल करून खुष केलें. येणेप्रमाणें पणींचा हा थोडक्यांत इतिहास आहे.

१० वलः—पणींच्या गुणस्वभावांचें सर्वसामान्य वर्णन वर करण्यांत आलेंच आहे. त्या सर्व गुणांत बल हा पूर्ण पटाईत होता व म्हणून त्याजकडे पणींचें अग्रेसरत्व आलें होतें. तो त्यांचा राजा होता असें म्हटलें तरी चालेल. या बलाचे जे अनुयायी त्यांनाच वेदांत पणी असें म्हटलें आहे. या पणींचें जें मुख्य ठाणें त्यास बलपूर असें नांव असून, त्या बलपुराजवळच एका डोंगराच्या पोटांत त्यांचा मोठा खजिना होता. बलाचे हे पणी लोक वेळप्रसंग साधून आर्यांच्या सुपीक व सधन प्रदेशांत शिरून त्यांचें गोधन व इतर चीजवस्त चोरून अगर लुटून आणून, तीं या डोंगरांतील गुहेंत लपवून ठेवीत असत. विशेषतः त्यांना आर्यांचें गोधन अपहरण करण्याची फार मोठी चटक लागली होती. एकदा त्यांनीं अंगिरसांच्या आश्रमांत शिरून देवगुरु बृहस्पतीच्या सुंदर दुभत्या गाईंचा सर्वोत्तम कळपचा कळपच रातोरात चोरून पळवून नेला! हा आंगिरस बृहस्पति म्हणजे देवराज इंद्राचा पुरोहित असून, त्याचें इंद्रावर अत्यंत वजन होतें. म्हणून त्यानें ही तक्रार इंद्रापुढें नेऊन त्यास आपल्या गाई शोधून परत मिळवून देण्याविषयीं त्याची आग्रहपूर्वक विनंति केली. तेव्हां इंद्रानें त्या गाईंचा शोध लावण्यासाठीं म्हणून आपली परम विश्वासांतली दूती जी सरमा, तिची त्या कामावर योजना करून तिला गोधनशोधार्थ बाहेर पाठवून दिली.

इंद्राज्ञा घेऊन ती सरमा बाहेर पडली व फिरत फिरत रसा नदी ओलांडून पणींच्या प्रदेशांत शिरली. ( 'रसाया अतरं पयांसि' १०-१०८-२) तेथून ती तपास करीत करीत फिरत असतां एका डोंगरापाशीं तिला दुरून गाईचें हंबरणें ऐकूं आलें. त्या रोखानें ती हळुंहळूं पुढें पुढें एकेक पाऊल टाकीत चालली असतां तिला अकस्मात् तो पणींचा मोठा खजिना आढळला. ( 'अग्रं नयत् सुपद्यक्षराणामच्छा रवं प्रथमा जानती गात्' ३-३१-६ ) तेथें आल्यावर आंतील गायींचें हंबरणें स्पष्ट ऐकूं येऊन, त्यावरून तिला बृहस्पतीच्या गायींची ओळख पटली व पुढें तेथून निघून इंद्राजवळ येऊन सर्व हकीकत तिनें त्यास निवेदन केली. ती ऐकून घेतल्यावर अग्नि, मरुत् व बृहस्पति यांस बरोबर घेऊन, पणींचें पारिपत्य करून बृहस्पतीच्या गायी सोडविण्यासाठीं इंद्र हा चटकन् बाहेर निघाला व रसा नदी ओलांडून पणींच्या राज्यांत शिरून मोठ्या रभसानें त्यानें बलावर चाल करून त्यास चकित करून सोडलें. त्याची व बलाची गांठ पडली व त्या दोघांत मोठें रणकंदन माजून अखेर बलाचा पराभव होऊन तो धारातीर्थीं गतप्राण होऊन पडला. इंद्रानें त्यास चक्रानें ठार मारलें ( 'भिनद् वलमिन्द्रो अंगिरसस्वान्' २-११-२० ).

नंतर सरमेनें गायी डांबून ठेविलेली जागा दाखविली. अर्थात् ती डोंगराच्या पोटांत असून दगडी दरवाजानें बंद केलेली होती. तेथें आल्यावर इन्द्रानें आपल्या वज्रानें तो डोंगर फोडून काढला. ( 'वि गोभिरद्रिमैरयत्' १-७-३ ). अग्नीनें तें दार उघडलें ( 'स सुक्रतुर्यो वि दुरः पणीनाम्' ७-९-२ ) नंतर इंद्र आंत शिरून तेथें अडकवून ठेविलेल्या गायी त्यानें मोकळ्या केल्या. ( 'यो (इंद्रः) गा उदाजदपधा वलस्य' २-१२-३ ) या चकमकींत पणींचा फार मोठा संहार झाला आणि त्यांची सर्व संपत्ति लुटून फस्त करण्यांत आली ( सर्व पणेः समविन्दन्त भोजनमश्वावन्तं गोमन्तमा पशुं नरः' (१-८३-४). या लुटींत पणींचें सर्व धनधान्य, गायी, घोडे, व इतर पश्वादि संपत्ति इन्द्राच्या हस्तगत झाली. ही पणीपासून मिळविलेली लूट व बृहस्पतीच्या चोरीस गेलेल्या गायी सर्व पुनः त्यास देऊन इंद्रानें त्या देवगुरूस पूर्ववत् सुखी व संपन्न केलें.

जातां जातां येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं पणींची ही जमात ती सर्व दुष्ट व चोरटी होती तरी, त्यांच्यांतला बबृ नांवाचा एक पाणि मोठा गुण-संपन्न होता. तो जातीचा सुतार असून, तो उदार दाता होता.

११ राक्षसः—ऋग्वेदांत राक्षस ही एक निराळी पण स्वतंत्र अशी विचित्र योनि असून, ती सूक्ष्म व मायावी अशी मोठी अद्‌भुत व विचित्र जात होती. तिची गणना धड मनुष्यांतहि नाहीं किंवा धड देवांतहि नाहीं अशी एक निराळीच मोठी दुष्ट व कपटी सृष्टि होती. देव व मनुष्य या दोहोंचीहि ती सारखीच द्वेष करणारी अशी महाव्रात्य व नष्ट प्राणिकोटि होती. वेदांत आर्यांना छळणारे दास-दस्यु अगर पणी हे सर्व मानवकोटींत मोडत असून, फार तर त्यांना जंगली व स्वार्थी म्हणतां येईल. त्यांचा सगळा राग व रोख वैदिक आर्यांवर होता. प्रत्यक्ष ते आपण होऊन देवांच्या वाटेस जाणारे लोक नव्हते. फक्त ते वैदिक आर्यांस छळत असत. या दुष्ट लोकांचें पारिपत्य करण्याची शक्ति वेदकालीन आर्यांत नसल्यामुळें ते इंद्रादि देवांची यज्ञद्वारा उपासना करून त्यांच्या मदतीनें त्यांनीं या दुष्ट व पापी लोकांचा बीमोड केला. उदाहरणार्थः—शंबर हा दिवोदासाचा, शुष्ण हा कुत्साचा, चुमुरि हा दभितीचा, नमुचि हा मनूचा, पिप्रु हा ऋजिश्व्याचा महाप्रबल शत्रु असून, ते सर्व दस्यु अगर दास कुलांतीलच होते.हे सर्व लोक आर्यांना अत्यंत भारी असून त्यांचें पारिपत्य करण्याची ताकद एकट्या आर्यांच्या अंगीं नव्हती. म्हणून त्यांनीं युद्धप्रसंगीं इंद्राचा धांवा करून त्याच्या मदतीनें, त्यांनीं या सर्व शत्रूंचा धुव्वा उडविला व त्यांचें निर्मूलन करून भरतभूमि ही आपली मातृभूमि केली. असो. सांगण्याचें तात्पर्य काय कीं दस्यु व दास यांच्यापेक्षांहि ही राक्षस जात मोठी विलक्षण होती.

या राक्षसांचें ऋग्वेदांत ठिकठिकाणीं वर्णन आढळतें, त्याचा थोडक्यांत सारांश असाः—राक्षस हे मोठे दुष्ट ( 'दुष्कृतः' ७-१०४-३ ) व दुर्जय ( 'दुरेवाः' १०-८७-१८ ) आहेत. ते मोठे कपटी-म्हणजे आंत एक, बाहेर एक अशा वृत्तीचे मायावी-प्राणी आहेत ( 'द्वयुं' ९-१०४-४३ ). ते मोठे खादाड आहेत ( 'अत्रिणः' ९-१०४-६ ). मांसावर त्यांचें प्रेम

भारी असून कच्चें मांससुद्धां त्यांना चालतें ( 'क्रव्यादः' १०-८७-२ ). निरुपद्रवी प्राण्यांना छळणें हा त्यांचा जन्मसिद्ध स्वभावच होऊन बसला आहे ('द्रुहा'७-१०४-१७)आणि हिंसा करण्यांत तर त्यांना मोठा आनंद वाटतो! ('यातुमत्' ७-१०४-२५). ते मोठमोठ्यानें शब्द करून व भयंकर किंकाळ्या फोडून प्राण्यांना घाबरवितात व बुजवितात ('रेभः'१०-८७).ते मोठे नास्तिक आहेत('अदेवः'९-१०५-१३).अर्थात् त्यांची देवावर मुळींच श्रद्धाभक्ति नाहीं, आणि म्हणून यज्ञोपासना त्यांस मान्य नाहीं ( 'अयज्ञः' १०-१३८-६ ). अर्थात् जेथें जेथें यज्ञसमारंभ चालला असेल तेथें तेथें जाऊन, त्या समारंभांत विघ्न उपस्थित करण्यांत—प्रसंगीं नासधूससुद्धां करण्यांत—ते मोठा पुरुषार्थ मानतात ( ' ये वा रिपो दधिरे देवे अध्वरे' ७-१०४-१८ ). यज्ञांतील देवांकरतां तयार केलेल्या हविरन्नावर झडप घालून त्याचा नाश करण्याचा जणूं कांहीं त्यांनीं चंगच बांधला आहे ( 'हविर्मथिनां'७-१०४-२१).पापकृत्याची प्रशंसा करणें हें त्यांचें ब्रीदच होऊन बसलें आहे ( 'अघशंसः' १०-८७-२० ). सत्य बोलणें त्यांना वावडें असून खोटें बोलण्यांतच ते आपणास धन्य मानणारे अशी द्वाड जात आहे ( 'वाचास्तेनः' १०-८७-१५ ). ते स्वभावानें अत्यंत क्रूर आहेत ( 'वृजिनः' १०-८७-१५ ). सत्पुरुषांना आपल्या तीक्ष्ण नखानें ओरबडून ओरबडून त्यांचा जीव रंजीस आणण्यांत त्यांना मोठ्या गुदगुल्या होतात ( 'शफारुजं' १०-८७-१२). ते मोठे ब्रह्मद्वेष्टे आहेत ( 'ब्रह्मद्विषः' ३-३०-१७ ). ते कठोर भाषणी आहेत ( 'जरूथं' ७-१-७ ). मनुष्यांचा प्राण घेण्यांत त्यांना मोठा आनंद वाटतो ( 'असुतृपः' १०-८७-१४ ). नरमांसावर त्यांचें प्रेम फार. त्याचप्रमाणें घोड्याचें व इतर पशूंच्या मांसावरहि त्यांचा तितकाच डोळा आहे. दूध म्हणजे तर त्यांचा जीव कीं प्राण. त्यावर ते मोठी मजा मारणारे आहेत. चांगल्या कृतींची मोडतोड करणें हा त्यांचा सहज स्वभावच आहे, असेंच कां म्हणाना ( 'भंगुरावतः' १०-८७-२३ ). ते मायावी असल्यामुळें वाटेल तसलें रूप धारण करूं शकतात. प्रसंगीं तें घुबडाचें रूप घेतात ( 'उलूकयातुः' ७-१०४-३ ) वाटल्यास कुत्र्याचें ( श्वयातुः ), वाटल्यास गिधाडाचें ('गृध्रयातुः'), केव्हां

गरुडाचें ( 'सुपर्णयातुः' ) तर केव्हां चक्रवाकाचें रूपहि धारण करूं शकतात ( ७-१०४-३ ). ते केव्हां आकाश मार्गानें संचार करणारे आहेत ( 'अंतरिक्षे पथिभिः पतन्तः' १०-८७-६ ) तर केव्हां पृथ्वीवर राहून धुडगूस घालणारे आहेत ( १०-८७-६ ). अर्थात् राक्षस ही जात वाटेल तें रूप धारण करून आपलें इष्ट मनोरथ साध्य करून घेण्यांत मोठी तरबेज आहे.

फार काय ? प्रसंग पडल्यास हे राक्षस मनुष्य रूप धारण करण्यासहि कमी करीत नाहींत. उदाहरणार्थ—स्त्रीच्या गर्भाचा अगर नवजन्मलेल्या बालकाचा घात करण्यासाठीं तिच्या भावाचें अगर तिच्या पतीचें रूप धारण करून तिच्या जवळ येतात ('यः (रक्षः ) त्वा भ्राता पतिर्भूत्वा निपद्यते प्रजां यस्ते जिघांसति' १०-१६२-५ ). त्याचप्रमाणें केव्हां केव्हां स्त्रीच्या गर्भांत शिरून तेथें नुकतेंच पतीनें विसर्जन केलेलें रेत चाटून तें फस्त करून टाकतात ( 'योनिं यो (रक्षः) अन्तरारेळिह' १०-१६२-४ ). ते इतकें प्रबल व उन्मत्त आहेत कीं कधीं कधीं देवावर—प्रत्यक्ष इंद्रावर—चाल करून जाण्यास ते भीत नाहींत ( 'अभि त्वा पाजो रक्षसो वि तस्थे' ६-२१-७ ). कपट करून ते सत्याचा नाश करण्यांत मोठे पटाईत आहेत (ऋतं यो (रक्षः) अग्ने अनृतेन हन्ति' १०-८७-११ ). या अशा दुष्ट व द्वाड राक्षसांना घरांत न येऊं देण्याबद्दल, त्यांचा त्रास व पीडा दूर करण्याबद्दल आणि त्यांना अत्यंत दूर पिटाळून देण्याबद्दल ऋषींनीं अग्नि देवाची मोठ्या कळकळीनें प्रार्थना केली आहे (८-६०-२०). कारण अग्निदेव हाच राक्षसांचा कट्टा विध्वंसक आहे असें वेदांतील रक्षोघ्न मंत्रावरून सूचित होत असून, ती गोष्ट ' अग्निर्हि रक्षसामपहन्ता ' या शतपथ वचनावरून चांगली दृढ होते. असो.

---



## प्रकरण ५ वें

# मंत्रद्रष्टे ब्रह्मर्षि

१ **अगस्त्य** मैत्रावरुणि १-१६९
२ अंगिरस सहस्र वसुरोचिष ८-३४
३ अजमीळ्ह सौहोत्र ४-४३
४ **अत्रि भौम** ५-२७
५ अंबरीष वर्षागिर १-१००
६ अयास्य आंगिरस, ९-४४
७ अवत्सार काश्यप ५-४४
८ उशना काव्य ८-८४
९ एतश वातरशन १०-१३६
१० **कक्षीवान औशिज** १-११६
११ **कण्व घौर** १-३६
१२ कवष ऐलूष १०-३०
१३ कश्यप मारीच १-९९
१४ कुशिक सौभरि १०-१२७
१५ कृष्ण आंगिरस ८-८५
१६ गर्ग भारद्वाज ६-४७
१७ गविष्ठर आत्रेय ५-१
१८ गृत्समद शौनक २-१
१९ **गोतम राहूगण** १-७४
२० गोपवन आत्रेय ८-७३
२१ गौरवीति शाक्त्य ५-२९
२२ **च्यवन भार्गव** १०-१९
२३ **जमदग्नि भार्गव** १०-१९
२४ त्रित आप्त्य १-१०५
२५ **दीर्घतमस औचथ्य** १-१४०
२६ देवापि आर्ष्टिषेण १०-९८
२७ नाभाक काण्व ८-३९
२८ **नाभा-नेदिष्ठ मानव** १०-६१
२९ नृमेध आंगिरस ८-८९
३० नोधा गौतम, १-५८
३१ पराशर शाक्त्य १-६५
३२ पायु भारद्वाज ६-७५
३३ प्रगाथ काण्व, ८-६३
३४ **प्रस्कण्व काण्व** १-४४
३५ बुध आत्रेय ५-१
३६ बृहदुक्थ वामदेव्य १०-५४
३७ **भरद्वाज बार्हस्पत्य** ६-१
३८ भृगु वारुणि ९-६५
३९ मधुच्छंद वैश्वामित्र, १-१
४० मान्धाता यौवनाश्व १०-१३४
४१ **मेधातिथि काण्व** १-१२
४२ राहूगण आंगिरस ९-३७
४३ राम जामदग्न्य, १०-११०

**४४ वसिष्ठ मैत्रावरुणि ७-१**
**४५ वामदेव गौतम ४-१**
४६ विरूप आंगिरस ८-४३
**४७ विश्वामित्र गाधिन ३-१**
**४८ शुनःशेप आजीगर्ती १-२५**
**४९ श्यावाश्व आत्रेय ५-५२**
५० श्रुतकक्ष आंगिरस ८-९२
५१ संवर्त आंगिरस १०-१७२
५२ सप्तवध्रि आत्रेय, ५-७८
५३ सुतंभर आत्रेय ५-११
५४ सुमित्र वाध्र्यश्व १०-६९
५५ सोभरि काण्व ८-१९
५६ हविर्धान आंगिरस १०-११
५७ हिरण्यगर्भ प्राजापत्य १०-१२१
५८ हिरण्यस्तूप आंगिरस, १-३१

आतां या ब्रम्हर्षींपैकीं कांहीं महत्वाच्या ऋर्षीचें चरित्र क्रमाक्रमानें खालीं देत जातों.

---

**१ अगस्त्यः**—अगस्त्य हा मित्रावरुणाचा मुलगा व वसिष्ठाचा भाऊ• अर्थात् तो अदितीचा नातू. याची जन्मकथा आहे ती अशी—एका सत्रांत मित्रावरुणांना आमंत्रित केल्यावरून ते तेथें गेले होते. त्यावेळीं स्वर्गांतील रूपलावण्यसंपन्न अप्सराश्रेष्ठ उर्वशीहि तेथें आली होती. सत्र चालू असतांना त्या मित्रावरुणांची दृष्टि सहज तिच्याकडे गेली. पण याचा परिणाम असा झाला कीं तें तिचें दिव्य सौंदर्य व मोहक रूप पाहून ते मोहित झाले. अर्थात् त्यांच्यांत कामविकार जागृत होऊन त्यांचें वीर्य स्खलन पावलें व तें तेथें शेजारी असलेल्या वसतीवरी कुंभांत पडलें. पुढें त्या वीर्यापासून अगस्त्य व वसिष्ठ हे दोन श्रेष्ठ ऋषी जन्मले. याविषयीं ऋग्वेदांत माहिती आढळते ती अशीः–( 'सत्रे ह जाताविषिता नमोभिः कुम्भे रेतः सिषिचतुः समानम्' । ततो ह मान उदियाय मध्यात् ततो जातमृषिमाहुर्वसिष्ठम् ॥' ७-३३-१३ ) भावार्थः एका सत्रामध्यें मैत्रावरुण हे दीक्षित होऊन बसले असतां भक्त जनांच्या प्रार्थनेवरून वसतीवरी नामक कुंभामध्यें त्यांनीं आपलें वीर्य एकाच वेळीं सिंचन केलें. त्यापासून अगस्त्य (मान) हा त्या कुंभाच्या मध्य भागांतून उत्पन्न झाला व वसिष्ठ हा त्या कुंभाच्या तळांतून जन्मला.

पुढें हा अगस्त्य मोठा तेजस्वी ऋषि झाला. त्याच्याच समकालीनचा खेल नांवाचा एक राजा होता. तो या अगस्त्य ऋषीचा आश्रयदाता होता. अर्थात् अगस्त्य हा त्याचा पुरोहित होता, हें निराळें सांगावयास नकोच. एकदा प्रसंग असा आला कीं त्यावेळीं त्या राजाला शत्रूशीं लढाई द्यावीच लागली. तेव्हां तो शत्रूशीं तोंड देण्यास म्हणून सैन्य जमवून समरांगणाकडे जाण्यास निघाला. त्यावेळीं त्याची विदुषी व शूर बायको जी विश्पला नांवाची होती, तीहि त्याच्याबरोबर लढाईंत जाण्यास तयार झाली. ती रणांत पतीच्या शेजारी राहून मोठ्या धैर्यानें व शौर्यानें लढत असतां दुर्दैवानें शत्रूच्या हातीं सांपडून तिचा पाय शत्रूकडून छाटला गेला. पुढें शत्रूचा पराभव होऊन ते पळून गेले. पण विश्पलेवर गुदरलेली ही आपत्ति पाहून अगस्त्य ऋषीला भारी खेद झाला व त्यावेळीं त्यानें एक सुंदर स्तोत्र गाऊन अश्विनी देवांचा धांवा केला. अश्विनीदेव हे देवांतले राजवैद्य असल्यामुळें ते वैद्यकी विद्येंत व कर्मांत अत्यंत कुशल व निष्णात होते. अगस्त्याचा तो स्तुतिपर धांवा ऐकून अश्वीदेव खुप झाले व तेथें येऊन विश्पलेचा पाय तुटला होता, तसाच एक दुसरा लोखंडाचा करून तो विश्पलेला जेथला तेथें त्यांनीं जोडून टाकला. ( 'अगस्त्ये ब्रह्मणा वावृधाना सं विश्पलां नासत्यारिणीतम् ।।' १-११७-११ ).

या अगस्त्याची सांगावयाची एक विशेष गोष्ट म्हणजे त्याची दीर्घ व कडक तपश्चर्या. तो ब्रह्मचारी नव्हता. विवाहित होता. लोपामुद्रा ही त्याची बायको. ती राजकन्या होती. विदर्भ देशाचा राजा हा तिचा बाप. लग्न झाल्यावर ती माहेर सोडून पतीजवळ येऊन राहूं लागली, आणि त्याची सेवा करीत त्याच्याप्रमाणेंच व्रतनिष्ठ राहून कालक्रमणा करूं लागली. पण किती झालें तरी स्त्रीहृदय तें ! मधून मधून पतिसुखाविषयीं तीव्र इच्छा तेथें उचंबळून येत असे ! पण स्त्रीशालिन्यामुळें आपलें मनोगत पतीपुढें उघड बोलून दाखविण्याचें मनोधैर्य तिला होईना आणि इकडे मनाची टोंचणीहि कमी होईना. असें होतां होतां तारुण्याचा भर ओसरणीस लागून, शरीराची शोभा व कांति अटत चालली. आणि तेथें म्हातारपणाची छटा डोकावूं लागली. शेवटीं ती अनिवार होऊन एके दिवशीं संधि साधून

अगस्त्याजवळ येऊन घट्ट धैर्य करून आपलें अंतःकरण तिनें त्याच्याजवळ पुढीलप्रमाणें उघड करून दाखविलें. ती म्हणाली:–हे पतिदेवा! अगस्ते! रात्रंदिवस सतत दक्ष राहून मी तुझी पुष्कळ वर्षे अनन्यभावें सेवाचाकरी करीत आलें आहें; पण काय सांगूं? आतां रहावेंच ना म्हणून उघड बोलून दाखवितें आहें. माझ्या धाष्टर्याची मला क्षमा कर! आतां उजाडणारा प्रत्येक उषःकाल तारुण्याला मागें रेटीत चालला असून, त्या मानानें म्हातारपण जवळ आणीत आहे. आणि त्यामुळें माझ्या शरीराचें सौंदर्य नाहींसें होत चाललें आहे. तर आतां माझी विनंति अशी कीं, आतां हें ब्रह्मचर्य व्रत टाकून पतिदेवानें आपल्या पत्नीशीं रतिसुखप्रसंग करावा ('पूर्वीरहं शरदः शश्रमाणा दोषा वस्तोरुषसो जरयन्तीः। मिनाति श्रियं जरिमा तनूनामप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः॥' १०-१७९-१). पुनः ती पुढें म्हणाली कीं प्राचीन काळीं जे कोणी सत्यव्रत ऋषी होऊन गेले व देवाशीं जे सत्यच बोलत गेले, त्यांनीं देखील आपल्या स्त्रीशीं एकांत करून प्रजोत्पादन केलेंच कीं नाहीं? ब्रह्मचर्येची अखेर त्यांनासुद्धां गाठतां आली नाहीं! म्हणून म्हणतें कीं पुरुषानें आपल्या स्त्रीबरोबर रतिसुखाचा उपभोग घ्यावा ('ये चिद्धि पूर्व ऋतसाप आसन्त्साकं देवेभिरवदन्नृतानि। ते चिदवासुर्नह्यन्तमापुः समू नु पत्नीर्वृषभिर्जगम्युः॥' १-१७९-२).

त्या चाणाक्ष अगस्त्य ऋषीनें आपल्या पत्नीचें तें स्त्रीहृदय जाणलें आणि ती तिची अंतरिच्छा सुपूर्त करण्याच्या इच्छेनें तो तिला म्हणाला–हे लोपामुद्रे! आपण कांहीं व्यर्थ श्रम केले नाहींत. देव आमच्यावर सुप्रसन्न होत्साते आमचें रक्षण करीत असल्यामुळें आमच्या सर्व इच्छा आम्ही पूर्ण करून घेऊंच घेऊं! आम्ही उभयतां मिळून जर प्रयत्न करूं तर या संसारांतील सर्व अडीअडचणींतून हमखास पार होऊन जाऊं! ('न मृषा श्रान्तं यदवन्ति देवा विश्वा इत्स्पृधो अभ्यश्नवाव। जयावेदत्र शतनीथमाजिं यत्सम्यञ्चा मिथुनावभ्यजाव॥' १-१७९-३). नंतर पुढें तो तिला म्हणाला, हे लोपामुद्रे! तुझें मन मीं ओळखलें. हे भार्ये! जपमग्न व ब्रह्मचर्यनिष्ठ असा हा जो मी त्या माझा काम या ना त्या कारणानें आतां जागृत होऊन वाढत चालला आहे. तर लोपामुद्रेनें आतां आपल्या संग-

मोत्सुक पतीजवळ खुशाल यावें ! कारण अधीर झालेल्या या स्त्रीनें—माझ्या लोपामुद्रेनें—धीर व महाबल अशा मज पुरुषाला सर्वस्वी कामवश करून टाकलें आहे! ( ' नदस्य मा रुधतः काम आगन्नित आजातो अमुतः कुतश्चित् । लोपामुद्रा वृषणं नी रिणाति धीरमधीरा धयति श्वसन्तम्' १-१७९-४) याचा परिणाम असा झाला कीं लोपामुद्रेची दीर्घकालीन इच्छा सुपूर्त होऊन, पुढें तिला पुत्र-संततीचाहि लाभ झाला. ही कथा दीर्घकाल ब्रह्मचर्य पाळूं पाहणाऱ्या स्त्रीपुरुषांना मननीय नाहीं असें कोण म्हणेल ? हा अगस्त्य सप्तर्षींपैकीं एक आहे.

आणखी एक प्रसंग या अगस्त्याचा सांगण्यासारखा आहे. तो तेवढा सांगून हें अगस्त्य-चरित्र संपवितों. तो प्रसंग म्हणजे इंद्र व मरुत् यांचा त्यानें केलेला सलोखा हा होय. त्या प्रसंगाची हकीकत ही अशी आहे— एकदां इंद्र हा एकटाच चालला होता. वाटेंत त्याला मरुत् भेटले. ते त्याला म्हणाले, देवा ! तूं एकटाच कुणीकडे चालला आहेस? ('कुतस्त्वमिन्द्र माहिनः सन्नेको यासि ? १-१६५-३ ) तुझ्याबरोबर कोणी अनुचर नाहींत हें कसें काय ?

तेव्हां इन्द्र त्यांना उत्तरला—हे मरुतांनो ! हें तुम्ही काय विचारतां ? मी हविसेवनार्थ निघालों आहें. जें काय हविरन्न आहे तें सगळें माझेंच आहे ! जीं काय स्तुतिस्तोत्रें आहेत तीं सगळीं मला सुखविण्यासाठींच— मला प्रसन्न करण्यासाठींच—म्हटलीं जातात ! आणि यज्ञांत सोमरस काढले जातात, ते झाले तरी माझ्याकरतांच ! हे पहा, हे माझे घोडे जे आहेत ते हविभक्षणार्थंच मला इष्टस्थळीं घेऊन चालले आहेत ! अर्थात् हविभक्षणार्थंच मी तिकडे जलद चाललों आहें. ( १-१६५-४ ).

हें इंद्राचें भाषण ऐकून मरुत् त्याला म्हणाले—हे इंद्रा ! आम्ही सुद्धां आमचे घोडे जोडून सज्ज केले आहेत. तुझ्याबरोबरच आम्हीहि हवीचा स्वीकार करूं ! तुझे जे हवि आहेत, ते आमच्या जलवृष्टीपासूनच झालेले नाहींत काय ? अर्थात् तें तुझें सामर्थ्य आमच्यापासूनच तुला लाभलें आहे ! तें तूं कसें विसरतोस ? ('इन्द्र स्वधामनु हि नो बभूथ '१-१६५-५).

इद्र म्हणाला—मरुतांनो! मी तुम्हांला स्पष्ट स्पष्ट सांगतों कीं, या विश्वांत मीच काय तो एकटा बलवान् आहे ! माझा राग मोठा दुस्तर आहे! त्या दुष्टवृत्राचा मींच वध केला ना ? (' वधीं वृत्रं मरुत इन्द्रियेण स्वेन भामेन तविषो बभूवान्' १-१६५-८) हे मरुत हो ! मी मोठा उग्र आहे बरें ! तसाच मोठा बलवानहि आहे ! आणि आणखी विचाराल तर महिमाशालीहि आहे ! ! सर्व शत्रूंना म्यां एकट्यानेंच रणांत माझ्या वज्राचें पाणी पाजलें आहे ! ( 'अहं ह्युग्रस्तविषस्तुविष्मान्विश्वस्य शत्रोरनमं वधस्नैः ।' १-१६५-६ ) असा मी शूर व पराक्रमी आहे ! माझ्या पुढें तसा दुसरा कोण आहे ! ! मीं सर्व शत्रूंना हत्यारानें नमविलें आहे ! ! अहीचा तर फडशाच पाडला ! तसें सामर्थ्य तुम्हांला होतें कोठें व कधीं ? ( 'क्व स्या वो मरुतः स्वधासीद्यन्मामेकं समधत्ताहिहत्ये' १-१६५-६ ).

हें इद्राचें आत्मश्लाघेचें भाषण मरुतांच्या स्वाभिमानाला जरासें डिवचल्यासारखें झालें, म्हणून त्यांनीं त्याच तोऱ्यांत त्यास उत्तर दिलें कीं, इंद्रा ! तूं पुष्कळ पराक्रम केले आहेस ही गोष्ट खरी. पण आमचा पराक्रम तूं विसरतोस, हें ठीक नाहीं. आणि आम्हीं काय कमी केले आहेत! तुझ्याप्रमाणेंच आम्हीहि पुष्कळ पराक्रम गाजविले आहेत ! इंद्रा ही तुझी घमेंड आह्मापुढें अगदीं व्यर्थ आहे ! खरें पुसशील तर तुझ्यापेक्षां आम्ही कर्तृत्वानें रतिभर सरसच आहों ! ! (भूरि चकर्थ युज्येभिरस्मे समानेभिर्वृषभ पौंस्येभिः । भूरीणि हि कृणवाम शविष्ठेन्द्र क्रत्वा मरुतो यद्वशाम ॥ ' १-१६५-७) लक्षांत घे आम्ही सुद्धां शूर मरुत् आहों !

इंद्र म्हणाला—माझ्या पुढें तुमची फुशारकी चालणार नाहीं ! वृत्रासुराचा वध केला तो मी एकट्यानेंच केला ! तुम्ही सर्व त्या वेळीं पळून गेला ! ! माझ्या एकट्या पराक्रमाचीच ती बहुमोल साक्ष आहे ! आणि माझा रागहि तितकाच भयंकर आहे! ती गोष्ट तुम्हाला मुळींच साधली नसती. मरुतांनो ! मी वज्रबाहू आहे ! हें तुम्ही विसरूं नका !('वधीं वृत्रं मरुत इन्द्रियेण स्वेन भामेन तविषो बभूवान् ' १-१६५-८ ).

याप्रमाणें दोघांचें आंत्मप्रौढीचें भाषण चाललें असतां अगस्त्य तेथें उपस्थित होता. त्यानें त्या दोघांचा संवाद ऐकल्यावर मरुतांना उद्देशून

म्हणाला, 'मरुतांनो ! हा जो स्तोम आहे, तो तुम्हांला सुखविण्यासाठींच मी करीत आहे; तुम्ही प्रसन्न झाला म्हणजे अन्न, बल व जयशील दान हें सर्व आम्हांस प्राप्त होईल. ('विद्यामेषं वृजनं जीरदानुम्' १-१६५-१५). नंतर त्यानें मरुतांची खूप स्तुति गाइली. (१-१६६ ते १६९) नंतर तो इन्द्राकडे वळला, पण इन्द्रास हें अगस्त्याचें कृत्य आवडलें व मानवलें नाहीं. अर्थात् त्यास राग आला व आपला अपमान करणाऱ्या अगस्त्यावर डोळे वटारून क्रोधमुद्रेनें पाहूं लागला. ती त्याची क्रोधमुद्रा पाहून अगस्त्य मनांत फार घाबरला आणि त्यास म्हणाला, 'इंद्रा ! मी निरापराधी आहे ! मग मला कां बरें मारूं इच्छितोस ? ('किं न इन्द्र जिघांससि' १-१७०-२).

इन्द्र म्हणाला--न रागावूं तर काय करूं ? तूं आमचा भाऊ म्हणवितोस. तूं आमचा सखा असून आमचा अपमान करतोस, याचा अर्थ काय ? ('किं नो भ्रातरगस्त्य सखा सन्नति मन्यसे' १-१७०-३) तुझें मन कसें आहे हें आम्ही जाणतों. ('विद्माहि ते यथा मनः' १-१७०-३). आमच्याकरितां तयार केलेला हविर्भाग आमचा आह्माला देत नाहींस ! ही काय तुझी रीत झाली ? ('अस्मभ्यमिन्न दित्ससि' १-१७०-३). आजचें आज आम्हांला मिळत नाहीं, तर उद्यांचा भरंवसा कोण धरील ? आजचें आज नाहीं मग उद्यांची आशा व्यर्थ आहे ! ('न नूनमस्ति नो श्वः कस्तद्वेद यदभ्दुतम्' १-१७०-१ ),

इन्द्राचें हें भाषण ऐकून अगस्त्य मनांत चपापल्यासारखा झाला. आपण केलेली मरुतांची स्तुति ऐकून इन्द्र चिडला हें त्यानें ओळखिलें. नंतर तो इंद्रास म्हणाला, देवा ! रागावूं नकोस ! तसा माझा भाव नाहीं. पण मरुत् हे झाले तरी, इंद्रा ! दुसरे का आहेत ? ते तुझे भाऊच ना ? ( 'मरुतो भ्रातरस्तव' १०-१७०-२) त्यांचेंहि संरक्षण करणें तुझें कर्तव्य नाहीं का ? बरें आतां असें कर ! हा जो हविर्भाग आहे तो तू त्यांच्यासह गोडीगुलाबीनें ग्रहण कर ! लढाईतल्याप्रमाणें आम्हास मारूं नकोस ! ( 'तेभिः कल्पस्व साधुया मानः समरणे वधीः' १-१७०-२ ).

नंतर इंद्राला हविर्भाग देणेसाठीं अगस्त्यानें लागलीच वेदि तयार करून, अग्नि पेटवून यज्ञाची तयारी केली. आणि इंद्राला उद्देशून म्हटलें--

हे वसुपते : हे इंद्र देवा ! तूं खरोखर सर्व संपत्तीचा ईश्वर आहेस ! आणि हे मित्रपते ! तूं आमच्यासारख्या मित्रांचा संरक्षक आहेस ! ( ' त्वमीशिषे वसुपते वसूनां त्वं मित्राणां मित्रपते धेष्ठः' १-१७०-५ ). आतां देवा असें कर ! हे जे तुझे बंधु मरुत् आहेत, त्यांच्याशीं गोड भाषण कर ! आणि या आमच्या यज्ञांतील हविरन्न यथेच्छ भक्षण कर ! ('इन्द्र त्वं मरुद्भिः सं वदस्वाध प्राशान ऋतुथा हवींषि' १-१७०-५ ). याप्रमाणें अगस्त्यानें अखेर इंद्र व मरुत् यांचें सख्य करून, त्यांच्यांतील द्वैतभाव काढून टाकला.

अगस्त्याच्या जन्मकथेची बृहद्देवतेंत माहिती सांगण्यांत आली आहे ती अशीः—

' त्वष्टा पूषा तथैवेन्द्रो द्वादशो विष्णुरुच्यते ।
द्वंद्वं तस्यास्तु तज्जज्ञे मित्रश्च वरुणश्च हा ॥ १४८ ॥
तयोरादित्ययोः सत्रे दृष्ट्वाप्सरसमुर्वशीम् ।
रेतश्चस्कन्द तत्कुंभे न्यपयद्वासतीवरे ॥ १४९ ॥
तत्रैव तु मुहूर्तेन वीर्यवन्तौ तपस्विनौ ।
अगस्त्यश्च वासिष्ठश्च तत्रर्षी संबभूवतुः ॥ १५० ॥
बहुधा पतति शुक्रे कलशेऽथ जले स्थले ।
स्थले वासिष्ठस्तु मुनिः संभूत ऋषिसत्तमः ॥ १५१ ॥
कुम्भे त्वगस्त्यः सम्भूतो जले मत्स्यो महाद्युतिः ।
उदियाय ततोऽगत्स्यः शम्यामात्रो महायशाः ॥ १५२ ॥
मानेन संमितो यस्मात्तस्मान्मान्य इहोच्यते ।
यद्वा कुंभादृषिर्जातः कुंभेनापि हि मीयते ॥ १५३ ॥
कुंभ इत्यभिधानं तु परिमाणस्य लक्ष्यते । '

( बृहद्देवता अ. ५, श्लो. १४८-१५४ ) वरील श्लोकांचा अर्थ सरळ व सुगम असल्यामुळें त्यांचा भावार्थ देण्याचें कारण दिसत नाहीं. असो.

२. अत्रिः—अत्रि हा प्राचीन ऋषी जे दध्यङ्, अंगिरा, प्रियमेध, कण्व, मनु इत्यादि होते, त्यांपैकीं एक होय. (' दध्यङ् ह मे जनुषं पूर्वो आङ्गिराः प्रियमेधः कण्वो अत्रिर्मनुर्विदुस्ते मे पूर्वे मनुर्विदुः' १-१३९-९). या अत्रीची जन्मकथा आहे ती अशीः—प्रजापति यानें साध्यदेवांसह त्रिसंवत्सर नावांचें एक सत्र प्रारंभिलें होतें. त्यांत वाग्देवी ही प्रत्यक्ष शरीर धारण करून, तेथें आली होती. तिला पाहून त्या प्रजापतीचें व वरुणाचें मन चंचल होऊन, त्याचा परिणाम रेत-स्खलनांत झाला ! तेथें वायु हा होताच. चटकन् त्यानें तें रेत अग्नींत नेऊन टाकलें. तेव्हां त्या अग्निज्वालेपासून भृगु हा जन्मला आणि निखाऱ्यापासून अंगिरा ऋषि उत्पन्न झाला ! हीं दोन सुंदर मुलें पाहून ती वाग्देवी त्या प्रजापतीला म्हणाली कीं, देवा ! या दोन मुलांसारखाच मला तिसरा एक पुत्र असावा अशी माझी इच्छा आहे. ती तेवढी आपण पूर्ण करा ! 'बरें आहे' असें म्हणून त्या प्रजापतीनें तिसरा एक मुलगा निर्माण केला. तो इतका तेजस्वी होता कीं तो म्हणजे प्रतिसूर्यच ! या विषयीं बृहद्देवतेंत मजकूर आढळतो तो चरित्राच्या शेवटीं दिला आहे.

अत्रि हा सप्तर्षींपैकीं एक असून तो मोठा कर्मनिष्ठ व महातेजस्वी असा ब्राह्मण होता. तपश्चर्या करतां करतां तो अत्यंत क्षीण झाला होता. तेव्हां त्यानें अश्विनीचा धांवा करून त्यांस प्रसन्न करून घेतलें. तेव्हां त्यांनीं त्याला पुनः धडधाकट करून घोड्याप्रमाणें चलाख व तरतरीत केलें ( त्यं चिदत्रिमृतजुरमर्थमश्वं न यातवे ॥' १०-१४३-१ ). एकदां असा प्रसंग आला कीं त्या वेळीं असुरांनीं या अत्रीला त्याच्या परिवारासहित पकडून त्याला एका गुहेंत घालून कोंडून ठेविलें, इतकेंच नव्हे तर तेथें त्यांनीं त्याचा छळ मांडून त्याचे हाल हाल चालविले ! त्याच्या सभोंवती अग्नि पेटवून त्यास अत्यंत ताप दिला. अशा विपन्न स्थितींत अनन्यगतिक होऊन त्यानें अश्विनी देवांचा धांवा केला. तेव्हां त्यांनीं अनुग्रह करून त्याचा ताप नाहींसा केला व त्यास अन्न व सुख दिलें ( 'युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावधत्तम्' १-११८-७ ), आणि पुढें त्याची परिवारासहित त्या दुष्ट असुरांच्या कपट

कृतीचें निवारण करून त्यांच्या तावडींतून मुक्तता केली ! ( ऋषिं नरावंहसः पाञ्चजन्यमृबीसादत्रिं मुञ्चथो गणेन । मिनन्ता दस्योरशिवस्य माया अनुपूर्वं वृषणा चोदयन्ता ।। १-११७-३ ).

या अत्रि ऋषीची सांगण्यासारखी महत्त्वाची अशी एक गोष्ट म्हणजे त्यानें सूर्यग्रहणाचा शोध लावला ही होय. एकदा असा चमत्कार झाला कीं तो पाहून लोक सगळे विस्मयचकित होऊन घाबरून गेले. अमावास्येचा दिवस होता तो ! भर दोन प्रहरीं सूर्य एकाएकीं निस्तेज पडत चालला. शेवटीं तो इतका क्षीणतेज झाला कीं भर दिवसाच रात्रीसारखा अंधःकार दाटला ! लोक हें पाहून भयग्रस्त झाले व आपण कुठें आहोंत व पुढें आपलें काय होणार, हें त्यांना कळेना ! अर्थात् स्वर्भानूचा कपट प्रयोग होता तो ! बोलून चालून असुरच तो ! त्यानें आपलें मायाजाल पसरून सूर्यास तेवढ्यापुरतें सपशेल झांकून टाकलें होतें. हें त्या असुराचें कपट चाणाक्ष अत्रीनें ताडलें आणि तो अनिष्ट प्रसंग टाळण्यासाठीं म्हणून त्यानें इंद्राचा धांवा केला. तेव्हां इंद्रानें त्या व्रतभ्रष्ट स्वर्भानूचा कपटप्रयोग ओळखून तो समूळ नष्ट करून टाकला आणि सूर्यनारायण आपल्या तेजानें पूर्ववत् पुनः प्रकाशूं लागला ! अत्रीचें हें प्रसंगावधान व प्रभाव पाहून पुढें सूर्यानेंदेखील त्याची 'त्वं मित्रोऽसि' म्हणून प्रशंसा केली. हा इतिहास पांचव्या मंडळांतील चाळीसाव्या सूक्तांत आला आहे. ( 'अत्रिः सूर्यस्य दिवि चक्षुराधात् स्वर्भानोरप माया अघुक्षत् ।। ८ ।। यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः । अत्रयस्तमन्वविन्दन् न ह्य१न्ये अशक्नुवन्'।।५-४०-९।।) या सूक्तावरून ऋग्वेदकालीं आर्यांना सूर्यग्रहणाचें ज्ञान असावें हें अनुमान बलवत्तर ठरतें. असो. अत्रि हा पांचव्या मंडळांतील ३७ ते ४३ व ७६ आणि ७७ या सूक्तांचा द्रष्टा असून इतर सूक्तें त्याच्या गोत्रज ऋषींनीं केलीं आहेत.

## अत्रीची वंशावळ

प्रजापति = वाक्
|
अत्रि ( बृ. दे. —१०१ )
|
अर्चनानस (५-६३) | बुध (५-१) | अपाला (८-९१) | विश्ववारा (५-२८-६)

अर्चनानस
|
श्यावाश्व (५-५२) ( ८-३६ )
|
अधीगु ( ९-१०१ )

## बृहद्देवता

त्रिसांवत्सरिकं सत्रं प्रजाकामः प्रजापतिः ।
आहरत्सहितः साध्यैर्विश्वैर्देवैः सहेति च ॥ ५-९७ ॥
तत्र वाग्दीक्षणीयायाम् आजगाम शरीरिणी ।
तां दृष्ट्वा युगपत्तत्र कस्याथ वरुणस्य च ॥ ५-९८ ॥
शुक्रं चस्कन्द तद्वायुरग्नौ प्रास्यद्यदृच्छया ।
ततोऽर्चिभ्यो भृगुर्जज्ञे अङ्गारेष्वङ्गिरा ऋषिः ॥ ५-९९ ॥
प्रजापतिं सुतौ दृष्ट्वा हृष्टा वागभ्यभाषत ॥
आभ्यामृषिस्तृतीयोऽपि भवेदत्रैव मे सुतः ॥ ९-१०० ॥
प्रजापतिस्तथेत्युक्त्वा प्रत्यभाषत भारतीम् ।
ऋषिरत्रिस्ततो जज्ञे सूर्यानलसमद्युतिः ॥ ९-१०१ ॥

---

**कक्षीवानः**—कक्षीवान हा दीर्घतमा ऋषीचा पुत्र असून तो मोठा मेधावी ( 'विप्रः ' ४-२६-१ ) होता. त्याची जन्मकथा आहे ती अशी :—

दीर्घतमा हा नदींत पडून वाहत वाहत अंग देशांत जाऊन अखेर तेथें एका कांठास येऊन लागला. पुढें तो अंगराजाच्या घरीं गेला असतां अंगराजानें पुत्राच्या इच्छेनें आपल्या घरांतील ‘ उशिज ’ नांवाची दासी त्याच्याकडे पाठवून दिली. तिच्या उदरीं त्या ऋषीपासून जो मुलगा झाला, तोच हा कक्षीवान ऋषि होय.

पुढें तो मोठा झाल्यावर गुरुगृहीं जाऊन राहून तेथें त्यानें संपूर्ण विद्या हस्तगत केली. नंतर गुरूची परवानगी घेऊन तो घराकडे परत येत असतां वाटेंत फार थकल्यामुळें विश्रांतीसाठीं म्हणून रस्त्याच्या एका बाजूला बसला व त्या थकव्यामुळें तेथेंच त्यास झोंप लागली. तो झोंपल्यावर पुढें कांहीं वेळानें स्वनय नांवाचा राजा बरोबर पुरोहित व भार्या घेऊन सहज फिरत फिरत तेथें आला. तेथें आल्यावर त्याची दृष्टि सहज त्या ऋषि-पुत्रावर गेली, म्हणून तो त्याच्याजवळ आला. त्याचें तें दिव्य तेज व तारुण्यसहज रूपसौंदर्य पाहून त्याला भारी आनंद झाला. तेव्हां तो निज-लेला युवक कोण, कोठला वगैरे विचारपूस करण्याच्या हेतूनें त्यानें त्यास इलवून जागें केलें. तो उठल्यावर त्यास राजानें प्रश्न केल्यावरून, तो युवक म्हणाला राजन्, मी ऋषिपुत्र आहे. माझा बाप दीर्घतमा असून मी अंगिरस कुलांतला आहे. त्याचें हें भाषण ऐकून, राजानें त्यास घरीं नेलें व आपली उपवर कन्या होती, ती त्याला लग्न करून दिली.

कक्षीवान हा पहिल्या मंडळांतील ११६ ते १२६ सूक्तांचा द्रष्टा ऋषि आहे. इंद्रानें त्याच्या स्तुतीला प्रसन्न होऊन त्याला वृचया नामक तरुणी मिळवून दिली ( ‘अददा अर्भां महते वचस्यवे कक्षीवते वृचयामिन्द्र सुन्वते’ १-५१-१३ ). तो श्रुतिरथ व प्रियरथ या राजांचा पुरोहित असून त्यानें मित्रावरुणांची त्या राजांच्या घरीं येण्यास प्रार्थना केली आहे. ( ‘श्रुतिरथे प्रियरथे दधानाः सद्यः पुष्टिं निरुन्धानासो अग्मन्’ १-१२२-७ ). त्याच-प्रमाणें तो सिंधु तीरावर राज्य करणाऱ्या भावयव्य राजाचाहि पुरोहित होता. कारण त्याच्याकडून त्यानें सहस्र यज्ञ करविले ( अमन्दान्स्तोमान् प्र भरे मनीषा सिन्धावधि क्षियतो भाव्यस्य’ १-१२६-१). भाव्य राजाकडून त्यानें पौरोहित्य करून पुष्कळ संपत्ति मिळविली. म्हणजे शंभर निष्क,

शंभर घोडे, दहा रथ, साठ हजार गायी व इतर हजारो प्रकारच्या देणग्या भाव्य राजाकडून त्यानें मिळविल्या ( शतं राज्ञो नाधमानस्य निष्काञ् छतमश्वान् प्रयतान् तसद्य आदम् ॥ १-१२६-२ ॥; उप मा श्यावाः स्वनयेन दत्ता वधूमन्तो दश रथासो अस्थुः। षष्टिः सहस्रमनु गव्यमागात् ॥ १-१२६-३) भावयव्याकडून त्यास ही जी इतकी संपत्ति मिळाली त्याला आणखी एक कारण असून तें म्हणजे तो त्याचा नातजांवई होता. या भावयव्य राजाचा मुलगा स्वनय हा असून, याची मुलगीच या कक्षीवानाला दिली होती, हा कथाभाग वर आलाच आहे. असो. हा पुढें म्हातारा होऊन फार थकला असतां त्यानें त्यावेळीं अश्वींची प्रार्थना केली. तेव्हां ते प्रसन्न करून त्याला पुनः नवजवान केलें ( 'कक्षीवन्तं यदी पुना रथं न कृणुथो नवम्' १०-१४३-१ ). दीर्घतमा हा याचा बाप, उशिज याची आई, वृचया याची बायको आणि घोषा ही त्याची मुलगी. याची वंशावळ

- प्रजापति वरुण
  - अंगिरस (बृ. दे. ५-९९)
    - बृहस्पति (१०-७१)
      - भरद्वाज (६-१)
        - पायु ६-७५
        - गर्ग ६-४७
        - शनहोत्र ६-१३
          - गृत्समद २-१
        - सुहोत्र ६-३१
          - अजमीळह ४-४३
      - शम्यु
      - रोमशा (कन्या)
    - उचथ्य ९-५१
      - दीर्घतमस १-१४०
        - कक्षीवान १-११६
          - घोषा (१०-३९)
            - सुहस्त्य १०-४१
    - शश्वती (कन्या)

याविषयीं बृहद्देवतेंत उल्लेख आढळतो तो असाः—

‘ अंग देशसमीपे तु तं नद्यः समुदक्षिपन् ।
अंगराजगृहे युक्तां उशिजं पुत्रकाम्यया ॥ ४-२४ ॥
राज्ञा च प्रहितां दासीं भक्तां मत्वा महातपाः
जनयामास चोत्थाय कक्षीवत्प्रमुखानृषीन् ’ ॥ ४-२५ ॥

या उल्लेखावरून कक्षीवान् हा उशिजेचा पुत्र ठरतो; म्हणून त्यास ऋग्वेदांत ‘औशिजः’ असें म्हटलें आहे. हा दीर्घतमाजवळ राहूनच वाढला.

‘ अधिगम्य गुरोर्विद्यां गच्छन्स्वनिलयं किल ।
कक्षीवानध्वनि श्रान्तः सुष्वापारण्यगोचरः ॥ ४-१४२ ॥
तं राजा स्वनयो नाम भावयव्यसुतो व्रजन् ।
क्रीडार्थं सानुगोऽपश्यत् सभार्यः सपुरोहितः ॥ ४-१४३ ॥
अथैनं रूपसंपन्नं दृष्ट्वा देवसुतोपम् ।
कन्यादाने मतिं चक्रे वर्णगोत्राविरोधतः ॥ ४-१४४ ॥
संबोध्यैनं स पप्रच्छ वर्णगोत्रादिकं ततः ।
राजन्नांगिरसोऽस्मीति कुमारः प्रत्युवाच तम् ॥ ४-१४५ ॥
पुत्रोऽहं दीर्घतमस औचथ्यस्य ऋषेर्नृप ।
अथास्मै स ददौ कन्यां दशाभरणभूषिताम् ॥ ४-१४६ बृहद्देवता ४-१४२ ते १४६ ).

---

४ **कण्वः**—कण्व हा आंगिरस कुलोत्पन्न असून तो घोर ऋषीचा पुत्र आहे. त्याचा भाऊ प्रगात हा होय. हे दोघे बंधु विद्याध्ययन संपविल्यावर लग्न करून वनांत आश्रम थाटून रहात होते. तेथें असतां एके दिवशीं प्रगाथ हा कण्वाच्या पत्नीच्या मांडीवर आपलें मस्तक ठेवून झोंपल्या वेळीं कण्व तेथें आला. तो चमत्कारिक प्रकार पाहून त्याच्या मनांत पापशंका उद्भवून त्यानें त्यास लाथ मारून जागें करून त्याजकडे क्रोधमुद्रेनें पाहूं लागला.

तेव्हां प्रगाथानें त्याच्या मनांतील भाव जाणून हा आपणास शाप देण्यास उद्युक्त झाला आहे असें पाहून, दोन्ही हात जोडून त्यास म्हणाला कीं– हे बंधो ! ही आपली पत्नी माझी माता आहे व आपण माझे बाप आहां. या भाषणानें कण्वाचा संशय मिटून त्याचा राग शांत झाला. हा प्रसंग बृहद्देवतेंत वर्णिला आहे. तो असा—'कण्वश्चैव प्रगाथश्च घोरपुत्रौ बभूवतुः । गुरुणा तावनुज्ञातान् उषतुः सहितौ वने ॥ ६-३५ ॥ वसतोस्तु तयोस्तत्र कण्वपत्न्याः शिरः स्वपत् । कृत्वा कनीयान्कण्वस्य उत्सङ्गे नान्व बुध्यत ॥६-३६॥ शप्तुकामस्तु तं कण्वः क्रुद्धः पापाभिशङ्कया । बोधयामास पादेन दिधक्षन्निव तेजसा ॥ ६-३७ ॥ विदित्वा तस्य तं भावं प्रगाथः प्राञ्जलिः स्थितः । मातृत्वे च पितृत्वेच्च वरयामास तावुभौ ॥ ६-३८ ॥

ऋग्वेदांत एके ठिकाणीं त्यास नृषदाचा पुत्र म्हटलें आहे ( 'उत कण्वं नृषदः पुत्रमाहुः' १०-३१-११ ) व बृहद्देवतेंत त्यास घोरपुत्र म्हटलें आहे. असो. कण्व हा रंगानें काळा होता ( 'उत श्यावो' १०-३१-११) पण अग्नीनें प्रसन्न होऊन त्यास तेजस्वी रूप प्राप्त करून दिलें ( 'प्र कृष्णाय रुशदपिन्वत' १०-३१-११ ). तो अग्नीचा महान उपासक असल्यामुळें अग्नीची त्याजवर खूपच मर्जी होती आणि म्हणून त्यानें त्यास वीर्यशाली संतति दिली ( 'अग्निर्वव्ने सुवीर्यम्' १-३६-१७ ) आणि त्याप्रमाणेंच उत्तम संपत्तिही दिली ( 'अग्निः कण्वाय सौभगम्' (वव्ने) १०-३६-१७). तो पहिल्या मंडळांतील ३६ ते ४३ या सूक्तांचा द्रष्टा असून, तो यदु-तुर्वशांचा पुरोहित म्हणून प्रसिद्ध आहे.

या कण्वावर एकदां असा प्रसंग आला होता कीं तो खरोखर प्राणावरच बेतला होता. तो प्रसंग म्हणजे असाः—कण्वाच्या ब्राह्मणत्वाची सत्त्व-परीक्षा करावी म्हणून असुरांनीं त्याला पकडून एका गाढ अंधःकार गुहेंत डांबून ठेवून त्यास म्हटलें कीं, कण्वा ! जर तूं खरा ब्राह्मण असशील, तर उषःकाल केव्हां होतो तो आम्हांस ओळखून सांग. नाहींतर तूं इथेंच अखेरपर्यंत खिचपत पडशील. आम्ही तुझी येथून मुक्तता करणार नाहीं. बिचारा कण्व ! अडकून पडला त्या अंधारकोठडींत । याला कांहीं दिवस गेले. पण त्यांतून मुक्त होण्याचा मार्ग कांहीं त्याला दिसेना.

याप्रमाणें तो चिंतेंत पडला असतां, त्याला सुदैवानें अश्वीदेवांची आठवण झाली. करतील तर अश्वीदेवच मला यांतून मुक्त करतील असा त्याला विश्वास वाटून, त्यानें अनन्यगतिक होऊन अश्वीदेवांचा भक्तिपूर्वक धांवा केला. तो धांवा ऐकून अश्वीदेव प्रसन्न होऊन त्याच्याजवळ आले. तेव्हां त्यांना पाहून तो म्हणाला--देवहो ! काय सांगूं माझें संकट ! असुरांनीं मला इथें सक्तीनें डांबून ठेविलें आहे अन् अशी अट घातली आहे कीं उषःकाल केव्हां होतो हें बरोबर सांगशील तर आम्ही तुला यांतून मुक्त करूं. तर आपल्याला माझी अशी प्रार्थना आहे कीं आपण कांहीं तरी उपाय सुचवून मला या बंधनांतून सोडवावें.

कण्वाची ही दीन स्थिति पाहून व त्याची हकीकत ऐकुन त्या देवांना त्याची दया आली व ते त्यास म्हणाले, कण्वा ! आम्ही तुला एक युक्ति सुचवितों. तसें कर म्हणजे तुझी सुटका होईल. उषःकाल होतांच आम्ही येथें वीणा वाजवीत येतों. तो नाद ऐकून तूं असुरांस उषःकाल झाला असें सांग, म्हणजे तूं बंधमुक्त होशील. पुढें उषःकाल होतांच अश्वी देव तेथें वीणा वाजवीत आले. तो वीणारव ऐकून कण्वानें असुरांस हाक मारून उषःकाल झाल्याची त्यांस खबर दिली. पुढें त्यांतून वचनाप्रमाणें असुरांनीं त्यास मुक्त करून सोडून दिलें आणि डोळे असूनहि दृष्टि गेलेल्या कण्वाला अश्वीच्या कृपेनें पुनः दृष्टि आली. ('महः क्षोणस्याश्विना कण्वाय,' १-११७-८ ).

**वंशावळ**



**५ गृत्समदः**—गृत्समद हा शुनहोत्राचा मुलगा. तो अंगिरस गोत्रांतील होता. पुढें तो भार्गव वीतहव्यानें दत्तक घेतला म्हणून तो भृगुकुलांत गेला. त्यानें जातवेद अग्नीची उपासना केली म्हणून अग्नीनें त्याला दिव्य कांति दिली. ती इतकी कीं तो पुढें इंद्राप्रमाणें तेजस्वी दिसूं लागला. धुनि व चुमुरि या दोन दैत्यांना त्याला पाहून तो इंद्रच आहे असें वाटलें व त्यांनीं त्याला शत्रु समजून त्याच्यावर चालून आले. हे राक्षस आपणावर हल्ला करून आपणास मारणार हें त्या गृत्समदानें अंतर्दृष्टीनें ओळखिलें तेव्हां त्यानें इंद्राचें स्तुतिस्तोत्र गाऊन त्याचा धांवा केला. इंद्र त्या स्तोत्रानें प्रसन्न होऊन, त्याच्या संरक्षणार्थ धांवून आला व त्या दैत्यांचें पारिपत्य करून त्यांस रणांत धूळ चारली. त्यानें त्या वेळीं इंद्राचा जो धांवा केला तो ऋग्वेदांत दुसऱ्या मंडळांतील बाराव्या सूक्तांत 'यो जात एव' या मंत्रानें प्रारंभ केला असून तें सबंध सूक्त अत्यंत सुंदर व मननीय आहे. तो ऋग्वेदांतील दुसऱ्या मंडळांतील ८ ते २६ सूक्तांचा ऋषि आहे.

याची कथा बृहद्देवतेंत आढळते ती अशीः—

> अस्तौत् गृत्समदोऽग्निं त्वं जातवेदस्यमाप्रियः ।
> यज्ञेनाथ समिद्धोग्निरतोऽग्निं सप्तभिर्हुवे ॥ ६५ ॥
> संपूज्य तपसाऽऽत्मानं ऐन्द्रं बिभ्रन्महद्वपुः ।
> अदृश्यत मुहूर्तेन दिवि च व्योम्नि चेह च ॥ ६६ ॥
> तमिन्द्रामिति मत्वा तु दैत्यौ भीमपराक्रमौ ।
> धुनिश्च चुमुरिश्चोभौ सायुधावभिपेततुः ॥ ६७ ॥
> विदित्वा तु तयोर्भावं ऋषिः पापं चिकीर्षतोः ।
> यो जात इति सूक्तेन कर्माण्यैन्द्राण्यकीर्तयत् ॥ ६८ ॥
> उक्तेषु कर्मस्वैन्द्रेषु भीस्तावाशु विवेश ह ।
> इदमन्तरमित्युक्त्वा ताविन्द्रस्तु निबर्हयत ॥ ६९ ॥

**निहत्य तौ गृहत्समम‍ृषिं शक्रोऽभ्यभाषत ।**
**यथेष्टं मां सखे पश्य प्रियत्वं ह्यागतोऽसि मे ॥ ७० ॥**

अ ४, ६५-७०

---

६ **गोतम**—गोतम हा रहू गणाचा पुत्र असून तो पहिल्या मंडळांतील ७४ ते ९६ सूक्तांचा द्रष्टा ऋषि आहे. तो प्रसिद्ध वामदेव ऋषीचा बाप असून त्याच्यापासूनच वामदेवास 'कृणुष्व पाजः' हें प्रसिद्ध रक्षोघ्न अग्नि स्तोत्र प्राप्त झालें ('महो रुजामि बन्धुता वचोभिस्तन्मा पितुर्गोतमादन्वियाय' ४-४-११ ). गोतमाला एकदा तृषा लागून त्याचा जीव तहानेनें फार व्याकुळ झाला. प्रदेश आजूबाजूचा सगळा निर्जल असल्यानें तो पुष्कळ फिर फिर फिरला. पण कोठेंच पाणी आढळेना. जीव फिरून फिरून फार हैराण झाला. पुढें याप्रमाणें पाण्यासाठीं फिरत असतां त्याला सुदैवानें एक विहीर आढळली. ती पाहून त्याला फार आनंद झाला. पण काय ? आंत डोकावून पाहतो तो पाणी खोल पाताळांत गेलेलें ! डोळ्याला दिसे पण हाताला लागेना ! त्या पाण्याकडे पहा पहा पाहून डोळे ताठरले पण तहानेनें घसा सुकून कोरडा ठणठणीत झाला ! जीभ सगळी वाळून गेली ! अशा आर्त स्थितींत किंकर्तव्यमूढ होऊन तो विचार करीत असतां त्यास मरुतांची आठवण झाली. तत्क्षणीं त्यानें मरुतांचा धांवा केला. मरुत् प्रसन्न होऊन तेथें आले व त्याची प्रार्थना ऐकून त्यांनीं तें विहिरींतील पाणी आपल्या अद्भुत शक्तीनें वर आणून तें वाहतें करून त्याची तहान शांत केली. ही गोष्ट या पुढील सूक्तांत निर्दिष्ट करण्यांत आली आहे. ('जिम्हं नुनुद्रेऽवतं तया दिशासिञ्चन्नुत्सं गोतमाय तृष्णजे' १-८५-११ ॥) हाच मजकूर पुनः या पुढील सूक्तांतहि आढळतो. 'ब्रह्म कृण्वन्तो गोतमासो अर्कैरूर्ध्वं नुनुद्र उत्सधिं पिबध्यै ॥' १-८८-४ ॥. शिवाय अश्वी देवांची प्रार्थना करून त्यानें त्यांच्याकडून अनेक प्रकारची अलोट संपत्ति प्राप्त करून घेतली. हा सप्तर्षींपैकीं एक ऋषि आहे.




---

७ **जमदग्निः**—जमदग्नि हा भृगुकुलोत्पन्न असून, तो ९-६२ व ६५ या सूक्तांचा व तसाच १०-११० या सूक्तांचा द्रष्टा आहे. त्यानें विश्वामित्राला सर्सपरी नांवाची दिव्य वाणी देऊन त्याचें अज्ञान नाहीसें केलें. याचा थोडक्यांत इतिहास म्हणजे असा आहे कीं, सौदास राजाच्या यज्ञांत वसिष्ठाच्या शक्ति नांवाच्या मुलानें वादविवादांत विश्वामित्राचा पराभव करून त्यास तेथून हांकून लावलें. तेव्हां त्यानें जमदग्नीजवळ जाऊन आपणास दिव्य वाणी देण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. तेव्हां त्यानें विश्वामित्राचें अज्ञान नाहींसें करणारी अशी सूर्य कन्या सर्सपरी नांवाची दिव्य वाणी त्यास दिली ( 'सर्सपरीरमतिं बाधमाना बृहन्मिमाय जमदग्निदत्ता' ३-५३-१५ ). तेव्हांपासून विश्वामित्र पुनः ज्ञानसंपन्न झाला. जमदग्नीचें व विश्वामित्राचें सख्य असावें असें १०-१२७ व्या सूक्तावरून दिसतें. कारण ते दोघे त्या सूक्ताचे द्रष्टे आहेत. परशुराम हा या जमदग्नीचाच मुलगा आहे. विश्वामित्राची नात रेणुका —रेणूची मुलगी—ही या जमदग्नीची बायको व परशुरामाची आई होय.




**८ वामदेवः**—वामदेव हा गोतम ऋषीचा मुलगा. तो चवथ्या मंडळाचा सूक्तद्रष्टा आहे. त्याची सांगण्यासारखी महत्त्वाची गोष्ट अशी कीं त्यास गर्भांत असतांनाच आत्मज्ञान झालें होतें ! ही पुढील ऋचा त्यानें गर्भांत असतांनाच म्हटली ( 'गर्भे नु सन्नन्वेषामवेदमहं देवानां जनिमानि विश्वा' ४-२७-१ ). तो सामान्य मनुष्याप्रमाणें नैसर्गिक मार्गानें जन्मास न येतां आपल्या पूर्वार्जित योगसामर्थ्यानें श्येनाचें रूप धारण करून आईच्या पोटांतून बाहेर आला, अशी आख्यायिका आहे.

**९ दीर्घतमस्ः**—दीर्घतमस् हा एक मोठा ऋषी असून, त्याचें चरित्रहि तितकेंच मोठें विचित्र आहे. अंगिरस ऋषीला बृहस्पति व उचथ्य असे दोन मुलगे होते. त्यांत बृहस्पति हा मोठा व उचथ्य हा लहान होता. उचथ्य हा मोठा झाल्यावर त्याचें ममता नांवाच्या स्त्रीशीं लग्न झालें. पुढें तीं नवराबायको संसार करीत असतां, एके दिवशीं बृहस्पति हा

आपल्या धाकट्या भावाच्या म्हणजे उचथ्याच्या घरीं आला असतां त्याचें लक्ष सहज आपल्या भावजयीकडे गेलें. तिला पाहून त्याचें मन चंचल होऊन त्यानें तिला एकांतांत बोलाविली. तेव्हां ती त्याचेकडे गेली. दोघांचें प्रेमरहस्य चाललें असतां रेतोत्सर्गाची वेळ आली. त्यावेळीं ममता ही गरोदर होती. बृहस्पति हा शुक्रोत्सर्ग करणार, इतक्यांत आंतील गर्भ त्यास म्हणाला कीं मी इथें अगोदरच गर्भ होऊन राहिलों असल्यानें आपण आतां येथें रेतसिंचन करून शुक्रसंकर करूं नये. पोटांतील गर्भाचें तें भाषण ऐकून बृहस्पतीचा ऐन वेळीं विरस झाला व त्यामुळें तो रागावून त्या गर्भाला म्हणाला कीं तूं जन्मतःच अंधळा होशील.

पुढें ममता ही दिवस भरल्यावर योग्य वेळीं बाळंत झाली. पण जें मूल झालें तें आंधळें निघालें. म्हणून त्याला दीर्घतमस् असें नांव ठेवण्यांत आलें. पण गम्मत ही कीं गर्भांत असतांनाच त्याला सकल वेदविद्या अवगत झाली होती. पुढें तो दीर्घतमस् मोठा झाल्यावर अग्नीची त्यानें प्रार्थना केली व त्या प्रार्थनेनें प्रसन्न होऊन अग्निनारायणानें त्यास सुंदर दृष्टी दिली ! हा मजकूर 'ये पायवो मामतेयं ते अग्ने पश्यन्तो अन्धं दुरितादरक्षन्' ( ऋ. ४-४-१३ ) या ऋग्वेदाच्या ऋचाथांत तात्पर्यरूपानें आला आहे. बाकीचा वरचा इतिहास बृहद्देवतेंत आला असून तो आम्हीं खालीं जसाच्या तसा दिला आहे.

पुढें दीर्घतमस् हा डोळस झाल्यावर प्रद्वेषी नांवाच्या कन्येशीं विवाह करून तिच्याशीं सुखानें संसार करूं लागला व त्या संसारांत त्याला मुलें-बाळेंहि झालीं. हा चांगला वेदविद्यापारंगत असल्यामुळें पुढें तो भरत दौष्यंतीचा पुरोहित बनून, त्यानें त्या राजास ऐंद्र महाभिषेक नांवाचा एक राज्याभिषेक केला. अर्थात् त्या वेळीं त्याच्याकडून अश्वमेध यज्ञहि करविण्यांत आला. असा दाखला ऐतरेय ब्राह्मणांत सांपडतो ( 'एतेन ह वाऽऐन्द्रेण महाभिषेकेण दीर्घतममामतेयो भरतं दौष्यन्तिमभिषिषेच' ऐ. ब्रा. ८-२३ ).

याप्रमाणें संसार सुखाचा चालला असतां कालगतीस अनसरून दीर्घतमास वृद्धापकाल आला व त्या वेळीं त्याची सेवाचाकरी करण्यास म्हणून

कांहीं चाकरमाणसें त्याच्या दिमतीस ठेवण्यांत आलीं. हीं माणसें त्याची रात्रंदिवस सेवा करतां करतां फार कंटाळलीं, त्रासलीं व वैतागलीं. पुढें त्यांना दुर्बुद्धि उत्पन्न होऊन त्यांनीं त्याला अग्नि पेटवून त्या खाईंत फेंकून दिलें; पण दीर्घतमानें त्या प्रसंगीं अश्वींचा धांवा केल्यावरून त्यांनीं त्याला त्या अग्नींतून बाहेर काढून वांचविलें ( 'मा मामेधो दशतयश्चितो धाक्' १-१५८-४). अग्नींत घातला तरी म्हातारा मरत नाहीं हें पाहून, ते सेवक अधिकच चिडले व त्याच्या मुसक्या बांधून त्यास नदींत लोटून दिलें, तेथेंहि अश्वींनीं त्याचें रक्षण केलें ('न मा गरन्नद्यो मातृतमा' १-१५८-५).

अग्नींत टाकला तरी जळत नाहीं व पाण्यांत फेंकला तरी बुडत नाहीं, हें पाहून त्या लोकांचें डोकें अधिकच भडकलें व त्यांच्यांत त्रैतन नांवाचा एक दुष्ट व द्वाड दास होता; त्यानें हातांत शस्त्र घेऊन त्या दीर्घतमास ठार मारावयास म्हणून त्याच्यावर धांवून जाऊन त्या शस्त्रानें त्याच्यावर प्रहार केला;पण अश्वींच्या कृपेनें तो वार चुकून, उलट अशी गम्मत झाली कीं तो वार त्या त्रैतनाच्या शिरावर, खांद्यावर व पोटावर पडून त्याचें डोकें व बाहू तुटून व पोट फाटून तो जेथल्या तेथें गतप्राण होऊन पडला! ( शिरो यदस्य त्रैतनो वितक्षत्स्वयं दास उरो अंसावपि ग्ध' १-१५८-५ ) याप्रमाणें तो दीर्घतमा त्या प्राणसंकटांतून अश्वींच्या कृपेनें तिसऱ्यांदा सुरक्षित वांचून बाहेर पडला !

पुढें तो नदींत स्नान करावयास गेला असतां पाय घसरून नदी प्रवाहांत सांपडून त्या प्रवाहाबरोबर वाहत चालला. याप्रमाणें वाहत जातां जातां अंगदेशांत एका कांठाला जाऊन लागला. तेथून पुढें तो अंगराजाच्या घरीं गेल्यावर त्या राजानें त्याचा आदरसत्कार करून, त्यास आपल्या घरीं ठेवून घेतलें. त्यावेळीं राजाला पुत्रसंतति नव्हती, म्हणून त्यानें उशिज् नांवाच्या आपल्या एका दासीला त्याजकडे पाठविलें; तेव्हां दीर्घतमानें तिच्याशीं रममाण होऊन तिच्या ठायीं गर्भ उत्पन्न केला. तोच पुढें कक्षीवान् या नांवानें प्रसिद्धीस आला. याची हकीगत मागें आलीच आहे. ( बृहद्देवता, ४, २१-२५ ). या दीर्घतमाच्या नांवावर पहिल्या

मंडळांतील १४० ते १६४ ऋचा मोडतात. अर्थात् या चोवीस ऋचांचा जो ऋषि असून, त्यांतील १६४ वी ऋचा फार महत्त्वाची आहे.

बृहद्देवतेंत या दीर्घतमाचें समग्र चरित्र पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहे—

द्वावुचथ्यबृहस्पती ऋषिपुत्रौ बभूवतुः
आसीदुचथ्यभार्या तु ममता नाम भार्गवी ॥ ४-११ ॥
तां कनीयान्बृहस्पतिर्मैथुनायोपचक्रमे ।
शुक्रस्योत्सर्गकाले तु गर्भस्तं प्रत्यभाषत ॥ ४-१२ ॥
इहास्मि पूर्वसंभूतो न कार्यः शुक्रसंकरः ।
तच्छुक्रप्रतिषेधं तु न ममर्ष बृहस्पतिः ॥ ४-१३ ॥
स व्याजहार तं गर्भं तमस्ते दीर्घमस्त्विति ।
स च दीर्घतमा नाम बभूवर्षिरुचथ्यजः ॥ ४-१४ ॥
स जातोऽभ्यतपद्देवान् अकस्मादन्धतां गतः ।
ददुर्देवास्तु तन्नेत्रे ततोऽनन्धो बभूव सः ॥ ४-१५ ॥
जीर्णं तु दीर्घतमसं खिन्नास्तत्परिचारिणः ।
दासा बद्ध्वा नदीतोये दृष्टिहीनमवादधुः ॥ ४-२१ ॥
तत्रैकस्त्रैतेनो नाम शस्त्रेणैनमपाहनत् ।
शिरश्चांसावुरश्चैव स्वयवमेव न्यकृतन्त ॥ ४-२२ ॥
हत्वा दीर्घतमास्तं तु पापेन महतावृतम् ।
आत्माङ्गान्यनुदच्चैव तत्रौदोन्मोहितो भृशम् ॥ ४-२३ ॥
अङ्गदेशसमीपे तु तं नद्यः समुदक्षिपन् ।
अङ्गराज गृहे युक्तां उशिजं पुत्रकाम्यया ॥ ४-२४ ॥
राज्ञा च प्रहितां दासीं भक्तां मत्वा महातपाः ।
जनयामास चोतथाय कक्षीवत्प्रमुखानृषीन् । ४-२५ ॥

**वंशावळ**

प्रजापतिवरुण=वाक्




---

१० देवापि:—देवापि हा कुरुकुलोद्भव राजपुत्र असून, सुप्रसिद्ध दिलीप राजाचा नातु व प्रतीप राजाचा मुलगा होय. तो शंतनूचा वडील भाऊ असून, युवराजाचा मान त्याच्याच होता. (वायु ३७, २२९ ते २३३) पण दुर्दैवाची गोष्ट म्हणजे ही कीं तो कुष्टरोगानें पछाडला होता. अर्थात् राजपदास तो अपात्र होता. तथापि तो स्वभावानें सात्विक, मनानें उदार, व बुद्धीनें तीक्ष्ण असून एकंदर त्याचा रोख त्यागवृत्तीकडे असे. आपण राजपदास पात्र नाहीं हें जेव्हां त्यास कळून चुकलें, तेव्हां तो गृहत्याग करून तपश्चर्येसाठीं म्हणून ऋष्टिषेण ऋषीजवळ जाऊन राहिला. याचा अर्थ असा कीं तो त्या ऋषीचा शिष्य झाला. शिष्याला पुत्र म्हणण्याचा वैदिक परिपाठ आहे. त्याला अनुसरून तो कौरव्य देवापि पुढें आर्ष्टिषेण देवापि म्हणून प्रसिद्ध झाला.

पुढें कांहीं कालानें राजा प्रतीप हा वारला. तेव्हां शंतनु व प्रजाजन त्याच्याजवळ येऊन राज्यपद स्वीकारण्याविषयीं त्यास विनवूं लागले. तेव्हां 'मी राज्यास योग्य नाहीं, अतएव शंतनूस गादीवर बसवावें' असें सांगून, त्यानें त्यास परत लावून दिलें. पुढें शंतनु हा गादीवर बसला. हा मजकूर बृहद्देवतेंत आढळतो तो असा—'आर्ष्टिषेणस्तु देवापिः कौरव्यश्च शंतनुः। भ्रातरौ कुरुषु त्वेतौ राजपुत्रौ बभूवतुः ॥ १५५ ज्येष्ठस्तयोस्तु देवापिः कनीयांश्चैव शंतनुः। त्वग्दोषी राजपुत्रस्तु ऋष्टिषेणसुतोऽभवत् ॥ १५६ ॥ राज्येन छन्दयामासुः प्रजाः स्वर्गं गतौ गुरौ। समुहूर्तमिव ध्यात्वा प्रजास्ताः प्रत्यभाषत ॥ ७-१५७ ॥ न राज्यमहमर्हामि नृपतिर्वोऽस्तु शंतनुः। तथेत्युक्त्वाऽभ्यसिञ्चंस्ताः प्रजा राज्याय शंतनुम् ॥ ८-१ ॥'

देवापीच्या सांगण्याप्रमाणें शंतनु गादीवर बसला. पण पुढें चमत्कार असा झाला कीं बारा वर्षेपर्यंत त्याच्या राज्यांत पावसानें खूप गैरमर्जी केली! देशांत भयंकर दुष्काळ माजला! ना खायला अन्न ना प्यायला पाणी! लोक अगदीं हवालदील झाले! आणि यमाची चंगळ चालली! प्रजेची ही दुर्दशा पाहून शंतनु मनांत फार घाबरला व याला पुढें उपाय काय म्हणून त्यानें ब्राह्मणांस जाऊन विचारलें. त्यांनीं सांगितलें कीं राजा! तूं देवापीला वगळून राज्यावर बसलास, हा अन्याय झाला. त्याचा हा परिणाम आहे. तर पुनः आतां त्याच्याकडे जा व त्याला राज्यावर घेऊन ये, म्हणजे पाऊस पडेल आणि ही आपत्ति टळेल! या भाषणानें शंतनूला जरासें हायसें वाटलें व तो पुनः आपल्या प्रजाजनांसह देवापीकडे गेला. व तेथें गेल्यावर त्याला सोडून आपण राज्यपद स्वीकारलें ही कर्तव्यच्युति झाली याबद्दल त्याची क्षमा मागून राज्यपद स्वीकारण्याबद्दल पुनः त्याची विनवणी केली. हा मजकूर बृहद्देवतेंत आला आहे तो असाः—

**'ततोऽभिषिक्ते कौरव्ये वनं देवापिराविशत्।**
**न ववर्षाथ पर्जन्यो राज्ये द्वादश वै समाः ॥ ८-२ ॥**
**ततोऽभ्यगच्छद्देवापिं प्रजाभिः सह शन्तनुः।**
**प्रसादयामास चैनं तस्मिन्धर्मे व्यतिक्रमे ॥ ८-३ ॥**
**शिशिक्ष चैनं राज्येन प्रजाभिः सहितस्तदा' ॥ ८-३ ॥**

शंतनूची ही विनंति ऐकून देवापि शांतपणें म्हणाला, 'शंतनो ! राज्याला मी अर्ह नाहीं ! कुष्ठ रोगासारख्या महारोगानें मी पीडित आहें. माझ्यामुळें तुझ्या राज्यांत पाऊस पडला नाहीं, असा तुझा व लोकांचा समज झाला आहे, तर ती आपत्ति मी दूर करतों. आतां तूं असें कर. पाऊस पडण्यासाठीं म्हणून वृष्टिकामेष्टि यज्ञाचें अनुष्ठान कर. त्यांत मी स्वत: तुझें पौरोहित्य स्वीकारतों. हें अनुष्ठान पूर्ण झालें म्हणजे खात्रीनें पाऊस पडेल आणि राज्यांत जिकडे तिकडे सुबत्ता नांदेल ! ही गोष्ट सर्वांना पटली आणि ते सर्व लोक देवापीसह राजधानींत आले. तेथें आल्यावर शंतनूनें यथासांग वृष्टिकामेष्टि केली व देवापीनें पौरोहित्य पत्करून तें कार्य निर्विघ्न व यथाविधि पार पाडलें. याविषयीं बृहद्देवता सांगते ती अशी—'तमुवाचाऽथ देवापि: प्रव्हं प्राञ्जलिस्थितम् ॥ ८-४ ॥ न राज्यमहमर्हामि त्वग्दोषोपहतेन्द्रियः । याजयिष्यामि ते राजन् वृष्टिकामेज्यया स्वयम् ॥ ८-५ ॥ ततस्तं तु पुरोऽधत्त आर्त्विज्याय स शंतनु: । स चास्य चक्रे कर्माणि वार्षिकाणि यथाविधि ॥८-६॥

याप्रमाणें वृष्टिकामेष्टि समाप्त झाल्यावर राज्यांत सर्वत्र पाऊस पडला ! हा मजकूर अगदीं संक्षेपत: ऋग्वेदांत दहाव्या मंडळांत ९८ व्या सूक्तांत आला आहे. त्याची त्रोटक माहिती येथें देतों. शंतनु राजाच्या यज्ञांत हौत्राचा पुरोहित म्हणून आर्ष्टिषेण देवापि हा नेमस्त केला गेला होता. ( यत् देवापि: शन्तनवे पुरोहितो होत्राय वृत:' १०-९८-७ ) त्याप्रमाणें देवापीनें होतृकर्माचा कार्यभाग स्वीकारला. कारण देवांना कसें प्रसन्न करावें ही कला त्यास उत्कृष्ट अवगत होती ( 'आर्ष्टिषेणो होत्रमृषिर्निषीदन् देवापिर्देवसुमतिं चिकित्वान्' १०-९८-५ ). त्यानें बृहस्पतीची प्रार्थना केली कीं, हे बृहस्पति देवा ! तूं आम्हाकडे पर्जन्य देवतेला पाठव! केव्हां मित्र म्हणून तर केव्हां वरूण म्हणून, आणि केव्हां पूषा म्हणून तूं प्रसिद्ध आहेस. तर मरुतांनीं परिवेष्टित असा तूं आदित्य व वसु यांसह प्रसन्न होऊन आमच्या शंतनु राजासाठीं जोरानें पर्जन्यवृष्टी कर ! (' बृहस्पते प्रति मे देवतामिहि मित्रो वा यद्वरुणो वासि पूषा । आदित्यैर्वा यद्वसुभिर्मरुत्वान् स पर्जन्यं शन्तनवे वृषाय ॥ १०-९८-१ ) हे बृहस्पते ! तुझी उज्वल पवित्र वाणी निरंतर आमच्या मुखांत राहूं दे ! ती वाणी

फक्त रोगनाशकच नव्हे तर अत्यंत उत्साहवर्धकहि आहे. तिच्या प्रभावानें शंतनु राजासाठीं आम्ही उभयतांनीं मिळून पर्जन्यवृष्टि घडवून आणण्यासाठीं आकांक्षा धरली आहे. तर पावसाचे मधुर व टपोरे थेंब आकाशांतून पाझरून खालीं पृथ्वीमध्यें प्रविष्ट होवोत ! ( 'अस्मे धेहि द्युमतीं वाचमासन् बृहस्पते अनमीवामिषिराम् । यया वृष्टिं शंतनवे वनाव दिवो द्रप्सो मधुमाँ आ विवेश' ॥ १०-९८-३ ॥ ) येथील समुद्रावर अंतरिक्षांतील जलमय भाग देवांनीं अडवून ठेवला होता. तेथील उदकें देवापीनें आपल्या स्तोत्राच्या योगानें मोकळीं केलीं, तेव्हां जोरानें पाऊस पडून पृथ्वीवर सगळें पाणीच पाणी झालें ! १०-९८-६ ) आणि राज्यांत सर्वत्र आनंदी आनंद झाला !



**११ नाभानेदिष्ठः**—नाभानेदिष्ठ हा मनूचा पुत्र ('मानव' १०-६२-१). तो दहाव्या मंडळांतील ६१ व ६२ या सूक्तांचा द्रष्टा आहे. याची हकीकत थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे. तो विद्या शिकण्यासाठीं म्हणून गुरुगृहीं राहिला असतां त्याच्या गैरहजेरींत त्याच्या तिघा भावांनीं आपापसांत पितृधनाची वाटणी करून घेतली. पुढें नाभानेदिष्ठ हा गुरुगृहांतून परत आल्यावर बापास आपल्या हिश्याविषयीं विचारूं लागला. तेव्हां बाप म्हणाला, 'मुला वांटणींतच काय मोठें आहे? तूं चांगला शिकलासवरला आहेस. कोठेंहि तुला संपत्ति मिळेल. आतां तुला ती पाहिजेच असेल, तर मी सांगतों तसें कर. नवग्व अंगिरस स्वर्गप्राप्तीसाठीं म्हणून यज्ञ करीत आहेत. त्या यज्ञांत सहा दिवस अनुष्ठान केल्यावर पुढें ते भ्रमिष्ठासारखे होतील. तेव्हां तूं तेथें जाऊन 'इदमित्था' (१०-६१) हें सूक्त म्हण. म्हणजे त्यांचें कार्य पुरें होऊन ते तुला एक हजार गोधन देतील. मग काय कमी तुला? संपत्तिच संपत्ति! जा आणि मीं सांगितलें आहे तसें कर!'

बापाच्या या सल्ल्यावरून तो नाभानेदिष्ठ तेथून निघाला आणि जेथें अंगिरसाचा यज्ञ चालला होता तेथें आला. बापानें सांगितल्याप्रमाणें सातव्या दिवशीं यज्ञांत गोंधळ माजला, तेव्हां नाभानेदिष्ठ पुढें होऊन 'इदमित्था' व 'ये यज्ञेनदक्षिणया' १०-६१ व ६२) हीं दोन सूक्तें म्हणून, तो यज्ञ त्यानें सफल केला. नाभानेदिष्ठाचें हें कौशल्य पाहून अंगिरस मोठे खूष झाले व त्यांनीं त्यास त्या कामगिरीबद्दल एक हजार गायी दान दिल्या!

नाभानेदिष्ठ त्या गायी घेऊन परत फिरतो न फिरतो तों इतक्यांत वास्तोष्पति रुद्र तेथें आला आणि म्हणाला कीं त्या गायी माझा भाग असल्यामुळें तूं घेऊन जाऊं नकोस. माझ्या पित्यानें मला त्या घ्यावयास सांगितलें आहे म्हणून मी घेणार असें नाभा म्हणाला. तेव्हां रुद्रानें त्यास वडिलास जाऊन पुनः विचार असें म्हटल्यावरून तो वडिलाकडे आला आणि त्यास घडलेली हकीगत सांगितली. तेव्हां बाप म्हणाला 'मुला तो भाग रुद्राचाच आहे. पुनः तो रुद्राजवळ येऊन बापानें सांगितल्याप्रमाणें त्यानें रुद्रास सांगितलें. तेव्हां रुद्र सत्य बोलल्याबद्दल संतुष्ट होऊन त्या गायी त्यास बक्षीस दिल्या ( ऐतरेय ब्राह्मण ५-१४ ).



---

१२ **भरद्वाजः**---भरद्वाज हा ऋग्वेदांतला एक महान् ऋषि व मोठा राजकारणी पुरोहित होय. तो देवगुरु बृहस्पतीचा पुत्र असून, प्रख्यात आंगिरस ऋषीचा नातू लागतो ('योऽङ्गारेभ्य ऋषिर्जज्ञे तस्य पुत्रो बृहस्पतिः । बृहस्पतेर्भरद्वाजो विदथीति यदुच्यते ।।' ( बृहद्देवता ५-१०२ ) तो सहाव्या मंडळाचा द्रष्टा ऋषि असून, सुविख्यात दिवोदास राजाचा तो पुरोहित होता. दिवोदासाचा व शंबरासुराचा जेव्हां युद्धप्रसंग आला तेव्हां त्यानें दिवोदासाचें पौरोहित्य पत्करून, त्याच्या मदतीला लढाईत इंद्रास आणून उभें केलें आणि त्या चकमकींत शम्बराचा फन्ना उडवून दिला, आणि त्या असुराची अलोट संपत्ति लूट म्हणून त्यास मिळवून दिली. या महदुपकाराबद्दल दिवोदासानें खुष होऊन त्यास दहा घोडे, दहा कोष, दहा महावस्त्रें, व दहा सुवर्णाचे गोळे.दान म्हणून दिलें ( 'दिवोदासादतिथिग्वस्य राधः शाम्बरं वसु प्रत्यग्रभीष्म ।। २२ ।।' दशाश्वान्दश कोशान्दश वस्त्राधिभोजना । दशो हिरण्यपिंडान्दिवोदासादसानिषम् ।। ऋ ६-४७-२२ व २३ ).

भरद्वाज हा अश्विनीभक्तहि होता. एका समयीं त्यास विपत्काल आला होता, त्यावेळीं त्यांनीं त्याचें रक्षण केलें ( 'याभिर्विप्रं प्र भरद्वाजमावतम्' ऋ. १-११२-१३ ) पुढें या भरद्वाजाच्या वशिल्यानेंच ते अश्विनी देव दिवोदासाच्या घरीं आले. त्यावेळीं त्यांनीं आपल्या रथांत भरून आणलेली संपत्ति त्या राजास प्रसन्न होऊन बहाल केली. ('यदायातं दिवोदासाय वर्तिर्भरद्वाजायाश्विना हयन्ता । रेवदुवाह सचनो रथो वां वृषभश्च शिंशुमारश्च युक्ता' ऋ. १-११६-१८ ) त्याच प्रमाणें इन्द्रानेंहि त्याला व भरद्वाजाला पुष्कळ संपत्ति अर्पण केली. ( 'आशिक्षो यत्र शच्या शचीवो दिवोदासाय सुन्वते सुतक्रे भरद्वाजाय गृणते वसूनि' ।। ऋ. ६-३१-४ ) यावरून भरद्वाज हा दिवोदासाचा पुरोहित होता हें उघड होतें.

त्याचप्रमाणें त्याचा संबंध आणखी दोघा महत्वाच्या राजांशीं आलेला दिसतो. तो प्रसंग असा. एका समयीं कांहीं कारणावरून अभ्यावर्तिन् चायमान व वरशिखाचे लोक यांमध्यें वितुष्ट वाढून त्याचा परिणाम

लढाईंत झाला. त्यांत अभ्यावर्तिन् चायमान राजाचा वारशिखांनीं पूर्ण पराभव करून त्यास पिटाळून लावलें ! त्याच वेळेस त्या वारशिखांनीं सृंजयपुत्र प्रस्तोक राजासहि संग्राम करून पराभूत केलें. या दोघांहि राजांना असा मार बसला होता कीं त्यांना त्या वारशिखांपुढें पुनः डोकें वर उचलण्याची छाती नव्हती. भरद्वाजाचें मंत्रकौशल्य, इन्द्रभक्ति व कर्तबगारी यांची त्यांना चांगली जाणीव असल्यामुळें त्या दोघांनीं त्याच्याकडे धांव मारली आणि आपलें पौराहित्य पत्करून वारशिखांचें पारिपत्य करण्याच्या कामीं मदत करण्याची त्यास विनंति केली. हा मजकूर बृहद्देवतेंत आहे तो असा :

अभ्यावर्ती चायमानः प्रस्तोकश्चैव सार्ञ्जयः ।
आजग्मतुर्भरद्वाजं जितौ वारशिखैर्युधि ॥ ५-१२४ ॥
अभिगम्योचतुस्तौ तं प्रसादाख्याय नामनी ।
युधि वारशिखैर्ब्रह्मन्नावां विद्धि विनिर्जितौ ॥ ५-१२५ ॥
भवत्पुरोहितावावां क्षत्रबन्धूञ्जयेवहि ।
क्षत्रं तदपि विज्ञेयं ब्रह्म यत्पाति शाश्वतम् ॥ ५-१२६ ॥
ऋषिस्तौ तु तथेत्युक्त्वा पायुं पुत्रमभाषत ।
अधर्षणीयौ शत्रूणां कुरुष्वेतौ नृपाविति ॥ ५-१२७ ॥

अर्थ सरळ व समजण्यास सोपा असल्यामुळें त्याचा मराठींत अनुवाद करण्याच्या भरीस पडत नाहीं.

त्या राजद्वयांच्या वरील विनंतीस मान देऊन, भरद्वाजानें पायु नांवाच्या आपल्या पुत्रास हाक मारून त्यास सांगितलें कीं ते राजे लढाईत शत्रूंना दुर्जय होतील अशी तजवीज कर. तेव्हां पायूनें 'बरें' असें म्हणून 'जीमूतस्य' (ऋ. ६-७५) या सूक्तानें राजाचें कवच, धनुष्य, बाण, हस्तघ्न, रथ, घोडे, चाबूक इत्यादि युद्धोपकरणें मंत्रानें अभिमंत्रण करून, तीं त्या राजांस अर्पण केलीं. नंतर भरद्वाजानें इन्द्रास प्रसन्न करून घेऊन त्याचें सहाय अभ्यावर्ती चायमानास मिळवून दिलें. तेव्हां चायमानाची व वारशिखांची पुनः हरियूपीया नदीकांठीं लढाई जुंपून, त्यांत इन्द्रानें चायमानाचा पक्ष घेऊन वारशिखांचा धुव्वा उडवून दिला ! व त्या धुमश्चक्रींत वराशिखाच्या मुलास ठार मारलें ( 'वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने

चायमानाय शिक्षन्। वृचीवतो यद्धरियूपीयायां हन् पूर्वे अर्धे भियसापरो दर्त ॥' ऋ. ६-२७-५ )! या लढाईत वरशिखांचे तीन हजार वीर-सैनिक यव्यावती नदीवर फुटक्या भांड्याप्रमाणें कामास आले ( 'त्रिंशच्छतं वर्मिण इन्द्र साकं यव्यावत्यां पुरुहूत श्रवस्या। वृचीवन्तः शरवे पत्यमानाः पात्रा भिन्दाना न्यर्थान्यायन्' ॥ ऋ. ६-२७-६ ).

हा उपरोक्त मजकूर बृहद्देवतेंत आहे तो असा:-'पितरं स तथेत्युक्त्वा युद्धोपकरणं तयो:। जीमूतस्येति सूक्तेन पृथक्त्वेनान्वमन्त्रयत् ॥ १२७ ॥ सूक्तेनानेन तु स्तुत्वा संग्रामाङ्गान्यृषिस्तयो:। तत: प्रस्थापयामास पुनर्वारशिखान्प्रति ॥ १३६ ॥ एतत्यत्ते चतसृभी राज्ञो साहाय्यकाम्यया। भरद्वाजोऽभितुष्टाव प्रीतस्तेन पुरंदरः ॥ १३७ ॥ अभ्यावर्तिनमभ्येत्य हर्युपीया नदीतटे। सहितश्चायमानेन जघानैताञ्छचीपतिः ॥ १३८ ॥ तौ तु वारशिखाञ्जित्वा ततोऽभ्यवर्तिसाञ्जयौ। भरद्वाजाय गुरवे ददतुर्विविधं वसु' ( ५-१३९ ). या श्लोकांतील तात्पर्यात्मक मजकूर वर आल्यामुळें व तेवढ्यावरून निर्वाह लागत असल्यामुळें पुनः त्याचा येथें शब्दशः अर्थ देण्याची आम्हांस आवश्यकता वाटत नाहीं. म्हणून तो दिला नाहीं.

या विजयोत्सव प्रसंगीं अभ्यावर्ती चायमान राजानें खुष होऊन भरद्वाजास काय काय दिलें याचा उल्लेख ऋग्वेदांत खुद्द भरद्वाजानेंच केला आहे तो असा:--

( 'द्वयाँ अग्ने रथिनो विंशतिं गा वधूमतो मघवा मह्यं सम्राट्। अभ्यावर्ती चायमानो ददाति दूणाशेयं दक्षिणा पार्थिवानाम् ॥' ऋ. ६-२७-८ )

अशा तऱ्हेनें भरद्वाज ऋषीनें तीन राजांची त्यांच्या आणीबाणीच्या वेळीं मदत करून अब्रु वांचवून, त्यांस वैदिक वाङ्मयांत अमर करून ठेविलें! असो. भरद्वाज हा मोठा राजकारणी ऋषि असून त्यास ऋजिश्वन्, पायु, गर्ग इत्यादि मंत्रद्रष्टे पुत्र होते.

जातां जातां या भरद्वाजाची आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगून प्रस्तुत चरित्रभाग संपवितों. यज्ञांत गायीचा वध करूं नये असें म्हणणारा ऋषि ऋग्वेदांत भरद्वाज हा प्रमुख आहे. 'आ गावो अग्मन्नुत'-गायी आमच्या घरीं येवोत!-हे गायीविषयक सुंदर व प्रसिद्ध सूक्त त्याचेंच असून, त्यांत गायींचें फार सुंदर वर्णन करण्यांत आलें आहे. त्याचा उल्लेख आमच्या

ऋग्रत्न भांडारांत (रत्न २१० वें पहा) केलाच आहे. पैकीं त्यांतील एकच ऋचा कीं ज्यांत गाय ही अवध्य आहे असा अर्थ ध्वनित होतो, ती तेवढी येथें उद्धृत करतों. 'न ता अर्वा रेणुककाटो अश्नुते न संस्कृतत्रमुप यन्ति ता अभि। उरुगायमभयं तस्य ता अनु गावो मर्तस्य वि चरन्ति यज्वनः ॥' (६-२८-४) भावार्थः—युद्धार्थ आलेला घोडा त्या गायी मिळवीत नाहीं. त्याचप्रमाणें यज्ञांत शरीरविच्छेदनाचे संस्कारहि त्यांच्यावर केले जात नाहींत. अर्थात् त्या गायी यजनशील यजमानाच्या विस्तीर्ण कुरणांत जाऊन निर्भय संचार करोत !' असो. एकंदरींत ऋग्वेदांत भरद्वाज ऋषींचें स्थान श्रेष्ठ प्रतीचें असून, तें चिरकाल स्मरणीय असेंच आहे. तो सप्तर्षींपैकीं एक ऋषि आहे, हें निराळें सांगणें नकोच.

**बृहद्देवता**

**यो अङ्गारेभ्य ऋषिर्जज्ञे तस्य पुत्रो बृहस्पतिः ।**
**बृहस्पतेर्भरद्वाजो विदथीति य उच्यते ॥ ५-१०२ ॥**

**भरद्वाजाची वंशावळ**



१३ **मेधातिथिः**—मेधातिथि हा कण्वपुत्र असून तो पहिल्या मंडळांतील बारा ते तेवीस आणि आठव्या मंडळांतील दोन व तीन या सूक्तांचा द्रष्टा आहे. तो आसंग प्लायोगि राजाचा पुरोहित असून, राजानें त्यास इतर राजांपेक्षां दहा हजारांनीं अधिक धन दिलें. ('अध प्लायोगिरति दासदन्यानासंगो अग्ने दशभिः सहस्रैः' ८-१-३३ ) त्याचप्रमाणें कौरयाण पाकस्थामानेंहि त्यास धन, तांबडा बैल व एक चलाख घोडा दान दिला. ( ८-३-२१ ते २३ ). इंद्रानें त्याचें रणांत रक्षण केलें. ( 'प्रावो मघवन् मेध्यातिथिं' ८-४९-९ ) व त्याचे घरीं सोम प्राशन केला. ( ८-५१-१ ).

१४ **वसिष्ठः**—ऋग्वेदांत ज्या कांहीं महनीय व चिरस्मरणीय अशा प्रख्यात व्यक्तींचा संबंध येतो, त्या सर्वांत महर्षि वसिष्ठाचें स्थान सर्वांत उच्च व श्रेष्ठ आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्तीचा दोष मुळींच येणार नाहीं. हा वसिष्ठ म्हणजे मित्रावरुणाचा कुंभोद्भव पुत्र असून, सप्तर्षींपैकीं तो एक आहे. तो ऋग्वेदांतील प्रसिद्ध सातव्या मंडळाचा द्रष्टा असून भरतांचा पुरोहित होता. त्याची जन्मकथा बृहद्देवतेंत आढळते ती अशीः—

प्रजापतीपासून मरीचि, मरीचीपासून कश्यप व कश्यपापासून दक्षपुत्री अदितीच्या ठिकाणीं भग, अर्यमा इत्यादि बारा पुत्र झाले असून, हे आदित्य नांवानें प्रसिद्ध आहेत. व मित्रावरुण नांवाचें एक जुळें भावंडहि तिच्यापासूनच उत्पन्न झालें. या मित्रावरुणांनीं पुढें एका कालीं एक सत्र प्रारंभिलें. त्या सत्रांत गंधर्व लोकांतील रूपलावण्यसंपन्न अशी उर्वशी अप्सरा आली होती. तिच्याकडे त्यांची दृष्टि वळली व तें अप्रतिम रूपलावण्य पाहून त्यांचें मन विरघळलें व त्याचा परिणाम म्हणून त्यांचें वीर्य स्खलन पावून, तें तेथील वसतीवरी नांवाच्या एका कुंभांत पडलें. अर्थात् सामान्य मनुष्याचें तें वीर्य नसून, प्रत्यक्ष आदित्य देवांचें तें प्रभावी वीर्य ! वीर्य भांड्यांत पडल्यावर पुढें मुहूर्तानें त्यापासून त्या कुंभांत एक ऋषि जन्मास आला ! तोच अगस्ति होय ! व पाण्यापासून एक तेजस्वी मासा निघाला. अगस्त्य त्या कुंभांतून बाहेर आल्यावर तो खुंटीच्या (शमीमात्रा) आकारा एवढा होता. अर्थात् तो त्या खुंटीनें मापला गेला म्हणून त्याला मान हें टोपण

नांवहि पडलें. शिवाय कुंभ हें देखील एक मोजण्याचें परिमाणच आहे. म्हणून तो कुंभापासून जन्मला असल्यामुळें त्याला मान हें नांव पडलें, हेंहि ठीकच झालें. पुढें त्या कुंभांतील पाणी जेव्हां बाहेर काढण्यांत आलें, तेव्हां वसिष्ठ हा तेथें एका कमळावर उभा राहिलेला असून त्या कमळाला देवांनीं सर्व बाजूंनीं सांवरून धरल्याचें दिसून आलें ! कुंभांतील पाण्यांतून बाहेर आल्यावर वसिष्ठानें पुढें मग मोठी तपश्चर्या केली. वसिष्ठ हा शब्द वस् धातूपासून झाला असून तो धातू श्रेष्ठत्व-सूचक आहे. आणि वसिष्ठाच्या श्रेष्ठ व दिव्य गुणाला अनुलक्षूनच वसिष्ठ हें पूज्य नांव त्यास प्राप्त झालें.

बृहद्देवतेंत ही हकीकत थोड्या विस्तारानें देण्यांत आली असली तरी ऋग्वेदांत त्याचा उल्लेख अगदींच नाहीं असें मात्र नाहीं. तेथें अगदीं संक्षेप रूपांत ती आढळते, एवढेंच. ऋग्वेदाच्या सातव्या मंडळांत या विषयाला अनुलक्षून एक ऋचा आहे. ती अशीः—'उतासि मैत्रावरुणो वसिष्ठोर्वश्या ब्रह्मन् मनसोऽधि जातः । द्रप्सं स्कन्नं ब्रह्मणा दैव्येन विश्वे देवाः पुष्करे त्वाददन्त '(७-३३-११). भावार्थ—हे वसिष्ठा ! तूं मित्रावरुणाचा पुत्र आहेस. हे ब्रह्मन् ! उर्वशीला पुत्राची इच्छा झाली असल्यामुळें तिला पाहून मित्रावरुणांचें रेत स्खलन पावलें व त्यापासून तूं उत्पन्न झालास. याप्रमाणें जन्मल्यावर दिव्य वेदराशीनें युक्त असलेल्या तुला देवांनीं कमळांतून संभाळिलें ! अशी कथा ऋग्वेदांत आढळते. अशी ही वसिष्ठाची जन्मकथा आहे. यालाच पुढें ७-३३-१३ मध्यें थोडी पुस्ती जोडण्यांत आली आहे ती अशीः—'सत्रे ह जाताविषिता नमोभिः कुम्भे रेतः सिषिचतुः समानम् । ततो ह मान उदियाय मध्यात्ततो जातमृषिमाहुर्वसिष्ठम्' (७-३३-१३) सत्रांत मित्रांवरुणांनीं दीक्षित होऊन बसल्यावेळीं इतरांनीं त्यांना स्तुति करून संतोषविलें असतां त्या स्तुतीनें प्रसन्न होऊन त्यांनीं वसतीवरी नांवाच्या कलशांत एकदाच रेत सिंचन केलें. तेव्हां त्या कुंभाच्या मध्यभागांतून शमीपरिमाणाचा अगस्त्य उत्पन्न झाला आणि त्यांतूनच वसिष्ठहि जन्मला. अर्थात् अगस्त्य व वसिष्ठ हे एकाच कुंभांतून जन्मले असल्यामुळें त्यांना अयोनिज असें म्हणण्याचा प्रघात पडला.

ऋग्वेदांत ज्या कांहीं राजकीय घडामोडीचा थोडाफार उल्लेख इतस्ततः करण्यांत आला आहे, त्यांत दाशराज्ञ युद्धाची प्रामुख्यानें गणना केली जाते. आणि या सुप्रसिद्ध प्राचीन ऐतिहासिक युद्धाचा प्रत्यक्ष संबंध या पुरोहित-श्रेष्ठ वसिष्ठाशीं येत असून, त्याच्या महान् कर्तबगारीमुळें व मंत्रसामर्थ्या-मुळेंच आर्यांचे पाय या भरतभूमींत स्थिर होऊन टिकून राहिले व तेव्हां-पासून तो देश भारत देश या नांवानें यथार्थ गाजूं लागला. ही विसरण्या-सारखी गोष्ट नाहीं. तेव्हां अशा तपोनिष्ठ, कर्मकुशल व राजकारणपटु श्रेष्ठ महर्षींचा इतिहास तितकाच अद्‌भुत व अलौकिक असला तर त्यांत नवल तें काय ? या महात्म्याचें चरित्र म्हणजे थोडक्यांत असें आहे.

वसिष्ठ हा रंगानें गोरा ( 'श्वित्यंचः' ७-३३-१ ) असून, त्याच्या डोक्यावर उजव्या बाजूला चूडा होती ( 'दक्षितस्कपर्दः' ७-३३-१ ). तो मंत्रविद्या व यज्ञकर्म या दोहोंतहि सारखाच निष्णात ('द्विबर्हाः' ७-८-६) असून, त्याच्याजवळ हजारांनीं गोसंपत्ति होती ( 'शतसाः संसहस्रम्' ७-८-६ ) त्याची तपश्चर्या इतकी श्रेष्ठ व कडकडीत होती कीं त्या तपश्च-र्येला, त्याच्या विद्येला व कर्मकौशल्याला भुलून इन्द्रानें त्यास प्रत्यक्ष दर्शन दिलें ! ही गोष्ट मागें कधींहि झाली नव्हती. वसिष्ठालाच प्रथम इन्द्राचें प्रत्यक्ष दर्शन झालें ( 'अदृशमृषिभिर्हीन्द्रं सो (वासिष्ठः)ऽपश्यत्त-पसा पुरा' बृहद्देवता ५-१५६ ) ! शिवाय त्यानें आपल्या तपश्चर्येच्या योगानें धाता, सविता व विष्णु यांस प्रसन्न करून घेऊन तोंपर्यंत कोणा-जवळहि नव्हतें असें रथंतर नांवाचे महत्त्वाचे साममंत्र त्यांजकडून मिळवून घेतले ('धातुर्द्युतानात् सवितुश्च विष्णो रथंतरमा जभारा वसिष्ठः' १०-१८१-१ ) ! जरूथ नांवाचा एक मोठा द्वाड असुर होता. तो वसिष्ठास भारी त्रास देत असे. तेव्हां वसिष्ठानें अग्नीस प्रसन्न करून घेऊन त्याच्या करवीं त्यानें त्या असुराचा पार सप्पा उडवून दिला !

कश्यपाची मुलगी अरुंधती ही त्याची बायको ( वायु. ७०-७९ ) असून, तिच्यापासून त्याला शक्ति या नांवाचा तितकाच प्रभावशाली पुत्र झाला ( वायु. ७०-८० ) व या शक्तीला अदृश्यंतीपासून पराशर नांवाचा विख्यात ऋषि जन्मला. वसिष्ठाचा मुख्य व जबरदस्त प्रतिस्पर्धी म्हणजे

विश्वामित्र होय. त्यानें वसिष्ठाचा परोपरीनें छळ केला पण वसिष्ठाची शांति कांहीं त्यापासून तसुभर देखील ढळली नाहीं ! यासंबंधीं विशेष हकीकत पुढें येणारच आहे. म्हणून त्याचा विशेष विस्तार येथें करीत नाहीं.

या वसिष्ठाची सांगावयाची एक मुख्य व महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यानें तृत्सूंच्या राजास केलेली मोठी मदत ही होय. तो प्रसंग म्हणजे असाः–– तृत्सूंचा राजा–यांना भरत असें म्हणतात–हा शत्रूंकडून पराभूत होऊन अनन्यगतिक झाला. त्यामुळें त्याच्या प्रजेची अत्यंत दुर्दशा उडून, ती देशोधडीस लागली ! त्यावेळीं त्यांना वाली असा कोणी राहिला नाहीं. त्यांची वाताहत फार झाली आणि हीनावस्था तर कळसास जाऊन पोंचली ! ही त्यांची पोरकेपणाची असहाय व करुणाजनक स्थिति पाहून वसिष्ठाचें अंतःकरण कळवळलें व मन द्रवलें व त्यानें त्या तृत्सूंचें पौरोहित्य पत्करून त्यांस पाठीशीं घेतलें. अर्थात् तो इन्द्राचा परमभक्त असल्यामुळें त्यानें यावेळीं इंद्राची प्रार्थना करून त्याला प्रसन्न करून घेतलें आणि त्याच्या मदतीनें त्यानें त्या तृत्सूंस वसाहत करून रहावयास मोठा प्रदेश मिळवून दिला. ( वसिष्ठस्य स्तुवत इन्द्रो अश्रोदुरुं तृत्सुभ्यो अकृणोदु लोकम्' ७-३३-५ ). याप्रमाणें रहावयास विस्तीर्ण प्रदेश मिळाल्यावर तृत्सु लोक तेथें जाऊन स्थिरस्थावर झाले आणि अर्थातच त्यांची प्रजा झपाट्यानें वाढूं लागली. याविषयीं ऋग्वेदांत उल्लेख आढळतो तो असाः– ( 'दण्डा इवेद् गोअजनास आसन् परिच्छिन्ना भरता अर्भकासः । अभवच्च पुरएता वसिष्ठ आदित् तृत्सूनां विशो अप्रथन्त' ७-३३-६ ). अर्थ विस्तारानें वर आलाच आहे. म्हणून येथें पुनरावृत्ति करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. अशा रीतीनें वसिष्ठानें पडलेल्या तृत्सुराष्ट्राचें पुढारीपण पत्करून, त्या राष्ट्राचा उद्धार व भरभराट केली ! आणि ' बुडत्यास हात द्यावा ' ही सुबोधोक्ति सत्य करून दाखविली !

अशीच उल्लेखनीय त्याची दुसरी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे सुदास राजावरील एक मोठा युद्धप्रसंग, ही होय. पंजाबांतील रावी (परुष्णी) नदीच्या प्रदेशांत घडलेली ही हकीकत आहे.

सुदासानें कांहीं दिवसांपूर्वी विश्वामित्राच्या प्रेरणेनें व सहाय्यानें एक मोठा अश्वमेध केला होता. त्याचा परिणाम असा झाला कीं जेथें जेथें तो अश्वमेधाचा घोडा फिरत गेला,तेथील तेथील राजांना कुशिकांच्या सहाय्यानें भरतांनीं चांगला चोप दिला होता. अर्थात् सुदास सर्वत्र विजयी झाला ही गोष्ट खरी आणि अश्वमेधहि सुरळीत पार पडला हेंहि खरें. याचा परिणाम मात्र असा झाला कीं ज्यांना ज्यांना म्हणून या अश्वमेधा निमित्तानें झळ लागली होती व चोप मिळाला होता, त्या त्या राजांच्या मनांत तो अपमान अंतःकरणांतून सारखा कुढत राहिला होता. पण सुदासास तोंड देण्याइतकें सामर्थ्य त्यांच्यांत एकासहि नव्हतें. म्हणून कांहीं काल ते सुप्त ज्वाला-मुखीप्रमाणें स्वस्थ व थंड पडून राहिले होते; पुढें त्यांना बुद्धि सुचली व सर्वांनीं मिळून एक प्रचंड कट केला.

ही गुणगुण सुदासाच्या कानावर आली. विश्वामित्राच्या प्रोत्साहनानें आपण तो अश्वमेध करून इतर राजांस दुखविलें व डिवचलें ही गोष्ट कांहीं चांगली केली नाहीं हा विचार त्याच्या मनांत शिरून, त्यास पुढें पुढें ती गोष्ट खाऊं लागली. याच सुमारास आपद्ग्रस्त तृत्सूंचें पौरोहित्य वसिष्ठाकडे येऊन,त्याच्या मदतीनें त्यांची स्थिति सुधारून ती भरभराटीस लागली होती. यामुळें वसिष्ठाचें वजन वाढून भरतांचा कल त्याच्याकडे अधिकाधिक झुकत चालला होता. इतक्यांत सुदासाविरुद्ध युद्धाची वावटळ उठण्याचा रंग दिसूं लागला.या प्रसंगांतून निभावून नेण्याचें सामर्थ्य व कौशल्य ब्रह्मर्षि वसिष्ठाकडेच आहे, अशी सुदासाची खात्री पटून त्यानें आपल्या पुरोहि-ताची जांगा विश्वामित्राकडून काढून घेऊन ती वसिष्ठास दिली ! इकडे तुर्वश राजाच्या नेतृत्वाखालीं पुरु, द्रुह्यु, कवष, भेद, कवि, वैकर्ण इत्यादि दहा राजांनीं आपसांत संगनमत करून सुदासावर एकदम चढाई करण्याचें कारस्थान रचण्यास सुरवात केली, व त्याप्रमाणें तयारी चालविली. ‘ वयं राष्ट्रे जागृयाम पुरोहिताः ’ या याज्ञवल्क्योक्तीप्रमाणें वैदिक राजपुरोहित सदैव जागृत राहून राष्ट्रांत व राष्ट्राबाहेर चाललेल्या घडामोडीकडे सूक्ष्म दृष्टीनें नीट लक्ष पुरवीत असत. तशांत वसिष्ठ म्हणजे अष्टावधानी व अष्टपैलू विभूति ! मोठा धोरणी व मोठा जागृत पुरोहित ! त्याला त्या

ऋटाचा कोठून तरी वास लागला. लागलाच तो सुदासाच्या मदतीस धांवून आला.

इतक्यांत दहा राजांनीं मिळून सुदासावर चढाई केली. एकटा सुदास एका बाजूला आणि त्याच्या विरुद्ध तुर्वश, पुरु, कविचायमान, वैकर्ण इत्यादि दहा बलाढ्य राजे दुसऱ्या बाजूला. चाणाक्ष वसिष्ठानें तो लढाईचा रागरंग मनांतून जाणला. त्या दहा राजांपुढें एकट्या सुदासाचा निभाव लागणें शक्य नाहीं हें ताडून, त्यानें सुदासाकडून तत्काल एक सोमयाग प्रारंभून, त्यांत इंद्राचें प्रिय पेय—जो सोमरस—तें पिण्यास त्यानें इंद्रास पाचारण केलें. त्याच वेळीं तो इंद्र पाशद्युम्नाच्या सोमयागांत जाऊन तेथें सोम पिण्यांत गुंतला होता. पण वसिष्ठाची ती प्रार्थना त्याच्या कानावर येतांच, तो सोमरसाचा प्याला तेथल्यातेथेंच सोडून देऊन तो सुदासाच्या यज्ञांत धांवून आला ! ( 'पाशद्युम्नस्य वायतस्य सोमात् सुतादिन्द्रोऽवृणीता वासिष्ठान्' ७-३३-२ ). वसिष्ठाच्या प्रसंगावधानामुळें व करामतीमुळेंच त्या असहाय सुदासाला सर्वसमर्थ इंद्राचें सहाय्य मिळून अखेर त्याची त्या लढाईत सरशी झाली ! सुदास विजयी झाला व शत्रूंची दाणादाण झाली !

असा हा दाशराज्ञ युद्धाचा गोड शेवट वसिष्ठाच्या करामतीनेंच झाला हें विसरून चालावयाचें नाहीं. हें आमच्या हातचें सांगतों असें नव्हे तर प्रत्यक्ष ऋग्वेदांत तसा उल्लेखच आहे. 'एवेन्नु कं दाशराज्ञे सुदासं प्राव-दिन्द्रो ब्रह्मणा वो वसिष्ठाः ' ( ७-३३-३ ) हे वसिष्ठ हो ! याप्रमाणें दाशराज्ञ युद्धांत इन्द्रानें सुदास राजाचें रक्षण केलें तो तुमच्या मंत्रसाम-र्थ्याचा प्रभाव होय ! या लढाईत शत्रू एवढे बलाढ्य होते कीं त्यांच्या-पुढें सुदासाचें कांहींच चालण्यासारखें नव्हतें ! असें असून सुद्धां सुदासा-लाच विजयश्रीनें माळ घातली ! या दोन्ही सैन्यांच्या बलाबलाचा विचार करतां 'शेळीनें (छाग) सिंहाची शिकार मारली ! ( सिंह्यं चित्पेत्वेना जघान ' ७-१८-१७ ) अशी अलंकारिक भाषा ऋग्वेदानें उपयोगिली आहे. असो, या लढाईची सविस्तर हकीकत पुढें येणारच असल्यामुळें त्याचा येथें विस्तार केला नाहीं. मात्र इतकें सांगणें जरूर आहे कीं वसि-ष्ठानें ही जी अपूर्व मदत सुदासास त्या दाशराज्ञ युद्धांत केली, ती ते व्हांच

काय, पण यावच्चन्द्रदिवाकरौ आम्हा भारतीयांस संस्मरणीय अशीच आहे व अशीच राहील.

असा हा वसिष्ठाचा महिमा सूर्याप्रमाणें स्पष्ट, समुद्राप्रमाणें अगाध व मंत्रसमुदाय वायूप्रमाणें अनुसरण्यास अशक्य असा होता, ही गोष्ट खुद्द ऋग्वेदांतच नमूद करून ठेवण्यांत आली आहे. ( 'सूर्यस्येव वक्षथो ज्योतिरेषां समुद्रस्येव महिमा गभीरः । वातस्येव प्रजवो नान्येन स्तोमो वसिष्ठा अन्वेतवे वः॥ ' ७-३३-८ ) केवळ इन्द्रच त्याला अनुकूल होता असें नसून इतर देवहि त्याजवर प्रसन्न होते. एकदां तर असा चमत्कार झाला कीं तो सांगितल्याशिवाय आम्हास पुढें जाववत नाहीं. वसिष्ठ मोठ्या खुषींत होता. त्यास त्यावेळीं देवाचें स्तोत्र गाण्याची एक मोठी लहर आली. म्हणून त्यानें त्या लहरींत वरुणाचें उत्तम स्तोत्र म्हटलें; तें स्तोत्र ऐकून वरुणराजाची कळी खुलली. त्या आनंदभरांत तो प्रत्यक्ष वसिष्ठाजवळ येऊन त्यास आपल्या घरीं बोलावून नेलें आणि एक सुंदर नाव घेऊन त्यांत वसिष्ठास वसवून समुद्रांत नौकाविहार करण्यासाठीं म्हणून तो त्याच्याबरोबर गेला व तेथें लाटांवर दोघांनीं मिळून खूप गम्मत केली. (' आ यद् रुहाव वरुणश्च नावं प्र यत् समुद्रमीरयाव मध्यम्' ७-८८-३) या वरुणदेवाप्रमाणें अश्विनी देवहि त्याजवर खुष होते. शिवाय धाता, सविता, विष्णु व अग्नि हे देव त्याजवर प्रसन्न असल्याचा धांवता उल्लेख वर आलाच आहे. एकंदरींत काय, वसिष्ठ हा इन्द्र, वरुण, अग्नि, धाता, सविता, विष्णु, अश्विनी कुमार इत्यादि देवांना आपल्या मंत्रकौशल्यानें व पवित्र चारित्र्यानें प्रसन्न ठेवून, त्यांच्या दैवी कृपेस पूर्ण पात्र झाला होता.

दाशराज्ञ युद्धाचा शेवट जरी गोड झाला होता तरी त्यापासून एक गोष्ट मात्र अनिष्ट ठरली. ती म्हणजे वसिष्ठ व विश्वामित्र यांच्यांतील तेढ व वितुष्ट ! सुदास राजानें आत्महितार्थ व राष्ट्ररक्षणार्थ पुरोहितांत बदल करून आपला बचाव करून घेतला हें खरें, पण त्याचा परिणाम विश्वामित्राच्या स्वाभिमानास डिवचून त्याचा मत्सर जागृत करण्यांत झाला, हें कांहीं खोटें नाहीं. तेव्हांपासून विश्वामित्राचा दांत वसिष्ठावर बसला. तो इतका कीं त्या दोघांमधून पुढें आडवा विस्तव जाईनासा झाला व चुरस सारखी भडक-

त्च चालली ! याचा प्रत्यय पुढें चांगला आलाच ! दाशराज्ञ युद्ध चमकून गेल्यावर पुढें कांहीं दिवसांनीं सुदासाच्या मुलानें एक मोठा यज्ञ केला. त्यांत वसिष्ठाचा मुलगा शक्ति यानें मुख्य कार्य हातीं घेतलें होतें. त्या समयीं विश्वामित्रहि तेथें आला होता. पुढें प्रसंगावरून त्या दोघांत वादाला तोंड फुटलें आणि त्यांत शक्तीनें वादकौशल्यांत विश्वामित्राची खूप फजिती केली. ती इतकी कीं विश्वामित्राला पुढें बोलतां येईना ! तो हतबुद्ध झाला! आणि भ्रमिष्ठासारखा बोलूं लागला. याचा परिणाम असा झाला कीं त्यास पुढें त्या यज्ञमंडपांतून हाकलून देण्यांत आलें ! ('सुदासश्च महायज्ञे शक्तिना गाथिसूनवे। निग्रहीतं बलाच्चेतः सोऽवसीदद्विचेतनः।।' बृहद्देवता,४-११२ व ११३ )

याप्रमाणें विश्वामित्राचें वादकौशल्य त्या वसिष्ठपुत्र शक्तीपुढें निस्तेज पडून तोंडाला कुलूप लागल्यामुळें त्याला परोपरीनें दुःख झालें, हें स्वाभाविकच आहे. बिचारा विश्वामित्र ! मोठा महर्षि खरा ! पण या पराभवानें मनांत अत्यंत खजिल होऊन मेल्यासारखा झाला ! लोकांत तोंड दाखविणेची सोय राहिली नाहीं ! फार काय त्याची वाणीच लुली पडली ! पुढें कर्मधर्मसंयोगानें त्याची व जमदग्निऋषीची गांठ पडली. विश्वामित्राची ती अनुकंपनीय स्थिति पाहून जमदग्नीला दया आली व सूर्याजवळ असलेली ससर्परी नांवाची दिव्यवाणी आणून त्यास दिली. ही वाणी त्यास मिळतांच त्याचें अज्ञान—मतिभ्रम—पार सगळा निघून गेला ! व तो पूर्वीप्रमाणेंच तेजस्वी झाला ! विश्वामित्रास फार आनंद झाला.

शक्तीनें ह्या जो विजय मिळविला तो त्याला हिताचा झाला नाहीं. पुढें विश्वामित्रानें त्या सुदासपुत्राला फितवून त्याच्या करवीं त्याला ( शक्तीला) संधि साधून अग्नींत फेंकवून दिलें ! मरतां मरतां शक्तीनें ' इन्द्र क्रतुं न आ भर पिता पुत्रेभ्योयथा।' ही एवढी अर्ध ऋचा म्हणून मधेंच प्राण सोडला ! व पुढें हें वसिष्ठास कळल्यावर ' शिक्षा णो अस्मिन्पुरुहूत यामनि जीवा ज्योतिरशीमहि ॥ ' ( ७-३२-२६ ) हा पुढील अर्धभाग म्हणून तो मंत्र पुरा केला आणि त्यालाच पुस्ती म्हणून ही पुढील ऋचा म्हटली:—' मा नो अज्ञाता वृजना दुराध्यो३ माशिवासो अव क्रमुः । त्वया वयं प्रवतः शश्वतीरपोऽति शूर तरामसि ।।' ७-३२-२७ ॥

अशापरीनें विश्वामित्रानें वसिष्ठाचा सूड उगविला. इतकेंच नव्हे तर त्याचे शंभर पुत्र याप्रमाणें यमसदनास पाठविले! तरी त्या ब्रह्मर्षि वसिष्ठाची शांति रतिभरहि ढळली नाहीं. आपण इतकें छळूनहि वसिष्ठाची समतोलता न ढळतां केवळ तो शेवटपर्यंत शांतीचा महामेरू राहिला, हें पाहून त्यालाच काय वाटलें कोण जाणें शेवटीं ' धिग्बलं क्षत्रियबलं, ब्रह्मतेजो बलं बलं ! ' असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले, हें महाभारत वाचकांस विदित आहेच. वसिष्ठ हा सप्तर्षींपैकीं एक आहे.

## वसिष्ठाची वंशावळ



'प्राजापत्यो मरीचिर्हि मारीचः कश्यपो मुनिः ।
तस्य देव्योऽभवञ्जाया दाक्षायण्यस्त्रयोदश ॥ ५-१४३ ॥
तत्रैकात्वदितिर्देवी द्वादशाञ्जनयत् सुतान् ॥ ५-१४६ ॥
भगश्चैवार्यमाश्च मित्रो वरुण एव च ।
धाता चैव विधाता च विवस्वांश्च महाद्युतिः ॥ ५-१४७ ॥
त्वष्टा पूषा तथैवेन्द्रो द्वादशोविष्णुरुच्यते ।
द्वन्द्वं तस्यास्तु तज्जज्ञे मित्रश्च वरुणश्च ह ॥ ५-१४८ ॥
तयोरादित्ययोः सत्रे दृष्ट्वाप्सरसमुर्वशीम् ।
रेतश्चस्कन्द तत्कुम्भे न्यपतद्वासतीवरे ॥ ५-१४९ ॥
तेनैव तु मुहूर्तेन वीर्यवन्तौ तपस्विनौ ।
अगस्त्यश्च वसिष्ठश्च तत्रर्षी संबभूवतुः ॥ ५-१५० ॥
बहुधा पतति शुक्रे कलशेऽथ जले स्थले ।
स्थले वसिष्ठस्तु मुनिः संभूत ऋषिसत्तमः ॥ ५-१५१ ॥
कुम्भे त्वगस्त्यः संभूते जले मत्स्यो महाद्युतिः ।
उदियाय ततोऽगस्त्यः शम्यामात्रो महायशाः ॥ ५-१५२ ॥
मानेन संमितो यस्मात्तस्मान्मान्य इहोच्यते ।
यद्वा कुम्भादृषिर्जातः कुंभेनापि हि मीयते ॥ ५-१५३ ॥
कुम्भ इत्याभिधानं तु परिमाणस्य लक्ष्यते ।
ततोऽप्सु गृह्यमाणासु वसिष्ठः पुष्करे स्थितः ॥ ५-१५४ ॥
सर्वत पुष्करं तत्र विश्वे देवा अधारयन् ।
उत्थाय सासिलात्तस्मादथ तेपे महत्तपः ॥ ५-१५५ ॥
नामास्य गुणतो जज्ञे वसतेः श्रैष्ठ्य-कर्मणः ।
अदृश्यमृषिभिर्हीन्द्रं सोऽपश्यत्तपसा पुरा ज ५-१५६ ॥

**१५ विश्वामित्रः**—ऋग्वेदांतील प्रसिद्ध थोर व्यक्तींपैकीं विश्वामित्र हाहि एक आहे. तो क्षत्रिय कुलोत्पन्न असून प्रसिद्ध कुशिक राजाचा नातू व गाथीचा पुत्र होय. त्यानें कांहीं काल राज्यहि केलें व प्रपंचहि केला. प्रत्यक्ष राजलक्ष्मीच त्यास अनुकूल असल्यामुळें सर्व प्रापंचिक सुखसाधनाचें त्यास पूर्ण पाठबळ होतें. तो मोठा भाग्यवान राजा होता. त्यास एकशेंएक पुत्र होते. यावरून त्याच्या प्रपंचविस्ताराची कल्पना करतां येईल. असें असून सुद्धां त्यास काय वाटलें कोणास ठाऊक, ती राज्यलक्ष्मी व तो सुखाचा प्रपंचविस्तार यांचा त्याग करून तो तपश्चर्या करावयास निघाला व मोठी दीर्घ व खडतर तपश्चर्या करून, अखेर महनीय व स्पृहणीय असें ऋषिपद गांटलें! तो महर्षि झाला! ( महाँ ऋषिः' ३-५३-९ ) या विषयीं बृहद्देवतेंत माहिती मिळते ती अशी;—'प्राशास्य गां यस्तपासाभ्यगच्छद् ब्रह्मर्षितामेकशतं च पुत्रान्। स गाथिपुत्रस्तु जगाद सूक्तं सोमस्य मेत्याग्नेयं यत्परे च॥' ( ४-९५ ) अर्थाचा तपशील वर थोड्या विस्तारानें आलाच असल्यामुळें पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं.

'तपसा वै लोकं जयति' असें यज्ञवाल्क्यांनी जें शतपथांत म्हटलें आहे, त्याची आम्हांस येथें आठवण होते. तपश्चर्या ही वैदिक आर्यांची एक मोठी कामधेनु आहे! तो एक स्वर्गीय कल्पवृक्ष असून या मर्त्यलोकीं जो कोणी त्याचा आश्रय करील तो नीचाचा उच्च, लहानाचा थोर, शूद्राचा ब्राह्मण आणि नराचा नारायण होऊन जातो! वैदिक आर्यांनीं ही जी एक दिव्य किमया शोधून काढली तिचा फायदा घेऊन या पुण्य भूमींत अनेक लहानथोर लोकांनीं आपलें नांव इतिहासांत अजरामर करून ठेविलें आहे. इन्द्र झाला तरी काय? तोहि प्रथम मनुष्यच होता. कश्यपाचा पुत्र. पण पुढें तपश्चर्या करून त्यानें स्वर्गाचें राज्यपद मिळविलें नाहीं काय?'त्वं तपः परितप्य अजयः स्वः',—इन्द्रा। तूं तपश्चर्या करूनच स्वर्गपद मिळविलेंस—असें खुद्द ऋग्वेदांत स्पष्ट बोलून दाखविलें आहे. मग आणखी काय पाहिजे? इतकेंच नव्हे, तर त्याचें प्रत्यंतर या भरतखंडांत असंख्य लोकांनीं घेतलें आहे! फार लांब कशाला, या विश्वामित्राचींच गोष्ट घ्या. तपश्चर्येचें दिव्य करून तो क्षत्रियाचा अखेर महर्षि, नव्हे, ब्रह्मर्षिहि झाला!

असो. एकंदरींत सांगावयाचें तात्पर्य हें कीं, इतरत्र कसेंहि असो या तपश्चर्येच्या क्षेत्रांत देश, धर्म, जात, कुल, वर्ण, लिंग हीं कांहींच आड येऊं शकत नाहींत ! मात्र तशी बलवत्तर इच्छा व कडकडीत तपश्चर्या पाहिजे, इतकेंच. अस्तु. प्रकृतं अनुसरामः.

ऋग्वेदांत विश्वामित्राची योग्यता एका दृष्टीनें फार मोठी आहे. तो जातीनें क्षत्रिय होता, तरी खडतर तपश्चर्येचें भयंकर दिव्य करून अखेर श्रेष्ठ ब्रह्मर्षीचें उच्च स्थान पटकावून मोठमोठ्या यज्ञांत त्यानें ब्राह्मणांच्या जोडीला आपला पाट भिडवून पौरोहित्याचें महनीय काम केलें, ही कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे ! अर्थात् विश्वामित्र म्हणजे अत्यंत योग्यतावान विभूति होय. तो ऋग्वेदांतील तिसऱ्या मंडळांतील जवळजवळ चाळीस मंत्रांचा द्रष्टा आहे ! तो भरतांचा पुरोहित असून, इंद्राप्रीत्यर्थ उत्तम व सुंदर स्तोत्रें करून त्यानें एका कालीं भरत कुलाचें रक्षण केलें आहे. ( 'विश्वामित्रस्य रक्षति ब्रम्हेदं भारतं जनम्' ३-५३-१२ ). ऋग्वेदांतील इतिहासप्रसिद्ध सुदास राजाचें पौरोहित्य त्याच्याकडेच असून, त्या वेळीं भरतांची जी भरभराट झाली, तिचें बहुतेक श्रेय त्यासच दिलें पाहिजे.

हें आम्हीं लिहिलें याचें कारण त्यानें सुदास राजाकडून करविलेला एक मोठा अश्वमेध यज्ञ हें होय. या अश्वमेध यज्ञांत त्याचे पुत्रबांधवादि कुशिकांनीं सुदासाच्या घोड्याचें रक्षण करण्याच्या कामीं पुढाकार घेऊन, त्या घोड्याला सुरक्षित पृथ्वीभर फिरवून आणला. त्या वेळीं विश्वामित्रानें त्यांना धीर व प्रोत्साहन देऊन ती कामगिरी यशस्वी रीतीनें पार पाडली. ( 'उप प्रेत कुशिकाः चेतयध्वमश्वं राये प्र मुंचता सुदासः' ३-५३-११). त्या वेळीं त्यानें त्या भरतवीरांस छातीठोक सांगितलें कीं 'हे कुशिकांनो ! मी वीरश्रेष्ठ इन्द्राचें तुमचेसाठीं सुंदर स्तोत्र करतों. तें या विश्वामित्राचें स्तोत्र तुम्हा भरत लोकांचें खात्रीनें रक्षण करील ( 'य इमे रोदसी उभे अहमिन्द्रमतुष्टवम् । विश्वामित्रस्य रक्षति ब्रम्हेदं भारतं जनम्' ३-५३-१२). पुढें तो घोडा पृथ्वीभर फिरून परत आला. त्या वेळीं वाटेंत ज्यांनीं ज्यांनीं म्हणून त्यास अडथळा केला, त्यास भरतांनीं चांगला चोप देऊन त्यांचा बीमोड केला आणि घोड्यास पुढें वाट करून दिली. याप्रमाणें घोडा सर्वत्र फिरून विजयी

होऊन परत आल्यावर मोठ्या समारंभानें सुदास राजानें अश्वमेध यज्ञ करून, त्यांत विश्वामित्रास फार मोठी संपत्ति दक्षिणा म्हणून दिली. अर्थात् या यज्ञांत विश्वामित्राचें यज्ञकौशल्य जगाच्या पूर्ण निदर्शनास आलें.

या यज्ञांत सुदास राजानें दिलेली अपार संपत्ति रथांत भरून घेऊन तो परत आपल्या आश्रमाकडे निघाला, पण वाटेंत त्यास विपाट व शुतुद्रु नद्यांनीं अडवून धरलें. त्या दोहोंचा संगम होता तो. त्या दोन्ही नद्या महापुरानें तुडुंब भरून वाहत असून, संगमांतील जलप्रवाह अफाट व अगाध असल्यामुळें तो ओलांडून जाणें अशक्य होतें. तेव्हां त्यानें त्यांचें स्तोत्र गाऊन आपणाला जावयास वाट होण्याइतका उतार द्यावा अशी त्यांची प्रार्थना केली. ('ओ षु स्वसारः कारवे शृणोत ययौ वो दूरादनसा रथेन। नि षू नमध्वं भवता सुपारा अधोअक्षाः सिन्धवः स्रोत्याभिः ॥ ३-३३-९) प्रथम त्या नद्यांनीं इन्द्रानें आपणास घालून दिलेली आज्ञा मोडतां येत नाहीं, म्हणून तुझी विनंति आम्हांस अग्राह्य आहे असें सांगितलें. पण पुढें विश्वामित्रानें चिकाटी धरून पुनः त्यांचें स्तोत्र गाऊन वरील सूक्तांत सांगितल्याप्रमाणें काकुळतीनें त्यांची विनंति केली. तेव्हां त्यांनीं त्या विनंतीस मान देऊन त्याच्या इच्छेप्रमाणें नम्र होऊन त्यास वाट करून दिली. या प्रसंगाला उद्देशूनच पुढें ५३ व्या सूक्तांत ('अस्तभ्नात्सिधुमर्णवम्')—नदीचा प्रवाह थोपवून धरला—असें म्हटलें आहे. खरोखर विश्वामित्राचा हा महिमा वाखाणण्यासारखा नाहीं, असें कोण म्हणेल ?

आणखी एक या विश्वामित्राची सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे वेधस पुत्र हरिश्चंद्र राजाच्या एका यज्ञांत त्यानें होत्याचें केलेलें काम होय. त्या यज्ञांत वसिष्ठ हाहि होता. त्यांत शुनःशेपाला बळी देण्याकरतां म्हणून यूपाला आणून बांधण्यांत आलें होतें. पण शुनःशेपानें वरुणाची प्रार्थना करून त्यांत आपली सुटका करून घेतली. त्याची ही देवभक्ति व मंत्रप्रभाव पाहून विश्वामित्रास मोठा आनंद झाला, व त्यानें खुष होऊन त्या शुनःशेपास दत्तक घेऊन त्याचें नांव देवरात असें ठेविलें. यावरून विश्वामित्राची गुणग्राहकता व्यक्त होते. असो.

वर सांगितलेल्या सुदास राजाच्या अश्वमेध यज्ञाचा परिणाम पुढें

असा झाला कीं, ज्या ज्या राजे लोकांना भरतांनीं अश्वभ्रमणाच्या वेळीं चिडविलें व डिवचिलें होतें, तो अपमान त्यांच्या मनांत सारखा कुढतच राहिला होता. पण त्याचें उट्टें काढण्याचें धैर्य व सामर्थ्य त्यांच्यांत एकांतहि नव्हतें. तेव्हां त्यांनीं सर्वांनीं मिळून आपला सूड उगवावा, असा आंतून बेत चालविला. ही गुणगुण पुढें सुदास राजाच्या कानावर आली. विश्वामित्राच्या प्रोत्साहनानें आपण अश्वमेध करून इतर राजांस नाहक दुखविलें ही गोष्ट कांहीं चांगली झाली नाहीं, हा विचार त्याच्या मनांत शिरून त्यास खाऊं लागला. बिचारा एकटाच! करतो काय? इतर राजांची मदत अगर सहानुभूति त्यास त्या वेळीं मिळण्याची आशा नव्हती. सभोंवतालचें राजकीय वातावरण क्षुब्ध व गरम झालेलें! तो मोठ्या विवंचनेंत पडला असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

याच सुमारास भरतांपैकीं आपद्ग्रस्त तृत्सूचें पौरोहित्य वसिष्ठाकडे येऊन त्याच्या मदतीनें त्यांची स्थिति सुधारत चालली होती. शिवाय वसिष्ठ म्हणजे हीहि एक महिमावान विभूति होती! तो देवांच्या अत्यंत कृपेंतला असून, इन्द्र व वरुण यांनीं प्रत्यक्ष होऊन त्यास दर्शन दिलें होतें! त्याचप्रमाणें त्याचा मंत्रप्रभावहि तसाच मोठा दांडगा होता! यामुळें वसिष्ठाचें वजन वाढत जाऊन भरतांचा कल त्याच्याकडे अधिकाधिक झुकत चालला होता. इतक्यांत सुदासाविरुद्ध युद्धाची वावटळ उठण्याचा रंग दिसूं लागला. या प्रसंगांतून निभावून नेण्याचें सामर्थ्य व कौशल्य फक्त वसिष्ठाजवळच आहे अशी सुदासाची खात्री पटून, त्यानें आपल्या पुरोहिताची जागा विश्वामित्राकडून काढून घेऊन ती वसिष्ठास दिली व पुढें लवकरच युद्धाचा वणवा भडकून त्यांतून सुदासाची वसिष्ठाच्या करामतीनें सुरक्षित सुटका होऊन, वर विजयश्रीहि त्यासच येऊन मिळाली! हा इतिहास पुढें दाशराज्ञ युद्ध प्रकरणांत सविस्तर येणारच आहे. असो. येथपासून वसिष्ठ व विश्वामित्र यांच्यांत तेढ वाढून दोघांत अखेरपर्यंत चुरस लागून द्वेष माजून राहिला.

या दाशराज्ञ युद्धानंतर पुढें कांहीं दिवसांनीं सुदास राजाच्या मुलानें—म्हणजे सौदासानें-एक यज्ञ केला. त्यांत वसिष्ठाचा मुलगा शक्ति यानें

विश्वामित्राशीं वादविवाद करून त्यांत त्यानें विश्वामित्राचा पराभव केला. विश्वामित्राचें ज्ञान व वादकौशल्य तेथें फिक्कें पडून शक्तीच्या ज्ञानतेजापुढें तो निस्तेज पडला ! अर्थात् त्या वादांत तो हतबुद्ध होऊन अखेर पराजयाचें माप पदरीं घेणें त्यास भाग पडलें. या अपमानामुळें तो फार खजिल झाल्यासारखा होऊन, लोकांत तोंड दाखविणें त्याच्या मोठ्या जिवावर आलें. हा काळिमा धुऊन काढण्यासाठीं त्यानें आपला नातजावई जमदग्नि ऋषीकडे धांव घेऊन, आपणास दिव्य वाणी देण्याविषयीं त्याची बिनवणी केली. तेव्हां जमदग्नीनें सूर्याजवळ असलेली ससर्परी नांवाची दिव्य वाणी आणून त्यास दिली. त्यामुळें त्याची हतबुद्धता नष्ट होऊन पुनः तो ज्ञानसंपन्न झाला ( 'ससर्परीरमतिं बाधमाना बृहन्मिमाय जमदग्निदत्ता' ३-५३-१५ ).

याविषयीं बृहद्देवतेंत मजकूर आढळतो तो असाः--

'सुदासश्च महायज्ञे शक्तिना गाधिसूनवे ॥ ४-११२ ॥
निग्रहीतं बलाच्चेतः सोऽवसीदद्विचेतनः ।
तस्मै ब्राम्हीं तु सौरीं वा नाम्ना वाचं ससर्परीम् ॥४-११३ ॥
सूर्यक्षयादिहाहृत्य ददुस्ते जमदग्नयः ।
कुशिकानां ततः सा वाग् अमतिं तामपाहनत् ॥ ४-११४ ॥
उपेति चास्यां कुशिकान् विश्वामित्रोऽनुबोधयत् ।
लब्ध्वा वाचं च हृष्टात्मा तानृषीन्प्रत्यपूजयत् ॥ ४-११५ ॥

या श्लोकांचा सारांशरूपानें अर्थ वर देण्यांत आलाच आहे. सबब चर्वितचर्वण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

या विश्वामित्राच्या पराजयाचा परिणाम मात्र शक्तीस सुखाचा झाला नाहीं. यज्ञांत विश्वामित्राचा वसिष्ठपुत्र शक्तीनें पराभव करावा ही गोष्ट त्या सुदासपुत्रास आवडली नाहीं. म्हणून त्यानें पुढें संधि साधून त्या शक्तीस धरून त्यास अग्नींत टाकून दिलें ! अर्थात् ही गोष्ट विश्वामित्राच्या फुसलावणीनेंच झाली असावी असा लोकप्रवाद आहे. असो. यानंतर वसिष्ठ व विश्वामित्र यांच्यांत उत्तरोउत्तर इतकें वैमनस्य वाढलें कीं विश्वामित्रानें त्या वसिष्ठाचे शंभराचे शंभरहि पुत्र एकामागून एक त्या

सौदासाकडून मारवून त्यांस यमलोक दाखविला ! यामुळें वसिष्ठास अत्यंत दु:ख झालें व त्या दुःखावेगांत वसिष्ठानें 'इन्द्रसोमा तपत रक्ष उब्जतं न्यर्पयतं वृषणा तमोवृधः !' हें सबंध रक्षोघ्न सूक्त त्या विश्वामित्रास उद्देशून म्हटलें. अशी ही विश्वामित्राची ऋग्वेदांत एकंदरींत कथा आहे.

**विश्वामित्राची वंशावळ**




---

**शुन:शेप:**—शुनःशेप हा पहिल्या मंडळांतील २४ ते ३० या सात सूक्तांचा मंत्रद्रष्टा आहे. याची हकीगत मोठी चमत्कारिक असून तितकीच पण हृदयस्पर्शीही आहे. वेधस हरिश्चंद्राच्या वेळची गोष्ट आहे ही. हा शुनःशेप म्हणजे अजीगर्ताचा पुत्र. हरिश्चंद्र राजाला पुत्रसंतती नव्हती, म्हणून त्यानें पुत्रप्राप्त्यर्थ वरुणाची उपासना चालविली. पुढें कांहीं काळानें त्या उपासनेनें संतुष्ट होऊन वरुण राजावर प्रसन्न झाला व त्याच्याजवळ

येऊन म्हणाला, 'राजा, तुला काय हवें तें माग.' तेव्हां राजा त्यास म्हणाला, 'देवा! मला पुत्र नाहीं; तो मला दे! आणि वर हेंहि पण सांगतों कीं तो झाला म्हणजे मी तुला तो बळी देईन.' वरुण म्हणाला 'खरं?' 'अगदीं खरं' राजा उत्तरला, 'यांत अंतर बिलकूल होणार नाहीं.' 'ठीक आहे' वरुण म्हणाला.'पण हें वचन नीट लक्षांत ठेव हो, नाहींतर विसरशील! तुझी इच्छा लवकरच सफल होईल!' असें सांगून वरुण तेथून अंतर्धान पावला.

पुढें कांहीं दिवसांनीं राजाच्या डोळ्याचें पारणें फिटलें. त्याला पुत्र झाला! आणि राजाची इच्छा तृप्त झाली! बाळ मोठें सुंदर व गोंडस होतें! त्याचें नांव रोहित असें ठेवण्यांत आलें. खरोखर बाळ म्हणजे बाळ! अत्यंत सुंदर! तसेंच मोठें गोंडस व गोजिरवाणें! मग तें राजाचें जीव कीं प्राण झालें, हें काय निराळें सांगावयास पाहिजे? राजाचा आनंद त्याकडे पाहून इतकाच म्हणून सांगतां येत नव्हता! रोहित वाढतां वाढतां आतां चांगला पांच वर्षांचा झाला. राजाचा केवढा संभ्रम तो! मुलाचा त्याला इतका लळा लागला कीं त्याला तो क्षणभर देखील विसंबून राहत नसे! मुलाचें अगदीं वेड लागलें होतें त्याला! त्या राजाला! तें म्हणजे इतकें कीं, त्या भरांत तो आपलें वरुणाला दिलेलें वचन अजीबात विसरून गेला! अगदींच विस्मरण झालें त्याला त्या वचनाचें! पण वरुण कोठला हें विसरायला? त्यानें वाट पहा पहा पाहिली. पण कशास काय ठाव ना ठिकाणा! पुढें कांहीं दिवस लोटल्यावर तो होऊनच राजाजवळ आला आणि म्हणाला 'राजा! विसरलास काय? कोठें आहे वचन तुझें? माझा बळी कुठें आहे नि केव्हां देणार?'

वरुणाचें हें भाषण ऐकून हरिश्चंद्राचें अवसानच खचलें! तो फार घाबरला! तडफडला! नि कळवळला! आणि कोणचा बाप कळवणार नाहीं? मुलाचा—प्रत्यक्ष आपल्या पोटच्या गोळ्याचा-बळी देणें, त्याचा गळा कापणें, हें खाटकी कृत्य कोणाच्या हातून होणार! पण बिचारा हरिश्चन्द्र करणार काय? तो वचनांत गुंतला होता ना? वचन कसें मोडावयाचें? अशा तशाला दिलेलें वचन नव्हे तें. प्रत्यक्ष वरुणाला दिलेलें वचन! मग

तें मोडायचें कसें ? देवाला दिलेलें वचन मोडण्याची या क्षुद्र मानवाची काय छाति आहे ? आणि तें मोडून कोण मानव सुखी झाला आहे ? तशांत वचन मोडणें हें अभिजात आर्याला अत्यंत दुःखदायक व मोठें अपमानास्पद नव्हे काय ? तो प्राण देईल पण वचन मोडणार नाहीं ! आर्यांचें वैशिष्ट्य तें हें ! राजाला आतां मोठा पेंच येऊन पडला. वचनाला जागावें तर मुलाचा बळी द्यावा आणि मुलाला वांचवावें तर वचनाचा भंग करावा ! या कठीण कातरींत राजाचें मन सांपडून फार अस्वस्थ झालें. तथापि धीर न सोडतां आलेली वेळ युक्तीनें मारून न्यावी असा विचार करून, तो वरुणास म्हणाला 'देवा ! अजून बाळ लहान आहे ! जरा मोठा होऊं दे म्हणजे तुला तो अर्पण करीन.' वरुणानें तें मान्य करून, तो त्यावेळीं तसाच परत फिरला.

या गोष्टीला कांहीं दिवस गेले. वरुण पुनः आला व आपला भाग देण्याचा आग्रह धरून बसला. या वेळींहि राजानें कांही तरी सबब सांगून त्याची समजूत पाडून ती वेळहि कशी बशी मारून नेली. पण हें असें किती दिवस चालणार ? त्यालाहि मर्यादा आहेच कीं नाहीं ? यालाहि कांहीं वर्षे लोटलीं. बाळ रोहित आतां चांगला मोठा झाला होता. त्याला बरें वाईट कळूं लागलें होतें. राजानें वरुणाची गोष्ट त्यास कळूं दिली नव्हती. तो फार सुखांत व आनंदांत वाढला होता. त्याला बळी देण्याचें राजाचें मन घेईना. अर्थात तो फार चिंतेंत पडला. त्यास अन्न गोड लागेना कीं रात्रीं झोंप येईना ! सारखी वरुणाची धास्ती व मुलाची चिंता ! याप्रमाणें काळ कंठीत असतां वरुणाची स्वारी पुनः दत्त म्हणून पुढें उभी राहिली ! आतां तर त्याला पाहून राजाची कम्मरच खचली ! त्याला वाटलें, हा देव नसून प्रत्यक्ष मृत्युच आहे ! ! वरुण म्हणाला 'राजा ! कर आतां वचन पुरें ! पुष्कळ दिवस वाट पाहिली. पण तूं कांहीं वचनाला जागण्याचें चिन्ह दिसत नाहीं. आतां मी स्पष्ट सांगतों तूं वचन पुरें केल्याखेरीज मी इथून हलणार नाहीं ! बळी तरी दे किंवा वचनभंग तरी कर ! कोणतें तुला परवडतें तें पहा ! ' असें म्हणून तो राजाच्या तोंडाकडे पाहत उभा राहिला. त्याचा तो या खेपेचा निश्चयी चेहरा व निर्भिड भाषण

पाहून गोष्ट अगदीं निकरावर आली हें राजानें ताडलें आणि या खेपेस आपली डाळ शिजणार नाहीं म्हणून दिलेलें वचन पुरें करण्याचें त्यानें ठरविलें आणि रोहितास हाक मारून त्यास प्राप्त प्रसंग कळविला. रोहितानें तें सर्व ऐकून घेतलें आणि आतां 'आलों' असें सांगून तो आंत गेला. पुढें क्षणभरानें बातमी आली कीं तो नजर चुकवून बाहेर पळून गेला !

राजानें ही गोष्ट वरुणास कळविली तेव्हां तो तसाच तेथून झपझप पावलें टाकीत निघून गेला. पण याचा पुढें असा परिणाम झाला कीं राजाचें पोट फुगत चाललें. त्यास उदर रोग झाला! वरुणाचा राग त्यास बाधला. बिचारा हरिश्चंद्र ! मुलगा गेला ही एक काळजी व आपण वचनभ्रष्ट झालों ही दुसरी चिन्ता आणि तशांत उदरारोगाची एक तिसरी पीडा ! पुढें लवकरच त्यानें आंथरूण धरलें असलें तर त्यांत नवल तें काय ? होय, मन चिंताग्रस्त झालें आणि शरीर जमीनीला खिळून बसलें !

इकडे रोहित जो घरांतून निसटला, तो थेट अरण्याच्या रस्त्यास लागला. पुढें अरण्यांत गेल्यावर उपाशी तापाशी इकडे तिकडे फिरत त्यानें कांहीं दिवस काढले. पुढें एके दिवशीं तो फिरत असतां सहज अजीगर्त ऋषीच्या आश्रमास आला. त्या ऋषीला शुनःपुच्छ, शुनःशेप व शुनोलांगूल असे तीन पुत्र असून घरची स्थिति गरीबीची होती. तेथील कांहीं दिवसांच्या अनुभवानें रोहितास कळून आलें कीं अजीगर्तास पैशाची अडचण आहे. तेव्हां त्यानें त्यांच्या गरीबीचा फायदा घेतां येतो कीं काय हें पहावें म्हणून एके दिवशीं संधि साधून तो अजीगर्ताजवळ येऊन म्हणाला, 'महाराज ! मी एक गोष्ट विचारीन म्हणतों. विचारूं का ?' 'ती काय' अजीगर्त म्हणाला. 'काय विचारणार आहेस तूं मला ?' 'विशेष कांहीं नाहीं' रोहित म्हणाला. 'आम्हाला एक मनुष्य पाहिजे आहे. मी तुम्हांस चांगल्या शंभर गाई देतों. तुमच्या तिघा पुत्रांपैकीं मला एक विकत पाहिजे आहे. द्याल का तुम्हीं ?' हें रोहिताचें भाषण ऐकून ऋषीच्या तोंडास पाणी सुटलें ! पुढें कशाचा विचार न करतां त्यानें एकदम 'हूं' म्हटलें. त्याप्रमाणें अजीगर्ताकडून वचन घेऊन तो सरळ बापाजवळ आला आणि त्यास झालेली हकीगत कळवून म्हणाला, 'पिताजी ! आपणास हें

पसंत आहे काय ?' त्यावर हरिश्चंद्र म्हणाला 'मुला, प्रथम आपण याविषयीं वरुणाचा सल्ला घेतला पाहिजे. तो कबूल झाला तर ठीक. मग पुढील कार्यास लागतां येईल.' रोहिताच्या या कृतीनें राजास जरा समाधान वाटलें आणि त्यानें वरुणास बोलावून घेऊन त्याचा सल्ला घेतला. सुदैवाची गोष्ट ही कीं त्यानें राजास तसें करण्यास परवानगी दिली. कारण वरुणास क्षत्रिय बळीपेक्षां ब्राह्मण बळी अधिक प्रशस्त वाटला.

मग आतां उशीर कसला ? गोठ्यांत जाऊन सुंदर व चांगल्या दुभत्या गाई घेऊन रोहित आतां अजीगर्ताच्या आश्रमांत आला आणि त्यास शंभर गाई दाखवून म्हणाला—महाराज, या घ्या शंभर गाई आणि द्या आम्हांस तुमच्यांतील एक मुलगा ! अजीगर्तास त्या सुंदर शंभर गायी पाहून पराकाष्ठेचा आनंद झाला व त्या भरांत त्यानें आपला मधला मुलगा शुनःशेप नांवाचा होता त्यास देऊन सौदा पूर्ण केला ! रोहित गायी अजीगर्ताच्या स्वाधीन करून, शुनःशेपास घेऊन तेथून परत फिरला.

घरीं आल्यावर वरुणाप्रीत्यर्थ यज्ञकार्यास प्रारंभ झाला. या यज्ञांत विश्वामित्रानें होत्याचें, जमदग्नीनें अध्वर्यूचें वसिष्ठानें ब्रह्मयाचें व आयास्यानें उद्गात्याचें पौरोहित्य पत्करलें होतें. यज्ञानुष्ठान मोठ्या उत्साहानें चालू करण्यांत आलें. वरुणास बळी देण्याची वेळ येऊन ठेपली आणि म्हणून शुन:शेपास यज्ञमंडपांत आणून यूपाजवळ उभें करण्यांत आलें. पण गम्मत ही कीं त्यास यूपास धरून बांधण्यास कोणीच तयार होईना ! या समारंभांत अजीगर्त हा प्रेक्षक म्हणून हजर होता. अखेर तोच शंभर गायी घेऊन ही गोष्ट करावयास तयार झाला ! त्याच्या मागणीप्रमाणें त्यास शंभर गायी देण्यांत आल्यावर त्यानें मुलास धरून यूपास दोरीनें जखडून बांधलें. पुढें बळी देण्याची वेळ आली. पण तें कठोर कृत्य तरी कोण करणार ? जो तो तसें करण्यास तोंड फिरवूं लागला. शेवटीं तो अजीगर्तच पुढें होऊन शंभर गायी दिल्यास आपणच तें शमित्याचें काम करूं असें राजास येऊन म्हणाला. राजानें ती गोष्ट मान्य करून शंभर गायी आणवून त्याच्या हवालीं केल्या आणि तो बाप अजीगर्त शंभर गायी घेऊन आपल्या हातानें आपल्या मुलाचा प्राण घेण्यास तयार झाला !

शुनःशेप हें सर्व पाहत होता. आपण अगदीं निरपराध असून आपला आतां लवकरच बळी देण्यांत येणार आहे हें जेव्हां त्यास कळलें, तेव्हां तो घाबरून निराश झाला. राजा हरिश्चंद्र, विश्वामित्र, वसिष्ठ, जमदग्नि हे सर्व मोठे लोक खरे, पण त्या कोणासहि आपली दया येत नाहीं आणि तशांतच आपला जो प्रत्यक्ष जन्मदाता बाप तोही शंभर गायींच्या आशेनें आपणास बांधावयास व अखेर ठार मारावयासहि तयार झाला ! मग आतां कोणाकडे पहावें आणि कोण आपली सुटका करणार ? आतां आपल्या सुटकेची आशा नाहीं व तसा कोणी त्राता नाहीं, याची जेव्हां त्याला खात्री पटली, तेव्हां तो अनन्यगतिक होऊन मनुष्याच्या तोंडाकडे पाहाण्याच्या भरीस न पडतां देवाचा धांवा करूं लागला. बाप जेव्हां त्यास धरून यूपास जखडूं लागला, तेव्हां त्यानें 'कस्य नूनं कतमस्यामृतानां' (१-२४-१) या प्रजापतीच्या धांव्यापासून सुरवात केली. प्रजापतीचा धांवा केल्यावर अग्नीचा, नंतर सवित्याचा, नंतर भगाचा धांवा करून अखेर 'नहि ते क्षत्रं न सहो न मन्युं' (१-२४-६) या मंत्रापासून वरुण देवाची प्रार्थना करण्यास प्रारंभ केला. वरुणाचें स्तोत्र म्हणून झाल्यावर त्यानें पुनः अग्नि, इन्द्र, अश्वी व उषा यांचें त्या त्या देवांच्या सांगण्यावरून तें तें स्तोत्र म्हटलें आणि सांगावयाचा चमत्कार हा कीं, उषेचें स्तोत्र म्हणून संपतें न संपतें तोंच शुनःशेपाचे पाश हळू हळू आपोआप सुटूं लागले ! व तो पुढें क्षणभरांत पाशांतून संपूर्ण मुक्त झाला ! व हरिश्चंद्राचें पोटहि त्याबरोबर उतरत चाललें ! हा सर्व अद्भुत व अनपेक्षित चमत्कार पाहून सर्वांस विस्मय व त्याबरोबर आनंदहि झाला !

शुनःशेपाच्या कथेचा हा असा गोड शेवट झाला. विश्वामित्रानें त्याच्याजवळ जाऊन त्यास पोटाशीं धरलें आणि राजास म्हटलें कीं, 'राजा आतां तुला चिंता करण्याचें कारण नाहीं. वरुणानें त्याच्या स्तोत्रावर प्रसन्न होऊन त्यास प्राणदान दिलें आहे. तुलाहि वचनमुक्त व रोगमुक्त करण्यांत आलें आहे. तेव्हां आतां शुनःशेपाच्या केसास धक्का लावण्याचें कारण राहिलें नाहीं.'

विश्वामित्राच्या सांगण्यावरून त्यास यूपापासून अलग करण्यांत येऊन,

पुढील यज्ञानुष्ठान यथाविधि समाप्त करण्यांत आलें. नंतर तो लोभी बाप अजीगर्त त्या मुलाजवळ येऊन परत घराकडे येण्यास त्यास विनवूं लागला. पण शुनःशेपानें तसें करण्यास आपली नाखुषी दर्शविली. निरुपाय होऊन बाप तेथून निघून गेला व पुढें विश्वामित्रानें त्यास दत्तक घेऊन त्याचें नांव देवरात ( म्हणजे देवानें दिलेला ) असें ठेविलें. शुनःशेपानें देवांची जी या प्रसंगीं स्तुति केली ती मंत्ररूपानें पहिल्या मंडळांत २४ ते ३० सूक्तांत ग्रथित करण्यांत आली असून, पुढें राजसूय यज्ञांत राजास अभिषेक झाल्यावर ते मंत्र त्याच्यापुढें म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. ( ऐतरेय ब्राह्मण. ७-३- ते १३ ते १७ )

---

**श्यावाश्वः**—श्यावाश्व हा अर्चनानसचा मुलगा. तो अत्रिकुलोत्पन्न होता. एकदा असें झालें कीं रथवीति दाभ्य राजाच्या मनांत यज्ञ करण्याचें आलें. तेव्हां त्यानें अर्चनानस यास यज्ञांत ऋत्विज नेमलें. तेथें होम करीत असतां रथवीति राजाजवळ बसलेली त्याची मुलगी त्यानें पाहिली. तेव्हां अर्चनानसानें आपल्या मुलाकरतां तिची मागणी घातली. रथवीतीच्या मनांत ती गोष्ट मान्य करावी असें होतें. पण तत्पूर्वी त्याविषयीं बायकोचा सल्ला घ्यावा असें त्यास वाटल्यावरून त्यानें ती गोष्ट तिच्या पुढें काढली. तेव्हां तिनें आपण राजे असून आपल्या कुळांतील मुलीला ब्राह्मणाला कधींच दिलेली नाहीं, मग आतांच ती गोष्ट आपण कां करावी आणि कुलपरंपरा कां मोडावी ? असें म्हटलें. राजानें तिचें हृद्गत त्या भाषणावरून जाणलें आणि अर्चनानसाजवळ येऊन त्याच्या मागणीस नकार दिला आणि यज्ञांत बसलेल्या श्यावाश्वास तेथून हाकलून दिलें.

श्यावाश्व कांहीं कमी नव्हता. त्यास राजानें केलेला हा अपमान सहन झाला नाहीं. 'करीन तर तीच बायको करीन' असा मनांत निश्चय करून तो तपश्चर्येसाठीं रानांत निघून गेला. तपश्चर्या करण्यांत ब्राह्मण केव्हांहि पुढेंच असावयाचा, त्याप्रमाणें त्यानें कडकडीत तपश्चर्या चालविली. त्याचा परिणाम असा झाला कीं त्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज झळकूं लागलें ! पुढें तो ब्रह्मचारी दोन प्रहरीं भिक्षा मागतां मागतां विदर्थीचा

मुलगा तरंताच्या पत्नीकडे—शशीयसीकडे—भिक्षेस आला. तेव्हां तिनें ऋषि भिक्षेस आल्याची बातमी नवऱ्यास कळविली. तेव्हां त्यानें तिला त्यास आंत बोलावून घेऊन त्याचा यथायोग्य सत्कार करावयास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें श्यावाश्वाचा आतिथ्यसत्कार केला. तरंत त्याला पाहून मनांत फार खुष झाला. आणि सहज बोलतां बोलतां त्याची सर्व हकीगत त्यानें ऐकून घेतली. दारिद्र्यामुळें गुणी लोकांची अवहेलना होते, हें पाहून त्यास मोठें वाईट वाटलें व तो दोष धुऊन टाकण्यासाठीं म्हणून त्यानें व त्याच्या बायकोनें मिळून त्यास गायींचे कळप, वस्त्रालंकार व संपत्ति दिली. या प्रमाणें त्याचा सत्कार करून जातांना त्यास आपला जो धाकटा भाऊ पुरुमिळ्ह, त्याच्याकडे जाण्यास सांगितलें.

त्याप्रमाणें तो जाण्यास निघाला. वाटेंत त्यास मरुताची गांठ पडली. त्यांना पाहून तो मनांत जरा घाबरला. पण लगेच प्रसंगावधान साधून त्यानें त्यांची सुंदर स्तोत्र गाऊन उत्तम स्तुति केली. मरुतांनीं त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं वरदान दिलें व ते तेथून निघून गेले. पुढें तो पुरुमिळ्हाच्या घरीं गेला. त्यानेंहि श्यावाश्वाचें आदरातिथ्य करून शंभर गायी दिल्या. श्यावाश्व निघून गेल्यावर इकडे राजा तरंतानें रथवीति दार्भ्यास आपली मुलगी श्यावाश्वास देण्याची शिफारस केली. ती मान्य करून पुढें श्यावाश्व घरीं आल्यावर रथवीतीनें त्यास आपली मुलगी दिली. पुढें श्यावाश्वानें कृतज्ञ होऊन, पुरुमिळ्ह, तरंत, त्याची भार्या शशीयसी, मरुत व रथवीति दार्भ्य यांनीं संतुष्ट होऊन आपली इच्छा पूर्ण केली असें वर्णन ५-६१ या सूक्तांत केलेलें आहे. पुढें श्यावाश्व हा तरंत व पुरुमिळ्ह यांचा पुरोहित झाला. हा शावाश्व पांचव्या मंडळांतील ५१ ते ६१ व आठव्या मंडळांतील ३५ ते ३८ सूक्तांचा द्रष्टा आहे.

---



## प्रकरण ६ वें

# वैदिक-राजे

## ऋग्वेदांतील कांहीं वैदिक राजे

| | | |
|---|---|---|
| १ | अभ्यावर्तिनचायमान, | ६-२७-८ |
| २ | अम्बरीष वार्षागीर | १-१० |
| ३ | असामति | १०-६०-२ |
| ४ | आयु काण्व | ८-५३-२ |
| ५ | आसंग प्लायोगि | ८-१-१० |
| ६ | ऋजिश्वा भारद्वाज | ५-२९-१ |
| ७ | ऋज्राश्व वार्षागिर | १-१०० |
| ८ | ऋणंचय | ५-३०-१२ |
| ९ | कुत्स आंगिरस | १-३३-१४ |
| १० | कुरुश्रवण | १०-३३-१४ |
| ११ | गविष्ठिर आत्रेय | ५-१-१२ |
| १२ | चैद्यकशु | ८-५-३७ |
| १३ | तुर्वश | ८-४-७ |
| १४ | तुर्वीति | १-६१-११ |
| १५ | तुर्वयाण | १-५३-१० |
| १६ | त्रसदस्यु | ७-४२-९ |
| १७ | दार्भ्य ( रथवीति ) | ५-६१-१८ |
| १८ | दिवोदास | ६-४७-२३ |
| १९ | दुर्गह | |
| २० | देववात | ६-२७-७ |
| २१ | नहुष मानव | ९-१०१-७ |
| २२ | पाकस्थामा | ८-३-२१ |
| २३ | पाषद्युम्न | ७-३३-२ |
| २४ | पुरुकुत्स | १-१७४.२ |
| २५ | पुरुमित्र | १०-३९-७ |
| २६ | पुरुमिळ्ह | ६-६१-१० |
| २७ | पुरुमेध | ८-८९ |
| २८ | पुरुरवा | १०-९५-२ |
| २९ | पौर आत्रेय | ५-७३ |
| ३० | प्रतर्दन | १०-१७९ |
| ३१ | प्रियमेध | १-१३९-९ |
| ३२ | भाव्य | १-१२६-१ |
| ३३ | भुज्यु | १-११६-४ |
| ३४ | मनु | १-१-३९-९ |
| ३५ | मांधाता | १०-१३४ |
| ३६ | यदु | ८-७-४ |
| ३७ | ययाति | १०-६३-१ |
| ३८ | विमदऐंद्र | १-११६-१ |
| ३९ | संवरण | ५-३३ |
| ४० | सुदास | ७-३३-३ |
| ४१ | सुश्रवस | १-५३-१० |
| ४२ | सृंजय | ६-२७-७ |
| ४३ | स्वनय | १-१२६-३ |

# वैदिक राजे व त्यांचे पुरोहित

| | राजा | पुरोहित | |
|---|---|---|---|
| १ | असामती | बंधु श्रुतबंधु | १०-६०-२ |
| २ | आसंग प्लायोगी | मेधातिथि | ८-१-१० |
| ३ | इंद्रोत | प्रियमेध | ८-६८-१६ |
| ४ | ऋणंचय | बभ्रुआत्रेय | ५-३०-१२ |
| ५ | कशुचैद्य | बह्मातिथि | १०-३३-१४ |
| ६ | कुरुश्रवण | कवष | १०-३३-१४ |
| ७ | कुरुंग | देवातिथि | ८-४-१९ |
| ८ | चायमानअभ्यावर्तिन् | भरद्वाज | ६-२७-८ |
| ९ | तिरिंदिर | वत्स काण्व | ८-६-४७ |
| १० | तुर्वश | देवातिथि काण्व | ८-४-७ |
| ११ | त्रसदस्यु | सोभरि काण्व | ८-१९-१६ |
| १२ | दिवोदास | गर्ग भारद्वाज | ६-४७-१३ |
| १३ | पाकस्थामा | मेधातिथि | ८-३-२१ |
| १४ | पुरु | अत्रि | १०-४८-५ |
| १५ | पुरुमिळ्ह | श्यावाश्व | ५-६१-१० |
| १६ | पुरुषंति | अवत्सार | ९-५८-३ |
| १७ | प्रस्तोक | गर्ग | ६-४७-२२ |
| १८ | भरत ( तृत्सु ) | वसिष्ठ | ७-३३-६ |
| १९ | यदु | देवातिथि८-४-७ | ८-४-७ |
| २० | सावर्णिमनु | नाभानेदिष्ट | १०-६२-८ |
| २१ | सुदास | विश्वामित्र } | ३-५३-९ |
| | | वसिष्ठ } | ७-३३-३ |
| २२ | सोमक | वामदेव | ४-१५-९ |
| २३ | स्वनय | कक्षीवान | १-१२६-१ |

**अभ्यावर्तिन् चायमान**:—अभ्यावर्ती चायमान हा पृथूंचा राजा असून तो सम्राट् होता. ( 'सम्राट पार्थिवानाम्' ६-२७-८ ) त्याचें व वरशिखाचें

कांहीं कारणावरून वितुष्ट वाढून, त्याचा परिणाम अखेर लढाईत झाला. या लढाईत अभ्यावर्तीचा चुलत भाऊ प्रस्तोक सांर्जय यानें अभ्यावर्तीचा पक्ष घेऊन, त्याच्या बाजूस लढण्यास तोहि आपलें सैन्य घेऊन मोहिमेंत सामील झाला होता. अभ्यावर्ती व वराशिख यांच्यांत भयंकर रणकंदन माजलें आणि अखेर त्यांत अभ्यावर्ती व प्रस्तोक यांचा पराभव झाला. ('अभ्यावर्ती चायमानः प्रस्तोकश्चैव सांर्जयः। आजग्म-तुर्भरद्वाजं जितौ वाराशिखैर्युधि ॥' बृहद्देवताः ५-१२४ ). या पराभवा-मुळें अभ्यवर्तीची फारच नालस्ती झाली. एवढा मोठा सम्राट! पण लढाईत मान खालीं घालण्याचा प्रसंग आला. अर्थात ही गोष्ट त्यास फारच लागून राहिली, यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं.

या पराभवापासून तो सारखा मनांत बेचैन झाला. याचा सूड कसा घ्यावा व आपली गेलेली अब्रु पुनः कशी मिळवावी, या विचारांत तो गर्क असतां त्यास भरद्वाज ऋषीची आठवण झाली. भरद्वाज हा मोठा महिमावान ऋषि म्हणून त्याची त्यावेळीं प्रसिद्धि होती. म्हणून तो व प्रस्तोक मिळून त्याच्याकडे जाऊन त्यास झालेली हकीगत कळवून, आपलें पौरोहित्य पत्करून आपणांस वराशिखाची खोड मोडण्याचे कामीं मदत करण्यास त्याची विनंती केली आणि भरद्वाजानें ती मान्य केली.

अभिगम्योचतुस्तौ तं प्रसादाख्यय नामनी ।
युधि वाराशिखैर्ब्रम्हन् आवां विद्धि विनिर्जितौ ॥१२५॥
भवत्पुरोहितावावां क्षत्रबंन्धुसृंजयेवहि ।
क्षत्रं तदपि विज्ञेयं ब्रम्हयत्पाति शाश्वतम् ॥ १२६ ॥
'ऋषिस्तौ तु तथैत्युक्त्वा पायुं पुत्रमभाषत ॥ १२७ ॥

( बृहद्देवता अ. ५-१२५ ते १२७ )

भरद्वाज हा मोठा इंद्रभक्त होता. त्याच्यावर इंद्राची मर्जी फार मोठी होती. त्याची हाक ऐकूं आली कीं पुरे, आलाच धांवून त्याच्याजवळ. हें रहस्य अभ्यावर्तीला माहीत होतें. म्हणून त्यानें त्या ऋषीकडे धांव घेतली. पुढें भरद्वाजानें आपल्या पुत्रास म्हणजे पायूस युद्धोपयोगी उपकरणें ह्मणजे कवच, धनुष्य, बाण, रथ, घोडे, सारथी इत्यादिकांस अभिमंत्रण करा-

चयास सांगितलें व पायूनें त्याप्रमाणें 'जीमूतस्येव भवति' या मंत्रानें त्या सर्वांना अभिमंत्रण केलें, ( 'पितरं स ( पायुः ) तथेत्युक्त्वा युद्धोपकरणं तयोः। जीमूतस्येति सूक्तेन पृथक्त्वेनान्वमन्त्रयत्' ॥ ५-१२७ ) व त्या सर्व वस्तु अभ्यावर्तीस धारण करण्यास व उपयोगण्यास दिल्या.

नंतर भरद्वाजानें इंद्राप्रीत्यर्थ यज्ञ करून त्यांत त्यास सोम अर्पण करून प्रसन्न केलें. इंद्र तेथें आला व भरद्वाजाच्या प्रार्थनेवरून अभ्यावर्तीचा पक्ष घेऊन, वरशिखावर चढाई केली व पुढें लढाईत त्यानें त्या उन्मत्त वरशिखाचा विमोड करून, त्यास कंठस्थान घातलें. ( 'भरद्वाजोऽभितुष्टाव प्रीतस्तेन पुरंदरः ॥ १३७ ॥ अभ्यावर्तिनमभ्येत्य हर्यूपीया नदीतटे। सहितश्चायमानेन जघानैनाञ्छचीपतिः॥ बृ. दे. ५-१४८ )

हा सगळा मजकूर ऋग्वेदांत सूत्ररूपानें एका ऋचेंत आला आहे. ती ऋचा अशी:—'वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन्। वृचीवतो यद्धरियूपीयां हन्पूर्वे अर्धे भियसापरो दर्त ॥ ६-२७-५ भावार्थ-ही लढाई हरियूपीया नदीच्या पूर्वेस होऊन, त्यांत वरशिख व त्याचे पुत्र ठार मारले गेले. इतकेंच नव्हे, तर त्या लढाईच्या ज्वाळा यव्यायती नदीपर्यंत पसरून त्या नदीच्या तीरावर त्याच्या तीन हजार सैनिकांची आहुति पडली. ( ६-२७-६). या विजयोत्सव प्रसंगीं चायमान अत्यंत खुष होऊन त्यानें भरद्वाजास रथ, स्त्रिया, गाई व इतर संपत्ति दक्षिणा म्हणून दिली ( 'भरद्वाजाय गुरवे ददतुर्विविधं वसु' ५-१३९ ).

### अभ्यावर्तिन्ची वंशावळ



**(२) आसंग प्लायोगीः**—आसंग हा प्लायोगी राजाचा मुलगा. त्यास अंगिरसाची मुलगी व बृहस्पतीची बहीण शश्वती ही दिली होती. तो यदुकुलोत्पन्न असून मेधातिथीचा मोठा आश्रयदाता होता. तो फार स्तुतिप्रिय होता. त्यानें मेधातिथीला पुष्कळ धन देऊन, आपली स्तुति वर्णन करण्यास सांगितलें. तेव्हां मेधातिथीनें आसंग हा आपल्या पराक्रमानें शत्रूच्या घोड्यांना अगदीं तुच्छ करून टाकतो, तसाच तो मोठा सन्मार्गवर्ती राजा आहे, त्याचें धनुष्य इतकें प्रभावी आहे कीं, तें मी मी म्हणणाऱ्या बलाढ्य शत्रूला देखील धूळ चारल्याशिवाय सोडत नाहीं; अर्थात् आसंग हा रणांत मोठा विजयी राजा आहे असें मेधातिथीनें त्याचें वर्णन केलें ( 'निन्दिताश्वः प्रपथी परमज्या मघस्य मेध्यातिथे' ८-१-३० ). मेधातिथीनें त्याची ८-१-३१, ३२ व ३३ या ऋचांमध्यें स्तुति करून त्याच्याकडून पुष्कळ संपत्ति मिळविली. आसंगानें त्या स्तुतीनें प्रसन्न होऊन मेधातिथीस पुष्कळ द्रव्य व दहा हजार गायी दिल्या.

पुढें कांहीं प्रसंगानें त्याच्यावर देवाचा कोप होऊन त्या देवाच्या शापानें त्याचें पुरुषत्व जाऊन त्यास स्त्रीत्व प्राप्त झालें. अर्थात् त्याला हिजड्याचें स्वरूप प्राप्त झालें. दिसावयाला स्त्री पण लैंगिक दृष्ट्या पुरुषहि नव्हे, स्त्रीहि नव्हे अशी त्याची मोठी चमत्कारिक स्थिति झाली. त्या वेळीं इंद्र हा तेथें येऊन त्यास म्हणतो—हे प्लायोगे, तूं आतां स्त्री झाला आहेस, तर स्त्रीधर्माप्रमाणें तूं आतां खालीं पाहत जा ('अधःपश्यस्व' ८-३३१-९). वर पाहूं नकोस ( 'मा उपरि' ८-३३-१९ ). चालतांना पाउलें हळूंच टाक ( 'संतरां पादकौ हर' ८-३३-१९ ). त्याचप्रमाणें तुझ्या पायाचे घोटे बाहेर न दिसतील असें कर ( 'मा ते कशप्लकौ दृशन्' ८-३३-१९). हें सर्व तुला सांगण्याचें कारण कीं तूं आतां स्त्री झाला आहेस. पुरुष नाहींस ( 'स्त्रीहि ब्रह्मा बभूविथ' ८-३३-१९ ). हें इंद्राचें भाषण आर्य कुलवधूचें विनयस्वभावाचें निदर्शक आहे. असो.

आपल्या पतीला पुरुषाचें रूप जाऊन स्त्रीचें आलें हें पाहून शश्वतीला अत्यंत वाईट वाटलें व मनस्वी दुःख झालें. कसेंहि करून त्याला पुरुषाचें रूप पुनः प्राप्त होईल असें करावें म्हणून ती त्या प्रयत्नास लागली.

तेथें लौकिक उपाय चालण्यासारखा नव्हता. अलौकिक उपाय योजूनच ती गोष्ट साध्य होण्यासारखी होती. अर्थात् ही उपाययोजना साधण्यासाठीं तिनें मेधातिथीकडे धांव मारली व आपल्या पतीस पुनः पुरुषरूप प्राप्त होईल असें करण्याबद्दल त्याची विनंति केली. मेधातिथीनें ती त्या शश्वतीची विनंति मान्य करून आपल्या मंत्र सामर्थ्यानें आसंगास पुनः पुरुषरूप प्राप्त करून दिलें. शश्वतीचा केवढा आनंद तो ! तिला तें पतीचें पुरुषरूप पाहून परमानंद झाला ! व त्याला विविध प्रेमविलासानें रमवून आनंदी आनंद करून सोडलें आणि या प्रसंगीं मेधातिथीलाहि पुष्कळ धनदान देऊन त्यालाहि संतुष्ट केलें. याविषयीं बृहद्देवतेंत उल्लेख आढळतो तो असा.

तुष्टावांगिरसी नारी वसंती शश्वती पतिम् ॥ ४० ॥
स्त्रियं सन्तं पुमांसं तमासंगं कृतवानृषिः ।
स्वस्य दानं स्तुहीत्यृग्भिश्चतुर्भिः परिकीर्तितम् ॥ ४१ ॥
( बृ. दे. ६-४० व ४१ )

---

(३) ऋजिश्वाः—हा विदथीचा पुत्र असून राजा होता. याला औशिज म्हणजे उशिजेचा पुत्र असें म्हटलें आहे. तो भारद्वाज गोत्रांतला असून मोठा शूर व देवभक्त होता. एकदा असा प्रसंग आला कीं त्याला एका प्रबल वृंगद नांवाच्या दस्यूबरोबर लढावें लागलें. त्या दस्यूचे बळकट असे शंभर किल्ले असून, आर्यांचा मोठा द्वेष्टा व जहाल शत्रु होता. त्याची पुंडाई फार माजली होती. त्याची खोड जिरविल्याशिवाय राज्यांत शांतता व सुरक्षितता नांदणें शक्य नव्हतें.तेव्हां त्यानें मोठें धाडस करून वृंगदावर हल्ला चढविला व मोठ्या पराक्रमानें लढून त्याचा पराभव केला व त्याच्या राज्यांत शिरून त्याचीं शंभर नगरें जमीनदोस्त करून टाकलीं. अर्थात् या मोहिमेंत त्यानें त्या दस्यूचें चांगलेंच पारिपत्य केलें. त्या वृंगदाला असा मार बसला कीं पुनः त्यानें ऋजिश्व्याचें नांव काढलें नाहीं. ( 'त्वं शतावृङ्गदस्याभिनत् पुरोऽनानुदः परिषूता ऋजिश्वना' १-५३-८ ).

अर्थात् हा ऋजिश्वा मोठा देवभक्त होता. त्यानें इंद्राची मैत्री संपादण्यासाठीं त्यास त्याचें प्रियपान म्हणजे सोमरस अर्पण करून व विविध हविर्द्रव्यें देऊन त्यास प्रसन्न करून घेतलें होतें. त्याजवर इंद्राची कृपा चांगली असल्यामुळें त्याला अपयश हें कोठेंच आलें नाहीं. वरील वृंगदाप्रमाणेंच कृष्ण नांवाचा एक मोठा असुर होता. तो रंगानें काळाकभिन्न असून मोठा दुष्ट होता. ऋजिश्व्याच्या राज्यांत शिरून लोकांना फार त्रास देत असे. त्याची पुंडाई जिरविण्यासाठीं ऋजिश्व्यानें त्या खोडकर दासावर स्वारी करून त्यास लढाईत गांठून अखेर ठार मारून टाकलें. इतकेंच नव्हे तर त्या वेळीं त्या कृष्णासुराची बायको गरोदर होती. तिच्यापासून पुढें असुर बंश वाढीस लागूं नये म्हणून तिलाहि त्यानें ठार मारून टाकलें. अर्थात् ते सर्व पराक्रम त्यानें इंद्राच्या साहय्यानेंच केले ('यः (इंद्रः) कृष्णगर्भा निरहन्नृजिश्वना' १-१०१-१ ).

या राजाची सर्वांत महत्वाची गोष्ट सांगावयाची म्हणजे त्याची व बलाढ्य पिप्रूची लागलेली भयंकर झुंज ही होय. हा पिप्रू म्हणजे मोठा शूर व तसाच अत्यंत क्रूर दस्यू होता ! तो नास्तिकांतला कट्टर नास्तिकाग्रणी होता. इंद्राचा तो भारी द्वेष व थट्टा करी, ( 'पीप्रूमव्रतम्' १-१०१-२ ). तो सर्पाप्रमाणें मोठा धूर्त व अत्यंत कपटी होता. ('पिप्रोरहिमायस्य' ६-२०-७). त्याच्यासारखा मायावी म्हणजे त्याचा तोच ! ('विप्रोरसुरस्य मायिनः' १०-१३८-३ ). हा दस्यू असल्यामुळें तो आर्यांचा जहाल शत्रु होता. तो काय, शंबर काय, शुष्ण काय हे सर्व दासाग्रणी वैदिक आर्यांचे हाडवैरी असून, त्यांनीं आर्यांना परोपरीनें छळून सळो कां पळो करून टाकलें होतें. ते वैदिक आर्यांना रानावनांत घेरून त्यांना लूटमार करीत. त्यांच्या गाई पळवून नेत. शेतांतील धान्य लुटून नेत. यज्ञांत नाहीं नाहीं तीं विघ्नें उपस्थित करीत आणि गांवांत बेधडक शिरून आर्यांची चीज वस्त पार लुटून नेत. अर्थात् ते आर्यांना परोपरीनें छळून त्यांचा जीव रंजीस आणीत. हा पिप्रु झाला तरी अशांतलाच एक दुष्ट असुरशिखामणि होता. लुटारू बेरड होता. दुष्ट व क्रूर होता. कांहीं प्रसंगावरून त्याची व ऋजिश्व्याची झुंझ लागली व मोठा रण-

संग्राम गाजला. ऋजिश्व्यानें पिप्रूच्या राज्यांत शिरून त्याच्या नगरावर मोर्चा नेला, पिप्रूला गांठून त्यास चीत केलें व त्याचा गौळवाडा फोडून तो लुटून फस्त करून टाकला !

---

(४) **कुत्सः**— हा अंगिरस कुलोत्पन्न असून तो अर्जुनाचा मुलगा होता ( 'कुत्समार्जुनेयं' १-११-२३ ). या अर्जुनाला रुरु असेंहि म्हणत व तो राजर्षि होता. कुत्स हा महाज्ञानी असून तसाच मोठा उदार दाताहि होता. उशनाकाव्य हा त्याचा पुरोहित व त्याच्या मदतीनेंच इंद्र हा कुत्साच्या घरीं आला ( 'आवः कुत्समिन्द्र यस्मिञ्चाकन्' १-३३-१४ ). कुत्स हा एकदां विहिरींत पडला होता. त्या वेळीं त्यानें इंद्राचा मोठा धांवा केला ( 'इन्द्रं कुत्सो वृत्रहणं शचीपतिं काटे निबाळ्ह ऋषिरव्हदूतये' १-१०६-६) त्यासरशीं इंद्रानें धांवत येऊन त्याचें रक्षण केलें. या कुत्सावर इंद्राची फार मर्जी होती. तो त्याचा आवडता भक्त होता.

एकदां प्रसंग असा आला कीं त्याची व दासाग्रणी शुष्णाची लढाई जुंपली. त्यावेळीं कुत्सानें इंद्राचा धांवा केल्यावरून तो त्याच्या रक्षणार्थ धांवून आला आणि त्याच्या रथांत बसून शुष्णाशीं लढूं लागला. यावेळीं कुत्स हा स्वतः रथापुढें बसून त्याचें सारथ्य करीत होता ( 'स रन्धयत् सदिवः सारथये शुष्णमशुषं कुयवं कुत्साय' २-१९-६ ). तो जो रथ होता, तो इंद्रानेंच कुत्साला दिलेला रथ होता. त्यांत बसून इंद्रानें शुष्णाशीं संग्राम करून अखेर त्या दस्यूस रणांत लोळवून ठार मारलें व भक्ताग्रणी कुत्साचें रक्षण केलें ( 'त्वं शुष्णं वृजने पृक्ष आणौ यूने कुत्साय द्युमते सचाहन्' १-६३-३ ).

हा कुत्स, दिवोदास व आयु यांच्यांत दाट मैत्री होती. हे सर्व वैदिक राजे असून ते देवभक्त होते. कांहीं कारणावरून यांच्यांत व सुश्रवस राजांत तेढ पडून त्याचा परिणाम लढाईत झाला. तेव्हां इंद्र सुश्रवसाचा पक्ष घेऊन, कुत्सादिकांचा पराभव करून त्यांस सुश्रवसाच्या ताब्यांत दिलें ( त्वमाविथ सुश्रवसं तवोतिभिस्तव त्रामभिरिन्द्र तूर्वयाणम् । त्वमस्मै कुत्समतिथिग्वमायुं महे राज्ञे यूने अरन्धनायः' १-५३-१० ). इंद्र हा

न्यायी देव असल्यामुळें जेव्हां त्याच्या भक्तांत लढाईचा प्रसंग येई, तेव्हां तो न्यायी भक्ताचा पक्ष घेऊन त्याच्या मदतीस जात असे. अशीं उदाहरणें ऋग्वेदांत अनेक आहेत. असो. कुत्स हा राजा असून तो पहिल्या मंडळांतील ९४ ते ९८, १०१ ते १०४ व १०६ ते ११५ या सूक्तांचा द्रष्टा ऋषि आहे.

---

( ५ ) चैद्य कशुः—हा वेदी कुलांतला मोठा दानशूर राजा. हा स्वभावानें मोठा प्रेमळ व उदार असल्यामुळें त्याची प्रजा त्याच्यावर फार अनुरक्त होऊन अगदीं त्याच्या मुठींत होती.('अधस्पदा इच्चैद्यस्य कृष्टयः' ८-५-३८) व त्याच्या राज्यांत कवचधारी असे सर्वत्र शूर योद्धे होते. ('चर्मम्ना अभितो जनाः' ८-५-३८). त्यानें ब्रह्मातिथीला शंभर उंट व दहा हजार गायी दक्षिणा म्हणून दिल्या. ( चैद्यः कशुः शतमुष्ट्रानां ददत् सहस्रादश गोनाम् ' ८-५-३७ ) म्हणून चेदि राजे ज्या मार्गानें जातात त्या थोर मार्गानें कोणीच जात नाहींत. ('माकिरेना पथा गाद् येनेमे यन्ति चेदयः ' ८-५-३९ ) आणि त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ असा उदारधी दाता या पृथ्वीतलावर दुसरा कोणी नाहींच नाहीं ! ( 'अन्यो नेत् सूरिरोहते भूरिदावत्तरो जनः ' ८-५-३९ ).या उदारधी राजाचें नांव शुक असें होतें. हे चेदि लोक बुंदेलखंडाचे रहिवासी असावेत असा तज्ज्ञांचा तर्क आहे.

---

( ६ ) तुर्वशः—तुर्वश ही वैदिक आर्यांतील एक पोटशाखा असून, त्या लोकांच्या राजालाहि तुर्वश असें म्हणण्याचा परिपाठ होता. त्यांची वस्ती पंजाबांतील परुष्णी व असिक्नी (म्हणजे रावी व चिनाब) या दोन दोआबांतील सुपीक प्रदेशांत होती. देवातिथि कण्व हा त्यांचा पुरोहित असून, यांची व यदूंची मोठी गट्टी असल्याचें ऋग्वेदांतून दिसून येतें. कारण जेथें जेथें तुर्वशांचा उल्लेख आढळतो, तेथें तेथें त्यांच्याबरोबरच यदूंचाहि निर्देश प्रायः करण्यांत आलेला आहे. तेव्हां ते दोघे एकमेकांचे मित्र व सहायकर्ते असावेत असा भावार्थ ध्वनित होतो. या तुर्वशांचा राजा–यालाहि तुर्वश हेंच नांव आहे–हा इंद्र, अग्नि, अश्विन् या देवांचा

मोठा भक्त होता. इन्द्रानें त्याला अनेक वेळां अनेक प्रसंगांतून वांचविल्याचें ऋग्वेदांत नमूद आहे.

एकदा तो सुदुघा नदीच्या महापुरांत सांपडला असतां, इंद्राचा धांवा केल्यामुळें त्या प्रसंगीं तो देवराज धावून येऊन, त्यास त्या संकटांतून त्यानें पार केलें. ('त्वमपोयदवे तुर्वशायाऽरमथः सदुघाः पार इन्द्रः'५-३१-८). या वेळीं यदूहि त्या पुरांत सांपडला होता, असें या वचनावरून दिसतें. पुंनः एकदा तुर्वश व यदु हे दूर एका प्रदेशांत जाऊन तेथें अडकून पडले. त्या वेळींहि इन्द्रानें त्यांस तेथून सुरक्षित घरीं आणून पोंचविलें. ( 'य (इन्द्रः) आनयत् परावतः सुनीती तुर्वशं यदुम्' ६-४५-१ ) पुनः आणखी, एकदा असा प्रसंग उद्भवला कीं त्या वेळीं त्याच्यांत व अन्हवाय्य यांच्यांत तेढ वाढून मोठी लढाई जुंपली. त्या वेळीं देखील तुर्वशाचीं सत्कृत्यें लक्षांत घेऊन इंद्रानें त्याचा पक्ष घेऊन, त्या दुष्ट अन्हवय्याला लढाईत पराभूत करून अखेर त्यास धारातीर्थीं धूळ चारली ( 'सत्यं तत् तुर्वशे यदौ विदानो अन्हवाय्यम्' ८-४५-२७ ) याप्रमाणें अनेक वेळां इंद्रानें यदुतुर्वश या दोघांनाहि संकटांतून वांचविलें आहे. शिवाय इन्द्राप्रमाणेंच अग्नि व अश्विन् या देवांचाहि तो मोठा भक्त होता, असें ऋग्वेदांतील ८-१०-५ व १-३६-१८ या ऋचांवरून दिसतें.

असें जरी असलें तरी ही देवकृपा त्याच्यावर फार दिवस टिकून राहिली नाहीं. कारण तो जितका देवभक्त होता, तितकाच तो भांडखोरहि होता. एकदां तर असें झालें कीं, त्याच्यांत व सृंजयांत वितुष्ट माजून शेवटीं प्रकरण हातघाईवर आलें. दोघांनीं या प्रसंगीं इंद्राचा धांवा केला. पण इंद्राला पडला पेंच. कोणाकडे जावें याचें, त्याला पडलें गूढ. कारण तुर्वश जसा इंद्रभक्त तसाच नि तेवढाच सृंजयहि त्याचा भक्त. दोघांची झुंज लागली खरी पण देवाला पडली पंचाईत. पण वैदिक देवांचें वैशिष्ट्य हें कीं ते न्यायप्रिय देव आहेत. भक्तीपेक्षां न्याय हा त्यांना अधिक प्रिय आहे. म्हणून या वेळीं इंद्रानें तुर्वशाची बाजू सोडून सृंजयाचा पक्ष उचलला आणि त्या लढाईत तुर्वशाला पराजित करून त्याला सृंजयाच्या स्वाधीन केलें ( 'स सृंजयाय तुर्वशं परादात्' ६-२७-७ ).

ही एकच गोष्ट नव्हे. पुनः तसाच दुसरा प्रसंगहि आला. भरतांचें व या तुर्वशांचें जमत नसे. भरतांचा राजा हा त्या वेळीं दिवोदास हा होता. त्या दोघांमध्यें दावा भडकला व प्रकरण शेवटीं लढाईवर आलें. यावेळीं इंद्रानें दिवोदासाचा पक्ष घेऊन तुर्वशाचा पराभव केला ( पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् । अध त्यं तुर्वशं यदुम्' ९-६१-२ ). यावेळीं दिवोदासाकडून ही जी थप्पड बसली ती तो जन्मभर विसरला नाहीं. पुढें पुढें तर भरतांचें व तुर्वशांचें हाडवैरच पडल्यासारखें झालें.

पुढें दिवोदासाच्या पश्चात् त्याचा मुलगा सुदास यानें एक मोठा अश्वमेध यज्ञ करून त्यास लाजविलें. यामुळें तो फार चिडला आणि या अपमानाचें उट्टें काढण्याकरितां इतर राजांशीं व दासांशीं संगनमत करून सुदासावर चढाई केली. परुष्णीच्या तीरीं दोघांची गांठ पडून, तेथें मोठें भयंकर रणकंदन माजलें.त्यांत तुर्वशानें पुढाकार घेतला होता('पुरोळा इत् तुर्वशो' ७-१८-६ ). तुर्वशाची ही दुष्ट प्रवृत्ति इंद्रास आवडली नाहीं. तशांत ऋषिश्रेष्ठ वसिष्ठाच्या वशिल्यामुळें त्यास सुदास राजाचा पक्ष घेणें भाग पडलें आणि त्याप्रमाणें त्यानें ती बाजू घेतली. या युद्धांत कमींतकमी दहा राजांनीं सुदासाविरुद्ध भाग घेतला होता. म्हणून ही लढाई ऋग्वेदांत दाशराज्ञ युद्ध म्हणून प्रसिद्ध आहे; या लढाईंत इंद्र हा प्रत्यक्ष रणभूमीवर येऊन सुदासाचा पाठराखा झाला व त्यानें सर्व राजांचा बीमोड करून भक्त सुदासाचें त्या महत् संकटांतून रक्षण केलें ( 'त्वं (इंद्रः) धृष्णो धृषता वीतहव्यं प्रावो विश्वाभिरूतिभिः सुदासम्' ७-१९-३ ). या युद्धांत पुष्कळ राजे नाश पावले व असंख्य जीवांचा संहार झाला. पण तुर्वश हा ऐन वेळीं पाय मागें घेऊन रणांतून पसार झाल्यामुळें तो मात्र एकटा वांचला. या लढाईचा कथाभाग पुढें एका प्रकरणांत सविस्तर येणारच आहे. असो.

एकंदरींत तुर्वश हा एक मोठा प्रबल राजा असून, तो एके कालीं इंद्राचा मोठ्या कृपेंतला भक्त होता. पण पुढें तो आडमार्गास लागल्यामुळें इंद्राची त्यावरील मर्जी खप्पा झाली व अखेर अपयश पदरांत घेऊन अवशेष आयुष्य त्यास दुःखांत व अपलौकिकांत कंठावें लागलें. पुढें कालांतरानें हे तुर्वश लोक पांचालांत विलीन झाले.

**(७) तूर्वयाण:**—तूर्वयाण हा पक्थांचा राजा असून तो इंद्रभक्त होता. हे पक्थ लोक पूर्व अफगाणिस्तानांत राहणारे असून ते अश्विनीचे उपासक असल्यामुळें अश्विनींनीं त्यांचें रक्षण केलें असें ऋग्वेदांत म्हटलें आहे ('याभि पक्थमवथ:' ८-२२-१० ). येथें म्हणजे या वचनांत पक्थ हें नांव एका राजाचें आहे असें सायणाचार्य म्हणतात. पण कोठें कोठें जमातीचेंच नांव त्यांच्या राजालाहि लावण्याचा प्राचीन काळीं प्रघात असल्यामुळें पक्थ ही जमातहि असावी असें धरून चालण्यांत कांहीं गैर नाहीं. म्हणून पक्थ हें नांव राजाचें व जमातीचेंहि होतें. या पक्थाचें म्हणजे तूर्वयाणाचें व अतिथिग्व दिवोदासाचें हाडवैर असल्यामुळें पुढें दाशराज्ञ युद्धांत या पक्थांनीं दिवोदास पुत्र सुदासाविरुद्ध पुरूंच्या बाजूनें भाग घेऊन लढाई दिली. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. पुरूबरोबरच त्यांचाहि पराभव झाला ( ७-१८-७ ).

---

**(८) त्रसदस्यु:**—त्रसदस्यु हा पुरुकुलोत्पन्न असून तो पुरुकुत्साचा मुलगा होता. पुरुकुत्स हा पुरूंचा राजा होता. तो राज्यावर असतांना त्याच्या शत्रूंनीं त्याच्यावर चाल करून त्यास युद्धांत पराभव करून पकडून नेलें व पुढें बंदींत टाकलें. त्याच्या पश्चात् त्याची राणी पुरुकुत्सानी ही राज्यकारभार पाहूं लागली. त्यावेळीं तिच्या राज्यांतील पुंड लोकांनीं बंड उठविलें. तें बंड राणीला मोडतां येईना. बंडखोर लोक तिला दाद देईनात. ती मोठ्या काळजींत पडली. अशा स्थितींत सप्तर्षि हे अचानक तिच्या घरीं आले. तेव्हां तिनें त्यांचा योग्य आदरसत्कार करून आपणास पुत्र देण्याविषयीं त्यांची विनंती केली. तेव्हां त्यांनीं पुत्रप्राप्त्यर्थ तिला इंद्रावरुणांची उपासना करण्यास सांगून ते तेथून निघून गेले. पुढें तिनें त्यांच्या सांगण्याप्रमाणें इंद्रावरुणाची आराधना केली व त्यांच्या प्रसादानें तिला सुंदर पुत्ररत्न झालें. हाच त्रसदस्यु होय ('पुरुकुत्सानी हि वामदाशद्धव्येभिरिन्द्रावरुणा नमोभि:' ४-४२-९ ).

त्रसदस्यु हा मोठा झाल्यावर तो इंद्रासारखा पराक्रमी राजा झाला. तो मोठा उदार दाता असून सज्जनांचा संरक्षणकर्ता होता ( मंहिष्ठो अर्य:

सत्पतिः' ८-१९-१६ ). त्याला द्यावा पृथ्वींनीं अलोट संपत्ति दिली होती. ती त्यानें लोकांमध्यें वांटून टाकली ( 'उतो हि वां दात्रा सन्ति पूर्वा या पुरुभ्यस्त्रसदस्युर्नितोशे' ४-३८-१ ). तो धन मिळवीत असतां अश्वींनीं त्याचें रक्षण केलें ( 'याभिर्नरा त्रसदस्युमावतं कृत्व्ये धने' ८-८-२१ ). इन्द्रानें त्यास गाई व सुवर्ण दिलें ( ८-४९-१० ). या उदार राजानें सोभरीला पन्नास तरुण स्त्रिया दिल्या ( 'अदान्मे पौरुकुत्स्यः पञ्चाशतं त्रसदस्यूर्वधूनाम्' (८-१९-३६). शिवाय त्यास तीनशें दहा गायी व एक बैल दान दिला (८-१९-३७). त्याचप्रमाणें त्यानें संवरणाला पांढरे शुभ्र असे दहा घोडे दिले (५-३३-८). या त्याच्या उदार व पराक्रमी स्वभावामुळें त्याची अर्धदेवांत गणना झाली ( 'अथा राजानं त्रसदस्युमस्या वृत्रहणं ददथुरर्धदेवम्' ४-४२-९ ). तो ऋग्वेदांतील ४-४२ व ९-११० या दोन सूक्तांचा द्रष्टा ऋषि आहे.

---

(९) **दिवोदासः**—दिवोदास हा ऋग्वेदांतला एक अति प्रख्यात राजा असून, त्याचें महत्त्व वैदिक इतिहासांत फार मोठें आहे. तो अतिथींचा सत्कार करण्यांत अत्यंत दक्ष असल्यामुळें त्यास अतिथिग्व हें टोपण नांवहि पडलें व त्या टोपण नांवानेंच तो ऋग्वेदांत कोठें कोठें उल्लेखिला गेला आहे. हा वध्र्यश्वाचा मुलगा असून तो त्यास सरस्वतीच्या प्रसादानें मिळाला ('इयमददाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे' ६-६१-१). हा अग्नीचा मोठा उपासक असून तसाच मोठा शूर व पराक्रमी राजा होता. या दिवोदासाचा अग्नि हा ऋग्वेदांतल्या प्रख्यात अग्नींपैकीं एक होता. भरतांचा अग्नि, सोभरीचा अग्नि, दिवोदासाचा अग्नि, वध्र्यश्वाचा अग्नि असे हे अग्नी ऋग्वेदांत निरनिराळ्या नांवानें प्रसिद्ध होते. या अग्निनारायणानें दिवोदासाच्या उपासनेमुळें प्रसन्न होऊन त्यास सुंदर व अपार संपत्ति दिली ('त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते (प्रादाः) ६-१६-५).

दिवोदास हा राज्य करीत असतां गुंग देशावर करंज व पर्णय या दास लोकांनीं स्वारी केली. त्यास तोंड देण्याचें सामर्थ्य त्या गुंगूच्या राजाजवळ नसल्यामुळें बिचारा असहाय होऊन त्यानें दिवोदासाकडे मदतीसाठीं धांव

घेतली. तेव्हां त्या थोर व उदार राजानें त्याची विनंति मान्य करून त्याचा पक्ष घेऊन, त्या करंजपर्णय दासाग्रणींवर उलट हल्ला चढविला आणि त्यांत मोठा पराक्रम गाजवून, त्यांचा पराभव करून शेवटीं त्यांस धारातीर्थी कंठस्नान घातलें. ही कथा इंद्रानेंच खुद्द आपल्या तोंडून जगास जाहीर केली ( 'अहं गुंगुभ्यो अतिथिग्वमिष्करं इषं न वृत्रतुरं विक्षु धारयम् । यत् पर्णयघ्न उत वा करञ्जहे प्राहं महे वृत्रहत्ये अशुश्रवि' १०-४८-८ ).

एकदां असें झालें कीं हा दिवोदास, कुत्स व आयु अशा तिघानीं मिळून सुश्रवस या तरुण राजावर स्वारी केली. त्यांत देवराज इंद्रानें सुश्रवसाचा पक्ष घेतल्यानें त्या लढाईंत दिवोदासादिकांचा पराभव झाला व ते इंद्राच्या स्वाधीन बंदीवान होऊन राहिले ( 'त्वमाविथ सुश्रवसं तवोतिभिस्तव त्रामभिरिन्द्र तूर्वयाणम् । त्वमस्मै कुत्समतिथिग्वमायुं महो राज्ञे यूने अरंधनायः' १-५३-१० ). ही जी इन्द्राची मर्जी दिवोदासावर खप्पा झाली होती ती पुढें फार दिवस टिकून राहिली नाहीं. पुढें लवकरच इंद्राचा रोष उतरला व नंतर दिवोदासावर तो कायमचा खुष होऊन राहिला.

याचें प्रत्यंतर पुढें लवकरच प्रत्ययास आलें. शम्बर नांवाचा एक महा बलाढ्य असुर मोठा प्रमत्त होऊन आर्यांस फार छळूं लागला होता. तो दास कुलांतला असल्यामुळें तो आर्यांना अगदीं पाण्यांत पहात असे. आणि संधि साधून त्यांच्या गांवांत शिरून गायी व इतर पशु लांबवीत असे. शेतांतील धान्य लुटून नेत असे. अर्थात् नाना तऱ्हेनें तो त्यांना छळत असे. दिवोदासाच्या राज्यांत याप्रमाणें त्यानें पुंडगिरी माजविल्यामुळें दिवोदासांत व त्याच्यांत अत्यंत तेढ वाढून, त्याचा परिणाम लढाईंत झाला.

हा शम्बर म्हणजे कुलीतराचा पुत्र व दासांचा राजा. त्यास दास असें म्हटलें आहे ( 'अव गिरेर्दासं शम्बरं' ६-२६-५ ). कोठें त्यास दस्यू असेंहि म्हटलें आहे ( 'त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्थाप्रतीनि दस्योः' ६-३१-४ ). त्याच्या राज्यांत शंभर दगडी दुर्ग होते. तो स्वतः एका उंच पर्वत शिखरावर बळकट व दुर्गम किल्ल्यामध्यें वास करून असे. तो

मोठा बलाढ्य असून पट्टीचा रणझुंझार होता. दिवोदासहि कांहीं कमी शूर नव्हता. त्याचीहि महारथींमध्येंच गणना करण्यांत येत होती.पण या दासाग्रणी शम्बरापुढें त्याचा निभाव लागेल कीं नाहीं हा एक प्रश्नच होता; व चाणाक्ष दिवोदासानें हें लवकरच ताडून विषाची अधिक परीक्षा न करतां त्यानें ताबडतोब इंद्राकडे धांव घेतली. त्यानें आतां इंद्राचा धांवा केला व भक्तकामकल्पद्रुम इंद्र देवानें त्याच्या हाकेस ओ देऊन, त्याच्या मदतीस तो धांवून आला.

या शम्बराला इंद्राचें पाणी चांगलें माहीत होतें. म्हणून त्यास ही बातमी कळतांच उघड्या मैदानावर येऊन त्याच्याशीं दोन हात करण्याचें टाळून डोंगरी किल्ल्यांचा आश्रय घेऊन, लपून छपून गनीमी काव्यानें लढण्याची त्यानें कारवाई चालविली. इंद्रापुढें येऊन तो लढेच ना. पण छपून गनीमी हल्ले करून त्यास दमवीत असे. इंद्र त्याला सारखा शोधीत होता. पण शम्बर त्याच्या नजरेस पडेल तर ! असें एक नव्हे, दोन नव्हे, भरभक्कम चाळीस वर्षें चाललें ! पण शम्बराचा कांहीं पत्ता नाहीं ! पण हें असें किती दिवस चालणार ? अखेर इंद्रानें त्याला गांठलेंच !

त्यावेळीं स्वारी इंद्राच्या भीतीनें पर्वत शिखरावरील एका किल्ल्यांत दडून बसली होती. त्या निवासस्थानाचा पत्ता काढून इंद्र तेथें गेला व किल्ल्यांत प्रवेश करून तो निजल्यावेळीं इंद्रानें त्यास पकडलें व ओढीत ओढीत पर्वताखालीं आणून त्यास अखेर आपल्या सहस्रधारी तीक्ष्ण वज्रानें तेथें ठार केलें ( 'यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत्' २-१२-११ ). या चाळीस वर्षांच्या मोहिमेंत इंद्रानें शम्बरास शोधून काढण्याच्या कामीं एकामागून एक असे त्याचे शंभर दगडी किल्ले पाडून पार जमीनदोस्त केले ( 'शतमश्मन्मयीनां पुरमिन्द्रो व्यास्यत्। दिवोदासाय दाशुषे' ४-३०-२० )! त्या अवधींत शम्बराचे शेकडों हजारों लोक ठार मारले आणि अखेर शम्बरासुराचीहि आहुति घेतली ( त्वं तदुक्थमिन्द्र बर्हणा कः प्र यच्छता सहस्रा शूर दर्षि। अव गिरेर्दासं शम्बरं हन् प्रावो दिवोदासं चित्राभिरूती ॥ ६-२६-५ )!

याप्रमाणें त्या भक्तकैवारी देवराजानें आपला प्रताप गाजवून, भक्त

दिवोदासाचें रक्षण केलें ( 'प्रावो दिवोदासं चित्राभिरूती' ६-२६-५ ). इतकेंच करून तो थांबला नाहीं, तर त्या दासाग्रणीची जी अश्वगवादिक पशूंची अलोट संपत्ति होती, ती सर्व त्यानें दिवोदासास देऊन टाकली. ( 'आतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत्। महो धनानि दयमान ओजसा विश्वा धनान्योजसा' १-१३०-७ ). याप्रमाणें पुनः एका प्रसंगीं त्यानें यदुतुर्वश यांनाहि जिंकून त्या महत्संकटांतून दिवोदासाचें रक्षण केलें. ( 'पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम्। अध त्यं तुर्वशं यदुम्' ९-६१-२ ). असा हा वैदिक धर्मातील प्रख्यात राजा इंद्रादि देवांची भक्तिपूर्वक उपासना करून त्यांच्या कृपाप्रसादानें अनेक शत्रूंना धूळ चारून वैदिक आर्यांचें रक्षण करून ऋग्वेदांत अजरामर होऊन बसला आहे.

आतां जातां जातां एका वादग्रस्त प्रश्नाचा थोडक्यांत उलगडा करून हें दिवोदासचरित्र संपवितों. तो वादग्रस्त प्रश्न म्हणजे दिवोदासाचा बाप कोण—अतिथिग्व का वध्र्यश्व—हा होय. कांहीं पाश्चात्य पंडित व त्यांचीच अंधानुकरणवृत्तीनें री ओढणारे पुण्याचे श्रीयुत अ. ज. करंदीकर हे म्हणतात कीं दिवोदासाचा बाप अतिथिग्व हा होय. आणि सायणाचार्य व इतर भारतीय पंडित म्हणतात कीं तो वध्र्यश्व आहे, अतिथिग्व नव्हे. या प्रश्नावर थोडासा प्रकाश पाडून या प्रश्नाचा एकदाचा निकाल लावणें अत्यंत जरूरीचें आहे. तेव्हां आम्ही आमच्या परी येथें दोन शब्द लिहून खरी वस्तुस्थिति काय आहे हें वाचकांपुढें मांडूं इच्छितों. प्रश्न हा आहे कीं अतिथिग्व हें व्यक्तीचें विशेष नांव कां विशेषण. पाश्चात्य पंडितांची री ओढून श्री. अ. ज. करंदीकर आपल्या 'दाशराज्ञ युद्ध' या ग्रंथांत म्हणतात कीं अतिथिग्व हें स्वतंत्र व्यक्तीचें नांव आहे. विशेषण नव्हे. सायणाचार्य म्हणतात तें विशेषनांव नसून विशेषण आहे. अर्थात् तें एकाच व्यक्तीचें टोपण नांव आहे. करंदीकरांच्या अर्थातून असा सूर निघतो कीं 'अतिथिग्व' या नांवाची एक स्वतंत्र व्यक्ति असून, तें दिवोदासाचें पैतृक नांव आहे. म्हणजे दिवोदासाच्या बापाचें नांव अतिथिग्व हें आहे. सायणाचार्य म्हणतात तसें नाहीं.

आतां या संबंधीं ऋग्वेदांत काय प्रकार आढळतो तो प्रथम पाहूं. ऋग्वेदांत

कोठें कोठें 'अतिथिग्व दिवोदास' तर कोठें कोठें नुसतें 'अतिथिग्व' आणि कोठें कोठें नुसतें 'दिवोदास' असें म्हटलें आहे. यावरून असा निष्कर्ष काढण्यांत आला आहे कीं 'आतीथिग्व' ही व्यक्ति निराळी व 'दिवोदास' ही व्यक्ति निराळी; दोन्ही एकाच व्यक्तीचीं नांवें नाहींत. सायणाचार्य म्हणतात कीं तसें नाहीं. नांवें निराळीं असलीं तरी व्यक्ति निराळ्या नाहींत, तर एकच आहे. त्यांत एक विशेषनाम आहे व दुसरें बहुव्रीहि समासघटित विशेषण आहे. म्हणजे टोपण नांव आहे.

आतां या प्रश्नासंबंधीं विशेष खोलांत शिरण्याच्या आधीं वरील स्वरूपासारखे असलेले आजचे कांहीं दाखले येथें प्रथम देऊन मग मुख्य मुद्याच्या विवेचनाकडे वळतों. वरीलसारखा आजचा दाखला म्हणजे ' लोकमान्य टिळक ' हा दाखवितां येईल. श्री. बाळ गंगाधर टिळक हे लोकांना इतके प्रिय व मान्य झाले होते कीं, त्यांना ' लोकमान्य ' ही बहुमोल पदवी स्वयंस्फूर्तीनें लोकांनींच अर्पण केली. तेव्हांपासून बाळ गंगाधर टिळकांना केव्हां ' लोकमान्य टिळक ' तर केव्हां नुसतेंच ' लोकमान्य ' असें म्हणण्याचा प्रघात पडला. अर्थात् तो शब्द टिळकवाचक झाला. आणि त्याप्रमाणें त्यांचें नांव उच्चारतांना केव्हां ' लोकमान्य टिळक ' तर केव्हां नुसता 'लोकमान्य' असा शब्दप्रयोग करण्याची प्रथा पडली. हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ' लोकमान्य टिळक ' म्हटलें काय किंवा नुकतेंच ' लोकमान्य ' म्हटलें काय, त्यापासून निर-निराळ्या व्यक्तीचा बोध न होतां ' बाळ गंगाधर टिळक ' या एका व्यक्तीचाच बोध होतो. हें उदाहरण आज प्रत्यक्ष लोकांपुढें आहे. तसेंच 'महात्मा गांधी' घ्या. 'महात्मा' हा शब्द गांधीला लावण्याचा एवढा प्रघात पडला कीं तो शब्द आज गांधी वाचकच झाला आहे. केव्हां ' महात्मा गांधीं ' तर केव्हां नुसता ' महात्मा ' असेंच म्हणण्यांत येतें. तसें असलें तरी महात्मा म्हणजे गांधी हाच अर्थ तेथें अभिप्रेत असतो, तद्वत् 'अतिथिग्व दिवोदास म्हटलें काय किंवा 'अतिथिग्व' म्हटलें काय, दोन्हीएकच व्यक्ति सूचित करतात, तेथें पृथक्पणा नाहीं.

आतां आपण मुख्य प्रश्नाकडे वळूं. ऋग्वेदांत ' अतिथिग्व दिवोदास ',

केव्हां नुसता 'आतिथिग्व' तर केव्हां नुसता 'दिवोदास' असे शब्दप्रयोग आले आहेत, तेव्हां जेथें जेथें 'अतिथिग्व' हा एवढाच शब्दप्रयोग आहे तेथें त्याचा अर्थ काय होतो हें पाहिलें म्हणजे या प्रश्नाचा आपोआपच निकाल होतो. म्हणून त्याचा अर्थ सायणाचार्य काय करतात हें पाहणें जरूर आहे. म्हणून त्या प्रश्नांत शिरणे हें ओघानेंच प्राप्त झालें. प्रथम 'अतिथिग्व' हा शब्द घेतो व तो जेथें जेथें आला आहे तशीं दोन तीन उदाहरणें येथें उद्धृत करून तेथें त्याचा अर्थ काय लावण्यांत आला आहे हें सायणाचार्यांच्या मूळ शब्दांतच देतों म्हणजे वादास जागा राहणार नाहीं.

पहिल्या मंडळांत ५१-६ ही ऋचा आहे ती अशीः—'त्वं कुत्सं शुष्ण-हत्येष्वाविथाऽरन्धयोऽतिथिग्वाय शम्बरम्' (ऋ. १-५१-६) या वचनांत दिवोदास हा शब्द नाहीं. 'अतिथिग्वाय शम्बरम्' असें आहे व हे दोन्ही शब्द महत्वाचे आहेत. अतिथिग्वाकरितां, हे इंद्रा! तूं शम्बराला मारलेंस असा त्याचा भावार्थ आहे. येथें 'अतिथिग्वाय' याचा सायणाचार्य खुलासा करतात तो असाः—'तथा अतिथिग्वाय अतिभिर्गन्तव्याय दिवोदासाय'-अतिथीस अभिमुख होऊन जाणाऱ्या दिवोदासाला-असा सायणाचार्य येथें अर्थ करतात. यावरून 'अतिथिग्व म्हणजे दिवोदास' हा अर्थ अभिप्रेत आहे असें त्यांनीं सूचित केलें. यावरून 'अतिथिग्व' या नांवाची स्वतंत्र व्यक्ति नसून तो शब्द बहुव्रीहि समासघटित दिवोदासाचा वाचक आहे.

त्याचप्रमाणें आतां हें दुसरें वचन पहा. 'कुत्सस्यायोरतिथिग्वस्य वीरान्न्यावृणग्भरता सोममस्मै' २-१४-७ या वचनांत 'अतिथिग्वस्य दिवोदासस्य' असें सायणभाष्य असून, त्यावरून 'अतिथिग्वस्य' म्हणजे 'दिवोदासस्य' असाच अर्थ सूचित होतो, म्हणजे अतिथिग्व हा शब्द दिवोदास-बोधक आहे. तसेंच हें तिसरें उदाहरण, 'प्र तत्रे अद्या करणं कृतं भूत्कुत्सं यदायुमतिथिग्वमस्मै' (६-१८-१३) येथें 'अतिथिग्वं' याचें स्पष्टीकरण 'अतिथीनामभिगन्तारं दिवोदासं' असें करण्यांत आलें असून, त्यावरून 'अतिथिग्व' हें दिवोदासाचें टोपण नांव होतें हें स्पष्ट होतें. पुनः आणखी, 'नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन्'

( ७-१९-८ ). येथेंहि 'अतिथिग्वाय' याचा अर्थ 'पूजयातिथीन् गच्छतीत्यतिथिग्वः तस्मै दिवोदासाय ' असा करण्यांत आला आहे. यावरून दिवोदासाचें त्या वचनांत कोठेंहि नांव नसतां ' अतिथिग्व ' हा शब्द घालून त्याचा अर्थ दिवोदास असा स्पष्ट करण्यांत आला आहे. या चारहि वचनांत ' अतिथिग्व ' या नांवाचा राजा अगर व्यक्ति होती असें कोठेंच सूचित करण्यांत आलें नाहीं.

आतां जेथें दिवोदासाच्या जोडीला अतिथिग्व शब्द आला आहे, तेथें त्याचा अर्थ काय होतो हें पाहूं. पहिल्या मंडळांतील ११२ सूक्तांतील चौदावी ऋचा आहे ती अशीः—'याभिर्महामतिथिग्वं कशोजुवं दिवोदासं शम्बरहत्य आवतम्' १-११२-१४. याचें भाष्य आहे तें असें. हे अश्विनौ महांमहान्तं आतिथिग्वं अतिभिर्गन्तव्यं कशोजुवं असुरभीत्या उदकं प्रवेष्टं गन्तारं एवंभूतं दिवोदासं एतत्संज्ञक राजर्षि शम्बरस्य हनने विषयभूते याभिः ऊतिभिः आवतं अरक्षतम्' या भाष्यावरून देखील ' अतिथिग्व ' म्हणजे 'अतिथिभिर्गन्तव्यं'असाच वरीलप्रमाणें अर्थ करून तो दिवोदासास लावण्यांत आला आहे. येथें दिवोदास या नांवाचा एक राजर्षि होता, हें 'दिवोदासं' याच्यापुढें 'एतत्संज्ञकं राजर्षि' हे शब्द घालून स्पष्ट केलें आहे. शिवाय आणखी हें वचन पहा. 'मिनत् पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महिदाशुषे नृतो वज्रेण दाशुषे नृतो । अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत् ॥' ( १-१३०-७ ) येथें दिवोदास व अतिथिग्व हे दोनहि शब्द एकत्र आले असून, त्यावरून दोन निराळ्या व्यक्तींचा बोध न होतां फक्त एकाच व्यक्तीचा बोध होतो हें लक्षांत घेण्यासारखें आहे. या वचनांत 'दिवोदासाय' याचा खुलासा ' एतन्नामकाय राज्ञे ' असें स्पष्टीकरण केलें असून 'आतिथिग्वाय' याचा अर्थ उपरोक्त वचनांतील अर्थाप्रमाणेंच 'पूजार्थं अतिथिं गच्छते दिवोदासाय' असा करण्यांत आला आहे. येथें दिवोदास व आतिथिग्व असे दोन शब्द असले तरी तद्बोधक व्यक्ति एकच आहे, दोन नाहींत, हें विसरून भागणार नाहीं. हें इतकें स्पष्टीकरण सोदाहरणसहित केलेलें आम्हांस वाटतें आमच्या विधानाच्या पुष्टीकरणार्थ पुरेसें आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, अतिथिग्व या शब्दानें स्वतंत्र व्यक्तीचा बोध होत नसून, दिवोदासाचें तें उपलक्षण आहे.

येथें आणखी एक गोष्ट विचारणीय आहे, ती म्हणजे शम्बर हा शत्रु कोणाचा ? अतिथिग्व ही स्वतंत्र व निराळी व्यक्ति मानल्यास तो शत्रु अतिथिग्वाचा कां दिवोदासाचा ? येथें अतिथिग्व व दिवोदास यांस श्री. करंदीकरांच्या म्हणण्याप्रमाणें पितापुत्र मानले,वेगवेगळ्या व्यक्ति मानल्या, तर शंबराच्या वधाविषयीं विरोध येतो. इन्द्रानें शम्बराला मांरलें तें दिवोदासासाठीं कां अतिथिग्वासाठीं ? दिवोदासासाठीं म्हटलें तर 'अरन्धयोऽतिथिग्वाय शंम्बरं' अतिथिग्वासाठीं शंबर मारला–( १-५१-६ ) हें वेदवचन लटकें पडतें ! आणि अतिथिग्वासाठीं मारला असें म्हटलें तर 'यस्य त्यच्छम्बरं मदे दिवोदासाय रन्धयः' दिवोदासासाठीं शम्बर मारला– हें वचन लटकें पडतें ! मग ऋग्वेदांत परस्पर विरोधी–अर्थात् खोटीं– विधानें आहेत असें म्हणावें लागेल ! तरच या पेंचांतून सुटका ! पण तसें धाडस निदान भारतीय पंडित तरी करणार नाहींत ! आणि ही आपत्ति जर टाळावयाची झाली–वेदवचनांत सुसंगति राखावयाची झाली–तर आमच्या म्हणण्याप्रमाणें अतिथिग्व व दिवोदास या व्यक्ति पृथक न मानतां एकच मानणें,हा एवढाच एक सरळमार्ग आहे, अतएव श्री. अ. ज.करंदीकर यांचा व त्यांचे पाश्चात्य गुरुदेव यांचा 'दिवोदास हा अतिथिग्वपुत्र आहे ' हा जो सिद्धांत आहे तो अर्धवट विचाराचा व म्हणून सपशेल भ्रामक व चुकीचा आहे असें आमचें स्पष्ट मत आहे.

आतां श्री. करंदीकरांच्या दुसऱ्या सिद्धांताकडे वळतों. पाश्चात्य पंडितांचें म्हणणें उचलून धरून श्री. करंदीकर आपल्या ' दाशराज्ञ युद्ध ' या ग्रंथांत म्हणतात कीं, दिवोदासाचा बाप वध्र्यश्व हा नव्हे, अतिथिग्व हा आहे, हें विधान देखील त्याचें तितकेंच तर्कदुष्ट नि भ्रामक आहे. कसें तें पहा. प्रथम विवादविषयक मूळ ऋचाच येथें उद्धृत करून मग त्याच्या अर्थाकडे व स्पष्टीकरणाकडे वळतों. ही ऋचा ऋग्वेदांतील सहाव्या मंडळांतील एकसष्ठाव्या सूक्तांत पहिली म्हणून दाखल आहे. ती अशीः– ' इयमददाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे '–ही सरस्वती वध्र्यश्व्याला अत्यंत चलाख व ऋणापकारी असा दिवोदास देती झाली. ( ६-६१-१ ). येथें ऋणच्युत म्हणजे ऋणापकारी–अर्थात् ऋण फेडणारा–

असा सरळ सायन-अर्थ असून, पुण्याचे संशोधकप्रवीण श्री. अ. ज. करंदीकर यांनीं आपल्या सुपीक मेंदूतून ऋणच्युत म्हणजे 'कृतघ्न अथवा करभार न देणारा' अशा दिवोदासाला बध्र्यश्वानें युद्धांत पकडलें ! असा अर्थ काढला आहे ! त्याला अर्थ म्हणण्यापेक्षां अनर्थ म्हणणेंच अधिक शोभेल ! तो अर्थ त्यांनीं कशाच्या आधारावर काढला, हें मात्र त्यांनीं गुलदस्तांत ठेविलें आहे. मूळ वचनांत जें क्रियापद आहे, तें 'अद-दात्' असें असून, त्याचाच अर्थ त्यांनीं पकडला असा केला असावा. तसें जर असेल तर 'दा' चा अर्थ पकडणें हें कोणत्या कोशांत सांगि-तलें आहे, हें बरीक त्यांचें त्यानांच ठाऊक ! 'अददात्' हें 'दा' धातूचें भूतकालवाचक रूप असून, त्या 'दा' धातूचा अर्थ कोशांत 'देणें' हा आहे. 'पकडणें', 'युद्धांत धरणें' असा अर्थ मुळींच होत नाहीं. आतां 'ऋणच्युत' याचा अर्थ 'करभार नाकारणारा' अगर 'कृतघ्न' असा त्यांनीं केला आहे ! पण तो तसा कसा होतो हें मात्र तें सांगत नाहींत ! तसा अर्थ करण्यांत त्यांनीं आपल्या वैदिक संस्कृतीचें अक्षम्य अज्ञान मात्र दाखविलें आहे. ऋणच्युत याचा अर्थ सायणाचार्य करतात, तो असाः—'ऋणच्युतं वैदिकस्य देवर्षिपितृसंबन्धिनो लौकिकस्य च ऋणस्य च्यावयितारं' असा हा त्यांचा अर्थ सरळ व वैदिक भावनेला पूर्ण धरून आहे. आणि 'अददात्' याचा अर्थ 'दत्तवती' असा करण्यांत आला आहे, तोहि शास्त्राला धरूनच आहे, आणि शास्त्रशुद्ध आहे. 'जायमानो वै ब्राह्मणः त्रिभि-र्ऋणवा जायते' असें बोधायनसूत्रांत म्हटलें आहे. आणि 'ऋणं वै जायते यो अस्ति' असें शतपथांत म्हटलें आहे, आणि हें श्रुतिवाक्य आहे. मनुष्य हा जन्मतःच तीन प्रकारचा ऋणी होऊन जन्मतो. तें ऋण म्हणजे देवऋण, ऋषिऋण व पितृऋण, हें होय. आणि हें ऋण फेडणें हें प्रत्येक वैदिक आर्याचें आद्य व पवित्र कर्तव्य आहे. हीं ऋणें फेडल्याशिवाय मनुष्याला सद्गति अगर स्वर्ग लाभत नाहीं, अशी वेदाची शिकवण आहे. आणि बध्र्यश्वाला पुत्र नसल्यामुळें—अर्थात् तो कृतकृत्य झाला नसल्यामुळें—त्यानें पुत्रप्राप्त्यर्थ सरस्वतीची उपासना करून, तिच्या कृपाप्रसादानें चलाख

व पितृऋणांतून मुक्त करणारा असा पुत्र मिळविला व सरस्वतीनें तो त्याला दिला. हा अर्थ वैदिक परंपरेला धरून सरळ व युक्तच आहे. आणि हाच भावार्थ पुढील अर्ध ऋचेंत स्पष्ट करून सांगण्यांत आला आहे, तो असाः—‘ ता ते दात्राणि तविषा सरस्वति ’–हे सरस्वति ! तीं तुझीं पुत्रदानासारखीं दानें फार महत्त्वाचीं आहेत. ( हे सरस्वति ! ‘ता तानि पुत्रदानादीनि ते त्वदीयानि दात्राणि दानानि तविषा तविषाणि महान्ति भवन्ति ’ भाष्य ) जर करंदीकरांचा अर्थ ग्राह्य मानला तर त्यांनीं त्या पुढील अर्ध ऋचेचा अर्थ आपल्या मतानुसार सुसंगत व सयुक्तिक लावून दाखवावा, असें आमचें त्यांस आग्रहाचें आव्हान आहे. जोंपर्यंत ते तसें करणार नाहींत तोंपर्यंत ऋग्वेदमंत्राचे कांहीं तरी थातुरमातुर करून निभावणार नाहीं. अशीं चुकीचीं व विलक्षण विधानें त्यांच्या दाशराज्ञ युद्धग्रंथांत पदोपदीं आढळून येतात. पण त्या सर्वांचा समाचार घेण्याचें हें स्थळ नव्हे. म्हणून आम्ही त्या भरीस येथें पडूं इच्छित नाहीं.

आतां दिवोदासाचा बाप कोण याविषयीं स्वच्छ व स्पष्टच पुरावा पाहिजे असल्यास आमच्या वतीनें हा ध्या पुरावा. आम्हीं आतां पुराणाला कौल लावूं. कारण इतिहास, पुराणें हीं वेदाचीं पूरक आहेत. ( इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृहेत्–इतिहासपुराणांनीं वेदवचनाला पुष्टि द्यावी असें शास्त्रवचन आहे ) या विषयावर वायु पुराणांत वचन आढळतें तें असें:—‘वध्र्यश्वान्मिथुनं जज्ञे मेनकायामिति श्रुतिः । दिवोदासश्च राजर्षिरहल्या च यशस्विनी ॥ ( वायु पु. ९९-१०० ) या वचनांत वध्र्यश्व हा दिवोदासाचा जनक असें स्पष्ट व निःसंदिग्ध म्हटलें आहे. तसेंच हें विष्णुपुराणांतील वचनहि मननीय आहे. तें वचन म्हणजे हें— ‘ मुद्गलाद्वृद्धश्वो वृद्धश्वाद्दिवोदासोऽहल्या च मिथुनमभूत् ’ ( वि. पु. ४-१९-१६ ) हीं वचनें सूर्यप्रकाशाइतकीं स्पष्टच आहेत आणि स्पष्टच सांगतात कीं दिवोदास हा वध्र्यश्वाचा पुत्र आहे. आतां यापेक्षां आणखी स्पष्ट पुरावा तो आणखी काय पाहिजे ?

येथें आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, अतिथिग्व यास दिवोदासाचा बाप मानल्यास दिवोदासास 'आतिथिग्व'–अतिथिग्वाचा मुलगा–असें म्हणावयास पाहिजे होतें. पण तसा प्रकार ऋग्वेद-वचनांत कोठेंच आढळत नाहीं. कुशिकाच्या मुलास कौशिक, भरद्वाजाच्या मुलाला भारद्वाज, वसिष्ठाच्या मुलाला वासिष्ठ, तसेंच अतिथिग्वाच्या मुलाला आतिथिग्व असें म्हणणें युक्त होतें. पण तसें म्हटलें नाहीं. पण सुदैवाची गोष्ट ही कीं, 'आतिथिग्व' हा शब्द मात्र इतरत्र दुसऱ्या व्यक्तीला लावलेला आढळतो. तें वचन असें आहे. 'सुरथाँ आतिथिग्वे स्वाभीशूँरार्क्षे । आश्वमेधे सुपेशसः ॥' (८-६-१६) या वचनांत 'आतिथिग्वे' या शब्दाचा अर्थ 'अतिथिग्व नाम्नो राज्ञः पुत्रे' असा करण्यांत आला असून, तो अतिथिग्वाचा मुलगा म्हणजे इन्द्रोत असें तेथें स्पष्टीकरण सायणांनीं केलें आहे. असो. येथपर्यंतच्या विवेचनावरून श्री. अ. ज. करंदीकरांचें दिवोदासाविषयींचें पांडित्य व परिश्रम कसे वाया गेले आहेत, एवढें दाखवून झाल्यावर आतां हा विषय हातानिराळा करतों.

**वंशावळ नं १**

**ऋग्वेदाप्रमाणें**

भृम्यश्व (१)

|

मुद्गल (१०-१०२-) (२)

|

वध्र्यश्व (१०-१०२) (३)

|

दिवोदास (६-६१-१) (४)

|

सुदास (७-१८-२५) (५)

**वंशावळ नं. २**

वायुपुराण ( ५ )



वंशावळ नं. ३


तृक्ष
भृम्यश्व
भरत
मुद्गल
देववात
देवश्रवस्
वध्र्यश्व
दिवोदास
सृंजय
चयमान
प्रतर्दन
मित्रयु
परुच्छेप
प्रस्तोक
पिजवन
अभ्यावर्तिन्
कवि
पिजवन
सुदास
सुदास
सहदेव
सोमक.

(१०) **पुरुकुत्सः**—पुरुकुत्स हा दुर्गहाचा पुत्र असून, तो पुरूंचा राजा होता. पुरुजमात ही वैदिक आर्यांपैकींच एक उपशाखा असून त्यांची वसहत सरस्वतीच्या तीरावर वसली होती ( 'उभे यत्ते महिना शुभ्रे अन्धसी अधि क्षियन्ति पूरवः' ७-९६-२). अत्रि हा त्यांचा पुरोहित होता. ते अग्नीचे उपासक होते ( 'यं (अग्निं) पूररवो वृत्रहणं सचन्ते' १-५९-६ ). तसेच ते इन्द्रभक्तहि होते. इन्द्रासाठीं ते सोमरस तयार करीत ( 'अथ ते मानुषे जने सोमः पूरुषु सूयते' ८-६४-१० ). इन्द्राला पुरूंचा नाद फार असावा असें दिसतें. कारण तो त्यांना म्हणतो कीं पुरूनों ! माझें सख्य सोडूं नका ( 'न मे पूरवः सख्ये रिपाथनं' १०-४८-५ ). हे पुरु म्हणजे मोठे सामर्थ्यवान लोक दिसतात. त्यांचें तें सामर्थ्य इतरांना प्रलोभनीय झालें असल्यामुळें तसलें सामर्थ्य आपणासहि मिळावें म्हणून इन्द्रभक्तांनीं त्याची प्रार्थना केली आहे ( 'यत् पूरौ कच्च वृष्ण्यम्। अस्मभ्यं तद् रीरिहि' ६-४८-८ ).

पुरुकुत्स हा या पुरूंपैकींच असून तो त्यांचा राजा होता. तो दुर्गहाचा पुत्र असून पुरुकुत्सानी ही त्याची बायको व त्रसदस्यु हा त्याचा मुलगा होय. त्याची सांगण्यासारखी मुख्य गोष्ट म्हणजे वृत्रासुरवध ही होय. हा जो वृत्र तो असुर कुलांतील महाबलाढ्य व अत्यंत पराक्रमी असा एक आर्यांचा प्रबल शत्रु होता. ऋग्वेदांत जो इतिहासाचा भाग आहे, तो दस्यु व आर्य यांच्यांत परस्परावर वर्चस्व लादण्यासाठीं व गाजविण्यासाठीं चाललेल्या चुरशीचा व लढ्याचा इतिहास असें म्हटलें तरी चालेल. त्या वेळीं आर्यांशीं स्पर्धा करणाऱ्या भारतांतील रानटी व लढाऊ जमाती म्हणजे दस्यु, दास, पणी व असुर इत्यादि होत. हे अगदीं नास्तिक, नीतिभ्रष्ट व मोठे तामसी लोक असून, आर्यांना परोपरीनें छळण्याचा त्यांनीं चंगच बांधला होता. या लोकांचें पारिपत्य करून त्यांना वठणीवर आणण्याच्या कामीं देवोपासक वैदिक आर्यांनीं प्रामुख्यानें देवराज इन्द्राचें सहाय मिळवून या दुष्ट व बेरड दस्यू व दास जमातीशीं टक्कर देऊन त्यांची खोड जिरविली. यासाठीं त्यांना दीर्घकाल या शत्रूंशीं झगडत राहून, वेळीं प्रसंगीं निरनिराळे डावपेंच टाकून, त्यांना रणधूळ कशी चारली

व वठणीवर कसें आणलें, हा इतिहास मोठा मनोरंजक असून, तो भारतीय युद्धनीतीचा आदर्श नमुना आहे असें म्हटल्यास त्यांत वावगें होणार नाहीं.

यावेळीं कोणत्या राजानें कोणत्या शत्रूशीं लढून रणांत विजय मिळविला, याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन केल्यास वैदिक आर्यांच्या कर्तबगारीची वाचकांना यथार्थ कल्पना येईल, असें आम्हांस वाटत असल्यावरून त्याचा येथें फक्त नामनिर्देश तेवढाच करतों.

| वैदिक राजा | विरुद्ध | दस्यु अगर दास. |
|---|---|---|
| (१) आयु | ,, | वेश ( १०-४९-५ ). |
| (२) ऋजिश्वन् | ,, | विप्र व अंगद ( ८१-५१-५ ). |
| (३) कुत्स | ,, | शुष्ण ( २-१९-६ ). |
| (४) गुंगू | ,, | करंज व पर्णय ( १०-४८-८ ). |
| (५) त्रित | ,, | अर्बुद ( २-११-२० ). |
| (६) दभीति | ,, | चुमुरि व धुनि ( २-१५-४ ). |
| (७) दिवोदास | ,, | शम्बर ( ६-२६-५ ). |
| (८) दुर्योण | ,, | कुयव ( १-१७४-७ ). |
| (९) नमी | ,, | नमुची |
| (१०) पुरुकुत्स | ,, | वृत्र ( १-१७४-२ ). |
| (११) श्रुतवर्ण | ,, | मृगय ( १०-१९-५ ). |

या सर्व आर्य व दस्यु चकमकीमध्यें आर्यांची सरशी होऊन, अखेर अनार्यांना आर्यांचें दास्यत्व पत्करणें भाग पडलें. असो.

पुनः मूळ मुद्यावर यावयाचें तर पुरुकुत्साची पुढील हकीगत सांगणें आतां प्राप्त आहे. या पुरुकुत्साचा शत्रु म्हणजे वृत्रासुर हा होय. त्याच्याशीं लढण्याचा जेव्हां प्रसंग आला त्यावेळीं पुरुकुत्स हा तरुण होता. त्यास वृत्र दाद देण्यासारखा नव्हता. तो भारी प्रचंड असुर असून, शिवाय मोठा कपटी व दुष्ट होता. त्याच्याशीं झुंज घालण्याचें सामर्थ्य या पुरुकुत्सांत नव्हतें. तेव्हां त्यानें इंद्रोपासना करून त्यास सहायास बोलाविलें. त्याप्रमाणें इंद्र त्याच्या मदतीस आला. ही गोष्ट जेव्हां त्या वृत्रास कळली, तेव्हां त्यानें इंद्रासमोर येऊन लढण्याचें टाळलें. पण लपून छपून गनीमी

काव्यानें लढण्याचा डाव घातला. इंद्र झाला तरी मोठा प्रबल योद्धा व तसाच मोठा कावेबाज वीर ! पण वृत्राच्या डावपेचामुळें तोहि बुचकळ्यांत पडल्यासारखा झाला. वृत्राचा त्याला प्रथम थांगच लागेना. त्याला शोधतां शोधतां इंद्राची चांगलीच तिरपीट उडाली ! एक नव्हे, दोन नव्हे, तब्बल चाळीस वर्षे त्याला शोधून काढावयास लागलीं! डोंगरांत लपून छपून वृत्रानें मोहीम चालविल्यामुळें इंद्राला भारी पेंच पडला. पण अखेर त्यानें मोठ्या कौशल्यानें त्यास शोधून काढलेंच! आणि त्याला पकडून डोंगरावरून खालीं खेंचून आणून, त्याचा वज्रानें पार फन्ना उडवून टाकला ! ('यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः' १-१७४-२). आणि त्या असुराचीं सातहि नगरें उध्वस्त करून, त्यांतील सर्व संपत्ति लुटून ती पुरुकुत्सास दिली ('सप्त यत् पुरः शर्म शारदीर्दर्द्धन् दासीः पुरुकुत्साय शिक्षन्' ६-२०-१० ). याप्रमाणें महाबलाढ्य वृत्राचा वध करून इंद्र देवानें पुरुकुत्साचें रक्षण केलें. असो. याचा पुढील इतिहास त्याचा मुलगा जो त्रसदस्यु त्याच्या चरित्रांत वर देण्यांत आला असल्यामुळें हें पुरुकुत्साचें चरित्र येथेंच आटपतें घेतों.

---

(११) **विमदः**—विमद हा इंद्राचा पुत्र असून तो राजा होता. पुरुमित्राची बहीण कामद्यु नांवाची होती. तिचें स्वयंवर लागलें. तेव्हां हा विमद तेथें हजर होता. कामद्यूनें त्या स्वयंवरांत इतर राजांस सोडून या विमदासच पसंत करून त्याच्या गळ्यांत माळ घातली. नंतर तो तिला रथांत बसवून घेऊन आपल्या घरीं जात असतां, वाटेंत ज्या राजांची स्वयंवरांत निराशा झाली होती त्यांनीं कट करून, विमदावर छापा घातला व कामद्यूस पळवून नेण्याचे प्रयत्न चालविले. बिचारा विमद ! रानांत एकटाच ! कोणीच नव्हतें बरोबर मदतीला ! अशा बिकट नि असहाय स्थितींत एकटाच करणार तरी काय ?

पण धैर्य त्यानें सोडिलें नाहीं. तो मोठा प्रसंगावधानी होता. लागलीच त्यानें अश्विनींचा धांवा केला ! मोठ्या काकुळतीनें केला ! दयाळु अश्विनी देव त्या अनन्यगतिक विमदाचा धांवा ऐकून तेथें धांवून आले व त्या दुष्टांशीं लढून, कामद्यूस त्यांच्या तावडींतून सोडवून, तिला आपल्या रथांत

बसवून घेऊन सुरक्षित विमदाच्या घरीं पोंचती केली. ( 'यावर्भगाय विमदाय जायां सेनाजुर। व्यूहतू रथेन' १-११६-१ ). आणि त्या-बरोबरच त्याला रहावयास सुरक्षित असें एक सुंदर गृह दिलें ( 'विमदाय प्रचेतसा छर्दिर्वत्साय यच्छतम्' ८-९-१५ ).

विमद हा ऋग्वेदांतील दहाव्या मंडळामधील वीस ते सव्वीस सूक्तांचा ऋषि आहे.

---

(१२) सुदासः—सुदास हा भरत कुलोत्पन्न राजा असून, तो सुप्रसिद्ध दिवोदासाचा पुत्र आहे. ( 'दिवोदासं न पितरं सुदासः' ७-१८-२५ ). त्यास एके ठिकाणीं पिजवनाचा पुत्र असेंहि म्हटलें आहे ( 'पैजवनस्य दानं' ७-१८-२२ ). तो देववाताचा नातू असून वैदिक धर्माचा मोठा अभिमानी होता ( 'नप्तुर्देववतः'७-१८-२२ ). वर त्याचा बाप दिवोदास असें सांगितलें असलें तरी तो पिजवनचा पुत्र या विधानालाच अधिक पुष्टि मिळते. कारण त्याला देववाताचा नातु जो पिजवन त्याचा पुत्र (नप्तुःर्देववतः पैजवनस्य' ७-१८-२२ ) असें म्हटलें आहे. याची संगति अशी लावतां येईल. भरताचा पुत्र जो देववात ( ३-२३ ) त्याचा पुत्र सृंजय ( ४-१५-४ ). सृंजयाचा पुत्र पिजवन व पिजवनाचा पुत्र हा सुदास. यावरून सुदास हा देववाताचा पणतु लागत असून सृंजयाचा नातु ठरतो. हा असा ऋग्वेदांतील संबंध आहे. पण सायणाचार्य पुढें पंच-विसाव्या ऋचेच्या टीकेंत पिजवन म्हणजे दिवोदास ('दिवोदास इति पिजवनस्यैव नामान्तरं' ) असा अर्थ करून त्याला दिवोदासाचा पुत्रहि ठरवितात. असा प्रकार असल्यामुळें पंडितांत याविषयीं दुमत होऊन राहिलें आहे. पण या प्रश्नांत खोल शिरण्याचें हें स्थळ नसल्यामुळें त्याचा अधिक उहापोह करण्याच्या भरीस आम्ही येथें पडूं इच्छित नाहीं.

सुदास हा पिजवनाचा पुत्र असला काय अगर दिवोदासाचा असला काय एक गोष्ट निश्चित आहे कीं तो वेदकालांतला एक मोठा प्रख्यात राजा होऊन गेला. त्यानें विश्वामित्राच्या मदतीनें एक अश्वमेध यज्ञ करून, त्यांत आसमंतांतील इतर राजांवर आपलें प्रभुत्व गाजविलें. यांत विश्वा-

मित्रानें पौरोहित्य करून सुदासाकडून पुष्कळ संपत्ति मिळविली. पण पुढें काय झालें कोण जाणें, हें विश्वामित्राचें पौरोहित्य सुदासाकडे फार दिवस टिकून राहिलें नाहीं. पुढें लवकरच दाशराज्ञ महायुद्धाचा मोठा भडका उडाला त्यावेळीं सुदासाचें पौरोहित्य वसिष्ठाकडे होतें, हें सातव्या मंडळावरून स्पष्ट होतें.

सुदासाला जें एवढें महत्त्व प्राप्त झालें त्याला कारण म्हणजे दाशराज्ञ युद्ध हें होय. या लढाईत दहा राजे संगनमत करून सुदासावर चोहों-बाजूंनीं चढाई करून त्यांनीं त्यास घेरलें. ('दाशराज्ञे परित्ताय विश्वतः सुदासे इन्द्रावरुणौ अशिक्षत्' ७-८३-८ ). या प्रसिद्ध मोहिमेंत सुदासाच्या विरुद्ध लढणाऱ्या राजांत भरतांचा कट्टर शत्रु तुर्वश राजा हा पुढारी होता. ( 'पुरोळा इत् तुर्वशः'७-१८-६ ). त्याच्या पक्षांत भृगु, द्रुह्यु, श्रुत, कवष, वृद्ध, अनु, तृत्सु, चायमान कवि, वैकर्ण व भेद इत्यादि राजे असून सुदासाच्या बाजूला त्याचा तो एकटाच होता. पण त्याचे पाठीराखे ब्रह्मर्षि वसिष्ठासारखे खंबीर पुरोहित असल्यामुळें व त्यांनीं आपल्या मंत्रसामर्थ्यानें देवराज इंद्राला प्रसन्न करून सुदासाच्या जोडीला आणून उभा केल्यामुळें त्याचा त्या महायुद्धांत निभाव लागला व बचाव झाला.

ही इतिहासप्रसिद्ध लढाई परुष्णीच्या तीरावर झाली. त्या वेळीं नदीला महापूर आला होता. म्हणून परतीरावर असलेल्या सुदासावर चढाई करण्याकरतां त्याच्या शत्रूंनीं नदीचें तीर एका बाजूनें फोडिलें. ( 'दुराध्यो अदितिं स्त्रेवयन्तोऽचेतसो वि जगृभ्रे परुष्णीम्' ७-१८-८ ). याचा परिणाम असा झाला कीं तो पाण्याचा लोंढा दुर्दैवानें तें तीर फोडणाऱ्या मूर्ख शत्रूंवरच उलटला ! यामुळें शत्रु-सैन्यांत मोठी गडबड उठून जीव वांचविण्याकरतां ते सैनिक जीव घेऊन पळत सुटले. त्यांना पळतां पळतां भुई थोडीच झाली ! सुदासाला हेंच पाहिजे होतें. तो महापूर ओसरतांच त्यानें आपला घोडा पुढें घालून नदींतून पार होऊन परतीरावर आला. त्यावेळीं शत्रु पक्षाचा एक महान् नेता चायमान कवि हा त्या पाण्याच्या पुरांतून आपला बचाव करण्यासाठीं जीव घेऊन पळत सुटला होता. सुदासानें मोठी चपळाई करून त्यास गांठले व त्याच्यावर अचूक हल्ला

करून अखेर त्यास आपल्या तलवारीचें पाणी पाजून त्यास जमिनीवर लोळविलें ( 'मन्हाविव्यक्पृथिवीं पत्यमानः पशुष्काविरशयच्चायमानः' ७-१८-८ ).

याचा परिणाम असा झाला कीं, आपला एक महान् पुढारी पडला हें पाहून शत्रु सैन्याची त्या धांदलींत अधिकच गाळण उडाली व ते लोक आपला जीव बचावण्यासाठीं सैरावैरा धांवत सुटले ! ( 'भेजे पथो वर्तनिं पत्यमानः' ७-१८-१६ ). या गर्दींत आपला बेत फसला असें पाहून तुर्वश व तृत्सु हे जीव घेऊन सूं बाल्या केल्यामुळें ते सहीसलामत जिवंत सुटले ! पण तशांतच धैर्य धरून हिरिरीनें सुदासाशीं लढण्यासाठीं पुढें सरसावलेले कांहीं शत्रु राजे—म्हणजे श्रुत, कवष, वृद्ध व द्रुह्यु यांस इंद्रानें घेरलें व त्यांच्याशीं लढून एकेकास जलसमाधि दिली ( 'अध श्रुतं कवषं वृद्धमप्स्वनु द्रुह्युं नि वृणग्वज्रबाहुः' ७-१८-१२ ). या वेळीं इंद्रानें फार मोठा पराक्रम केला. अनूचे चांगले चांगले एकशें साठ वीर व द्रुह्यूचे सहा हजार सासष्ठ वीर एकजात जमिनीवर लोळविले ! ( 'नि गव्यवोऽनवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा। षष्टिर्वीरासो अधि षड् दुवोयु विश्वेदिन्द्रस्य वीर्या कृतानि ॥' ७-१८-१४ ). आणि त्याचप्रमाणें कवषादिकांचीं सात सात तटबंदींनीं बंदिस्त केलेलीं अनेक शहरें पार फोडून पाडून उध्वस्त करून टाकलीं ( 'वि सद्यो विश्वा दृंहितान्येषामिन्द्रः पुरः सहसा सप्त दर्दः' ७-१८-१३ ).

इकडे सुदास कांहीं कमी शौर्यानें लढत नव्हता. परुष्णीच्या तीरावर तळ ठोकून राहिलेल्या वैकर्णांवर हल्ला चढवून, त्यांच्यापैकीं एकवीस वीरांस आपल्या तलवारीचें चांगलें पाणी पाजलें ! या लढाईत भेदानेंहि पुढाकार घेऊन सुदासाच्या विरुद्ध चढाई केली होती. पण बिचारा अखेर तोच कामास आला ! इंद्रानें त्या कट्टर नास्तिकाला गांठून त्याची चांगली गठडी वळून टाकली ( 'प्रात्र भेदं सर्वताता मुषायत्' ७-१८-१९ ). हे जे सुदासावर चढाई करून आलेले राजे होते, ते सर्व सुदासाचा द्वेष करणारे, देवांना हविरन्न समर्पण न करणारे, इन्द्राला न मानणारे, अत्यंत उन्मत्त

बनलेले असे देवनिंदक दुष्ट होते. ( 'अर्धं वीरस्य शृतपामनिन्द्रं परा शर्धन्तं नुनुदे अभिक्षाम् । ' ७-१८-१६ ).

एकूण ही इतिहासप्रसिद्ध लढाई आस्तिक व नास्तिक, शिष्ट व दुष्ट यांमध्यें लढली जाऊन, त्यांत नास्तिक हरले व आस्तिकांचा विजय झाला. ( 'दश राजानः समिता अयज्यवः सुदासमिन्द्रावरुणा न युयुधुः'७-८३-७). अर्थात् हें सर्व पुरोहितश्रेष्ठ वसिष्ठाच्या प्रभावी मंत्रसामर्थ्यामुळें व कुशल युद्धनीतीमुळें घडून आलें. आणि भरतांवर व आर्यांवर एक मोठें संकट येऊं घातलें होतें, तें इंद्रकृपेनें टळलें ! असो.

सुदास हा मोठा देवभक्त व सन्मार्गवर्ती राजा होता. त्याच्या भक्तीनें प्रसन्न होऊन अदिति, मित्र व वरुण यांनीं त्यास रहावयास सुरक्षित असें घर दिलें ( 'यद् गोपावददितिः शर्म भद्रं मित्रो यच्छन्ति वरुणः सुदासे' ७-६०-८ ). अश्विनींनीं त्यास सुदेवी पत्नी मिळवून दिली. ( 'याभिः सुदास ऊहथुः सुदेव्यम्' १-११२-९ ). त्याचप्रमाणें इंद्रानें त्यास सर्व प्रकारची उपभोग्य संपत्ति बहाल केली ( 'इंद्र प्रायच्छद् विश्वा भोजना सुदासे' ७-१८-१७ ) आणि वसिष्ठानें त्यास दाशराज युद्धांत त्याचें पौरोहित्य पत्करून मोठा विजय प्राप्त करून दिला ( 'एवेन्नु कं दाशराजे सुदासं प्रावदिन्द्रो ब्रह्मणा वो वसिष्ठाः' ७-३३-३ ) आणि इंद्रानें त्याचें सर्वतोपरी रक्षण केलें ( 'सुदास प्रावदिन्द्रः' ७-३३-३ ). असा हा सुदास राजा दुष्टांचा पराभव करून, वैदिक इतिहासांत आपलें नांव अजरामर करून कृतकृत्य झाला ! !

---



## प्रकरण ७ वें

# ऋग्वेदांतील ख्यातनाम स्त्रिया

| | |
|---|---|
| १ अदिति ४-१८-७ | १३ रोमशा १-१२६-७ |
| २ अपाला ८-९१-७ | १४ लोपामुद्रा१-१७९-१ |
| ३ इंद्राणी १०-८६ | १५ वाघ्रिमती |
| ४ उर्वशी १०-९५-२ | १६ वसुक्रपत्नी १०-२८ |
| ५ कमद्यु | १७ विश्पला |
| ६ गोधा १०-१३४ | १८ विश्ववारा ५-२८ |
| ७ घोषा १०-३९ | १९ सरमा१०-१०८-२ |
| ८ ममता | २० सार्पराज्ञी १०-१८९ |
| ९ मुद्गलानी १०-१०२-२ | २१ शश्वती ८-१ |
| १० मेना | २२ सरण्यू १०-१७-२ |
| ११ यमी १०-१०-० | २३ सुदेवी |
| १२ रजि | २४ सूर्या १०-८५ |

यापमाणें ऋग्वेदांतील ख्यातनाम स्त्रिया असून, त्यांचा उल्लेख बृहद्देवतेंत खालीलप्रमाणें आढळतो.

'घोषा गोधा विश्ववारा, अपालोपनिषन्निषत् ।
ब्रह्मजाया जूहूर्नाम अगस्त्यस्य स्वसा अदितिः ।। ८२ ।।
इन्द्राणी चेन्द्रमाताच सरमा रोमशोर्वसी ।
लोपामुद्रा च नद्यश्च यमी नारी च शश्वती ।। ८३ ।।
श्रीर्लाक्षा सार्पराज्ञी वाक् श्रद्धा येधा च दक्षिणा ।
रात्री सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरिताः ।। ८४ ।।

बृहद्देवता

घोषा, गोधा, विश्ववारा, अपाला, उपनिषत्, ब्रह्मजाया जुहू, अगस्त्य भगिनी अदिति, इन्द्राणी, इन्द्रमाता, सरमा, रोमशा, उर्वशी, लोपामुद्रा, नद्या, यमी, शश्वती, श्री, लाक्षा, सार्पराज्ञी, वाक्, श्रद्धा, मेधा, दक्षिणा, रात्री, सूर्या, सावित्री, या सर्व ब्रह्मवादिनी अर्थात् ऋषिका होत.

---

(१) **अपालाः**—ही मोठी विदुषी स्त्री असून ती प्रख्यात अत्रि ऋषीची कन्या होती. लग्न झाल्यावर तिच्या अंगावर कुष्ठ रोगासारखा पांढरा त्वचारोग उठला होता म्हणून तिच्या नवऱ्यानें तिला टाकून दिली होती. अर्थात् ती तेथून निघून बापाच्या घरीं येऊन राहिली. तेथें आल्यावर ती जवळजवळ तापस वृत्तीनें राहूं लागली. बापाच्या घरीं असतांना तिला असें कळलें कीं इन्द्राला सोम फार आवडतो. तो त्याचा मोठा भोक्ता असून, तो रस त्याचें अत्यंत प्रिय पान आहे. तेव्हां तिच्या मनांत असें आलें कीं आपण त्याला सोमरस अर्पण करावा. या उद्देशानें त्याचा शोध करावयासाठीं म्हणून ती घराबाहेर पडली.

पुढें ती शोधीत शोधीत नदी कांठावर आली. तेथें आल्यावर नदीचें पाणी स्वच्छ झुळझुळ वाहत होतें. दिवसहि बराच वर चढला होता. तेव्हां तेथें स्नान करावयाचें असें तिच्या मनांत आलें. त्याप्रमाणें नदींत उतरून स्नान केलें. नंतर बाहेर येऊन तीरावर हळुहळूं सोम शोधीत निघाली. इकडे पहा, तिकडे पहा, असें शोधीत असतां सुदैवानें तिला लवकरच तेथें सोम मिळाला! केवढा आनंद तिचा! तो घेऊन ती घराकडे निघाली.

घराकडे येत असतां वाटेंत सोम कसा लागतो, त्याची रुचि थोडीशी पहावी म्हणून तिनें त्यांतला थोडासा तोडून तोंडांत टाकला व दांतानें चावून खात खात घराकडे चालली. दांतांतून तो चावून चघळून खात असतां जो आवाज होत होता, तो ऐकून इन्द्रास वाटलें कीं कोणीतरी येथें दगडानें सोम कुटीत आहे, म्हणून तो येथें आला व अपालेला पाहून म्हणाला, येथें दगडानें सोम कुटणें चाललें आहे असें दिसतें. पण तें कुठें चाललें आहे? तेव्हां अपाला त्याला म्हणाली, 'नाहीं, येथें दगडानें कोणी

सोम कुटत नाहीं.' इंद्र म्हणाला, मग आवाज कसला येतो ? त्याला ती उत्तरली कीं मी मात्र दांतांत तो धरून चावून त्याची चव कशी लागते हें पहात आहें. तो दांतांचा आवाज आहे, दगडाचा नव्हे. इंद्राला मी तो घरीं जाऊन त्याचा रस काढून त्याला अर्पण करणार आहें. पण आपण कोण हें मला सांगाल का ? 'मी?' इंद्र म्हणाला, 'मी इंद्र आहें!' 'आं!' अपाला आश्चर्यानें उद्गारली 'काय, आपण इंद्र ! खरंच का हें ! तर मग देवा ! ठीकच झालें ! आतां आपण मजबरोबर चलावें ! मी घरीं जाऊन आपणांस सुंदर सोमरस तयार करून देतें. लोक सांगतात कीं आपणास सोमरस फार आवडतो. त्यासाठीं आपण घरोघर फिरत असतां. तर मग माझ्याबरोबर चला कीं ! तुम्हाला सोमहि देतें व त्याबरोबरच लाह्या व करंभहि देतें. लाह्या व करंभ खा व वर सोम प्या ! देवा ! नाहीं म्हणूं नका ! मी स्त्री झालें म्हणून काय झालें ? माझी शुद्ध भक्ति व निष्ठा इकडे पहा, व माझा सोम ग्रहण करून मग परत जा ! देवा ! नाहीं म्हणूं नका ! चला मजबरोबर घरीं !'

इंद्र त्या अबलेची ती शुद्ध व सरळ भक्ति व निष्ठा पाहून मनांत फार संतोषला. इतक्यांत ती पुन: म्हणाली 'देवा ! घरापर्यंत तरी कशाला ! मी आपल्या शुद्ध दांतानें इथेंच सोमरस काढून देतें. तो घ्या व तुष्ट व्हा !' असें म्हणून तिनें तोंडांत सोमवल्लि घालून तिचा चावून चावून तेथेंच रस काढला व तो इंद्राला दिला ! व भक्तिवश इंद्रानें तो मोठ्या प्रेमानें प्राशन केला ! नंतर ती त्याला घरीं घेऊन जाऊन त्याला अपूप, सत्तूच्या लाह्या व करंभ खावयास देऊन वर सोमरसहि प्यावयास दिला. इंन्द्रानें ते सर्व पदार्थ खाल्ले आणि सोम प्राशन केला व त्याची पूर्ण तृप्ति झाली ! अपालेची ती भक्ति व देवनिष्ठा पाहून देवराज प्रसन्न झाला व तिला म्हणाला—'अपाले ! सांग ! मी तुझें काय बरें करूं तें सांग ! तूं मागशील तें मी तुला देतों !! मनांत कसलाहि किंतु बाळगूं नकोस ! माग, काय तुला पाहिजे तें माग ! तें मी तुला देईन ! अपाले ! खात्रीनें देईन !'

हें इंद्राच्या तोंडून भाषण ऐकून अपालेला परमावधीचा आनंद झाला हें काय आतां उघड सांगावयास पाहिजे ? ती फार चतुर स्त्री होती.

ती म्हणाली 'देवराज ! आपण देणारच असला तर मला हें द्या !' 'काय देऊं ?' इंद्र म्हणाला ' काय पाहिजे तुला ? काय तुझी इच्छा आहे ? वाटेल तें व वाटेल तितकें माग ! तें सर्व तुला मी देईन ! '

स्मित हास्य करून अपाला म्हणाली–' देवा ! प्रथम मला हें द्या कीं, माझ्या बापाच्या डोक्याला टक्कल पडलें आहे तें नीट केशयुक्त व्हावें.' इंद्र म्हणाला, होईल ! आणखी काय इच्छा ? आपाला म्हणाली–'माझ्या बापाची जमीन अगदीं नापीक झाली आहे, ती देवा! चांगली सुपीक व्हावी !' इंद्र म्हणाला–' जा ! ती सुपीक झाली ! आणखी कांहीं ? ' तिसऱ्यांदा अपालेनें वर मागितला तो हा–'देवा ! आतां मी शेवटचें मागणें मागतें.' इन्द्र म्हणाला–'ती काय ?' अपाला म्हणाली–' देवा ! माझ्या पोटाचा खालचा भाग रोमयुक्त व्हावा, म्हणजे माझ्या उदरीं संतान नाहीं ! ती माझी इच्छा आहे ! मला मुलेंबाळें होऊन मी लेंकुरवाळी व्हावी, असें मनांत फार फार भरून येतें. पण पतीच्या रोषाला मी पात्र झालें आहे. तो रोष जाऊन मी त्याला प्रिय व्हावें, तर, देवा ! ती माझी इच्छा पूर्ण व्हावी ! !' इंद्र म्हणाला–'ठीक आहे. तेंहि घडून येईल ! !'

इंद्रानें तिचे तीनहि वर पूर्ण केले. अर्थात् तिसरा वर पूर्ण होण्याला एक अडचण होती. तिला कुष्ठ असल्यामुळें नवऱ्यानें तिला टाकून दिली होती. ती अडचण ध्यानांत घेऊन तिला जवळ घेऊन तो रोग घालविण्यासाठीं तिचें शरीर आपल्या रथाच्या मोठ्या भोंकाशीं व शकटाच्या लहान भोंकाशीं तीन वार घासून तें निर्दोष केलें ! आणि तिची शरीरकांति सूर्याप्रमाणें तेजस्वी केली ! ! (शाठ्यायन ब्राह्मण ८-९१-१ ते ७).

याविषयीं ऋग्वेदांत मजकूर आढळतो तो असाः—

'कन्या३ वारवायती सोममपि स्रुताविदत् ।
अस्तं भरन्त्यब्रवीदिन्द्राय सुनवै त्वा शक्राय सुनवै त्वा ॥ १ ॥
असौ य एषि वीरको गृहंगृहं विचाशकत् ।
इमं जम्भसुतं पिब धानावन्तं करम्भिणमपूपवन्तमुक्थिनम् ॥२॥
इमानि त्रीणि विष्टपा तानीद्र वि रोहय ।
शिरस्ततस्योर्वरामादिदं म उपोदरे ॥ ५ ॥

असौ च या न उर्वरादिमां तन्वं मम ।
अथो ततस्य यच्छिरः सर्वा ता रोमशा कृधि ॥ ६ ॥
खे रथस्य खे अनसः खे युगस्य शतक्रतो ।
अपालामिन्द्र त्रिष्पत्व्यकृणोः सूर्यत्वचम् ॥ ७ ॥

( ऋ. ८-९१ १ ते ७ )

ही जी अपालेची कथा आहे ती वाचून रामायणांतील शबरी व श्रीरामचंद्र यांच्या कथेची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. अपालेनें आपल्या तोंडांतील रस भक्तिभावपूर्वक अर्पण करून इंद्राला जसें प्रसन्न केलें, तसेंच शबरीनेंहि अरण्यांतील बोरें आपल्या दातानें चावून तीं मधुर आहेत अशी आपली खात्री झाल्यावर तीं रामास खावयास दिलीं व रामानें त्या शबरीचा शुद्ध भाव पाहून तीं खाल्लीं. यावेळीं शबरी रामास म्हणते ती कथा कवितेंत देण्यांत आली आहे ती अशीः—

‘ म्यां आपुल्या चावुनि शुद्ध दांतें ।
चाखोनी घे मी शिवते पदाते ॥
मधुरतर फळाची पूर्ण घेऊनि गोडी ।
मज मग रघुनाथा ठेवितां होय खोडी ॥
निरखुनि रघुरायें भाव त्या भिल्लणीचा ।
परम मनीं सुखावें नाथ तो जानकीचा ॥
प्रेमें प्रेमभरें प्रसन्न हृदये भक्ताजनांचा पिता ।
आत्माराम रमापति निजमुखें झाला फळें ओपिता ॥ ’

वरील अपालेचें व हें शबरीचें आख्यान यांतील साहश्य पाहून ‘ देव भावाचा भुकेला ’ या संतवचनाची आठवण होत नाहीं काय ? असो.

या अपालेचा इतिहास बृहद्देवतेंत आला आहे तो असाः—

अपालात्रिसुता त्वासीत् कन्या त्वग्दोषिणी पुरा ।
तामिन्द्रश्चक्रमे दृष्ट्वा विजने पितुराश्रमे ॥ ६-९९ ॥
तपसा बुबुधे सा तु सर्वमिन्द्रचिकीर्षितम् ।
उदकुम्भं समादाय अपामर्थे जगाम सा ॥ ६-१०० ॥

दृष्ट्वा सोममपामन्ते तुष्टावर्चा वने तु तम् ।
कन्या वारिति चैतस्यामेषोऽर्थः कथितस्ततः ॥ ६-१०१ ॥
सा सुषाव मुखे सोमं सुत्वेन्द्रं चाजुहाव तम् ।
असौ य एषीत्यनया पथाविन्द्रश्च तन्मुखात् ॥ ६-१०२ ॥
अपूपांश्चैव सक्तूंश्च भक्षयित्वा स तद्गृहात् ।
ऋग्भिस्तुष्टाव सा चैनं जगादैनं तृचेन तु ॥ ६-१०३ ॥
सुलोमामनवद्याङ्गीं कुरु मां शक्र सुत्वचम् ।
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा प्रीतस्तेन पुरंदरः ॥ ६-१०४ ॥
रथछिद्रेण तामिन्द्रः शकटस्य युगस्य च ।
प्रक्षिप्य निश्चकर्ष त्रिः सुत्वक् सा तु ततोऽभवत् ॥ ६-१०५ ॥
तस्यास्त्वगपहृता या पूर्वा सा शल्यकोऽभवत् ॥
उत्तरा त्वभवद्गोधा कृकलासस्त्वगुत्तमा ॥ ६-१०६ ॥

( बृहद्देवता ६-९९ ते १०६ )

(२) उर्वशी—उर्वशी ही गंधर्व लोकांतील एक प्रख्यात अप्सरा. सुंदरांतली अत्यंत सुंदर ! ती एकदां सहज या मृत्युलोकीं आली व येथें आल्यावर येथील निसर्ग शोभा पाहाण्यासाठीं म्हणून इकडे तिकडे फिरत असतां अकस्मात राजा पुरूरवा तिच्या दृष्टीस पडला ! केवढा सुंदर पुरुष तो ! खरोखर मदनाचा पुतळाच! तिची दृष्टी सहज त्याच्यावर पडली.पडली म्हणजे काय, खिळलीच तेथें! तरुण राजबिंडा,अत्यंत तेजस्वी व रूपसुंदर! मग खिळणार नाहीं तर काय होईल ? सुंदर व तरुण पुरुषावर सुंदर व तरुण स्त्रीची दृष्टी खिळणार नाहीं तर त्या तारुण्याचा महिमा तो काय ? कांहीं जरी असलें तरी येथें उर्वशीचें—त्या अप्सरेचें—मन विरघळलें ! मग काय ? अप्सरेचा तोल सुटला ! व ती कामवश झाली ! आणि अखेर अशा प्रियदर्शनाचा परिणाम व्हावयाचा तो झाला ! !

पुरूरव्यानें तिला जवळ बोलाविली व ती त्याच्याजवळ गेली. दोघांचें कांहीं हितगुज चालून शेवटीं तीन अटींवर तिनें त्याच्याजवळ राहण्याचें

कबूल केलें. पहिली अट म्हणजे त्यानें तिला दिवसांतून फक्त तीनच वेळां आलिंगावयाचें; दुसरी अट अशी कीं तिच्या सम्मतिशिवाय तिच्याजवळ निजावयाचें नाहीं; आणि तिसरी ही कीं एकांताशिवाय इतर वेळीं त्यास केव्हांहि तिनें नग्न स्थितींत पहावयाचें नाहीं ! यांत कोणतीहि एखादी अट मोडली गेल्यास मग उर्वशी ही त्याची कोणीच नव्हे ! मग ती स्वतंत्र झाली. या सर्व अटी राजानें कबूल केल्यावरून ती त्याच्याजवळ रहावयास तयार झाली.

पुढें ती त्या पुरुरव्याच्या सहवासांत व राजविलासांत इतकी रंगली कीं तिला गंधर्व लोकाचें अजिबात विस्मरण झालें. ती आपली पूर्वस्मृति सगळीच विसरून पुरूरव्याच्या सहवासांत पूर्ण रंगून गेली. तिला हें विस्मरण झालें हें खरें, पण गंधर्व कोठले तिला विसरायला ? पुष्कळ दिवस ती त्यांना दिसली नाहीं, म्हणून त्यांच्यांत चर्चा सुरू झाली व अखेर त्यांना असें कळलें कीं ती मृत्युलोकांत पुरूरव्याजवळ रंगली आहे. तेव्हां त्यांनीं तिला तेथून हलविणेचा बेत केला.

कांहीं कांहीं स्त्रिया मोठ्या नादिष्ट असतात. त्यांतलीच उर्वशी हीहि एक होती. तिला मूल नव्हतें म्हणून जवळ दोन गोजिरवाणीं कोंकरें बाळगून त्यांच्यावर ती मुलाची हौस पुरवून घेत असे. अर्थात् तीं कोंकरें म्हणजे तिचे जणु कांहीं जीव कीं प्राण ! क्षणभर देखील ती त्यांना विसंबत नसे.

एके दिवशीं रात्रीं ती पलंगावर निजली असतां कोणीतरी तिच्या महालांत शिरून तीं तिच्या शेजारी निजलेलीं कोंकरें पळवून नेलीं. कोंकरें ओरडूं लागलीं म्हणून ती जागी झाली. आणि तेथें हात फिरवून पाहते तर तेथें कोण ? कोंकरें कांहीं दिसेनात. तेव्हां तिनें आरडाओरडा केला. तो ऐकून शेजारच्या दालनांत झोंपलेला पुरूरवा जागा झाला व काय भानगड आहे म्हणून तसाच बाहेर धांवत आला. यावेळीं तो नग्न होता. बाहेर येतांना गडबडींत धोतर गुंडाळण्याचें विसरला. उर्वशीजवळ येऊन 'काय भानगड आहे' असें तो विचारूं लागला.

ते जे चोर होते, ते दुसरे तिसरे कोणी नसून प्रत्यक्ष गंधर्वच होते ! त्यांनीं तो प्रसंग साधून तेथें पुरूरव्यावर चक्क प्रकाश पाडला. झालें !

उर्वशीनें त्याला नग्न स्थितींत पाहिलें ! करार मोडला आणि ती आतां स्वतंत्र झाली. पुरूरव्याला याची आठवण देऊन क्षणाचाहि विलंब न करतां विजेसारखी तेथून ती चालती झाली ! पुरूरवा हा सर्व प्रकार पाहून आश्चर्यचकित झाला ! हें काय झालें नि कसें झालें याचें त्याला कांहींच समजलें नाहीं. त्याची स्थिति मोठी चमत्कारिक झाली ! बुद्धि भांबावली व मन बेचन झालें !

उर्वशी आपली थट्टा करीत आहे असा समज करून घेऊन, तो तिला 'उर्वशी, ए उर्वशी' म्हणून इकडे तिकडे शोधूं लागला. पण उर्वशी त्याला आतां कोठली भेटायला ! ती केव्हांच येथून पसार होऊन गंधर्व लोकांत जाऊन बसली होती ! अरेरे ! बिचारा पुरूरवा ! आतां त्याला खरोखर तिचें वेड लागलें ! घरदार सोडून 'उर्वशी, ए उर्वशी' म्हणत रानावनांत भटकूं लागला ! सर्व कुरुक्षेत्र त्यानें पालथें घातलें. पण तिचा कांहीं पत्ता नाहीं.

याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर तेथें एका सरोवराच्या कांठावर फिरत असतां, एका अप्सरेच्या घोळक्यांत ती उर्वशी त्यास अकस्मात दिसली. त्या अप्सरा तेथें जलविहार करण्याकरतां म्हणून आल्या होत्या. उर्वशीला पाहतांच 'ए उर्वशी' म्हणून तो तिला मिठी मारावयास गेला. पण ती बाजूला सरकून म्हणाली, 'पुरूरव्या ! आतां मी तुझी कोणी नाहीं ! जा ! घरीं जा आणि सुखानें रहा ! असा वेड्यासारखा फिरूं नकोस ! '

तो म्हणाला, तुला सोडून कोठें ग जाऊं ? प्रिये, उर्वशी ! तूं म्हणजे माझा प्राण ! किती प्रेमळ तूं ! मग अशी दुष्ट कां झालीस ! माझी सखी ना तूं !' त्याला उर्वशी म्हणाली,–'पुरूरव्या ! किती वेडा आहेस तूं ! आम्हा स्त्रियांचें सख्य हें सख्यच नव्हे ! ('न वै स्त्रैणानि सख्यानि' १०-९५-१५) किती बावळट आहेस तूं ! आमचें हृदय म्हणजे लांडग्यांचें हृदय होय ! ( 'सालवृकाणां हृदयान्येता' १०-९५-१५ ) हें अजून तुला कसें कळत नाहीं ? जा ! आतां जा ! माझी आशा सोड नि पुढील उद्योगास लाग ! जा ! जा !!'

उर्वशी इतकें बोलून गेली खरी ! पण तिला त्याची शेवटीं दया आली ! पुनः ती त्याला म्हणाली, 'पुरूरव्या मी जर तुला हवी असलें तर असें

कर. उद्यां गंधर्व येथें येतील व तुला काय पाहिजे म्हणून विचारतील. तेव्हां त्यांना सांग कीं मला उर्वशीजवळ राहावयाचें आहे. मग ते सांगतील तसें कर. म्हणजे तुझी इच्छा सफल होईल.

दुसरे दिवशीं गंधर्व आले व पुरूरव्यानें आपली मनीषा त्यांच्यापुढें व्यक्त केली. तेव्हां ते म्हणाले, या देहानें तुला गंधर्व लोकीं येतां येणार नाहीं. तर हा अग्नि घे व त्यांत हवन कर! म्हणजे तूंहि आमच्यासारखाच व आमच्यांतलाच एक होशील! असें सांगून ते तेथून निघून गेले व पुरूरवा तो अग्नि व उर्वशीच्या उदरीं त्याच्यापासून झालेला मुलगा–हाच ययाति राजा–घेऊन, परत आनंदानें घराकडे परतला. (शतपथ–११-५-१)

पुरूरवसि राजर्षावप्सरास्तूर्वशी पुरा ।
न्यवसत्संविदं कृत्वा तस्मिन्धर्मं चचार च ।। ७-१४७ ।।
तया तस्य च संवासमसूयन् पाकशासनः ।
पैतामहं चानुरागं इन्द्रवच्चापि तस्य तु ।। ७-१४८ ।।
स तयोस्तु वियोगार्थं पार्श्वस्थं वज्रमब्रीत् ।
प्रीतिं भिन्द्धि तयोर्वज्र ममचेदिच्छसि प्रियम् ।। ७-१४९ ।।
तथेत्युक्त्वा तयोः प्रीतिं वज्रोऽभिनत्स्वमायया ।
ततस्तया विहीनस्तु चचारोन्मत्तवन्नृपः ।। ७-१५० ।।
चरन्सरसि सोऽपश्यदभिरूपामिवोर्वशीम् ।
सखीभिरभिरूपाभिः पंचाभिः पार्श्वतो वृताम् ।। ७-१५१ ।।
तामाह पुनरेहीति दुःखात्सा त्वब्रवीन्नृपम् ।
अप्राप्याहं त्वयाद्येह स्वर्ग प्राप्स्यासि मां पुनः ।। ७-१५२ ।।
( बृहद्देवता ७-१४७–१५२ )

(३) घोषाः—घोषा ही कक्षीवानाची कन्या. पण दुर्दैवानें ती कुष्ट रोगी होती. म्हणून तिला पत्नी करून घेण्यास कोणीहि तयार होईना. होतां होतां तिचें तारुण्य उलटून गेलें. पण तिला पतिलाभ होण्याचें चिन्ह दिसेना.

इतर स्त्रियांप्रमाणें तिच्या नशीबीं संसारसुख अनुभवण्याचें भाग्य नसून, पतिहीन व पुत्रहीन राहून संन्यास वृत्तीप्रमाणें नीरस आयुष्य कंठणें हें तिला अत्यंत तापदायक झालें. ती मनांत पुष्कळ विचार करी, पण उपाय कांहीं तिला सुचेना. पण पुढें तिला एक आशेचा किरण दिसला. तो म्हणजे अश्वींचा धांवा. मागें आपल्या बापाला तो जरठ झाला असतां पुन: त्यांनीं त्याला तरणाजवान केला होता, याची तिला आठवण होऊन त्यांची उपासना केल्यास आपला कार्यभाग साधेल ही आशा तिच्यांत अंकुरली. त्याप्रमाणें तिनें त्यांचा धांवा केला आणि त्यानें ते अश्वीदेव प्रसन्न होऊन तिच्याजवळ आले. तेव्हां ती त्यांना म्हणाली:–हे अश्वीदेव हो! तुमच्या कृपेनें या घोषेला कन्याकाम पति प्राप्त होवो ( 'जनिष्ठ योषा' १०-४०-९ )! व त्यासाठीं तिचें हें म्हातारपण जाऊन तिला पुनः तारुण्य प्राप्त होवो! ( 'अस्मा अन्हे भवति तत् पतित्वनम्' १०-४०-९ ). अहो देवहो! मी तुमच्या कृपेनें प्रपंचसुखाची इच्छा करीत आहे ( 'युवोरहमवसा सुम्नमा चक्रे' १०-४०-७ ). स्त्रिया प्रेमभरांत पतीस आलिंगून त्यास सुख देतात म्हणे! ( मयः पतिभ्यो जनयः परिष्वजे' १०-४०-१० ). तें सुख देवा! मी जाणत नाहीं ( 'न तस्य विद्म' १०-४०-११ ). तें तुम्ही मला चांगलें समजावून सांगा ( 'तदुषु प्र वोचत्' ). तरुण पति तरुण स्त्रीच्या प्रेमालिंगनांत तन्मय होतात असें म्हणतात ( 'युवा ह यद्युवत्याः क्षेति योनिषु' १०-४०-११ ). मी माझ्यासारख्या पत्नीवर प्रेम करणाऱ्या सुदृढ व तरुण पतीच्या घरीं जाऊं इच्छितें. तर हे देवहो! तें घर तुम्ही मला मिळवून द्या! ('प्रियोस्रियस्य वृषभस्य रेतिनो गृहं गमेमाश्विना तदुश्मसि' १०-४०-११ ). मी पतीला आवडती होईन असें करून मला पतिगृहीं नांदूं द्या! ( 'प्रिया अर्यम्णो दुर्या अशीमहि' १०-४०-१२ ). माझ्या मनांत वेडेवांकडे विचार येतील, ते सर्व नष्ट करा ( 'अप दुर्मतिं हतम्' १०-४०-१३ )! अहो अश्वीहो! घोषा याप्रमाणें तुमची प्रार्थना करीत आहे. ती माझी प्रार्थना ऐका! बांधवांस सोडावयास लावणारी मूर्खपणाची व अयोग्य भावना माझ्यांत डोकावूं पाहते, तर तिच्या आधींच मला तारा! व मातापित्याप्रमाणें मला सदुपदेश करा! (१०-३९-६) याप्रमाणें आश्वि-

देवांची तिनें मोठ्या कळकळीनें करुणा भाकली. अश्विदेव प्रसन्न झाले व त्या म्हातारी होत चाललेल्या घोषेला रोगमुक्त करून व तिला तारुण्य देऊन तिला तिच्या मनाजोगता पति मिळवून दिला ('घोषायै चित् पितृषदे दुरोणे पतिं जूर्यन्त्या अश्विनावदत्तम्' १-११७-७ ). यापुढें घोषा आपल्या पतीबरोबर सुखाचा संसार करून त्या संसारसुखांत सुहस्ति नांवाचा मुनितुल्य पुत्र मिळविला.

आसीत्कक्षीवती घोषा पापरोगेण दुर्भगा ।
उवास षाष्टिं वर्षाणि पितुरे व गृहे पुरा ।। ७,४२ ।।
आतस्थे महतीं चिन्तां न पुत्रो न पतिर्मम ।
जरां प्राप्ता मुधा तस्मात् प्रपद्येऽहं शुभस्वती ।।
'स्तुतौ तावश्विनौ देवौ प्रीतौ तस्या भगन्तरम्' ।।७-४७ ।।
प्रविश्य विजराऽरोगां सुभगां चक्रतुश्च तौ ।
भर्तारं ददतुस्तस्यै सुहस्त्यं च सुतं मुनिम् ।। ७-४६' ।।

( बृहद्देवता ७-४२-४३ व ४६-४७ ).

(४) **मुद्गलानीः**—मुद्गलानी ही भर्म्यश्वाचा पुत्र जो मुद्गल त्याची बायको. ही प्रख्यात नलराजाची मुलगी. तिचें माहेरचें नांव इंद्रसेना ( 'मुद्गलानी गविष्टौ भारे कृतं व्यचेदिन्द्रसेना' ( ऋ. १०-१०२-२ ) ही नलाची मुलगी म्हणून इला नालायनी असेंहि म्हटलें आहे. ( वनपर्व, ३-५७-४६ ). ही मोठी शूर असून, सारथ्य करण्यांत मोठी चतुर होती. ही सारथ्य विद्या तिला बापाकडून म्हणजे नलराजाकडून मिळाली होती. नलराजा हा सारथ्य कर्मांत मोठा कुशल होता हें सुप्रसिद्ध आहेच. असो.

मुद्गल गोधनानें फार संपन्न होता. त्याच्याजवळ चांगल्या दुभत्या गाई व उत्तमोत्तम खोंड व बैल होते. या पशुधनावर चोरांची नजर बसून एके दिवशीं संधि साधून त्यांनीं तें सर्व गोधन लुटून नेलें. ही बातमी मुद्गलास लागतांच ताबडतोब तो त्यांचा पाठलाग करावयास तयार झाला. पण रथास जुंपावयास कांहींच साधन नव्हतें. सर्व गाई, घोडे, बैल चोरांनीं

पळवून नेले होते. त्यास मोठी पंचाईत पडली. पण सुदैवानें एक म्हातारा बैल तेवढा चोर सोडून गेले होते. तो बैल घेऊन एका बाजूस रथास जुंपला. पण दुसऱ्या बाजूस जुंपण्यास कांहींच नव्हतें. तेव्हां दुसऱ्या बाजूला एक भरीव मुद्गर जोडून चोरांचें पारिपत्य करून गाई परत आणण्यास म्हणून निघाला.

त्यावेळीं त्याची बायको मुद्गलानी ही त्याचें सारथ्य करण्यास रथांत पुढें येऊन बसली. रथांत पुढें येऊन बसल्यावर बैलाला पुनः पुन: ओरडून त्याला उत्तेजन देत तिनें रथ जोरानें हाकण्यास सुरवात केली. तिच्या प्रोत्साहनानें बैल इतक्या वीरावेशानें पळत होता कीं, त्या वेगानें तिचें वस्त्र वाऱ्यानें सारखें उडत होतें. यावेळीं ती मुद्गलाची जणू कांहीं सेनानीच होती, ( 'उत्स्म वातो वहति वासो अस्या अधिरथं यदजयत्सहस्रम्। रथीरभून्मुद्गलानी गविष्टौ भरे कृतं व्यचेदिन्द्रसेना ॥ १०-१०२-२ )

चोरांना गांठल्यावर मुद्गलानें शौर्यानें लढून त्या गायी परत मिळविल्या. मुद्गलानीनें त्या शत्रूपासून मुक्त करून आपल्याकडे घेतल्या.

(५) **यमी**—त्वष्टयाला त्रिशिरस हा मुलगा व सरण्यू ही मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं. सरण्यु ही उपवर झाल्यावर त्यानें तिला विवस्वान राजास दिली. पुढें तिला त्याच्यापासून यम व यमी असें जुळें भावंड झालें. पुढें तीं दोघीं बहीणभाऊ एकत्रच वाढलीं व एकत्रच नांदूं लागलीं. ( 'अभवन्मिथुनं त्वष्टुः सरण्यूस्त्रिशिराःसह । स वै सरण्यूं प्रायच्छत्स्वयमेव विवस्वते ॥ ६-१६२ ॥ ततः सरण्यां जज्ञाते यमयम्यौ विवस्वतः । तौ चाप्युभौ यमावेव ज्यायांस्ताभ्यां तु वै यमः ॥ १६३ बृहद्देवता. ६-१६२ व १६३ ).

पुढें यमी चांगली वयांत आल्यावर तिच्या मनांत पुरुष-सुखेच्छा उत्पन्न होऊन, पुढें ती अनावर झाल्यामुळें एके दिवशीं ती आपल्या भावाजवळ येऊन आपली रतिसुखेच्छा पूर्ण करण्यास त्यास एकांतांत नेऊन विनवूं लागली. त्यावेळचा त्या बहीण-भावंडांचा संवाद मनोरंजक व मननीय आहे. म्हणून तो आम्ही येथें भावार्थ रूपानें उद्धृत करून दाखवितों.

योग्य संधि साधून यमी ही आपल्या भावाजवळ आली व त्याला प्रेम-प्रवृत्त करण्याच्या इराद्यानें म्हणाली—यमा ! हें स्थळ किती एकांत व प्रशांत आहे बरें ! तसेंच मोठें प्रसन्नहि आहे ! नाही कां ?

यम म्हणाला—होय, आहे खरं !

यमी—आतां मी या अशा प्रशांत स्थळीं व प्रसन्न वेळीं येथें माझ्याशीं प्रेमप्रसंग करण्यासाठीं माझ्या सख्याला विनविलें तर तें अयोग्य होईल काय? यमा ! मला उत्तम सुलक्षण व गुणवान पुत्र व्हावा म्हणून माझ्याशीं प्रेमसंग करून तूं पितृपद मिळवूं इच्छित नाहींस काय ? होशील कां तूं माझा प्रेमसखा ? ( १०-१०-१ )

यम—छट् ! यमे ! हें तूं काय बोलत आहेस ? कुणाला बोलत आहेस? मी तुझा भाऊ ना ? आपलें भावा-बहिणीचें पवित्र नातें आहे ना ? मग हें तूं काय बोलत आहेस ! मी तुझा सखा खरा. पण तूं म्हणतेस तशा-तऱ्हेची मैत्री मी तुझ्याशीं करूं इच्छित नाहीं ! कारण आपलें हें आतां जें समान नातें आहे तें मग विषम होऊन बसेल. देव हे द्यावा पृथ्वीला धारण करीत असून ते सर्वत्र पाहात असतात. देवाचें भय तुला वाटत नाहीं काय ? (१०-१०-२ )

यमी—यमा ! अजून तुला कळत कसें नाहीं ? देव झाले म्हणून काय झाले ! ते झाले तरी मनुष्याला त्याज्य वाटणारी गोष्ट करतातच कीं नाहीं ? प्रजापतीनें काय केलें ? म्हणून म्हणतें तुझें मन माझ्या मनाशीं समरस होवो ! आणि त्या प्रजापतीप्रमाणेंच तूंहि माझ्या शरीरांत प्रवेश कर ! ( १०-१०-३.)

यम—छे, छे ! जें मागें झालें तें होऊन गेलें, तें पुनः आम्ही करणार नाहीं. आतांपर्यंत पापपुण्याच्या ऐसपैस गोष्टी बोलणारे आम्ही असल्या हीन पापाच्या गोष्टी कशा बोलाव्या ? आकाशांतील सूर्य व आमचे पोषण करणारी पृथ्वी ( सरण्यू ) हे आमचे आईबाप नव्हेत काय ? अर्थात् हें आपलें भावा-बहिणीचें नातें आहे, हें तूं कशी विसरतेस ? (१०-१०-४)

यमी—यमा ! अजून तूं बावळटच दिसतोस ! अरे ! त्वष्ट्यानें आम्हांस गर्भांत असतांनाच नवरा बायको केलें आहे कीं ! ती त्याची इच्छा कोण मोडूं शकेल ? हें नातें माता सरण्यू हीहि जाणतें व पिता सूर्य हाहि जाणतो. यांत नवीन तें काय सांगितलें आहे मी ? शिवाय आणखी, असेंहि पाहा कीं हा आपला प्रथम दिवसाचा संबंध कोणाला कळणार आहे? कोण पाहायला येणार आहे इथं ? आणि मग बाहेर तरी कोण फोडणार ? मित्रावरुणांच्या या विशाल जगांत नसत्या पापाच्या भडक कल्पनेनें बहकलेल्या यमा ! काय बोलतो आहेस हें तूं ! काय सांगूं तुला माझें अंतरंग ! एकाच ठिकाणीं तुजजवळ निजण्याचा माझा काम बलवत्तर झाला आहे ! तो मला सारखा डिवचत आहे ! यमा ! तो मला छळत आहे ! पत्नी जशी एकांतांत आपलें शरीर पतीपुढें पसरून त्याच्या आधीन करते तद्वत मीहि हें माझें कामतप्त शरीर तुझ्या स्वाधीन करूं इच्छितें. तर आतां आपण रथ व चाक याप्रमाणें एकमेकास आलिंगन देऊं ! (१०-१०-५ ते ७).

यम—यमे ! तू प्रेमांध झाली आहेस ! देवदूत हे सर्वत्र फिरत असतात. ते कोठें थांबत नाहींत कीं कोठे डोळेझांक करीत नाहींत. म्हणून म्हणतो कीं तूं आतां येथून नीघ ! आणि दुसऱ्या कोणा पुरुषाकडे जा ! त्याला यथेच्छ कडकडून भेट ! जा ! येथून नीघ कशी ! ( १०-१०-८ )

यमी—यमा ! अहोरात्र तुला सद्बुद्धि देवोत ! आणि द्यावा पृथ्वी या यमीला यमाची बायको करोत ( १०-१०-९ ).

यम—बहिणभावाला सोडून इतराला पति करून घेणेचा आतां काळ येत आहे. तेव्हां हे सुभगे ! मला आतां सोडून जा आणि दुसऱ्या पुरुषाची इच्छा कर. त्याचा बाहु तूं आपल्या उशाशीं घे. ( १०-१०-१० )

यमी–तुझ्यासारखा सुंदर व तरुण भाऊ असूनहि मी जर बहीण अनाथ होईन,तर तूं मग माझा भाऊ कसला ! यमा ! माझा भाऊ कसचा ! आणि माझ्यासारखी सुंदर व तरुण बहीण तुजजवळ असूनहि तूं जर कष्टी होशील तर मी मग तुझी बहीण तरी कसली ! कामोविकारानें संतप्त होऊन मीं हें कांहीं तरी बरळूं लागलें आहें खरी ! तर,हे यमा ! माझा अंत तूं आतां

पाहूं नकोस ! तूं आपलें शरीर माझ्या शरीराशीं भिडव आणि मला सुखी कर ! ( १०-१०-११ )

यम—नाहीं ! नाहीं ! मी तुझ्याशीं संगत व संरत होणार नाहीं. यमे! बिलकूल नाहीं. जो बहिणीशीं प्रेमरंग करतो, तो महापापी असें म्हणतात. तर आतां, सुभगे ! येथून जा ! मला सोडून दुसऱ्या पुरुषाची इच्छा कर. तुझा भाऊ हें पाप मुळींच करूं इच्छित नाहीं. (१०-१०-१२)

यमी—यमा ! किती निष्ठुर आहेस रे तूं ! तुझें मन तरी कसें कठोर होतें कोण जाणे ! तूं इतका पाषाणहृदयी असशील हें मला माहीत नव्हतें. पण हाय ! आतां काय? मला वाटतें दुसरी कोणी तरी रमणी तुला वेली-प्रमाणें वेष्टून असेल ! ( १०-१०-१३ )

यम—आणि तूं हि लता जशी वृक्षाला आलिंगून असते, तद्वत् दुसऱ्या एकाद्या पुरुषाला जाऊन आलिंगून रहा ! तो हि तुला तशीच मिठी मारो! तूं त्याचें मन आकर्षून घे, तो तुझें घेवो ! याप्रमाणें तूं त्या पतीबरोबर सुखानें संसार कर ! जा, यमे ! आतां तूं येथून निघून जा!(१०-१०-१४)




(बृहद्देवता ६-१६२-१६३)

**बृहद्देवता**

**अभवन्मिथुनं त्वष्टुः सरण्यूस्त्रिशिराः सह ।**
**स वै सरण्यूं प्रायच्छत्स्वयमेव विवस्वते ॥ १६२ ॥**

**ततः सरण्यां जज्ञाते यमयमी विवस्वतः ।**
**तौ चाप्युभौ यमावेव ज्यायांस्ताभ्यां तु वै यमः ॥ १६३ ॥**

**(६) विश्पला**—विश्पला ही महाविदुषी होती. इतकेंच नव्हे तर ती मोठी शूरहि होती. ती खेल राजाची बायको. एकदा राजावर लढाईचा प्रसंग आला. तेव्हां ती त्याच्याबरोबर लढाईत गेली. रणांत शौर्यानें लढत असतां अकस्मात् शत्रूंनीं तिला घेरलें व तिचा पाय तोडून टाकला ! तरी ती वीरस्त्री डगमगली नाहीं !

मन शांत ठेवून तिनें त्यावेळीं अश्विनींचा धांवा केला. त्यासरशी ते प्रसन्न होऊन तिच्याजवळ आले व तिच्या विनंतीवरून तसाच एक दुसरा लोखंडाचा पाय करून, तो त्यांनीं मोठ्या कौशल्यानें त्या तुटलेल्या पायाच्या जागीं पुनः जशाचा तसा बसवून दिला ! ( ' चरित्रं हि वेरिवाच्छेदि पर्णमाजा खेलस्य परितक्म्यायाम् । सद्योजङ्घमायसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम्॥ ( ऋ. १-११६-१५ )

तो तुटलेला पाय पुनः बरोबर झाल्यावर दुसऱ्या दिवशीं ती शूर अबला पुनः शत्रूबरोबर लढावयास गेली आणि त्यांच्याबरोबर शौर्यानें लढून अखेर त्यांच्यावर अश्विनीच्या प्रसादानें मोठा जय मिळविला !( 'याभिर्विश्पलां धनसामथर्व्यं सहस्रमीळ्ह आजावजिन्वतम् । ' ( १-११२-१० ). अशी ही शूर अबला लढाईत पतीबरोबर जाऊन तेथें शौर्यानें लढून शत्रूला धूळ चारून ऋग्वेदांत प्रतिष्ठा मिळवून अमर होऊन बसली आहे. या विश्पलेचेंच अनुकरण करून कैकेयी झाली तरी दशरथाबरोबर रणभूमीवर जाऊन त्यास ऐन धुमश्चक्रींत मोठी मदत केली, हा इतिहास वाचकांना माहीत आहेच. असो.

**(७) सरण्यू:**—त्वष्ट्याला त्रिशिर नांवाचा एक मुलगा व सरण्यू नांवाची एक मुलगी होती. ती उपवर झाली तेव्हां त्यानें तिला विवस्वान राजाशीं लग्न करून दिलें. पुढें कांहीं कालानें ती गरोदर झाली व योग्य वेळीं प्रसूत होऊन जुळ्या मुलांस जन्म दिला. प्रथम जो जन्मला त्याला यम व नंतर जन्मलेली मुलगी, तिला यमी हें नांव ठेवण्यांत आलें. पुढें सरण्यूला तेथून जावेसें वाटलें म्हणून, आपल्यासारखीच एक स्त्री निर्माण करून तिच्या स्वाधीन तीं आपलीं मुलें देऊन, ती तेथून निघून गेली.

विवस्वानाला हें कांहीं कळलें नाहीं. त्यानें सरण्यू घरींच आहे असें समजून, सरण्यूनें निर्मिलेल्या स्त्रीशीं एकांत व्यवहार केला. पुढें ती गरोदर राहून पुढें तिला एक मुलगा झाला. हाच मनु होय. यानंतर विवास्वानाला कळून चुकलें कीं आपणाजवळ जी स्त्री आहे, ती सरण्यू नव्हे. दुसरी कोणी तरीच आहे. म्हणून तिला सोडून सरण्यूच्या शोधार्थ तो निघाला.

यावेळीं सरण्यू ही घोडीचें रूप धारण करून भटकत आहे, हें त्याला कळल्यावरून त्यानेंहि सुंदर घोड्याचें रूप धारण करून तो बाहेर पडला. तिला शोधीत असतां अखेर घोडीचें रूप घेऊन फिरत असलेली ती त्याला दिसली. सरण्यूनेंहि त्या घोड्याकडे पाहिलें व ती त्याच्या जवळ मैथुनार्थ आली.

त्या घोड्यानें तिची प्रेमपूर्ती करण्यास म्हणून तिच्यावर मागून आरोहरण केलें व त्या प्रेमक्रीडेच्या भरांत त्या घोड्याचें वीर्य गळून खालीं जमिनीवर पडलें. त्या वीर्याचा तिनें नाकांतून वास घेतला. आणि परिणाम असा झाला कीं त्यापासून ती गरोदर राहिली व पुढें तिला दोन मुलगे झाले. त्यांत एकाचें नांव नासत्य व दुसऱ्याचें दस्र असें ठेविलें. अश्विनी कुमार ते हेच होत ! सरण्यूची ही अशी कथा आहे. बृहद्देवतेंत तिचा उल्लेख आढळतो तो असाः—

'**अभवन्मिथुनं त्वष्टुः सरण्यूस्त्रिशिराः सह ।**
**स वै सरण्यूं प्रायच्छत् स्वयमेव विवस्वते ॥ ६-१६२ ॥**
**ततः सरण्व्यां जज्ञाते यमयम्यौ विवस्वतः ।**
**तौ चाप्युभौ यमावेव ज्यायांस्ताभ्यां तु वै यमः ॥ १६३ ॥**

सृष्ट्वा भर्तुः परोक्षं तु सरण्यूः सदृशीं स्त्रियम् ।
निक्षिप्य मिथुनं तस्यामश्वा भूत्वापचक्रमे ।। ७-१ ।।
अविज्ञानाद्विवस्वांस्तु तस्यामजनयन्मनुम् ।
राजर्षिरभवत्सोऽपि विवस्वानिव तेजसा ।। ७-२ ।।
स विज्ञाय त्वपक्रान्तां सरण्यूमश्वरूपिणीम् ।
त्वाष्ट्रीं प्रति जगामाशु वाजी भूत्वा सलक्षणः ।। ७-३ ।।
सरण्यूश्च विवस्वन्तं विदित्वा हयरूपिणम् ।
मैथुनायोपचक्राम तांच तत्रारुरोह सः ।। ७-४ ।।
ततस्तयोस्तु वेगेन शुक्रं तदपतद्भुवि ।
उपजिघ्रच्च सा त्वश्वा तच्छुक्रं गर्भकाम्यया ।। ७-५ ।।
आघ्रातामात्राच्छुक्रात्तु कुमारौ सं बभूवतुः ।
नासत्यश्चैव दस्रश्च यौ स्तुतानाश्विनाविति ।। ७-६ ।।

(८) **सरमा**:–देवगुरु बृहस्पति हा इंद्राचा राजपुरोहित होता. त्याच्याजवळ सुंदर व दुधांळ गायींचें एक मोठें खिल्लार होतें. चोरट्या पर्णींनीं संधि साधून त्या गायी पळवून नेल्या आणि आपल्या जागेंत आणून सुरक्षित व बंदिस्त अशा डोंगरी गुहेंत लपवून ठेवल्या. ही तक्रार बृहस्पतीनें देवराज इंद्राच्या कानावर घातली व गायींचा शोध करण्यास त्यास सांगितलें. इन्द्रानें आपली विश्वासूक सरमा नांवाची दूती, तिला गायींच्या शोधार्थ पाठवून दिली.

ती फिरत फिरत रसा नदी ओलांडून पर्णींच्या प्रदेशांत आली आणि शोध करीत करीत अखेर पर्णींनीं जेथें गायी लपवून ठेविल्या होत्या, त्या ठिकाणीं आली. सरमेला पाहून पर्णींना संशय आला आणि म्हणून ती कोण, कोठून आली, कां आली व कशी आली याविषयीं त्यांनीं तिच्या जवळ जाऊन चौकशी चालविली. ते म्हणाले — सरमे ! कोणत्या उद्देशानें बरें तूं इथें आलीस ? केवढा लांबचा प्रवास हा ! तुला श्रम झाले नाहींत काय ? तुला भीति वाटली नाहीं काय ? रात्रीं तूं कुठें होतीस ? ही

रसानदी कशी अगदीं दुथडी भरून वाहती आहे ! ती तूं कशी ओलांडलीस? तुला भीति कशी नाहीं वाटली ? सरमा म्हणाली :— पणी हो ! मी इंद्राची दूती आहें. माझें तो इंद्र रक्षण करीत असल्यामुळें मला कोणाची व कशाची भीति म्हणून वाटली नाहीं व वाटत नाहीं. अर्थात् मी तुमची ही रसा नदी सहज ओलांडून आलें. ( 'तथा रसाया अतरं पयांसि' १०-१०८-२)

पणी :—बरं, ज्याची तूं दूती म्हणवितेस, तो इंद्र आहे तरी कसा ग ? तो आमच्या इथं येईल कां? आणशील कां त्याला इथं ? त्याची दृष्टि कशी काय आहे? ( कीदृङिङन्द्रः सरमे ? का दृशीका ? १०-१०८-३)

सरमा — काय सांगूं पणींनो ! त्या इंद्राचा महिमा ! खरं विचाराल तर त्याला कोणी मारणारा नाहीं. उलट तो मात्र सर्वांना मारील ! ('नाहं तं वेद दभ्यं दभत्स' १०-१०८-४

पणी :— आम्हांला मारील का !

सरमा:— हो हो. तुम्हांला सुद्धां मारील! चांगला जमिनीवर लोळवील! पणींनो ! काय बिशाद आहे तुमची ! त्याच्याशी लढूं पहाल तर फुकट मरून पडाल! 'हता इन्द्रेण पणयः शयध्वे' १०-१०८-४ )

पणी :—ज्या गाई तूं इच्छितेस त्या सरमे, लढाई केल्याशिवाय कोण बरें सोडील ? आणि कोण त्या घेऊन जाईल ?(कस्त एना अव सृजदयुध्वी ? १०-१०८-५) आणि आम्हीं पणी म्हणजे काय हातांत बांगड्या भरल्या आहेत वाटतें तुला ? आमचीं हत्यारें देखील तशींच तीक्ष्ण आहेत कीं ! (अस्माकमायुधा सन्ति तिग्मा ' १०-१०८.५) मग तुझा इंद्र आमचें काय करणार ?

सरमा:—काय बोलतां हें तुम्हीं बायकासारखं! वीरांना हें शोभत नाहीं ! तुम्ही पराक्रमशून्य असूं नये! खरोखर आतां जें तुम्ही बोलला, तें एखाद्या पापी मनुष्यासारखी भाषा बोलला! (असेन्यावः पणयोवचांस्यनिषव्यास्तन्वः सन्तु पापीः '१०-१०८-६ )

पणी:—अग तो इथें येईल तेव्हांची तुझी गोष्ट. पण आमची रसानदी आहे ना मध्यें खबीर! ती कशी तो ओलांडून येणार? छट्, तें शक्यच नाहीं !

सरमा—वेड्या पणीनों! तुमचा हा सगळा भ्रम आहे ! त्याला तुमची रसा मुळींच अडवूं शकणार नाहीं! काय समजलां? उगीच गप्पा मारूं नका! ('न तं गूहन्ति स्रवतो गभीरा' १०-१०८-४)

हें तिचें भाषण ऐकून ते पणी घाबरले व विषय बदलून तिला म्हणाले, —तें जाऊं दे ग सरमे ! आमचें ऐकशील का तूं ? आम्ही तुला मोठी भाग्यवती करतों.

सरमा —माझं आधीं पूर्ण ऐकून घ्या ! मी म्हणतें इंद्राचें सख्य पाहिजे असल्यास मुकाट्यानें त्या गायी सोडून द्या कसे ! पणींनो ! शाहाणे व्हा ! मृत्यूला आमंत्रण देऊं नका ! तुम्ही म्हणतां ती रसा त्याला अडविण्यास अगदीं असमर्थ आहे. (' अधृष्टो व एतवा अस्तु पन्था ' १०-१०८-६) म्हणून म्हणतें सोडा त्याच्या गायी ! नाहींतर तो इन्द्रहि येईल आणि बृहस्पतिहि येईल आणि तुमचें ते दोघे चांगलें पारिपत्य करतील ! ऐका माझी गोष्ट !

पणी--एक रसानदीच काय,हा आमचा दगडी खजिना पहा! तो केवढा बंदिस्त आहे ! त्यांत गाई किती, घोडे किती, संपत्ति किती, या सर्वांनीं तो अगदीं खच्चून भरून गेला आहे! ('अयं निधी सरमे अद्रिबुध्नो गोभिरश्वो-भिर्वसुभिन्र्युष्टः' १०-१०८-७ ) आणि इतकेंच नव्हे तर आमचे शूर पणी हातांत प्रखर शस्त्र धरून त्याचें रक्षण करीत आहेत ! खडा पहारा आहे त्यांचा! मग तुझे इंद्रबृहस्पति इथें येऊन काय करतील? ('रक्षन्ति तं पणयो ये सुगोपा '१०-१०८-७) खरं सांगूं आम्ही तुला? तूं इथं फुकट आलीस बघ !

सरमा —पापी लोकांना सुबुद्धि सुचेल तर! मी खरखुरं सांगतें तुम्ही गायी मुकाट्यानें न सोडाल तर सोमपान करून प्रमत्त झालेले अयास्य, अंगिरस, नवग्व इत्यादि ऋषी येथें येतील, तुमचा फडशा पाडतील आणि या तुमच्या गायी सोडवून त्या आपापसांत वांटून घेतील ! मग काय कराल तुम्ही ? (एह गमन्नृषयः सोमशिता अयास्यो अंगिरसो नवग्वाः त एतमूर्वं वि भजन्त गोनाम्' १०-१०८-८)

पणी (विषय बदलून) सरमे ! तें सगळं राहूं दे! तूं जाऊन सांगशील तेव्हांची ही गोष्ट! आम्ही तुला आमची बहीण करून इथेंच ठेवून घेऊं! आमची बहीण होऊन तूं इथेंच आमच्या जवळच रहा! शाहाणी झालीस तर आमचें ऐक! त्या इंद्राच्या त्रासानें दूती होऊन तूं येथपर्यंत कष्ट सोसून आली आहेस, हें आम्ही जाणतों. तर आतां असं कर. पुनः तिकडे जाऊं नकोस म्हणजे झालं. आम्ही तुला बहीण करून इथंच ठेऊन घेऊं.

सरमा —- आं, काय म्हणतां? बहीण!

पणी–हं. बहीण! आमची बहीण होऊन तूं इथंच रहा.सुखांत व चैनींत रहा! कशाला कांहीं कमी नाहीं! मग कशाला जातीस त्या इंद्राजवळ! तो तुला असाच राबवून घेईल. मग, राहशील ना आमच्या जवळ? ('एवा च त्वं सरम आजगन्थ प्रबाधिता सहसा दैवेन। स्वसारं त्वाकृणवै मा पुनर्गाः।' १०-१०८-९)

सरमा—काय बोलतां, पर्णीनो! हें तुम्ही! त्या देवाची सर तुम्हांला कशी येणार! मी इंद्रालाहि ओळखतें व तुम्हांलाहि ओळखतें.

पणी— अग नुसती बहीणच नव्हे, तर आम्ही ज्या गायी आणल्या आहेत, त्यांत आम्ही तुला हिस्साहि देतों. तूं व आम्ही त्या वांटून घेऊं! मग तर झालं? त्या इंद्राजवळ काय मिळणार आहे तुला? ('अप ते गवां सुभगे भजाम' १०-१०८.९ )

सरमा—पर्णीनो! तुम्ही वेडे आहांत! मूर्ख आहांत! मी ही सरमा तुमचा भाऊपणाहि जाणत नाहीं व बहीणपणाहि जाणत नाहीं! तें सर्व इन्द्र व अंगिरस जाणतात! समजलं? ( 'नाहं वेद भ्रातृत्वं नो स्वसृत्व-मिन्द्रो विदुरंगिरसश्च' १०-१०८-१०)

पणी—असं म्हणूं नकोस, सरमे! ऐक आमचं.

सरमा—मी तुम्हांला खचीत खचीत सांगतें कीं, मी जेव्हां इथून निघून इंद्रादि देवांजवळ जाईन, तेव्हां ते माझे देव तुम्ही चोरून येथें आणून ठेविलेल्या गायी सोडवून परत घेऊन जाण्याकरतां इथं येतील आणि तुमचा फडशा फाडून गायी परत घेऊन जातील! सबब, पणींनो! आपका जीव

बांचविण्याकरतां तुम्ही इथून दूर देशीं जा कसे! ('गोकामा मे अच्छदयन्यदायमपात इत पणयो वरीयः' १०-१०८-१०)

असें म्हणून ती तेथून निसटून गेली. पुढें इन्द्र, बृहस्पति, अग्नि वगैरे देव येऊन, पर्णांचा फडशा पाडून, गायी सोडवून त्यांनीं बृहस्पतीच्या बृहस्पतीस दिल्या.

सेवक प्रामाणिक असावा, लांचलुचपतीस बळी पडणारा नसावा व मालकाची सेवा जागरूकतेनें करावी याचें प्रतीक म्हणजे ऋग्वेदांतील ही देवदूती सरमा होय! असें सांगितलें तर त्यांत वावगें काय आहे?

## सरमा

'असुराः पणयो नाम रसापारनिवासिनः ।
गास्तेऽपजुहुरिन्द्रस्य न्यगूहंश्च प्रयत्नतः ॥ ८-२४ ॥
बृहस्पतिस्तथाऽपश्यद् दृष्ट्वेन्द्राय शशंस च ।
प्रहिणोत्तत्र दूत्येऽथ सरमां पाकशासनः ॥ ८-२५ ॥
किमित्यत्रायुजाभिस्तां पप्रच्छुः पणयोऽसुराः ।
कुतः कस्यासि कल्याणि किं वा कार्यमिहास्ति ते ॥ ८-२६ ॥
अथाब्रवीत्तान्सरमा दूत्यैन्द्री विचराम्यहम् ।
युष्मान्व्रजं चान्विष्यन्ती गाश्चैवेन्द्रस्य पृच्छतः ॥ ८-२७ ॥
विदित्वेन्द्रस्य दूतिं तामसुराः पापचेतसः ।
ऊचुर्मा सरमे गास्त्वमिहास्माकं स्वसा भव ॥ ८-२८ ॥
विभजामो गवां भागं माहिता ह ततः पुनः।
सूक्तस्यास्यान्त्यया चर्चा युग्माभिस्त्वेव सर्वशः ॥ ८-२९ ॥
साऽब्रवीतन्नाहमिच्छामि स्वस्तृत्वं वा धनानि वा ।
पिबेयं तु पयस्तासां गवां यास्ता निगूहथ ॥ ८-३० ॥

असुरास्तां तथेत्युक्त्वा तदाजहुः पयस्ततः ।
सा स्वाभवाच्च लौल्याच्च पीत्वा तत्पय आसुराम् ।। ८-३१ ।।
परं संवननं हृद्यं बलपुष्टिकरं ततः ।
शतयोजनविस्तारामतस्तां रसां पुनः ।। ८-३२ ।।
यस्याः पारे परे तेषां पुरमासीत्सुदुर्जयम् ।
पप्रच्छेन्द्रश्च सरमां कच्चिद्रा दृष्टवत्यासि ।। ८-३३ ।।
सा नेति प्रत्युवाचेन्द्र प्रभावादसुरस्य तु ।
तां जघान पदा क्रुद्धः उद्गरन्ती पयस्ततः ।। ८-३४ ।।
जगाम सा भयोद्विग्ना पुनरेव पणीन्प्रति ।
पदानुसारिपद्धत्या रथेन हरिवाहनः ।। ८-३५ ।।
गत्वा जघात च पणीन् गाश्च ताः पुनराहरत् ।
तेऽवदन्वैश्वदेवं तु ब्रह्मजाया जुहू जगौ ।। ८-३६ ।।

---



## प्रकरण ७ वें

# वैदिक आर्यांचें जागतिक जीवन

ऋग्वेदांत वैदिक आर्यांचें जागतिक जीवन म्हणजे वैय्यक्तिक, कौटुंबिक, सामाजिक, राजकीय व पारमार्थिक जीवन—याचें चित्र कसें उमटलें आहे व त्याची रूपरेखा कशी काय आहे, हें पाहणें उद्‌बोधक व मनोरंजक असल्यामुळें त्याचें आतां टप्याटप्यानें विवेचन व निरूपण करण्याचा अल्पसा प्रयत्न करूं इच्छितों. अर्थात् हे विषय स्थूल मानानेंच पर्यालोचन करून, उदयोन्मुख भारतास—विशेषतः महाराष्ट्रास—प्राचीन पूर्वजांच्या जीवनचरित्राची ओझरती ओळख करून देण्याचा हा आमचा प्रयत्न असून, तो अस्थानी होणार नाहीं असा आमचा समज आहे. अतएव या प्रासादिक ग्रंथराजाच्या विशाल अंतरंगांत यथाशक्ति प्रवेश करून, तेथील आचार व विचारसौंदर्याचें भारतीय संस्कृतिप्रेमी सुज्ञ वाचकांस दर्शन घडविल्यास त्यांच्या अंतःकरणांत खास नवा प्रकाश उजळून, त्यांचें जागतिक जीवन सुखमय व शांतिमय होण्यास मार्गदर्शक होईल, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे.

वेद-वाङ्मयाचा—विशेषतः ऋग्वेद-ग्रंथाचा—सूक्ष्म कानोसा घेतला, तर तेथें वैय्यक्तिक जीवनाचा उत्कर्ष व विकास, त्याला प्रपोषक असें कौटुंबिक स्थैर्य, त्याला उपकारक अशी सामाजिक घडण व त्याला धारण करणारें राजकीय धोरण—अर्थात् वैदिक आर्यांच्या जागतिक जीवनाचें अष्टपैलू सुंदर चित्र—वेदांत कसें उमटलेलें दिसून येतें, हें महाराष्ट्र वाचकांपुढें यथामति रंगून दाखविण्यासाठींच या ग्रंथाचा अवतार आहे. सबब ऋग्वेदाला धरूनच व त्याला वाट पुशीत-पुशीतच आम्ही यापुढें वाटचाल करणार आहों, हें सकृद्दर्शनीं स्पष्ट करून आतां पुढील मार्गास लागतों.

वैदिक ऋषींनीं मनुष्याचें सर्वसाधारण आयुर्मान शंभर वर्षांचें—शतायुर्वै पुरुषः—धरून, त्याचे ठोकळ मानानें तीन भाग कल्पून, त्या प्रत्येकास आश्रम अशी संज्ञा दिली आहे. त्यांतला पहिला आश्रम म्हणजे हा ब्रह्मचर्याश्रम होय. या आश्रमाचें ध्येय विद्यासाधन व बलवर्धन हें असून, त्याप्रमाणें तो सिद्ध झाल्यावर पुढें योग्य वयांत अनुरूप वधूशीं विवाह करून गृहस्थाश्रमी बनावयाचें आणि तेथील सर्व कर्तव्यें व जबाबदाऱ्या जगाच्या आखाड्यांत उतरून यथाशक्ति व यथामति पार पाडून मग प्रपंचनिवृत्त होऊन, वानप्रस्थाश्रम स्वीकारून तेथें अवशेष आयुष्य अध्यात्म विचारांत व ब्रह्मचिंतनांत घालवून इहलोकयात्रा संपवावयाची. अशी ही मानवी जीवनक्रमाची सर्वसाधारण वैदिक व्यवस्था आहे.

या रोखानें जीवनक्रम आंखून तदनुरोधानें जगाचा म्हणजे प्रपंचाचा उपभोग घेत गेल्यास मनुष्यास ऐहिक सुख व पारलौकिक हित—अभ्युदय व निःश्रेयस—साधण्यास सुकर व सुलभ होऊन, मानव जन्माचें साफल्य व सार्थक होतें, असा वैदिक ऋषींचा प्रत्यक्ष अनुभव असून, त्या धोरणानें जीवनक्रम आंखण्यास व पाळण्यास सनातन धर्माचा मानव जातीला—विशेषतः भारतीयांना—मौलिक हितोपदेश आहे आणि त्याप्रमाणें जो सश्रद्ध मनानें वाटचाल करील, तो धन्य व कृतकृत्य होऊन, त्याचा मानवजन्म पूर्ण सार्थकीं लागला असें मानावयास मग कसलीच हरकत दिसत नाहीं.

याप्रमाणें मानवजन्माचें उच्च ध्येय—अभ्युदय व निःश्रेयस—साधावयाचें झालें तर तें काम तितकें सोपें नाहीं. त्याचा पाया पूर्ववयांतच घातला पाहिजे आणि तशी प्रथा प्राचीन वैदिक आर्यांत सर्रास चालू होती. व्यक्तीची शारीरिक वाढ व मानसिक विकासाचा पाया त्यावेळीं त्याच्या बालवयांतच घालण्यांत येत असे. अर्थात् वयाच्या आठव्या वर्षी या कार्याच्या श्रीगणेशास प्रारंभ होऊन, पुढें जवळजवळ दोन तपेंपर्यंत तें कार्य सतत चालू असे. या काळाला ब्रह्मचर्याश्रम अशी संज्ञा आहे. हा काळ म्हणजे मनुष्याच्या जीवनांतला अत्यंत महत्त्वाचा काळ आहे. या काळांत पेरावें तसें पुढें उगवतें. खपावें तसें वाढतें. कष्टावें तसें फळतें. अर्थात् हा काळ म्हणजे सर्व पुरुषार्थाचा—भावी जीवनोत्कर्षाचा—मूळ व

मुख्य पायाच म्हटलें तरी चालेल. मूळ पाया म्हणण्याचें कारण असें कीं विद्या व बळ, सुख व संपत्ति, आरोग्य व आयुष्य, पौरुष व पराक्रम, यश व कीर्ति या सर्व उपकारक व प्रलोभनीय गोष्टी सर्वस्वीं या आश्रमांतील तपश्चर्येवरच अवलंबून आहेत. थोडक्यांत म्हणजे विद्यार्जनाचा, शरीर कमावण्याचा व आरोग्य जोडण्याचा—एकंदरींत भावी जीवनोत्कर्षाचा—हा अत्यंत महत्त्वाचा काळ आहे.

वेदकाळीं भारतीय आर्यांचें आयुर्मान निदान शंभर वर्षांचें तरी असावें, असें ऋग्वेदावरून अनुमान काढण्यास जागा आहे. तेथें एका मंत्रांत ‘आम्ही शंभर वर्षें जगावें’ असें स्पष्ट म्हटलें आहे. तो मंत्रच येथें देतों म्हणजे झालें. तो मंत्र प्रसिद्ध असून, वैदिक आर्यांच्या दैनिक प्रार्थनेंत त्याचा अंतर्भाव करण्यांत आला आहे. तो मंत्र हा असाः—‘तच्चक्षुर्देवहितं शुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम्’ ( ७-६६-१६ ). ही वसिष्ठाची मूळची प्रार्थना असून, त्या मंत्राचा समावेश प्रस्तुतकाळीं संध्योपासनेंत करण्यांत आला आहे. हाच मंत्र जरा विस्तारानें शुक्ल यजुर्वेदांत आला असून, तोहि येथें याच हातानें वाचकांच्या अवलोकनार्थ देऊन ठेवतों. तेथें तो मंत्र आढळतो तो असाः—‘तच्चक्षुर्देवहितं पुरस्ताच्छुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतं शृणुयाम शरदः शतं प्रब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम शरदः शतं भूयश्च शरदः शतात्’ ( ३६-२४ ) भावार्थः—देवांना प्रिय, तेजाचा अखंडपुंज, विश्वाचा सर्वसाक्षी असा तो भगवान श्रीसूर्यनारायण पूर्वदिशेस उदयगिरीवर उदय पावता झाला. त्या देवाच्या कृपाप्रसादानें आम्ही शंभर वर्षें डोळ्यांनीं धड पाहत असावें ! शंभर वर्षें आम्ही धड जीवंत असावें ! शंभर वर्षें कानांनीं धड ऐकत असावें ! शंभर वर्षें वाणीनें धड बोलत असावें ! शंभर वर्षें आम्ही दैन्यरहित असावें ! इतकेंच नव्हे, तर शंभर वर्षांहूनहि आम्ही अधिक जीवंत रहावें, असें घडो !

या मंत्रावरून वैदिक आर्य शंभर वर्षें जगण्याची इच्छा तर करतातच. शिवाय आणखी वर त्यापेक्षांहि अधिक काळ जिवंत राहण्याची प्रार्थना करतात ! आणि तोंपर्यंत डोळे, कान व वाणी इत्यादि इंद्रियें चांगलीं

शाबूत राहून, तीं आपापलीं कर्तव्यें व्यवस्थित बजावोत, अशी सूर्य-नारायणाजवळ प्रार्थना करतात. ' शतायुर्वै पुरुषः ' हें वचन तर प्रसिद्धच आहे. हें आयुष्याबद्दल झालें.

नुसतें पशुतुल्य आयुष्य काय कामाचें ? ज्ञान नसेल तर त्या आयुष्याला काय किंमत आहे ? म्हणून आयुष्याबरोबर ज्ञान देण्याविषयींहि त्यांची देवांजवळ प्रार्थना आहे. ती प्रार्थना अशीः--'मेधां मे वरुणो ददातु मेधामग्निः प्रजापतिः । मेधामिन्द्रश्च वायुश्च मेधां धाता ददातु मे'।। शु. य. ३२-१५ ।।वैदिक आर्य हे पशुतुल्य जीवन कंठणारे विषयमुग्ध जंगली लोक नव्हते. ते विद्याप्रेमी व विद्योपासक असून, मोठे जिज्ञासु व चिकित्सक असे होते. त्यांची दृष्टि विशाल व सूक्ष्म होती. बालवयापासूनच त्यांच्या विद्योपासनेला प्रारंभ होई. अर्थात् या विद्यार्जनाच्या वेळीं ते जें व्रत पाळीत त्यालाच ब्रह्मचर्य हें नांव आहे. येथें विद्या म्हणजे वेदविद्या होय. कारण ब्रह्म हें नांव वेदाला अनुलक्षूनच आहे. ' ब्रह्म हि मंत्रः ' असें शतपथ वचन आहे. अतएव ब्रह्मचर्य आश्रम हा विद्यार्जनाचा काळ म्हटला तरी चालेल. या वयांतच विद्या शिकावयाची असा वैदिक दंडक असून, त्या वेळीं विद्यार्थी दशेंत निदान दोन तपें म्हणजे चोवीस वर्षें तरी जात. तोच काळ मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत महत्त्वाचा काळ होय. भावी जीवनोत्कर्षाचा तो मूळ व मुख्य पाया असून, येथें केलेल्या तपश्चर्येला पुढें गोमटीं फळें लागतात, ही गोष्ट त्रिकालाबाधित अनुभवसिद्ध आहे.

शिवाय पुनः हेंहि सांगितलें पाहिजे कीं या प्रथमाश्रमांत केवळ विद्यार्जन हें व एवढेंच ध्येय नसून, त्याच्या जोडीला तितकेंच महत्त्वाचें दुसरें एक ध्येय आहे. तें म्हणजे बलसंवर्धन. ब्रह्म याचा अर्थ वेद जसा होतो, तसाच त्याचा दुसरा एक अर्थ बल असाहि होतो. ' ब्रह्म हि मंत्रः' असें एके ठिकाणीं म्हटलें आहे, तसेंच ' बलं हि ब्रह्म ' असें दुसरें ठिकाणीं सांगण्यांत आलें आहें. यावरून ब्रह्मचर्याश्रमाचा विद्यार्जन जसा एक हेतु तसाच व तितकाच महत्त्वाचा बलसंवर्धन हाहि एक आहे, हें निर्विवाद आहे. जसा विद्येचा प्रभाव आहे, तसेच बलाचेहि कांहीं गुण आहेत.

मनुष्याला पुरुषार्थ साध्य करून घेण्यास विद्या व बल या दोहोंचीहि सारखीच गरज आहे. ब्रह्मचर्याचा प्रभाव व गुण काय आहेत, याविषयीं आम्ही पदरचें अधिक न सांगतां प्रसिद्ध आयुर्वेदाचार्य चरक महर्षि काय सांगतात, तेंच येथें उध्दृत करतों म्हणजे झालें. ते सांगतात तें असें:— 'पुण्यतमायुःप्रकर्षकरं जराव्याधिप्रशमनं ऊर्जस्करममृतं शिवं पुण्यं शरण्यं उदात्तं श्रोतुमर्हथ उपधारयितुं प्रकाशयितुं च प्रजानामनुग्रहार्थं ब्रह्मचर्यम्'— भावार्थ—अत्यंत पवित्र, आयुष्यवर्धक, अकालमृत्युहारक, जरानिवर्तक, व्याधिप्रतिबंधक, सामर्थ्यदायक, उदात्त व अलौकिक असें हें बलरूप ब्रह्म प्राप्त करून घेणेसाठीं, माझे शिष्यवृंदहो ! तुम्ही मजकडून शिका ! व त्याप्रमाणें आचरण करा ! आणि लोकोपकारार्थ त्याचा प्रसार करा !! याप्रमाणें या ब्रह्मचर्याचें महत्त्व व श्रेष्ठत्व गाणारीं अशीं अनेक वचनें आमच्या धर्मग्रंथांत ठिकठिकाणीं पहावयास मिळतात. पण विस्तारभयास्तव त्यांचा येथें उल्लेख करण्याचें टाळतों.

आतां या बलाचें अधिष्ठान शरीरांत कोठें व कशांत आहे, हें सांगितलें नाहीं तर आमचा उद्देश सिद्धीस जाणार नाहीं, याची आम्हांस जाणीव असल्यामुळें त्याचाहि येथें धांवता उल्लेख करतों. या बलाचें अधिष्ठान म्हणजे शरीरांतील वीर्य हें होय! 'वीर्यं वै बलम्' असें श्रुतींत म्हटलें असून खरोखर तें वचन शास्त्रशुद्ध व अनुभवसिद्ध आहे. अर्थात् हें वीर्य म्हणजेच बल ! वीर्य म्हणजेच प्राण ! वीर्य म्हणजेच तेज ! वीर्य म्हणजेच उत्साह ! वीर्य म्हणजेच आरोग्य ! वीर्य म्हणजेच प्रतिभा ! वीर्य म्हणजेच शौर्य आणि वीर्य म्हणजेच पराक्रम ! शरीराला वज्रदेही बनविणारें शरीरांतील धातु म्हणजेच हें वीर्य—हा दिव्य परिस—होय!! हें वीर्य जर शरीरांत मुसमुसत नसेल, तर तें निष्प्रभ व नीरस जीवन जगण्यांत तरी मग काय मौज व अर्थ आहे ?

खरें सांगावयाचें म्हणजे या वीर्यापासूनच शरीरांत चैतन्य स्फुरतें ! उत्साह खेळतो ! बुद्धि उजळते ! प्रतिभा चमकते ! सौंदर्य खुलतें व चेहरा टवटवतो !! हा सर्व चमत्कार विद्यार्थी-जीवनांत हें ब्रह्मचर्य कडकडीत पाळल्यानें घडून येतो, इकडे उदयोन्मुख भारत लक्ष देईल तर काय मौज

होईल ! शरीरांत प्रथम वयांत या वीर्याचें संवर्धन, संपोषण व संरक्षण झाल्यानेंच शरीर, इंद्रियें, मन व बुद्धि यांस सफाईदार उजळा मिळून पुढील जागतिक जीवन आनंदमय व उत्साहमय बनतें ! अशी बलोपासना करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याला मग कसलीच शारीरिक व मानसिक आधिव्याधि पीडा देत नाहीं—'ब्रह्मचारी न कांचनार्तिमार्च्छति'—असें शतपथांत म्हटलें असून, यमराज अशा तेजस्वी ब्रह्मचाऱ्याच्या अकालीं जवळ येण्यास धजत नाहीं ! आणि म्हणून 'शतं जीवेम शरदः' या मंत्राची सार्थकता त्यावेळीं भारतीयांच्या पूर्ण प्रचीतींत उतरली होती, हें उघड सांगावयास नकोच !

त्या वेळचा ब्रह्मचारी गुरुकुलांत राहून, एकनिष्ठेनें शारदांबेची व शक्तिदेवतेची उदंड उपासना करून, पुढें व्रतस्नात झाल्यावर तो कसा दिसत असे, याचें वर्णन शतपथांत याज्ञवल्क्यांनीं स्वानुभवपूर्वक गायिलें आहे तें असें:—'यथा ह वाऽअग्निः समिद्धो रोचतऽएवं ह वै स स्नात्वा रोचते य एवं विद्वान्ब्रह्मचर्यं चरति ' (श.प. ११-३३-७) भावार्थ—अग्नि नारायण चांगला प्रज्वलित झाला म्हणजे जसा तो तेजस्वी दिसतो, तद्वत् जो ब्रम्हचारी ब्रम्हचर्याचा दिव्य प्रभाव जाणून त्याप्रमाणें व्रतोपासना करतो, ब्रह्मचर्य पाळतो, तो विद्या शिकून व्रतस्नात झाला म्हणजे त्या तेजःपुंज अग्निनारायणाप्रमाणें ब्रम्हवर्चस तेजानें चमकूं लागतो !

आधुनिक विद्यार्थीजगाला आपल्या भारतीय प्राचीन विद्यार्जनव्रताचें बाळकडू तोडलें गेल्यामुळें तो हतबुद्ध व हतप्रभ व्हावा यांत नवल तें काय ? पुष्कळ विद्या शिकली पण त्या जोडीला आयुष्य नसलें तर त्या विद्येचा काय उपयोग ? विद्या शिकली व आयुष्य लाभलें पण बलारोग्य नसलें तर ती विद्या व तें आयुष्य सगळें फुकटच नव्हे काय ? हा विद्यार्थ्यांचा दोष नसून, आधुनिक पाश्चात्य वळणाचें वेड घेतलेल्या आमच्या राष्ट्रीय शिक्षण-धुरीणांचा आहे ! असो. बल, आयुष्य, तेज व ज्ञान देण्याविषयीं वैदिक आर्यांची देवाजवळ काय प्रार्थना होती व ते काय काय गोष्टी मागत असत एवढें देऊन प्रस्तुत विषयाचा समारोप करतों. प्राचीन भारतीय आर्यांची

प्रार्थना ती अशी:—'तेजोऽसि तेजो मयि धेहि वीर्यमसि वीर्यं मयि धेहि बलमसि बलं मयि धेह्योजो ऽस्योजो मयि धेहि मन्युरसि मन्युं मयि धेहि सहोऽसि सहो महि धेहि'!! ( शु. य. १९.९ ) या मंत्रांत तेज, वीर्य, बल, ओज, मन्यु व सामर्थ्य देण्याबद्दल पयोदेवतेची प्रार्थना करण्यांत आली आहे.

पण ब्रह्मचाऱ्याचें मुख्य दैवत म्हणजे अग्निनारायण हें होय. अग्नि म्हणजे तेज आणि अग्नि म्हणजे तप. 'तेजो वा अग्निः' असें शतपथांत म्हटलें आहे. तेज म्हणजे ज्ञान, अर्थात् अग्निनारायण हा ज्ञानस्वरूप आहे. म्हणून ब्रह्मचर्याश्रमांत ब्रह्मचाऱ्याला नित्य अग्नि-उपासना करावी लागत असे. त्या वेळीं तो अग्नीची समिधा अर्पण करून त्याची प्रार्थना करीत असे, ती मननीय असल्यामुळें तेवढा मंत्र देऊन हा विषय संपवितों. ती अग्नीची प्रार्थना पुढील प्रमाणें आहेः—'अग्नये समिधमाहर्षं बृहते जातवेदसे यथा त्वमग्ने समिधा समिध्यसे एवमहमायुषा मेधया वर्चसा पशुभिर्ब्रह्मवर्चसेन समिन्धे जीवपुत्रो ममाचार्यो मेधाव्यहमसान्यनिराकरिष्णुर्यशस्वी तेजस्वी ब्रह्मवर्चस्यन्नादो भूयासंऽस्वाहा॥' भावार्थ—मी या अग्निदेवाप्रीत्यर्थ समिधा आणली आहे. ज्याप्रमाणें हे अग्निदेवा! या समिधेनें तूं प्रज्वलित होऊन सुतेजस्वी होतोस, त्याप्रमाणें मीहि, देवा! तुझ्या प्रसादानें आयुष्मान, बुद्धिमान, कांतिमान, प्रज्ञावान व प्रतिभावान व्हावें! माझ्या गुरुदेवाचे पुत्र दीर्घकाल जगोत! आणि देवा! मीहि ज्ञानी होईन! गुरुदेवानें शिकविलेली विद्या अंतःकरणांत नीट जपून ठेवीन! माझ्या कार्यांत यशस्वी होईन! जगांत प्रभावशाली होईन! प्रतिभातेजानें चमकूं लागेन! अन्नाचा उत्तम भोक्ता होईन!' केवढी सुंदर व दणदणीत प्रार्थना ही! प्रार्थनेचा प्रभाव काय आहे, याचा भारताला दुर्दैवानें विसर पडल्यामुळें अग्निनारायणाच्या मंगल कृपाप्रसादास आधुनिक विद्यार्थीवृंद मुकला असला तर त्यांत नवल मानण्याचें कारण नाहीं. वैदिक देव हे उपासनेचे चाहते आहेत; उपासनेशिवाय त्यांचा कृपाप्रसाद फुकटाफुकट कोणाच्या पदरांत पडत नाहीं, अशी श्रुतिमाउलीची शिकवण आहे. असो.

एकंदरींत सांगावयाचा इत्यर्थ काय, तर वैदिक आर्य हे जगाच्या आखाड्यांत उतरण्याच्या आधीं पूर्वतयारी कशी करीत असत, हें आम्हांस सांगावयाचें होतें, म्हणून त्याची येथें थोडक्यांत वाचकांस ओझरती ओळख करून दिली असून, आतां पुढील कार्यास लागतों. हा विषय ऋग्वेदांत अंतर्भूत झाला नाहीं, याचें कारण असें कीं तो गृहस्थाश्रमाचा वेद आहे. ब्रह्मचर्य आटपून जगाच्या आखाड्यांत उतरल्यावर त्याचा प्रांत सुरू होतो. ही अशी वैदिक आर्यांच्या जीवनक्रमांतील प्रारंभींची हकीकत असून, पुढील जीवनक्रमाचें निरूपण प्रस्तुत ग्रंथांत यापुढें क्रमाक्रमानें करण्यांत येईल.

## गृहपति हा वैदिक धर्माचा मुख्य केंद्र

ऋग्वेदांत वैदिक आर्यांचा जीवनेतिहास म्हणजे वैय्यक्तिक, कौटुंबिक, सामाजिक, राजकीय व अध्यात्मिक जीवनाचें यथार्थ चित्र याची रूपरेखा कशी उमटली आहे व ती सूक्ष्म दृष्टीनें पाहाणाऱ्यास कशी दिसते, हें पाहणें उद्बोधक व उपकारक असल्यामुळें त्याचें आतां यापुढें टप्याटप्यानें विवेचन व निरूपण करण्याचें मनांत योजिलें आहे. अर्थात् प्राचीन वैदिक आर्यांचें जागतिक जीवनाचें चित्र ऋग्वेदांत कसें उमटलेलें आहे याचें स्थूलमानानें पर्यालोचन करून, त्याची थोडक्यांत ओळख करून दिल्यास तें अस्थानीं होणार नाहीं अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. वेद वाङ्मयाचा—विशेषतः ऋग्वेद महाग्रंथाचा—कानोसा घेतला तर तेथें वैय्यक्तिक जीवनाचा विकास व उत्कर्ष व त्याला पोषक अशी कौटुंबिक उभारणी, त्याला उपकारक अशी सामाजिक व राष्ट्रीय उर्फ राजकीय धोरण—अर्थात् वैदिक आर्यांच्या जागतिक जीवनाचें अष्टपैलू सुंदर चित्र वेदांत कसें उमटलेलें आहे हें पाहणें मोठें उद्बोधक आहे.

वैदिक वाङ्मयाची नुसती वरवर चांचणी करून पाहिलें तरी एक गोष्ट ठळकपणें नजरेसमोर येते, ती ही कीं वेदकालीन आर्य हा भटकत फिरणारा धनगर वृत्तीचा फिरस्ता प्राणी नसून, तो चांगला स्थाईक झालेला असून कुटुंबस्थ व कुटंबवत्सल प्राणी होता. त्याची जीवनप्रवृत्ति एकांतिक व एकलकोंडेपणाची नसून, ती कौटुंबिक व सामाजिक घडणाची होती असें म्हटल्यास त्याला अयथार्थतेचा दोष लागणार नाहीं.

अर्थात् तो घर करून राहणारा—म्हणजे गृहस्थ—होता. मनुष्याच्या सर्व आशा-आकांक्षा फलद्रूप व्हावयाच्या—अर्थात् जागतिक अभ्युदय व पारमार्थिक उत्कर्ष—यांची जोड मिळवावयाची झाली तर जीवनयात्रा प्रथम सुखरूप, सुसूत्र व सुव्यवस्थित चालणें हें आवश्यक असून, त्यासाठीं एखाद्या सुरक्षित आश्रयस्थानाची जोड मिळविणें हें अपरिहार्यच आहे, हें तो पूर्ण ओळखून होता; आणि हें आश्रयस्थान म्हणजेच घर.

ऋग्वेदांत स्पष्टच सांगून टाकलें आहे कीं जाया म्हणजेच घर. 'जायेदस्तं' ( जाया इत्अस्तं ३-५३-४ ) अर्थात् वैदिक धर्मदृष्ट्या घर म्हणजे दगडाविटांनीं बांधून काढलेली निवाऱ्याची जागा नव्हे, तर तेथें जागृत राहून संसाराची सुव्यवस्थित मांडणी करून त्याचा स्वर्ग बनविणारी सुशील व सुदक्ष अशी गृहिणी होय ! आणि ऋग्वेदांत तिलाच—गृहिणीलाच—घर म्हटलें आहे. आणि तोच भावार्थ 'न गृहं गृहमित्याहुः गृहिणी गृहमुच्यते' या मनुवचनांत प्रतिबिंबित झाला आहे, ही गोष्ट आजच नव्यानें सांगितली पाहिजे अशांतला आतां भाग राहिला नाहीं.

'अस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि' हा जो वेद नारायणाचा तिला विवाहकालीन सदुपदेश आहे, तो आर्य गृहिणीच्या जीवन विकासाचें मुख्य केंद्र आहे—अर्थात् स्त्रीचें खरें कर्तव्यक्षेत्र म्हणजे घर हेंच आहे—ही गोष्ट नजरेआड करून दांपत्यजीवन सुखाचें व समाधानाचें होईल ही आर्यगृहिणीची आशा अगदीं निर्मूल आहे, असा वेदाचा स्पष्ट निर्वाळा आहे. आणि ज्या महिलेला आपलें दाम्पत्य-जीवन सुखमय करून, झोंपडीचा स्वर्ग करावयाचा आहे, तिला वरील वेदवचन सतत नजरेपुढें ठेवणें हें हिताचें आहे, हें आतां निराळें सांगणें नकोच.

तेव्हां आतां सांगण्याचा मुद्दा हा कीं वैदिक दृष्टीनें घर म्हणजे चिखलामातीचें बांधकाम नव्हे, तर पुरुषाशीं सहकार्य व साहचर्य करणारी व राखणारी स्त्री होय. अर्थात् स्त्री-पुरुषांचें सहकार्य व साहचर्य यालाच घर—यालाच कुटुंब—असें म्हणण्याचा वैदिक परिपाठ आहे. यावरून हें उघड आहे कीं पुरुषाशीं सहकार्य करणारें माणूस स्त्रीच असावयास पाहिजे, तरच त्याला घराचें—कुटुंबाचें—स्वरूप येतें. मात्र त्याच वेळेस हेंहि

ध्यानांत घेतलें पाहिजे कीं नुसत्या देहतर्पण लालसेनें जुळून आलेल्या स्त्रीपुरुष-साहचर्यास घर हें नांव प्राप्त होत नाहीं. कारण वेदांत स्त्री हा शब्द वापरलेला नसून जाया हा शब्द वापरलेला आहे व त्याला एक विशिष्ट अर्थ आहे. स्त्रीपुरुषांच्या एकत्र राहणीला घर हें नांव प्राप्त होत नसून, त्या दोहोंच्या संबंधास एका विशिष्ट संस्काराची जरूरी लागते आणि तो संस्कार म्हणजे पाणिग्रहण.स्त्रीचें वेदोक्त मंत्रांनें पाणिग्रहण करून तिला रथांतून घरीं घेऊन येणें, यालाच विवाह हें नामाभिधान आहे. स्त्रीपुरुषांचा संबंध विवाहसंस्कारानें दृढबद्ध झाल्याशिवाय त्या जोडप्यामध्यें जायापतींचें नातें उद्‌भूत होत नाहीं आणि जेथें जायापतींचें नातें नाहीं तेथें घराची प्राणप्रतिष्ठा नाहीं, हें आतां निराळें सांगावयास नकोच. आणि हा भावार्थ मनामध्यें घेऊनच याज्ञवल्क्यांनी 'गृहा वै पत्न्यै प्रतिष्ठा' असें शतपथांत बोलून दाखविलें आहे. (श. प. ३-३-१-१०)

याचें कारण असें कीं गृहस्थ-जीवनांत केवळ जागतिक सुखानंदाचाच तेवढा अंतर्भाव होतो असें नसून, शिवाय आणखी तेथें पारलौकिक सुख-प्राप्त्यर्थ देवोपासनाहि अवश्य म्हणून सांगितली आहे. आणि ही देवोपासना एकट्या पुरुषाला अगर एकट्या स्त्रीला स्वतंत्र राहून करतां येण्यासारखी नसून, ती विवाह संस्कारानें पुनीत होऊन बद्ध झालेल्या स्त्रीपुरुष दांपत्यालाच उक्त आहे. ' मिथुनेन ह यजते ' असें शतपथांत म्हटलें आहे. जोडप्यानेंच देव-यजन करावें आणि त्यांचाच तो अधिकार आहे.आाणि तें मिथुन म्हणजे पतिपत्नी होय.स्त्रीपुरुष नव्हे. 'यजमानश्च पत्नीच तदेकं मिथुनं' (श.प.) पति व पत्नी या जोडप्या-लाच मिथुन ही संज्ञा आहे. तेव्हां देवोपासनेला पतिपत्नी हें दाम्पत्यच योग्य अधिकारी आहे आणि अशा दाम्पत्याच्या देवोपासनेंत त्या दोघांची पारमार्थिक सिद्धि होऊं शकते. वैदिक देवोपासनेंत ऐहिक अभ्युदय व पारमा-र्थिक सिद्धि या दोन्ही गोष्टींचा—म्हणजे चारहि पुरुषार्थांचा—अंतर्भाव होतो. आणि म्हणून स्त्रीपुरुषांमध्यें पतिपत्नीचें नातें उद्‌भवल्याशिवाय त्यांना अभ्युदय व निःश्रेयस् प्राप्त करून घेण्याचा वेददृष्ट्या अधिकारच पोंचत नाहीं.

शिवाय येथें आणखी एक मुख्य गोष्ट सांगावयाची म्हणजे मनुष्य हा

जो जन्मतो, तो तीन ऋणें बरोबर घेऊनच जन्मतो, असा वैदिक धर्माचा मूळ सिद्धांत आहे. 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते' जन्मणारा ब्राह्मण हा तीन ऋणें बरोबर घेऊनच जन्मास येतो-अशी वैदिक धर्माची मांडणी आहे. येथें ब्राह्मण हा शब्द उपलक्षणार्थी वापरण्यांत आला आहे. यावरून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीनहि द्विजातींचा बोध होतो. म्हणजे वैदिक आर्य हा तीन ऋणांनीं जन्मतःच बद्ध झालेला असतो. तीं तीन ऋणें म्हटलीं म्हणजे देव-ऋण, ऋषि-ऋण व पितृ-ऋण हीं असून, त्यांची फेड पुढीलप्रमाणें करावयाची असते. देवयजन म्हणजे यज्ञयाग करून देव ऋणांतून, वेदाध्यन म्हणजे ब्रह्मचर्य पाळून, वेद शिकून ऋषिऋणांतून व संतति-म्हणजे पत्नीच्या ठायीं प्रजा-निर्माण करून पितृऋणांतून मुक्त झालें पाहिजे व मुक्त हेतां येतें. याविषयी वचन आहे तें असें:—जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते। ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो, यज्ञेन देवेभ्यः, प्रजया पितृभ्य, एष वा अनृणो यः पुत्री यज्वा ब्रह्मचारिवासी तै. सं.६-३-१०-५ ईश्वरीप्रसाद, विद्यारक्षण व वंशसातत्य या गोष्टी सिद्ध होण्यासाठीं वैदिक धर्मानें ही जी गृहयोजना आंखली आहे तिचें अनुकरण करीत गेल्यास व्यक्ति व समाज यांचा उत्कर्ष व विकास होणार नाहीं असें म्हणण्याचें कोण शहाणा धाडस करील! वैदिक लोक आजपर्यंत अनेक आपत्ति विपत्तींतून टिकून राहिले व त्यांची विद्या आतांपर्यंत मिळमिळीतच का होईना पण जिवंत राहिली, याचें श्रेय वैदिकांच्या वरील कुशल योजनेंतच आहे, हें आतां उघड सांगावयास नकोच. असो.

येथपर्यंतच्या विवेचनावरून एवढी गोष्ट स्पष्ट झाली कीं जो वैदिक धर्मात जन्मला-मग तो ब्राह्मण असो, क्षत्रिय असो वा वैश्य असो-त्यानें योग्य वेळीं विद्याध्ययन करून व योग्य वेळीं विवाह करून स्त्रीचें सख्य मिळवून पुढें शास्त्रोक्त रीतीनें गृहस्थाश्रमाचा गाडा चालविल्यास खात्रीनें त्याला अभ्युदय व निःश्रेयस या दोहोंचा लाभ होऊन त्याचा मानव जन्म सफल व कृतकृत्य होतो, ही गोष्ट भारतीयांना कधींच पटून गेली आहे.

वैदिकांनीं सर्व आश्रमांत गृहस्थाश्रमाला प्राधान्य देऊन वर त्याला धन्य म्हटलें आहे याचें कारण आतां उघडच आहे. या आश्रमांत सांसा-

रिक—जागतिक—सर्व सुखें अनुभवण्यास मिळून, शिवाय सृष्टीचें सत्य स्वरूपहि येथेंच यज्ञद्वारा उमगलें जातें. प्रपंचाच्या अनुभवांतूनच पारमार्थिक ज्ञानाचा मंगलोदय होऊन, पुढें उत्तर वयांत मनुष्य क्षणोक्षणीं पालटणाऱ्या प्रपंचाच्या पसाऱ्यांतून आपोआप निवृत्त होऊन, पुढें तो पारमार्थिक विद्येंत—आत्मज्ञानांत—आपसुखेंच विलीन होऊन रंगून जातो. पूर्ववयांत प्रपंचसुखाची जी त्यास गोडी असते, जी तिकडे ओढ असते, जी त्यांत मोहिनी वाटते, ती पुढें उत्तरवयांत ओसरून, आचारविचारांत क्रमशः क्रांती घडून येते आणि प्रपंचांत आलेल्या अनुभवाच्या जोरावर परमार्थांत शिरून तेथें तो तात्विक विचारांत व ब्रह्मानंदांत पूर्ण रंगून व गढून जातो. अर्थात् जो गृहपति आपलें गार्हस्थ्य जीवन वेदावर दृष्टि ठेवून जागरूकतेनें व श्रद्धा-युक्त मनानें आक्रमूं शकतो, त्यालाच वैदिक धर्माचें परमोच्च सुखैकधाम लाभून त्याचा मानव जन्म धन्य व कृतकृत्य होतो! म्हणून वैदिक धर्मात गृहपतीलाच प्रमुख स्थान देण्यांत आलें आहे, तें सर्वस्वीं योग्य असून, कोणाहि विचारी मनुष्याला अनुकरणीय आहे असेंच म्हणणें प्राप्त आहे. असो. आतां यापुढें या गृहपतीच्या आशा-आकांक्षा काय आहेत अगर असतात याचा थोडक्यांत छडा घेऊन पाहूं.

## वैदिक आर्यांच्या आशा, आकांक्षा

इष्ट प्राप्ति व अनिष्ट परिहार—म्हणजे सुखलाभ व दुःखनिरास—या दोन महत्त्वाच्या गोष्टी जगांतील मानवमात्रांचें मुख्य जीवनध्येय होऊन बसल्या आहेत, हें कांहीं आजच नव्यानें सांगावयास पाहिजे, अशांतला कांहीं भाग नाहीं. तो सर्व सांसारिक जीवांचा सामान्य नियमच होऊन बसला आहे, असें म्हटल्यास त्यांत फारसें बिघडत नाहीं. मनुष्याची सर्व धडपड सुखासाठींच आहे व असते. तसें पाहूं गेलें तर सुख कोणाला नको आहे? आणि दुःख कोणाला पाहिजे आहे? नित्याचा हा प्रत्यक्ष अनुभवच आहे कीं जो तो सुखाला चटावलेला असून तितकाच तो दुःखाला बुजणारा आहे! या बाबतींत वैदिक आर्यांच्या आशा, आकांक्षा काय आहेत, त्यांच्या भावना कशा उमटल्या आहेत, विचारप्रवाह कसे वाहात आहेत याची ओझरती ओळख आज वाचकांस—नवभारतास—करून दिल्यास त्यावरून भारतीय

आर्यांच्या स्वभाव गुणांची काहीं अंशीं कल्पना येईल, असें आम्हांस वाटल्यावरून ऋग्वेदांत प्रार्थनाद्वारें या बाबतींत वैदिक आर्यांनीं आपलें मनोगत काय व कसें व्यक्त केलें आहे, याची आम्ही थोडक्यांत ओळख करून देऊं इच्छितों.

हा विषय येथें देण्याचें कारण इतकेंच कीं आज पाश्चात्य पंडितांचे ग्रंथ वाचून व त्यांनीं त्यांत तोडलेले तारे सत्य समजून आधुनिक सुशिक्षितांचा आपल्या तेजस्वी पूर्वजांविषयीं व धर्माविषयीं भलताच ग्रह झालेला दिसून येतो. तो कितपत खरा आहे म्हणजे वस्तुस्थितीस धरून आहे, याची हा ग्रंथ वाचल्यावर ज्याची त्यालाच कल्पना करतां येईल. वैदिक आर्य म्हणजे रानटी लोक, त्यांचे विचार अगदीं उथळ, भावना फार संकुचित, ते जंगलांत राहणारे, धनगरवृत्तीचे, भांडखोर स्वभावाचे असून, त्यांच्यांत उदात्त विचार नाहींत, उदार वृत्ति नाहीं, विशाल दृष्टि नाहीं, असा आरोप कांहीं पाश्चात्य पंडित अहंमन्यतेच्या भरीस पडून बेमुरवत करीत आहेत व त्यांचीच री ओढून साहेबाची शिफारस मिळविण्यांत पुरुषार्थ मानणारे आमच्यांतले कांहीं विद्वान पंडित तसाच सूर काढण्यांत मोठी धन्यता मानीत आहेत ! जे वैदिक धर्माला खरोखरच नाक मुरडणारे आहेत त्यांच्याविषयीं आमचें कांहीं म्हणणें नाहीं. पण ज्यांच्यांत वैदिक धर्माविषयींची सद्भावनेची ज्योत– मिळमिळितच कां होईना–पण तेवत राहिली आहे, त्यांच्यापुढें खरी वस्तुस्थिति काय आहे हें पुनः थोडक्यांत उजळणी रूपानें मांडून दाखविल्यास, अज्ञानाच्या काजळीनें मंद झालेल्या विवेकदीपास पुनः उजळा मिळून, भ्रष्ट व भ्रमिष्ट झालेली परप्रत्ययनेय बुद्धि खास निवळूं लागेल, अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यामुळें वैदिक आर्य हे देवापाशीं आपलें अंत:करण काय व कसें उघड करून दाखवीत आहेत, म्हणजे त्यांना काय पाहिजे आहे व काय नको आहे, त्याची येथें थोडक्यांत मांडणी करून दाखवितों.

तेवढ्यावरून वैदिक आर्य हा प्राणि कसा आहे, म्हणजे तो रानटी आहे कां सुधारलेला आहे, अर्धवट अडाणी आहे कां चांगला समजूतदार आहे, मेंगा आहे कां तेजस्वी आहे, भांडखोर आहे कां शांतताप्रिय आहे, थोडक्यांत तो आहे तरी कसा, याची कल्पना सूज्ञ वाचकांस सहज करतां येईल.

त्यांनीं त्या प्रार्थनेंत प्रदर्शित केलेल्या इच्छा, आकांक्षा, भावना व विचार यांच्या पुढें या विसाव्या शतकांतील सर्व शहाणपणाचा व सुधारणेचा टेंभा मिरविणारे व मक्ता घेणारे लोक रेसभर तरी पुढें सरकल्याचें दिसत आहे कीं काय, हें ज्याचें त्यानेंच आपल्या मनाशीं अजमावून पहावें म्हणजे झालें. एवढी सूचना देऊन आतां आम्ही प्रस्तुत विषयाकडे वळतों.

हा विषय येथें देतांना आम्ही त्याचे दोन भाग करून ते वेगवेगळे वाचकांपुढें ठेवीत आहों. प्रथम त्यांना काय पाहिजे आहे—म्हणजे त्यांना प्रपंचांत काय इष्ट व प्रिय आहे–तें, व नंतर त्यांना काय नको आहे–म्हणजे काय अनिष्ट व म्हणून अप्रिय आहे–तें, यांचा पृथक् पृथक् उल्लेख करीत आहों.

## प्रार्थना.

| मूळ | अर्थ |
|---|---|
| १ ‘ अस्मभ्यं शर्म यच्छतम् ’ (ऋ १-१७-८) | आम्हांस सर्व प्रकारचें सुख द्या ! |
| २ ‘विश्वानि द्रविणानि धेहि ’ ( ५-४-७ ) | आम्हांस सर्व प्रकारची संपत्ति द्या ! |
| ३ ‘अस्मे धेहि श्रवो बृहत्’ (८-६५-९) | आम्हांस मोठी कीर्ति द्या ! |
| ४ ‘आ नो अग्ने सुचेतुना रयिं विश्वायुपोषसं । मार्डीकं धेहि जीवसे (१-७९-९) | हे अग्ने! आमची जीवनयात्रा उत्तम चालावी म्हणून सुंदर ज्ञानानें युक्त, सर्व आयुष्यभर पुरेल व आमच्या सुखास कारणीभूत होईल अशी उत्तम संपत्ति दे! |
| ५ ‘इन्द्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि’ (२-२१-६) | इंद्रा ! आम्हांस श्रेष्ठ प्रतीचें धन-दौलत दे ! |
| ६ ‘उरु क्षयाय नः कृधि’ (८-६८-१२) | आमच्या घरादाराची चांगली भर-भराट कर ! |
| ७ ‘ प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम्’ (५-४-१०) | प्रजेच्या द्वारें आम्ही अमर होऊं ! |

| मूळ | अर्थ |
|---|---|
| ७अ ' अतारिष्म तमसस्पारम्' (१-१८३-६) | आम्ही अज्ञानांधकारांतून पार व्हावें! |
| ८ 'तन्नो देवा यच्छत सुप्रवाचनं छर्दिरादित्याः सुभरं नृपाय्यम् ' (१०-३५-१२) | अहो आदित्यदेवांनो! अत्यंत प्रशस्त, सुसमृद्ध, माणसांचें रक्षण करणारें असें तुम्ही आम्हांस घर द्या! |
| ९ 'त्वं नः पश्चादधरादुत्तरात् पुर इंद्र नि पाहि विश्वतः ' (८-६१-१६) | हे देवा ! तूं आमचें पश्चिमेकडून, दक्षिणेकडून, उत्तरेकडून व पूर्वेकडून-अर्थात् सर्व बाजूंनीं-रक्षण कर ! |
| १० 'देवानां सख्यमुप सेदिमा वयं' (१-८९-२) | आम्ही देवांचें सख्य संपादन करूं ! |
| ११ 'नित्यस्य रायः पतयः स्याम' (७-४-७) | आम्हीं औरस पुत्राचे धनी व्हावें ! |
| १२ 'द्युमत्तमं रयिं दाः'(५-२४-२) | अत्यंत तेजस्वी असें ज्ञानधन दे ! |
| १३ 'नो मृळयत ' (२-२९-२) | आम्हांस सदैव सुखांत ठेव ! |
| १४ ' नः पशुमाँ अस्तु गातुः' (३-५४-१८) | आमचें घर पुत्रपौत्रादि संततींनीं व अश्वगवादि पशूंनीं भरभराटून असो! |
| १५ 'प्रतरं न आयुः' | आमचें आयुष्य सुदीर्घ कर ! |
| १६ 'शतं जीवेम शरदः'(७-६६-१६) | आम्ही शंभर वर्षे जगून रहावें ! |
| १७ 'यच्छा तोकाय तनयाय शं योः (४-१२-५) | आमच्या पुत्रपौत्रादिकांना शारीरिक सुख व मानसिक स्वास्थ्य दे ! |
| १८ 'यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु' (१०-१२१-१०) | फार काय, जी जी इच्छा धरून आम्ही तुझी उपासना करूं, ती ती आमची इच्छा सफल होवो ! |
| १९ 'यत् त्वा यामि दद्धि तत् नः' | आम्ही जें कांहीं मागूं तें सर्व, देवा! तूं आम्हांस देच ! |
| २० ' रयिं देहि सहस्त्रिणम् । अग्ने वीरवतीमिषम् ' (८-४३-१५) | हजारांनीं धनसंपत्ति व तसेंच बलवर्धक अन्न आम्हांस दे ! |

| मूळ | अर्थ |
|---|---|
| २१ 'विश्वा च नो जरितॄन् त्सत्पते अहा दिवा नक्तं च रक्षिषः'॥ (८-६१-१७) | हे सज्जनपालका। आम्हां भक्तांचें दिवसा व रात्रीं रक्षण कर ! |
| २२ 'विश्वायुर्धेह्यक्षितम्' (१-९-७) | खंडरहित असें उदंड आयुष्य दे ! |
| २३ 'शंताति मयस्करत्' (८-१८-७) | शांति वाढविणारें असें सुख दे ! |
| २४ 'शतं नो रास्व शरदः' (२-२७-१०) | आम्हांस शंभर वर्षें आयुष्य दे ! |
| २५ 'शं नः करत्यर्वते सुगं मेषाय मेष्ये। नृभ्यो नारिभ्यो गवे' (१-४३-६) | आमच्या घोड्यांला, मेढ्यांला, मेंढीला पुरुषांना, स्त्रियांना व गाईंना, अर्थात् सर्वांना सुखी ठेव ! |
| २६ 'शं यो ( धेहि' ) (३-१८-४) | आम्हांस सुख व शांति दे ! |
| २७ 'सत्या भवन्तु आशिषो नो अद्य' (७-१७-५) | आमच्या सर्व इच्छा आज सत्य म्हणजे सफल होवोत ! |
| २८ 'सं माऽग्ने वर्चसा सृज' (१-२३-२४) | हे अग्ने आम्हांस ज्ञानतेजानें सुकान्तिमान कर ! |
| २९ 'हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय' (१-५०-११) | माझा क्षयरोग व कावीळ, हे सूर्य देवा ! तूं नाश कर ! |
| ३० 'सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतः' (८-४०-७) | आमच्याशीं जे द्वेषभावानें वागतील त्यांची आम्ही चांगली खोड जिरवूं व आमच्याशीं जे मित्रत्वानें वागतील त्यांच्याशीं आम्ही सलोख्यानेंच वागूं. |
| ३१ 'वाजेषु नो अव' (१-७-४) | हे इन्द्र देवा ! युद्धांत आमचें रक्षण कर ! |
| ३२ 'जयेम सं युधि स्पृधः' (१-८-३) | लढाईत आम्हीं शत्रूस जिंकूंच जिंकूं असें होवो ! |
| ३३ 'यशो अस्मासु धेहि' (५-४-१०) | देवा! लढाईत आम्हांस यशस्वी कर! |

| मूळ | अर्थ |
|---|---|
| ३४ 'यत इंद्र भयामहे ततो नो अभयं कृधि' (८-६१-१३) | हे इंद्र देवा! जेथून आम्हांस भय प्राप्त होईल, तेथून आम्हांस निर्भय कर! |
| ३५ 'पाहि रीषत उत वा जिघांसतः' (१-३६-१५) | व्याघ्रादि दुष्ट प्राण्यांपासून व घात करूं पाहाणाऱ्या शत्रूंपासून आमचें रक्षण कर ! |
| ३६ 'पाहि धूर्तेरराव्णः' (१-३६-१५) | धूर्त कवडीचुंबकापासून आमचें रक्षण कर ! |
| ३७ 'पाहि नो अग्ने रक्षसः' (१-३६-१५) | हे अग्ने ! आमचें राक्षसांपासून रक्षण कर ! |
| ३८ 'त्वं पाहि अंहसः' (७-१५-१५) | आमचें पापापासून रक्षण कर ! |
| ३९ 'अप त्यं परिपन्थिनं मुषीवाणं हुरश्चितम्' (१-४२-३) | वाटमारे, चोर व कपटी लोक यांस आम्हांपासून दूर-अतिदूर—ठेव ! |
| ४० 'अप अमीवां (सेधत) (८-१८-१०) | आमची रोगराई सर्व नष्ट कर ! |
| ४१ 'अग्ने नि पाहि नस्त्वं प्रति ष्म देव रीषतः' (८-४४-११) | अग्ने, हिंसक लोकांपासून आमचें रक्षण कर ! |
| ४२ 'अप स्रिध सेधत' (८-१८-१०) | आमच्या शत्रूचा नायनाट कर ! |
| ४३ 'अप सेधत दुर्मतिम्' (८-१८-१०) | जे दुष्टबुद्धि आहेत त्यांचाहि फडशा पाड. |
| ४४ 'अस्मिन् भयस्थे कृणुतमु लोकम्' (२-३०-६) | या घनघोर युद्धांत आम्हांस निर्भय असें सुरक्षित स्थान दे ! |
| ४५ 'आरे अस्मत् कृणुहि दैव्यं भयम्' (८-६१-१६) | देवांचा जो कोप आम्हांवर झाला असेल, त्याभयापासून आम्हांस दूर ठेव! |
| ४६ 'युयुतमस्मदनिरामवीवाम्' (७-७१-२) | आमचें अन्नदारिद्य व आधिव्याधि आम्हांपासून दूर कर ! |
| ४७ 'युयुताऽमतिम्' (८-१८-११) | आमची बुद्धिहीनता नाहींशी कर! |

| मूळ | अर्थ |
|---|---|
| ४८ 'शत्रूयतामा भरा भोजनानि' (५-४-५) | आमच्या शत्रूची सर्व अन्नसामग्री आम्हांस आणून दे ! |
| ४९ 'व्यमीवाश्चातयस्वा विषूचीः' (२-३३-२) | सर्व शरीरांत व्यापून राहणाऱ्या रोगाचें उच्छेदन कर ! |
| ५० 'सत्याः सन्तु यजमानस्य कामाः | हे देवा ! या तुझ्या उपासकाचे मनोरथ सर्व सिद्धीस जावोत! देवा, सर्व सिद्धीस जावोत ! |

वैदिक आर्य देवापाशीं प्रार्थनाद्वारा काय मागतात याची स्थूल मानानें कल्पना करण्यास वरील वचनें पुरेशीं आहेत. तसें म्हटल्यास वरील अर्थाच्या व ठशाच्या प्रार्थना ऋग्वेदांत पदोपदीं आढळून येतात. पण त्या प्रत्येकांत कांहीं तरी नाविन्य असतें हें खरें; तथापि त्यांची यथार्थ कल्पना येण्यास वरील वचनें बस्स आहेत. शितावरून भाताची परिक्षा करण्याइतके आमचे वाचक सूज्ञ आहेत, असें गृहीत धरून हा विषय येथेंच आटपता घेतों. आतां यानंतर त्या वेदभक्तांना काय वावडें होतें, काय अप्रिय होतें, काय अनिष्ट होतें, याविषयीं याच हातानें कांहीं वचनें उद्धृत करून हा विषय संपवितों.

त्यांना या पुढील गोष्टी वावड्या व अप्रिय होत्या.

| | |
|---|---|
| १ मा ते गोदत्र निरराम राधसः ' (८-२१-१६) | हे उदार इंद्रा! आम्ही जे तुझे भक्त ते संपत्तीपासून ढळूं नये म्हणजे धनरहित असूं नये ! |
| २ 'मा ते गृहामहि' (८-२१-१६) | तुझे भक्त जे आम्ही, त्या आम्हांला तुला सोडून इतरांजवळ याचना करण्याचा प्रसंग येऊं नये ! |
| ३ 'मा किस्तोकस्य नो रिषत् ' (८-६७-११) | आमच्या मुला-बाळांना इतरांपासून त्रास होऊं नये ! |
| ४ मा न आयुःप्रमोषीः(१-६४-११) | आमच्या आयुष्यास मारूं नकोस ! |

| मूळ | अर्थ |
|---|---|
| ५ 'मा न क्षुदे परादाः (७-१-१९) | आम्हांस भुकेच्या तडाख्यांत देऊं नकोस ! |
| ६ ('मा न अग्ने अवसृजो) अविष्यवे' (१-१८९-५) | आम्हांस भुकेकंगाल बनलेल्यांच्या स्वाधीन करूं नकोस ! |
| ७ 'मा नो अग्ने अव सृजो अघाया' (१-१८९-५) | आम्हांस दुष्ट हिंसकाच्या स्वाधीन करूं नकोस ! |
| ८ 'मा नो अव सृज रिपवे दुच्छनायै (१-१८९-५) | आम्हांस सतावणाऱ्या शत्रूच्या हवालीं करूं नकोस! |
| ९ 'मा रक्षसःपरा दाः'(७-१-१९) | आम्हांस छळणाऱ्या राक्षसांच्या हवालीं करूं नकोस ! |
| १० 'मा नो अग्नेऽमतये परा दाः। (७-१-१९) | आम्हांस मूर्ख मनुष्यांच्या हवालीं करूं नकोस ! |
| ११ 'मा नो अग्ने ऽवीरते परा दाः। (७-११-९) | आम्हांस निपुत्रिकाच्या स्वाधीन करूं नकोस ! |
| १२ 'मा दत्वते दशते परा दाः ' (१-१८९-५) | दांतानीं दंश करणाऱ्या सर्पादिकांच्या व शिंगांनीं डिवचणाऱ्या पशूंच्या सपाट्यांत आम्हांस देऊं नकोस ! |
| १३ 'मा नो अरातिरीशत'(२-७-२) | शत्रु आमच्यावर सत्ता न चालवो ! |
| १४ 'मा नो निद्रा ईशत (८-४८-१४) | आमच्यावर निद्रेचा अमंल न चालो! |
| १५ 'मा नो मर्ता अभि द्रुहन्' (१-५-१०) | मनुष्य आमचा द्रोह न करो ! |
| १६ 'मा व एनो अन्यकृतं भुजेम' (६-५१-७) | इतरांनीं केलेल्या पापांचें प्रायश्चित्त भोगण्याचा दुर्धर प्रसंग आम्हांवर न येवो ! |

| मूळ | अर्थ |
| --- | --- |
| १७ 'मा शूनें अग्ने निषदाम ' (७-१-११) | निपुत्रिकाच्या घरीं राहाण्याचा अनिष्ट प्रसंग आम्हावर येऊं नये ! |
| १८ 'मा निदे अप कृधि'(३-१६-५) | आम्ही जगांत निंदेचा विषय होऊं असा प्रसंग आणूं नकोस ! |
| १९ माऽगोतायै सहस्पुत्त(अप कृधि) (३-१६-५) | गोसंपत्ति हीन अशा दरिद्याच्या हवाली आम्हांस देऊं नकोस ! |
| २० 'मा तत्कर्म वसवो यच्चयध्वे' (६-५१-७) | हे देवांनो ! जें कर्म केल्यानें तुम्ही आम्हांस शिक्षा कराल, तसलें पापकर्म आमच्या हातून केव्हांहि न घडो! इ० |

या प्रार्थनांवरून नजर फिरविली म्हणजे त्याच्या प्रपंचाची—जागतिक जीवनाची—कोणालाहि सहज कल्पना करतां येण्यासारखी आहे. एवढ्या-वरूनच त्यांच्या संपूर्ण जागतिक जीवनाची यथार्थ ओळख पटण्यासारखी नसली तरी त्याचा सर्वसाधारण रेख व रंग ओळखण्यास फारशी अड-चण पडणार नाहीं. हा सर्व ग्रंथ वाचून पाहिल्यावर त्यांची पूर्ण ओळख पटण्यास अडचण भासणार नाहीं. पण प्रस्तुत प्रकरणाचा तेवढाच विचार केला तरी त्याच्या जीवनाचें वैशिष्ट्य ध्यानांत भरल्याशिवाय रहात नांहीं. आतां ते विचार सामान्य प्रापंचिकासारखे दिसतात हें खरें. वर वर पाह-णाऱ्या उथळ दृष्टीच्या मनुष्याला तसे दिसले व दिसावेत, यांत कांहीं आश्चर्य नाहीं; पण जरा खोल व सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास तो समज फारसा टिकून राहील असें आम्हांस वाटत नाहीं. सकृद्दर्शनी ही गोष्ट दिसून येते कीं त्यांची दृष्टि केवळ जडांतच गुंतून व खिळून राहिली नव्हती. त्याप-लीकडे गेली होती, म्हणजे त्यांचें जागतिक जीवन अर्थात् प्रपंच हा पर-मार्थ प्रवण होता. तो आधुनिकांच्यासारखा केवळ विषयसुखलोलुप अर्थात् देहतर्पणप्रवण-नव्हता. जडाच्या—दृश्य जगाच्या—पलीकडे जडावर सत्ता चालविणारी अशी एक सूक्ष्म व दिव्य शक्ति असून, ती वर द्युलोकांत नांदते. तिच्या कर्तव्यपरत्वें विविध पर्यायाला देव असें नांव असून त्या शक्तीच्या उपासनेनेंच मनुष्य या लोकीं सर्व प्रकारें सुखी व संपन्न होऊन,

मरणोत्तर सद्गतीस जातो, या गोष्टीवर त्यांचा संपूर्ण व भरीव विश्वास होता आणि म्हणून इहलोकांतील जीवनयात्रा सुखरूप व सुसमृद्ध होण्यासाठीं त्यांनीं प्रपंचांत प्रार्थनारूपानें वरीलप्रमाणें देवांची करुणा भाकिली आहे. आतां त्यांचा परमार्थ कसा होता हें पुढें योग्य प्रसंगीं सांगण्यांत येईल. येथें फक्त त्यांच्या प्रपंचांतील सुखदुःख, अडीअडचणी, आपत्तिविपत्ति यांचा नामनिर्देश करण्यांत आला आहे. त्यांतील गोष्टी विचारांत घेतां त्यांचें प्रापंचिक जीवन-जागतिक जीवन-तेजस्वी, प्रभावी, उदात्त व सुसमृद्ध असें अष्टपैलू होतें असें म्हटल्यास त्यांत चूक होणार नाहीं. असो.

## वैदिक आर्यांचा देव

उपरिनिर्दिष्ट वैदिकांच्या प्रार्थना सुपूर्त करणारा असा जो वैदिकांचा देव, तो आहे तरी कसा, त्याचें रूप काय, स्वभाव काय, सत्ता काय, महिमा काय, आणि तो राहतो कोठें आणि करतो काय, इत्यादि प्रश्न अंतःकरणांत उद्भवणें, हें साहजिकच असून, त्याचें येथें थोडक्यांत निरूपण करणें हें आतां ओघानेंच प्राप्त झालें. म्हणून त्याचाहि परामर्श या स्थळीं स्थूल मानानेंच करण्याचें योजिलें आहे. तत्पूर्वी एका गोष्टीचा उलगडा करणें अवश्य असून ती म्हणजे देवाची कल्पना; वैदिकांच्या मतें देवाची कल्पना काय व कशी आहे, याचें थोडेसें स्पष्टीकरण केल्याशिवाय पुढें जाणें योग्य होणार नाहीं. कारण आज जशी हिंदूंची देवाविषयीं भरमसाट कल्पना झालेली दिसून येते, तशी वैदिकांची वेदकालीं नव्हती. वैदिक लोक आजच्या हिंदूंप्रमाणें मूर्तिपूजक नव्हते. त्यांचे देव अमूर्त पण सर्व विश्वांत घनदाट भरून राहिलेले ! हिंदूंच्या देवांप्रमाणें बालयौवनजरादि अवस्थांनीं युक्त व जन्म-मरणादिकांनीं व्याप्त असणारे मर्त्य मानव नसून, ते नित्य तरुण असून अजर व अमर आहेत ! ते पूर्वी होते, आजहि आहेत व पुढेंहि असतील ! रामकृष्णादि देव आज नाहींत. ते कालवश झाले आहेत. पण इंद्र, अग्नि, वरुण, सूर्य इत्यादि सर्व वैदिक देव मात्र पूर्वीप्रमाणेंच आजहि आहेत ! व जगाच्या अंतापर्यंतहि तसेच राहतील ! अशा अमूर्त पण अमर देवांची उपासना करून प्राचीन वैदिक आर्य धन्य व कृतकृत्य झाले ! थोडक्यांत म्हणजे वैदिकांचा देव आजच्यासारखा देवळांत नाहीं, मूर्तींत

नाहीं, क्षेत्रांत नाहीं, तीर्थांत नाहीं. पण गम्मत ही कीं कोठेंच नाहीं म्हणावा तर तो सर्वत्र आहे ! आणि सर्वत्र आहे म्हणावा तर कोठेंच दिसत नाहीं ! वेदांतील वैदिकांचा देव हा असा सूक्ष्म व सर्वव्यापी आहे ! !

आतां वैदिक आर्यांची देवकल्पना सांगावयाची झाली तर ती अशी सांगतां येईल. ' देवो दानाद्वा दीपनाद्वा द्योतनाद्वा द्युस्थानो भवतीति वा'— भक्त मागेल तें देणारा ( दानात् ), प्रकाश देणारा ( दीपनात् ), स्वतः प्रकाशवान् ( द्योतनात् ) किंवा द्युलोकांत म्हणजे स्वर्गांत राहणारा असा जो, त्याला देव अशी संज्ञा आहे. आणि ही व्याख्या निरुक्तकारांनीं केलेली असून, ती वेदाला पूर्ण मान्य आहे. थोडक्यांत म्हणजे वैदिक देव हे स्वर्गांत राहणारे असून ते स्वयंप्रकाश आहेत. तसेंच ते जगाला प्रकाश देणारे असून भक्तमनोरथ पूर्ण करणारे कामकल्पद्रुम आहेत. ही अशी थोडक्यांत पण यथार्थ वैदिकांची देवकल्पना आहे. आज हिंदूंचे रामकृष्णादि जे देव आहेत, ते वैदिक देव नसून, पौराणिक देव आहेत. अर्थात् ते अवतारी पुरुष असून, वैदिक दृष्टीनें त्यांची गणना देवकोटींत करण्यांत येत नसून, मानवकोटींतच होतें, हें आतां उघड सांगण्याचें कारण नाहीं.

वेदांत डोकावून पाहिल्यास तेथें अनेक देवदेवता आढळतात ही गोष्ट खरी. पण म्हणून ते सर्व निराळे व स्वतंत्र देव आहेत असें मात्र नव्हे. अशी ज्यांची समजूत असेल ती भ्रामक व म्हणून चुकीची आहे. वेदांत सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केल्यास तेथें एकेश्वरीवादच गर्भित आहे असें स्पष्ट दिसून येईल. नव्हे,तसें स्पष्ट वेदनारायणानें बोलूनहि दाखविलें आहे. पण तिकडे लोकांचें जावें तसें लक्ष जात नाहीं. म्हणून हा घोटाळा झाला आहे. ऋग्वेदांत याविषयीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, ' **इन्द्रं मित्रं वरुणं अग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्। एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः** ' ( ऋ. १-१६४-४६ ) हा जो परब्रह्मस्वरूप तेजस्वी सूर्यनारायण आहे, त्यालाच कोणी ऐश्वर्यसंपन्न इंद्र म्हणतात. त्यालाच कोणी मरणापासून तारण करणारा मित्र म्हणतात. त्यालाच

कोणी पापापासून मुक्त करणारा वरुण म्हणतात व त्यालाच कोणी चलनादि गुणविशिष्ट असा अग्नि म्हणतात. आणि तोच द्युलोकांत राहणारा सुंदर पंखाचा पक्षी म्हणजे सूर्यनारायण हा होय. पण वस्तुतः देव हा आदित्यरूपानें एकच असला तरी मूल तत्त्व जाणणारे सूक्ष्म दृष्टीचे सूज्ञ ऋषी त्या एकाच देवाला व्यवहारकालीं प्रसंगाप्रसंगानें निरनिराळ्या नांवानें संबोधितात व निरनिराळ्या रूपांत आळवितात. आकाशांत राहून जगावर वृष्टि करणारा म्हणून त्यास ( विद्युत् ) अग्नि म्हणतात. प्राणिमात्राचें नियमन करणारा म्हणून त्यासच यम असें म्हणतात. अंतरिक्षांत राहून श्वसन करणारा म्हणून त्यासच मातरिश्वा म्हणजे वायु असें म्हणतात. यावरून हें स्पष्ट होतें कीं देव हा एकच, पण निरनिराळ्या नांवांखालीं, निरानिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या रूपांत त्या एकाच देवाची आराधना करण्यांत आली आहे. हीच गोष्ट इतरत्र **'एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति '** अशी पुनः स्पष्ट घोषित केली आहे, ( ऋ. १०-११४-५ ). तेव्हां वैदिक आर्य हे एक देवोपासक होते, पण व्यवहारकालीं त्यांनीं त्या एका देवालाच प्रसंगोपात् निरनिराळ्या नांवाखालीं व निरनिराळ्या रूपांत आळविलें आहे, हें मात्र खरें.

आतां एकाच देवाचीं अनेक रूपें कशीं असूं शकतात हें आतां सांगणें ओघानेंच प्राप्त झालें आहे. म्हणून त्याविषयीं दृष्टांतद्वारा थोडक्यांत खुलासा करतों. सूर्य हा वस्तुतः एकच आहे व त्याचा प्रकाश हा पांढरा शुभ्र आहे. अशी जरी वस्तुस्थिति असली तरी त्या सूर्यापासून निघणाऱ्या किरणांची गोष्ट मात्र अगदीं निराळी आहे. सूर्य हा पांढरा शुभ्र प्रकाशवान दिसला तरी त्याचे किरण मात्र तसे नाहींत. ते लाल, पिवळे, हिरवे, निळे असे सात निरनिराळे रंगाचे आहेत. सूर्यप्रकाशाचें लोलकामधून पृथक्करण केल्यास तेथें हे सात रंग स्वच्छ व स्पष्ट दिसतात, हें आज अनुभवसिद्ध व जगप्रसिद्ध आहे. त्या सातहि किरणांच्या समीकरणानें—संमिश्रणानें—एकजिनसी पांढरा शुभ्र प्रकाश आविर्भूत होतो आणि तो प्रकाश म्हणजेच सूर्य होय, हें तितकेंच सत्य आहे. किरणाला उद्देशून जेव्हां बोलावयाचें असतें तेव्हां त्या सप्तरंगी किरणांचें पृथक् पृथक् रीतीनें वर्णन करणें हें

स्वाभाविकच आहे, आणि तसें त्यांचें निरनिराळें रंगरूपांत वर्णन केलें म्हणून ते कांहीं सूर्यापासून निराळे व स्वतंत्र आहेत असें समजणें अगर मानणें हें अनुभवदृष्ट्या चुकीचें होईल. सूर्याचेच ते अंशभूत पर्याय आहेत. म्हणजे त्यांचा अंगांगी संबंध आहे—हें जसें खरें, तद्वत् इंद्र, अग्नि, वरुण, मित्र इत्यादि देव हे व्यवहारकालीं कर्तव्यपरत्वें निरनिराळ्या शब्दांनीं वर्णन करण्यांत व आळविण्यांत आले असले तरी ते सर्व वस्तुतः एकाच परब्रह्म वस्तूचे—सगुण प्रजापति देवाचे—निरनिराळे पर्याय आहेत. नहून ते परब्रह्म वस्तूहून निराळे व स्वतंत्र नाहींत आणि हीच भावना—तंतोतंत हीच भावना—' एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति '—हीच भावना वैदिक ऋषींची अभंग व अखंड होती आणि तीच त्यांनीं ' एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ' या वचनांतूनहि स्पष्ट बोलून दाखविली आहे. मग आतां आणखी काय पाहिजे ?

पुनः आणखी, एकच वस्तु निरनिराळ्या शब्दांतून कशी व्यक्त करण्यांत येते, याला हें पुढील उदाहरण मननीय आहे. मनुष्य तोच पण मुलाच्या दृष्टीनें तोच बाप होतो, बापाच्या दृष्टीनें तोच मुलगा होतो. पत्नीच्या दृष्टीनें तोच पति होतो, बहिणीच्या दृष्टीनें भाऊ होतो, मित्राच्या दृष्टीनें सखा होतो, शिष्याच्या दृष्टीनें गुरु होतो व प्रजेच्या दृष्टीनें राजा होतो ! अर्थात् व्यक्ति एकच पण कारणपरत्वें अगर कर्तव्यपरत्वें तीच केव्हां बाप, तर केव्हां मुलगा, केव्हां पति तर केव्हां भाऊ, केव्हां गुरु तर केव्हां राजा होऊं शकते, ही गोष्ट सामान्य जनतेस कांहीं अपरिचित नाहीं. हें जर खरें तर उपासनाप्रसंगीं कारणपरत्वें एकाच देवाला निरनिराळ्या नांवानें संबोधण्यांत व आळविण्यांत आलें म्हणून तो देव काय निराळा झाला म्हणावें काय ? वैदिक आर्य हे अनेक देवोपासक आहेत, त्यांना एकेश्वरीवाद माहीत व मान्य नाहीं, असा जो त्यांजवर तुच्छतापूर्वक आरोप करण्यांत येतो, त्यांत आरोप करणाऱ्यांचें शोचनीय अज्ञान मात्र दिसून येतें. तो दोष वैदिकांचा नसून, अज्ञानामुळें तसा आरोप करणाऱ्या अर्धवटांचा आहे, इतका शेरा मारून आतां पुढें चालूं लागतों.

वेदांत एकाच परमेश्वराच्या निरनिराळ्या शक्तीला निरनिराळ्या रूपांत निरनिराळें नांव देऊन व्यवहारकालीं त्याला निरनिराळे देव बनविलें आहे, ही गोष्ट क्षणभर खरी धरून चालूं. तेव्हां असे हे देव वेदांत फक्त तेहतीसच ('ये त्रिंशति त्रयस्परो देवासः' ऋ. ८-२८-१) असून, त्यांचे मुख्य तीन गट आहेत. एक गट वसूंचा, दुसरा रुद्रांचा व तिसरा आदित्यांचा. वसूच्या गटांत आठ, रुद्राच्या गटांत अकरा आणि तिसऱ्या आदित्यांच्या गटांत बारा, याप्रमाणें एकतीस देव व त्यांच्या जोडीला द्यावा व पृथ्वी यांची गणना करून तेहतीस ही सख्या निश्चित करण्यांत आली आहे. या देहतीस देवांत इंद्र, अग्नि, वरुण व सूर्य या चार देवांसच महत्त्वाचें स्थान असून, त्यांत इंद्र हा राष्ट्रपति, अग्नि हा गृहपति, वरुण हा व्रतपति व सूर्य हा विश्वपति आहे. लढाईच्या प्रसंगीं राष्ट्ररक्षणार्थ इंद्राला, गृहकृत्यांत अग्नीला, पापपुण्य विचारांत वरुणाला व विश्वधारणांत सूर्याला अग्रस्थान देण्यांत आलें आहे.

वैदिक आर्यांच्या आशा-आकांक्षा व त्यांच्या देव-प्रार्थना पाहिल्यास आधुनिक कांहीं पाश्चात्य पंडित व त्यांचे अंधभक्त आमचे कांहीं भारतीय पंडित समजतात तसे ते विचारांत उथळ व आचारांत अडाणी नसून, आचारांत चांगले सुधारलेले व विचारांत सर्वांत पुढारलेले होते, असें म्हणावयास कसलीच हरकत दिसत नाहीं. तेव्हां त्यांचा देव तरी कसा होता अगर असावा हें समजण्याचें कुतूहल वाचकांच्या मनांत डोकावूं लागलें तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. कारण जसा गुरु तसा शिष्य हें जसें खरें, तसें जसा देव तसा भक्त हेंहि तितकेंच खरें आहे. गुरूवरून शिष्याची कल्पना करतां येते, तशीच देवावरून भक्ताचीहि कल्पना करण्यास मदत होते. म्हणून वैदिकांचा देव ऋग्वेदांतून कसा उमटलेला दिसतो, याची स्थूलमानानें येथें रूपरेखा आंखून, वाचकांना त्याची कल्पना करून देऊं इच्छितों. अर्थात् पुढील विवरण हें कोणत्याहि एकाच देवताचें नसून ऋग्वेदांतील सर्व देवतांचें मिळून केलेलें आहे. आणि असें असलें तरी तें तत्त्वतः एकाच परमेश्वराचें—देवाधिदेवाचें—आहे, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

वैदिक आर्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण करणारा देव, तो आहे तरी कसा अगर असावा हें समजण्याचें कुतूहल वाचकांच्या मनांत आतां डोकावूं लागलें तर त्यांत अस्वाभाविक असें आमच्या मतें कांहींच नाहीं. म्हणून त्यांच्या समाधानार्थ ऋग्वेदांतून त्याचें चित्र कसें उमटलेलें आहे, याची स्थूलमानानें येथें रूपरेखा आखून दाखवितों. अर्थात् पुढील विवरण हें ऋग्वेदांतील अनेक देवांचें मिळून एकत्र केलेलें असलें तरी तें तत्वतः एकाच परमेश्वराचें आहे हें लक्षांत ठेवावें. आणि हें वर्णन अक्षरानुक्रमानें देण्यांत आलें आहे हेंहि पण विसरूं नये.

वैदिकांचा देव आहे तो असाः—

| ऋग्वेद वर्णन | मराठी अर्थ |
|---|---|
| १ 'अच्युतः' ४-१७-४ | तो च्युतिरहित आहे ! |
| २ 'अजरः' ६-४-३ | तो जरारहित आहे ! |
| ३ 'अदब्धः' ८-४४-२० | तो अहिंसित आहे : |
| ४ 'अदाभ्यः' ८-६१-१२ | तो खंडरहित आहे ! |
| ५ 'अद्भुतः' ५-२३-२ | तो अत्यंत मोठा आहे ! |
| ६ 'अद्रुहः' १-३-९ | तो द्रोहरहित आहे ! |
| ७ 'अनवद्यः' १-३१-९ | तो कलंकरहित आहे ! |
| ८ 'अनागाः' १-९४-१५ | तो पापरहित आहे ! |
| ९ 'अपारः' ४-१७-८ | तो अंतरहित आहे ! |
| १० 'अमर्त्यः' ३-२-११ | तो मरणरहित आहे ! |
| ११ 'अमूरः' १-७२-२ | तो अज्ञानरहित आहे ! |
| १२ 'अमृतः' ८-७४-५ | तो नाशरहित आहे ! |
| १३ 'अस्रिधः' १-३-९ | तो क्षयरहित आहे ! |
| १४ 'असुरः' १-३५-१० | तो सर्वसमर्थ आहे ! |
| १५ 'उग्रः' ८-३३-१० | तो तेजस्वी आहे ! |
| १६ 'ऋतपा' ३-१०-४ | तो सत्याचा संरक्षक आहे ! |
| १७ 'गृहपतिः' ७-१५-२ | तो गृहाचा पालक आहे ! |
| १८ 'गुहासन्तः' ५-८-३ | तो गुप्तस्थळीं राहणारा आहे ! |

| | |
|---|---|
| १९ ' जातवेदः ' ८-११-३ | तो सर्वज्ञाता आहे ! |
| २० ' धनदाः ' ६-१९-५ | तो भक्तांना धन देणारा आहे ! |
| २१ ' धृतव्रतः ' ८-४४-२५ | तो अंगीकृत कार्य तडीस नेणारा आहे ! |
| २२ ' पतिर्दिवः ' ८-१३-८ | तो स्वर्गाचा स्वामी आहे ! |
| २३ ' पुरुरूपः ' ५-८-५ | तो नानारूपें धारण करणारा आहे ! |
| २४ ' पुष्टिवर्धनः , १-३१-५ | तो भक्ताची भरभराट करणारा आहे ! |
| २५ ' मघवा ' ८-६१-१ | तो अत्यंत उदार आहे ! |
| २६ ' मनोजवा ' ७-६८-३ | तो मनोगतीनें धावणारा आहे ! |
| २७ ' यजिष्ठः ' ४-१-४ | तो अत्यंत पूज्य आहे ! |
| २८ ' यविष्ठ्यः ' ५-८-६ | तो अत्यंत तरुण आहे ! |
| २९ ' विपश्चितः ' ८-१-४ | तो अत्यंत सूज्ञ आहे ! |
| ३० ' विश्वचक्षः ' ७-६३-१ | तो सर्व पाहणारा आहे ! |
| ३१ ' विश्पतिः ' ८-४४-२६ | तो लोकांचा पालक आहे ! |
| ३२ ' विश्वतः पात् ' १०-८१-३ | त्याला सर्व बाजूंनीं पाय आहेत ! |
| ३३ ' विश्वतो बाहू ' १०-८१-३ | त्याला सर्व बाजूंनीं हात आहेत ! |
| ३४ ' विश्वतो मुखः ' १०-८१-३ | त्याला सर्व बाजूंनीं मुखें आहेत ! |
| ३५ ' विश्वभरासः ' ४-१-१९ | तो जगाचा पोषक आहे ! |
| ३६ ' विश्वरूपः ' १-१३-१० | सर्व रूपें त्याचींच आहेत ! |
| ३७ ' विश्वविदः ' ३-१९-१ | तो विश्वांतील सर्व गोष्टी जाणतो ! |
| ३८ ' विश्वसाहः ' ६-१९-११ | तो सर्व शत्रूंचा फडशा पाडणारा आहे ! |
| ३९ ' वृषभः ' ८-२१-४ | तो भक्तांचा मनोरथ-पूरक आहे ! |
| ४० ' व्रतपा ' ८-११-१ | तो सत्कर्माचा पालक आहे ! |
| ४१ ' शतक्रतुः ' ८-१-११ | तो अनंत पराक्रमी आहे ! |
| ४२ ' शुचिः ' १-१४२-३ | तो परम पवित्र आहे ! |
| ४३ ' शूरः ' ६-१५-११ | तो शूर आहे ! |

| | |
|---|---|
| ४४ ' शोचिर्वसानः ' ३-१-५ | तो तेजोरूपी वस्त्र नेसलेला आहे ! |
| ४५ ' श्रवस्तमः ' १-९१-१७ | तो अत्यंत यशस्वी आहे ! |
| ४६ ' सत्पतिः ' ८-१९-३६ | तो सज्जनांचा पालक आहे! |
| ४७ ' सत्यः ' ८-२-३६ | तो सत्य स्वरूप आहे ! |
| ४८ ' सत्यराधः ' १-१०१ ८ | सत्य हेंच त्याचें धन आहे! |
| ४९ ' सत्यशुष्मः ' १-१०३-६ | सत्य हेंच त्याचें बळ आहे ! |
| ५० ' सुक्रतुः ' १-२५-१२ | तो सत्कर्म करणारा आहे ! |
| ५१ ' सुदावनः ' १-१४१-९ | तो महान् दाता आहे ! |
| ५२ ' सुप्रतीकः ' ६-१५-१० | तो सर्वसुंदर आहे ! |
| ५३ ' सुमेधाः ' ३-१५-५ | तो परम ज्ञानी आहे ! |
| ५४ ' सहस्त्राक्षः ' १-७९-१२ | त्याला सहस्र म्हणजे अनंत नेत्र आहेत ! |

या सर्वांचें तात्पर्य थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तो स्वर्गाचा जनक आहे. ( ' जनिता दिवः ' ८-३६-४ ) तसाच पृथ्वीचाहि जनक आहे. ( 'जनिता पृथिव्याः'८-३६-४) इतकेंच काय तो या सर्व विश्वाचा निर्माणकर्ता आहे. अर्थात् तोच या सर्व भुवनांचा राजा आहे. ( 'एको विश्वस्य भुवनस्य राजा'३-४६-२) त्यानेंच तो स्वर्ग व ही पृथ्वी धारण केली आहे. ( 'सदाधार पृथ्वीं द्यामुतेमाम्' १०-१२१-१ ) तोच या द्यावापृथ्वीचें रक्षण व पोषण करतो. ('स द्यावापृथिवी बिभर्ति'१०-३१-८) त्याला या सर्व भुवनांतील घडामोडी समजतात. ('विश्वा भुवनानि वेद' ३-३५-१०) मनुष्याच्या अंतःकरणांतहि तोच प्रविष्ट होऊन आहे. ( 'मर्त्येष्वाविशन्' ५-२५-४) म्हणून मनुष्याच्या अंतरंगांतील सर्व कांहीं गुह्यें त्यास समजतात. ( ' वेद मर्तानामपीच्यम् ' ८-३९-६ ) हा जो देवाचा महिमा आहे, तो सत्य—अगदीं सत्य सत्य—आहे. पण गम्मत ही कीं हा असा देव असून त्याला मात्र कोणीच ओळखीत नाहींत. ( ' न तं विदाथ ' १०-८२-७. )

या देवांची सांगावयाची आणखी एक गोष्ट म्हणजे ते इच्छतील तसें होतें. म्हणजे ते सत्यसंकल्प आहेत. ( ‘ यथा वशन्ति देवास्तथेदसत् ’ ८-२८-४ ) ते जें मनांत आणतील तसें झालेंच पाहिजे. तें व्यर्थ होणारच नाहीं. ( ‘ यच्चिकेत सत्यमित् तन्न मोघम् ’ १०-५५-६ ). तसेंच त्यांचे जे नियम आहेत ते अखंडित आहेत. ते कोणालाहि मोडतां यावयाचे नाहींत. ( ‘ अदब्धानि वरुणस्य व्रतानि ’ ३-५४-१८ ) जें सत्य आहे व जें सरळ आहे त्याचें ते रक्षण करतात व जें असत्य आहे त्याचा नाश करतात. ( ‘ यत्सत्यं यतरद्दजीयस्तादितत्सोमोऽवति हन्त्यासत् ’ ७-१०४-१२ ). त्याचप्रमाणें राक्षसादिक दुष्ट लोकांचे व कपटी व लबाड लोकांचे ते कर्दनकाळ आहेत. ( ‘ हन्ति रक्षो हन्त्यासद्वदन्तम् ’ ७-१०४-१३ ) लढाईच्या वेळीं देव ज्यांचा पक्ष घेईल त्यांचा जय होतो. ( ‘ येषामिन्द्रस्ते जयन्ति ’ ८-१६-५ ) कसलाहि शत्रु असो—तो कितीहि प्रबल असो--तो देवाला जिंकू शकत नाहीं. ( ‘ नहि त्वा शत्रुस्तरते ’ ). किंबहुना त्यांना कोणी शत्रूच नाहीं. ( ‘ नास्य शत्रुः ’ ६-१८-१२). त्याचप्रमाणें त्यांची कल्पना करून द्यावी म्हटलें तर जगांत तशी दुसरी प्रतिमाच—वस्तूच—नाहीं ! ( ‘ न प्रतिमानमस्ति’ ६-१८-१२)

अशा मंगलकारक देवाच्या देणग्याहि पण तितक्याच मंगलकारक असतात. ( ‘भद्रा भद्रस्य रातयः’ १-१३२-२) म्हणून देवभक्तांनीं म्हटलें आहे कीं, या देवांचें सख्य हें अत्यंत गोड आहे आणि त्याची कृपा झाली तरी ती तितकीच मधुर आहे ! ( ‘ यस्य ते स्वादु सख्यम् । स्वाद्वी प्रणीतिरद्रिवः ’ ८-६८-११ ). असा हा वैदिक आर्यांचा ऋग्वेदांतला देव असून तो कोणाला वळतो म्हणाल तर जो त्याचें अंतःकरणपूर्वक श्रद्धायुक्त मनानें पूजासत्कार करतो, त्यालाच तो पदरांत घेतो आणि अशा भक्ताचाच सखा होऊन तो त्याचें सर्व संकटापासून रक्षण करतो. (‘ तस्य त्राता भवसि तस्य सखा यस्त आतिथ्यमानुषग् जुजोषत’ ४-४-१०) याप्रमाणें वैदिक देवांचा स्वभाव, गुण, महिमा व प्रभाव असल्यामुळें त्याच्या भक्तिभावानें अंतःकरण उचंबळून येऊन देवभक्त मोठ्या लाडिकपणें उद्गारतो कीं देवा ! तूंच आमचा पिता! आणि तूंच आमची माता !!

( त्वं नः पिता वसो त्वं माता ' ८-९८-१० ) असा हा वैदिकांचा सर्वज्ञ व सर्वसमर्थ देव असून, चर्मचक्षूला दिसत नसला तरी सश्रद्ध मनानें विचार करणाऱ्याच्या अंतर्दृष्टीला खास दिसतोच दिसतो आणि वैदिक ऋषींना तसा दिसला म्हणूनच त्यांनीं त्याचें तसें वर्णन केलें आहे. ऋषींनीं स्पष्टच बोलून दाखविलें आहे कीं आम्हांस देव जसा दिसला–आम्ही त्यास अंतःचक्षूनें जसा पाहिला–तसें आम्ही त्याचें वर्णन केलें आहे, ( यादृगेव ददृशे तादृगुच्यते ' ५-४४-६ ) ही गोष्ट ज्यांना पटली अगर पटते त्यांनींच या वैदिक देवांच्या भरीस पडावें, इतकी सूचना देऊन, आतां पुढील वाटेस लागतों.

## वैदिक आर्यांची देवोपासना

ऋग्वेदाचें सूक्ष्म दृष्ट्या निरीक्षण व परीक्षण केल्यास व त्याबरोबरच यजुर्वेदाचाहि कानोसा घेतल्यास असें आढळून येईल कीं, भारतीय आर्यांची देवोपासना ही यज्ञद्वाराच केली जात असे, व ती तशी केली जात होती असा स्पष्टध्वनि त्यांतून उमटतो. स्पष्टच सांगावयाचें तर वेदांत यज्ञाशिवाय देवोपासनेचा दुसरा मार्गच नाहीं ! ' यज्ञप्रिया हि देवाः '—देव हे यज्ञप्रिय आहेत–असें जें श्रुतींत म्हटलें आहे, तिकडे डोळेझांक करून भागणार नाहीं. आज भारतीयांचा जो धर्म आहे कीं ज्याला आपण हिंदुधर्म म्हणतों, तो शुद्ध व सनातन वैदिक धर्म नसून, जैन, बौद्ध इत्यादि अवैदिक विचारसरणीनें गढूळ झालेला निकृष्ट व विकृत धर्म आहे, असें म्हटल्यास त्याला नांव ठेवण्यास जागा नाहीं. तो कां व कसा यासंबंधीं विचार करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें त्या विषयांत खोल शिरण्याचें टाळून, फक्त ऋग्वेदांत देवोपासना कोणत्या स्वरूपांत आढळते, याचाच विहंगमदृष्ट्या विचार करतों. कारण प्रस्तुत ग्रंथ हा ऋग्वेदविषयक गोष्टींचें समालोचन करण्याकरतां असून, त्यांत इतर विषयाची भेसळ करणें हें प्रसंगास धरून होणार नाहीं. म्हणून तो विषय महत्त्वाचा व मनोरंजक असला, तरी तो येथें हाताळणें इष्ट नाहीं, असें आमचें स्पष्ट मत आहे. असो.

वैदिक आर्यांची देवोपासना कशी होती हें सांगावयाचें झालें तर 'यज्ञेन यज्ञमयजंत देवाः'—साध्य देवांनीं यज्ञेश्वराचें म्हणजे प्रजापति-देवाचें—यज्ञद्वारा पूजन केलें—या एका सूक्त वचनावर बोट ठेवून सांगतां येईल. अर्थात् हें वरील वचन वैदिक देवोपासनेचें मुख्य गमक आहे. हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें तर देवांची उपासना ही यज्ञद्वाराच केली पाहिजे असा त्याचा निष्कर्ष निघतो. आणि देवोपासना म्हणजेच यज्ञोपासना. देवांनीं हेंच केलें; आणि त्यांचें अनुकरण करणारे—त्यांच्याच पावलावर पाऊल टाकणारे—हे वैदिक आर्य असल्यामुळें त्यांनींहि यज्ञद्वाराच देवोपासनेचा धडा गिरविला. 'देवानां पन्थामनुचरेम' असें ऋग्वेदांत वैदिक ऋषींनीं स्पष्ट बोलून दाखविलें आहे आणि या वचनाला अनुसरूनच 'यथा देवानां चरणं तद्वाऽनु मनुष्याणाम्' असें योगीश्वर याज्ञवल्क्यांनीं शतपथांत उद्गार काढले आहेत. देवांनीं—अर्थात् ज्ञानी महात्म्यांनीं जसें केलें, तसें मनुष्यांनीं करावें अथवा मनुष्याचें असावें असा वैदिक ऋषींचा कटाक्ष आहे. तेव्हां आतां थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे देवोपासना ही यज्ञद्वाराच करावयाची असते व केली पाहिजे. कारण देवांनीं घालून दिलेला तो धडा आहे.

ही इतकी प्रस्तावना केल्यावर आधुनिक वाचकांना यथार्थ कल्पना येण्यासाठीं यज्ञ शब्दाविषयीं थोडासा अधिक खुलासा करणें हें ओघानेंच प्राप्त होतें, म्हणून त्याविषयीं येथें दोन शब्द अधिक लिहितों. या 'यज्ञ' शब्दाचे वेदांत अनेक अर्थ होतात, हें आधुनिकांना माहीत नाहीं. कारण वेदग्रंथाची व आमची फारकत होऊन आज जवळजवळ दोनअडीच हजार वर्षे झालीं असून, तशांतच या दीडशें वर्षांच्या इंग्रजांच्या जडमूढ राजवटींत त्याविषयीं अनेक गैरसमज बोकाळले आहेत. तेव्हां यज्ञाचें नांव घेतांच अगर निघतांच आम्ही जैनाळलेले हिंदू आज त्यास बुजतों व साहेबाळलेले सुशिक्षित त्यास नाक मुरडतात. पण हा दोष यज्ञसंस्थेचा नसून आमच्या विकृत भावनेचा व गाढ अज्ञानाचा आहे. तो अज्ञानाचा पडदा दूर सारण्यासाठीं वेदांतील यज्ञविषयक अंतरंग आज महाराष्ट्रापुढें मांडण्यासाठीं या विषयावर दोन शब्द लिहितों. याविषयीं अधिक व

विस्तृत माहिती पाहिजे असल्यास आमच्या 'ज्ञानवल्यप-दर्शन' ग्रंथांतील 'यज्ञमीमांसा' हें प्रकरण पहावें.

यज्ञ शब्दाचा पहिला व मुख्य अर्थ म्हणजे परमेश्वर असा आहे. 'ब्रह्म हि यज्ञः'-या शतपथ वचनांत ब्रह्म म्हणजे जगदीश्वर-विश्वेश्वर- असा अर्थ असून, त्याला ऋग्वेदाचा पाठिंबा आहे, असें सांगितलें तर आधुनिक जनतेला सकृद्दर्शनी तें पटणार नाहीं, हें आम्ही ओळखून आहों. आज जैनाळलेल्या आम्हा हिंदूंपुढें यज्ञाचें नांव काढतांच त्यांच्या डोळ्यापुढें धुराचा लोळ व खाटीकखाना उभा राहतो ! अर्थात् हें त्यांचें आपल्या प्राचीन तेजस्वी धर्माविषयीं अक्षम्य व महान् अज्ञान आहे, असें सांगितल्याशिवाय आमच्यानें रहावत नाहीं. आतां यज्ञ म्हणजे परमेश्वर हा अर्थ कसा निष्पन्न होतो, हें सांगावयाचें तर प्रथम ऋग्वेदाकडे धांव मारली पाहिजे. या बाबतींत ऋग्वेदांतील 'यज्ञेन यज्ञमयजन्त देवाः' या वचनाच्या अंतरंगाचा कानोसा घेतला पाहिजे. वरील वचनांत यज्ञ हा शब्द दोनदां आला असून, प्रत्येक वेळीं त्याचा अर्थ निरनिराळा होतो. पैकीं 'यज्ञं' या शब्दाचा अर्थ यज्ञेश्वर-म्हणजे प्रजापति देव-असा होतो आणि सायणाचार्यांनीं तो तसा केला आहे 'यज्ञं यथोक्तयज्ञस्वरूपं प्रजापतिं' असें वरील ऋग्वेद वचनावरील सायण भाष्य आहे. प्रजापति हें अव्यक्त परब्रह्माचें व्यक्त स्वरूप-सगुण-स्वरूप आहे. आणि प्रजापतीचें व्यक्त स्वरूप प्रगट झाल्यावरच विश्वोत्पत्तीला प्रारंभ झाला, अशी ऋषींची भावना-नव्हे सिद्धांत-आहे. तेव्हां यज्ञ म्हणजे प्रजापति-अर्थात् देवदेवेश्वर-सगुण परमेश्वर-असा अर्थ ध्वनित होतो.

हाच अर्थ जरा स्पष्ट करून सांगावयाचें म्हणजे 'यज्ञो वै विष्णुः'-यज्ञ म्हणजे विष्णु-असें सांगतां येईल. कारण विष्णु हा विश्वव्यापक असून त्याची गणना देवांत सर्वश्रेष्ठ आहे. त्यानें आपल्या तीन पदांनींच हें सर्व विश्व व्यापून टाकलें, आणि म्हणून त्याची योग्यता सर्व देवांत श्रेष्ठ गणली जाते. 'विष्णुर्वै देवानां श्रेष्ठः' असें शतपथांत म्हटलें असून, आणि त्याच वेळीं त्याला यज्ञ म्हटलें असून ( यज्ञो वै विष्णुः' श. प. ) दोन्हींचा मेळ बसविल्यास यज्ञ म्हणजे विश्वेश्वर, परमेश्वर, प्रजापति-विष्णु-

असा सुंदर अर्थ ओघानेंच सिद्ध होतो, हें सूज्ञ वाचकांस आतां निराळें सिद्ध करून दाखवावयास नको. ‘ यज्ञेन यज्ञमयजन्त देवाः ’ या महावाक्यावरून यज्ञ म्हणजे विश्वाचा आद्यजनक प्रजापति देव–महादेव–हा अर्थ स्पष्ट झाला.

पुनः आणखी, ब्रह्म म्हणजे वेदमंत्र असाहि एक अर्थ आहे. ‘ब्रह्म हि मंत्रः ’ असें श्रुतिवचन असून, तेथें मंत्र म्हणजे वेदमंत्र हा अर्थच अभिप्रेत आहे. याचें कारण असें कीं वैदिक देव हे वेदमंत्रांत–म्हणजे ऋग्वेदांतील ऋचांत–निवास करून आहेत. अर्थात् वेदऋचा हें वैदिक देवाचें निवासस्थान आहे, ही गोष्ट ऋग्वेदांत ‘ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः’ (१-१६४-३९) या मंत्रांत स्पष्ट करून सांगितली असल्यामुळें आणि शिवाय वेद हे प्रजापतीप्रमाणेंच त्या परब्रह्मापासूनच निश्वासरूपानें प्रकट झाल्यामुळें मंत्राला ऋषींनीं ब्रह्म म्हटलें यांत गैर कांहीं झालें नाहीं. अतएव मंत्र म्हणजे ब्रह्म व ब्रह्म म्हणजे यज्ञ अशी संगति स्वाभाविकच लागत असून, त्यावरून यज्ञ म्हणजे मंत्र अर्थात् वेद असा अर्थ निष्पन्न होतो ! अर्थात् ‘यज्ञेन’ म्हणजे वेदोक्त उपासनेनें असा अर्थ सिद्ध झाला.

याप्रमाणें यज्ञाचा मुख्य अर्थ यज्ञ म्हणजे ईश्वर आणि त्याबरोबरच यज्ञ म्हणजे वेद, असें थोडक्यांत दाखविण्यांत आल्यावर आतां पुढें त्याचे इतर अर्थ कसे कसे होतात याचा नुसता धांवता उल्लेख करून मग थोडक्यांत देवोपासनेचा प्रश्न हाताळतों. ज्याप्रमाणें परब्रह्माला व वेदमंत्राला यज्ञ असें म्हटलें आहे, त्याचप्रमाणें अग्नीलाहि यज्ञ असें म्हटलें आहे. (अग्निरु वै यज्ञः’ श. प.) कारण देवांना प्रसन्न करणेकरितां त्यांना यथाशक्ति हविर्भाग अर्पण करावयाचा असतो. पण देव हे प्रत्यक्ष येऊन तो ग्रहण करीत नाहींत. याचें कारण असें सांगतां येईल कीं देव हे सूक्ष्मदेही असल्यामुळें त्यांना स्थूल-द्रव्याचा हविर्भाग स्वीकारतां येत नाहीं आणि त्या स्थूल द्रव्याला सूक्ष्म रूप देण्याची शक्ति फक्त अग्नीमध्येंच आहे. ‘ तपो वा अग्निः ’–अग्नि हा उष्ण आहे–असें शतपथांत अग्नीचें एक लक्षण सांगितलें असल्यामुळें व त्याचें रूपहि इतर देवांप्रमाणें तेजोमय असल्यामुळें ( तेजो वा अग्निः ’ ) त्याच्यांत दिलेली आहुति

देव ग्रहण करण्यास समर्थ होतात. अर्थात् देव हे अग्निद्वारा आपला हविर्भाव ग्रहण करतात. म्हणजे अग्नि हा देवांच्या मुखस्थानीं आहे. ' अग्निमुखा हि देवाः ' असें श्रुतिवचन असून, तद्वारा देव हे भक्तांनीं दिलेला हविर्भाग भक्षण करून संतुष्ट होतात व भक्ताच्या श्रद्धायुक्त अंतः-करणानें अर्पण केलेल्या अन्नसंतर्पणानें तृप्त व तुष्ट होत्साते, उपासकाला त्याचे इष्ट मनोरथ पुरवून त्याला सुखी व संपन्न करतात. तेव्हां देवांना संतुष्ट करावयाचा एकमेव मार्ग यज्ञ हाच असून, तें कार्य अग्नि करीत असल्यामुळें लक्षणेनें त्यालाहि यज्ञ म्हटलें त्यांत कांहीं गैर झालें, असें युक्तिदृष्ट्या म्हणतां येत नाहीं. अग्नि हा देवांचा अन्न वाहून नेणारा त्यांचा प्रतिनिधि असल्यामुळें त्यास ' हव्यवाहनः ' असें म्हटलें आहे, तें महशूर आहेच.

शिवाय यज्ञ शब्दाचा आणखी एक अर्थ होतो. तो म्हणजे देवांचें अन्न. ' यज्ञो हि देवानामन्नं '–यज्ञ म्हणजे देवांचें अन्न–असें शत-पथ वचन असून, त्या देवांच्या अन्नाला हवि हें पारिभाषिक नांव आहे. यावरून हविर्द्रव्याला देखील यज्ञ म्हणण्याचा परिपाठ पडला तोहि सयु-क्तिक आहे. ' यज्ञो हि देवतामुद्दिश्य द्रव्यस्य त्यागः ' अशी यज्ञ शब्दाची कोठें कोठें व्याख्या करण्यांत आली आहे. ' यज्ञो देवानां प्रत्येति ' या ऋग्वेद वचनांत यज्ञ शब्दाचा हविर्भाग असा अर्थ अभिप्रेत आहे. ( ऋ. १-१०७-१ )

' यज्ञ ' शब्दाचे वर सांगितल्याप्रमाणें प्रसंगाप्रसंगानें वेगवेगळे अर्थ होत असले तरी त्याचा सर्वसामान्य अर्थ म्हणजे देवोपासनेचें प्रमुख साधन असाच करावयाचा आहे. हेंच जरा स्पष्ट करून सांगावयाचें म्हणजे देवांना उद्देशून हविर्भाग अर्पण करावयाच्या शास्त्रोक्त कर्मानु-ष्ठानास यज्ञ अशी संज्ञा आहे. ' यज्ञो हि देवतामुद्दिश्य द्रव्यस्य त्यागः ' अशी यज्ञ शब्दाची व्याख्या करण्यांत आली असून, ती विद्वज्जनास मान्य अशीच झाली आहे. देवांना प्रसन्न करून इष्ट मनोरथ प्राप्त करून घेण्याचें एकमेव प्रभावी साधन म्हणून वैदिक धर्मांत यज्ञाला प्रमुख स्थान देण्यांत आलें असून, यज्ञ म्हणजे श्रेष्ठ कर्म–' यज्ञो वै श्रेष्ठतमं कर्म–' या शब्दांनीं

त्या यज्ञाचा शतपथांत गौरव करण्यांत आला आहे. तेव्हां यज्ञाला एवढें महत्त्व कां आलें हें सांगणें आतां ओघानेंच प्राप्त झालें. म्हणून त्याविषयीं दोन शब्द लिहितों. यज्ञ हा देवांचा संवर्धक आहे. ( ' यज्ञ इन्द्रमवर्धयत्' ८-१४-५ ) आणि म्हणून तो इंद्रादि देवांना अत्यंत प्रिय आहे. तो इतका कीं त्याशिवाय त्यांना प्रसन्न करणेचा वेदांत दुसरा मार्गच सांगितलेला नाहीं. यज्ञाला देवांनीं आपला आत्मा करून स्वर्ग लोकांत वास केला असें शतपथांत म्हटलें असून, त्यावरून यज्ञाचें महत्त्व सहजच सिद्ध होतें.

आतां यज्ञांत देवांना प्रसन्न करण्यासाठीं त्यांना निरनिराळें हविरन्न अर्पण करावयाचें असतें. पण देव हे सूक्ष्मरूपी असल्यामुळें, ते प्रत्यक्ष येऊन कांहीं खात नाहींत व पीत नाहींत. तेव्हां त्यांना द्यावयाचें अन्न तें सूक्ष्म रूपांतच पोंचविलें पाहिजे. आणि हें करण्याचें साधन म्हणजे अग्नि होय. अग्नींत हविरन्न अर्पण केलें म्हणजे तें देवांना जाऊन पोंचतें. अर्थात् अग्नि हा देवांच्या मुखस्थानीं आहे असें म्हटल्यास त्यांत कांहीं चूक होणार नाहीं. ऋग्वेदांत त्यांना ' अग्निजिव्हाः ' असें म्हटलें आहे. ( ६-५०-२ ) आणि शतपथांत ' अग्निमुखाहि देवाः ' असा उल्लेख करण्यांत आला आहे. म्हणजे अग्नि हा देवांच्या मुखस्थानीं—जिव्हास्थानीं—असल्यामुळें त्याच्यांत दिलेला हविर्भाग सूक्ष्मरूप पावून तो सूक्ष्मरूपी देवांना पोंचतो, हा अर्थ उघड झाला. देव हे अग्निद्वाराच आपणांस तृप्त करतात. ( ' यस्मिन्देवा विदथे मादयन्ते ' १०-१२-७ ) व ते अग्नीमध्यें संचार करतात. ( ' यस्मिन् देवा मन्मनि संचरन्ति' १०-१२-८) असें ऋग्वेदांत स्पष्ट सांगितल्यामुळें, त्याविषयीं आतां अधिक सांगण्याची आवश्यकता दिसत नाहीं. तेव्हां आतां येथें सांगावयाचें इतकेंच कीं, देवोपासनेंत देवांना पोंचवावयाचा हविर्भाग अग्नींतच अर्पण केला पाहिजे -तरच तो देवांना पोंचतो. आणि देव इच्छा करतात ती अशा यज्ञोपासकाचीच. ( ' इच्छन्ति देवाः सुन्वन्तम् ' ८-२-१८ ).

आतां हा जो यज्ञ तो कां करावा, त्यापासून फायदा काय, फलश्रुति काय, हें सांगितल्याशिवाय प्रस्तुत विषयाची पूर्तता झाली असें म्हणतां

येत नाहीं. म्हणून त्याचाहि येथें थोडक्यांत उलगडा करून मग पुढील रस्त्यास लागतों. हा जो यज्ञ आहे, तो उपासकाचें अभीष्ट पूर्ण करणारा आहे. ( 'वृषा यज्ञः' १०-६६-६ ) आणि मनुष्य जेव्हां या यज्ञोपासने-कडे वळतो तेव्हां त्याची मनीच्छा दैवीप्रसादानें सुपूर्त व्हावी या इच्छे-नेंच वळतो. ( 'यत्कामास्ते जुहुमस्तन्नोऽस्तु' १०-१२१-१० ), 'आम्ही ज्या इच्छेनें देवयजन करूं, ती आमची इच्छा सफल होवो' असें ऋग्वेदांत भक्तानें स्पष्टच म्हटलें आहे. अर्थात् ही यज्ञोपासना प्रापंचिकास कामधेनू-प्रमाणें सर्वाभीष्टवरदा अशी आहे. आम्हांस चांगलें क्षेत्र मिळावें, चांगली गति मिळावी व चांगली संपत्ति लाभावी या इच्छेनें आम्ही ही यज्ञो-पासना करतों, असें देवभक्तानें चक्क बोलून दाखविलें आहे. ( 'सुक्षेत्रिया सुगातुया वसूया च यजामहे' १-९७-२ ) अर्थात् यज्ञोपासक हा आपल्या घरच्या प्रपंचाचा उत्कर्ष करूं इच्छिणारा असतो. ( 'प्र स क्षयं तिरते' ७-५९-२)म्हणून म्हटलें आहे कीं,असा देवोपासकच-यज्ञोपासक-खरा धन्य, तोच प्रशंसनीय आणि तोच बुद्धिमान होय! ('सो अद्धा दाश्वध्वरो अग्ने मर्तः सुभगः स प्रशंस्यः' ८-१९-९ ) असा जो देवोपासक आहे, त्याचा नाश होत नाहीं! ( 'न यजमान रिष्यति' )

हा यज्ञमार्ग अनुसरूनच प्राचीन पितर तेजस्वी झाले आणि शुद्ध स्थानाप्रत म्हणजे स्वर्गलोकाप्रत जाते झाले. ( 'अधा यथा नः पितरः परासः प्रत्नासो अग्न ऋतमाशुषाणाः । शुचीदयन्दीधितिं' ४-२-१६) आणि अंगिरस झाले तरी यज्ञ करूनच इन्द्राचें सख्य मिळवून अमरहि झाले. (ये यज्ञेन दक्षिणया समक्ता इद्रस्य सख्यममृतत्वमानश । तेभ्यो भद्रमंगिरसो वो अस्तु ॥'१०-६२-१ ). आणि ज्या मार्गावरून हे आमचे यज्ञोपासक आंगिरसादि पूर्वज पितर गेले त्या मार्गानेंच आम्हीहि जावें. ( 'यत्रा नः पूर्वे पितरः परेयुरेना जज्ञानाः पथ्या अनु स्वाः' १०-१४-२ ). आणि अशा प्रकारचा जो सर्वमंगल यज्ञ तो आहे तरी कसा असें म्हणाल तर तो असा आहे. 'सुत्रामाणं पृथिवीं द्यामनेहसं सुशर्माणमदितिं सुप्रणीतिम् । दैवीं नावं स्वरित्रामनागसमस्रवन्तीमा रुहेमा स्वस्तये' १०-६३-१० ) भावार्थ—उत्तम रक्षण करणारी, अत्यंत विशाल, दोषरहित, सुखकारक,

दैन्यरहित, आनंदकारक, व्यंगरहित, छिद्ररहित अशी ही यज्ञरूपी दिव्य नाव आम्हीं उत्कर्षत्व व देवत्व प्राप्त करून घेणेसाठीं म्हणून आरोहण करतों. हें यज्ञाचें वर्णन किती सुंदर व किती सार्थ आहे बरें ! असो.

आतां हा यज्ञमार्ग जे चोखाळत नाहींत, या मंगलमय यज्ञरूपी दिव्य नावेचा जे आश्रय करीत नाहींत, ते लोक खरोखर पापी असून अखेर अधोगतीच्या मार्गास लागतात ! ('न ये शेकुर्यज्ञियां नावमारुहमीमैव ते न्यविशन्त केपयः:' १०-४४-६ ) म्हणून वैदिक ऋषि आपल्या वंशजांस म्हणजे भारत जनतेस मोठ्या कळकळीनें उपदेश करीत आहेत कीं 'अहो लोकहो ! दिव्य ज्ञान देणारा व सर्व आपत्ति विपत्तींतून पार नेण्यास समर्थ असलेला असा हा यज्ञ लोककल्याणार्थ करा ! (यज्ञं दधात केतु जनाय वीरम् ' ७-३४-६) वैदिकांची ही देवोपासना किती सुंदर व किती प्रभावी आहे बरें ! असो.

## देवोपासक

वर जें निरूपण करण्यांत आलें, तें देवोपासना वैदिक आर्यांची कशी होती, तिचें स्वरूप काय, महत्त्व काय व महिमा काय यासंबंधानें झालें. आतां ती देवोपासना करणारा देवोपासक हा कसा असावा अगर असतो, त्याची स्थिति गति काय व कशी असते, याविषयीं दोन शब्द सांगणें हें अर्थतःच प्राप्त झालें, म्हणून त्यासंबंधानें येथें थोडीशी चर्चा करतों. सकृद्दर्शनीं हें सांगितलें पाहिजे कीं, वेदोक्त देवोपासना ही यज्ञद्वाराच करावयाची असते व करावी लागते, हें वाचक आतां नीट ओळखून असतीलच. तेव्हां या देवोपासनेंत म्हणजे यज्ञकर्मानुष्ठानांत काय काय गोष्टी करावयाच्या असतात व कराव्या लागतात, हें आतांपर्यंत सांगण्यांत आलें नसल्यामुळें त्यासंबंधीं कांहीं सांगणें हें आतां क्रमप्राप्तच होऊन बसलें. म्हणून त्याविषयीं येथें दोन शब्द लिहून ठेवतों.

या देवोपासनेंत अनेक गोष्टी कराव्या लागतात. त्यांतील महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे या आहेत. देवांचें स्तुतिस्तोत्र गाणें, त्यांच्याप्रीत्यर्थ नानाप्रकारचें हविरन्न तयार करणें, सोमरस काढून गाळून ठेवणें व या सर्व हविर्द्रव्यांचें यथाविधि देवांना अर्पण करणें इत्यादि इत्यादि. देवांचा कृपाप्रसाद-मंगल अनुग्रह-मिळवावयाचा मार्ग काय तो फक्त हा एकच एक यज्ञ

मार्ग आहे. आतां वैदिक देव हे सूक्ष्मरूपी असल्यामुळें ते प्रत्यक्ष येऊन कांहीं खात नाहींत व पीत नाहींत. मग त्यांना हविरन्न पोंचायचें कसें ? त्यांना प्रसन्न करणेचा मार्ग तरी काय ? हा प्रश्न जिज्ञासूच्या मनांत सहजच उपस्थित होतो, आणि त्याचें समाधान म्हणजे अगदीं वरच आहे. देवांना भक्तांचा नैवेद्य पोंचविणारा प्रामाणिक प्रतिनिधि म्हणजे अग्निनारायण हा होय ! त्याशिवाय इतरांस ही गोष्ट शक्य नाहीं. अर्थात् देवांचें मुख म्हणजे अग्नि. 'अग्निमुखा हि देवाः' असें शतपथांत म्हटलें असून, ऋग्वेदांत त्यांसच 'अग्निजिव्हाः' असें संबोधिलें आहे, असें वर सांगण्यांत आलेंच आहे. याचा सरळ अर्थ असा कीं उपासकानें देवांना जें कांहीं द्यावयाचें तें अग्निनारायणाच्या हवालीं केलें म्हणजे सरळ त्या त्या देवांना जाऊन पोंचतें. आणि म्हणून त्याला 'हव्यवाहनः'–देवांचा हविर्भाग वाहून नेणारा-असें ऋग्वेदांत इतरत्र म्हटलें आहे. एवंच तात्पर्य काय तर देवांना प्रसन्न करावयाचें तर तेथें अग्नीची आराधना अवश्य आहे. त्याशिवाय दुसरा असा वेदोक्त मार्ग नाहीं.

आतां इतक्यांत वर जें सांगण्यांत आलें तें देवांना कसें प्रसन्न करून घ्यावयाचें याविषयीं झालें. आतां देवोपासकाची भूमिका कशी असावयास पाहिजे, याचें दिग्दर्शन केलें नाहीं तर सर्वच फुकट जावयाचें. म्हणून त्यासंबंधानेंहि दोन शब्द लिहितों. ज्याला वैदिक देवांचा अनुग्रह पाहिजे आहे, त्यांची मदत व त्यांची कृपाप्रसाद मिळवावयाचा आहे, तो प्रथम श्रद्धावान असावयास पाहिजे. म्हणजे देवांच्या अस्तित्वासंबंधी व त्यांच्या कर्तृत्वासंबंधी पूर्ण व भरीव विश्वास त्या देवोपासकास असावयास पाहिजे. श्रद्धा नसेल, विश्वास नसेल तर वैदिक देव वळणार नाहीं व त्याचा अनुग्रह मिळणार नाहीं. नुसत्या कोरड्या होमहवनानें व पूजापुरस्कारानें अगर इतर टिळाटोपी इत्यादि अवडंबरानें वैदिक देव काय अगर इतर देव काय वळण्यासारखा नाहीं, ही मुख्य गोष्ट देवभक्तानें स्पष्ट व चक्क आपल्या मनांत ठसठशीत बिंबवून ठेविली पाहिजे. ऋग्वेदांत स्पष्टच म्हटलें आहे कीं-'श्रद्धया हूयते हविः'–श्रद्धायुक्त अंतःकरणानेंच देवांना हविर्भाग अर्पण करण्यांत येतो. तेव्हां वैदिक धर्माचें मुख्य पालुपद म्हणजे ही श्रद्धा. श्रद्धे-

शिवाय कांहीं नाहीं. असो; हें इतकें सांगितलें म्हणजे देवोपासकाची मनोभूमिका कशी असावी, याविषयीं आतां अधिक सांगण्याची आवश्यकता राहिली नाहीं. ही वाण त्या उपासकाचा पुरोहित भरून काढूं शकत नाहीं. पुरोहित हा नुसता मदतनीस आहे. तो यजमानाच्या मनोवृत्तींत कांहीं भर अगर बदल करूं शकत नाहीं, हें देवोपासक न विसरेल तर त्याचें खात्रीनें कोट कल्याण होईल.

वैदिक धर्माची ही आद्य व प्रमुख अट मान्य झाल्यावर पुढें देवभक्ताला घालून दिलेली दुसरी अट म्हणजे तो सद्वृत्त व सच्छील असावयास पाहिजे. दुर्वृत्त व दुःशील मनुष्यास देवाच्या दरबारीं मान व स्थान नाहीं. त्याची हाक त्याला ऐकूं जात नाहीं. म्हणून अंतःकरण शुद्ध व पवित्र नसता, स्वभाव व गुण सरळ व सात्त्विक नसतां केलेलें देवोपासनेचें बाह्य अवडंबर सगळें व्यर्थ व फुकट आहे, असें सांगितलें तर त्यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. शिवाय आणखी, ती जी देवोपासना आहे, ती यथाविधि असावयास पाहिजे. शास्त्रोक्त विधि सोडून केलेली उपासना ही उपासनाच नव्हे ! केवळ तो फार्स आहे ! तशा उपासनेला देव भीक घालील, ही आशा निर्मूल आहे. एवंच सांगावयाचा मुद्दा हा येथें इतकाच कीं, देवोपासक हा वैदिकधर्मक्षेत्रांत पदार्पण करतांना तो सश्रद्ध, सद्वृत्त व सच्छील असावयास पाहिजे व त्याची देवोपासना शास्त्रशुद्ध पाहिजे.

अशा प्रकारचा जो सद्भक्त देवांना भक्तिपूर्वक होमहवन करून त्यांना संतुष्ट करूं पाहतो, तोच देवांना फार आवडतो. अर्थात् अशा भक्ताचीच ते इच्छा करतात. ( ' इच्छन्ति देवाः सुन्वन्तम् ' ८-२-१८ ) अशा या उपासकानें देवांना कोणत्या प्रकारें आळविलें पाहिजे, त्याचा ऋग्वेदांत थोडक्यांत तपशील आढळतो तो असा:--' यो यजाति यजात् इत् सुनवच्च पचाति च । ब्रम्हेदिन्द्रस्य चाकनत् ॥ १ ॥ पुराळाशं यो अस्मै सोमं ररत आशिरं । पादित् तं शक्रो अंहसः ॥२॥ ८-३१-१ व २) भावार्थः— जो यजमान म्हणजे देवोपासक आपल्या अभीष्टप्राप्तीसाठीं इन्द्रादि देवांना यज्ञद्वारा आळवून त्यांना हविर्भाग अर्पण करतो, त्यांच्या प्रीत्यर्थ सोमरस कुटून गाळून स्वच्छ पानयोग्य तयार करतो, त्यांना पुरोडाशादि हविरन्न

प्रदान करतो, सोमरस प्यावयास देतो, त्यांचीं स्तुतिस्तोत्रें आवडीनें गाऊन त्यांचें गुणगान करतो, त्याला तो इंद्रदेव सर्व संकटांतून पार करून त्याचें रक्षण करतो. अशाच ठशाचा आणखी एक मंत्र आहे तो असाः—' यः समिधा य आहुती यो वेदेन ददाश मर्तो अग्नये। यो नमसा स्वध्वरः ८-१९-५ रंहयन्त आशवस्तस्य द्युम्नितमं यशः ॥ ८-१९-६ ॥ जो मनुष्य अग्निदेवाला भक्तिपूर्वक समिधा अर्पण करतो, त्याला घृतादि आहुति देतो, वेदमंत्र म्हणून त्याचें स्तुतिस्तोत्र गातो व पुरोडाशादि हविरन्न अर्पितो व नमस्कारादि करतो त्याला तो अग्निनारायण प्रसन्न होऊन प्रभूत धनधान्य देऊन त्याची प्रपंचांत भरभराट करतो, व त्यास वर्चस्वी करून मोठा लौकिकवान करतो.

अर्थात मोठ्या आवडीनें देवाचें नामसंकीर्तन करणारा व त्याला हविरन्न अर्पण करणारा असा जो देवभक्त, तो जगांत सुखी व कीर्तिमान होऊन शेवटीं इह लोक सोडल्यावर देवांच्या उदंड आनंदमय अशा श्रेष्ठ मंगलधामाप्रत जातो. ( ' सेदु श्रवोभिर्युज्यं चिदभ्यसत् ' १-१५६-२ ) अशा देवभक्ताला दुःख शिवत नाहीं कीं पाप बाधत नाहीं. ('मा पृणन्तो दुरितमेन आरन्' १-१२५-७ ) अर्थात् देवांची पूजा करणाऱ्यावर त्यांची कृपादृष्टि होते. ( ' सुन्वतो भद्रा इन्द्रस्य रातयः ' ८-६२-१२ ) इतकेंच नव्हे, तर जो या देवांचें यजनपूजन करतो, तो किती जरी पापी असला, अमंगल असला, पतित असला तरी पुढें तो या देवांच्या कृपादृष्टीनें पवित्र, मंगल व पूज्य बनतो. ( ' सखायस्ते विषुणा अग्न एते शिवासःसन्तो अशिवा अभूवन् ' ५-१२-५ ) अर्थात् यावरून उलट हें सिद्ध होतें कीं जे देवांची निंदा, टिंगलटवाळी करतात ते प्रपंचांत सदैव दरिद्रीच राहतात. कारण त्यांना धन मिळण्याचा योगच येत नाहीं. ( न दुष्टुती मर्त्यो विन्दते वसु ' ७-३२-२१ ) इतकेंच काय, अशा नतद्रष्ट नास्तिकांवर देवांचा रोष होऊन, ते मागेंपुढें केव्हांतरी मोठ्या आपत्तींत व दुःखांत गुरफटले जातात. ( ' महाँ असुन्वतो वधः ' ८-६२-१२ )

ही देवद्वेष्टे व देवनिंदक यांची कथा झाली. आतां जो खरा सद्भक्त आहे, त्याची गोष्ट पाहूं. या देवभक्तावर कसले जरी प्रसंग आले आणि

कितीहि संकटें आलीं, तरी त्यांत सांपडून त्याचा नाश होत नाहीं. ( ' न यज्ञमान रिष्यसि ' ८-३१-१६ ) त्याच्यावर देवांची कृपा असल्यामुळें देवकृत काय अगर मनुष्यकृत काय, कसलेंहि पाप त्यास बाधत नाहीं. ( ' न तमंहो देवकृतं कुतश्चन न मर्त्यकृतं नशत् ' ८-१९-६ ) त्याच्या शत्रूचा कपटडाव त्याला जिंकूं शकत नाहीं. ( ' न तस्य मायया चन रिपुरीशीत मर्त्यः ' ८-२३-१५ ) अर्थात् त्याच्यावर आक्रमण करण्यास कोणीच समर्थ होत नाहींत. ( ' नकिष्टं कमर्णा नशत् ' ८-३१-१७ ) तो स्वस्थानांतून हाकून दिला जात नाहीं. ( ' न प्र योषन् ' ८-३१-१७ ) लढाईच्या वेळीं रणांत या देवभक्ताचा रथ कोठेंहि अडत नाहीं. म्हणजे तो रणभूमीवर अप्रातिहतगति असतो. ( ' मक्षू देववतो रथः ' ८-३१-१५ तसाच तो मोठा तेजस्वी म्हणजे प्रभावी असतो. ('तस्य द्युमाँ असत् रथः' ८-३१-३ ) म्हणून शत्रूचे सर्व कुटिल डावपेच तो रथ हाणून पाडण्यास कमी करत नाहीं. ( ' विश्वा वन्वन्नमित्रिया , ८-३१-३ ) आणि अखेर तो देवभक्त आपल्या शत्रूचा पाडाव करून सोडतो. ( ' देवयन्निद्देवयन्तमभ्यसत् ' २-२६-१) तो आपल्या शत्रूच्या तडाख्यांतून सहीसलामत पार होऊन, उलट त्या शत्रूचा पार धुव्वा उडवून देतो. (तरन्तो अर्यो अरातीर्वन्वन्तो अर्यो अरातीः ' ६-१६-२७ )

याचें कारण असें कीं देवभक्त हे देवांकडून सदैव रक्षिले जातात. दुष्ट शत्रूंपासून त्यांचें देव रक्षण करतात. ( 'पादित्तं शक्रो अंहसः' ८-३१-२ ) अर्थात् देव हे भक्ताचें कवच आहेत. ( ' त्वं वर्मासि ' ७-३१-६ ) आणि त्यांचे सहाय्यकर्ते असे मोठे मित्र आहेत. (' मित्रमहः ' २-१-५) म्हणून देवभक्तांवर कोणत्याहि शत्रूचा कसलाहि प्रभाव अगर इलाज चालत नाहीं. त्याचें कोणीहि वांकडें करूं शकत नाहीं. हा देवभक्त आपण होऊन कोणाच्या वाटेस जात नाहीं पण दुसरें जर कोणी त्याच्या वाटेस आलें, तर त्याचा सप्पा उडविल्या शिवाय रहात नाहीं. आतां वरील सर्व विवेचनाचा तात्पर्यार्थ थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे देवभक्त हा उदंडायुषी होतो. तो संपत्तिमान, सुकीर्तिमान, सुप्रज्ञवान,सर्वसमर्थ व सर्वविजयी होत्साता , इह लोकांतील मानव जन्माचें सार्थक करून अखेर

मरणोत्तर देवलोकांत जाऊन तेथें सुखासमाधानानें कालक्रमणा करतो. ( यः पृणाति स ह देवेषु गच्छति ' १-१२५-५ ) अशी ही ऋग्वेदांतील देवभक्ताची कथा आहे.

## वैदिक धर्मांत श्रद्धेचें स्थान

कोणी कांहीं म्हणोत,ज्याला धर्मक्षेत्रांत पदार्पण करून आत्महित साधावयाचें आहे, केव्हां तरी नि कोठें तरी त्याला श्रद्धेची कास धरणें हें अत्यंत जरूर आहे. श्रद्धेशिवाय देव भेटणार नाहीं व मुमुक्षुला आत्मसाक्षात्कार होणार नाहीं, हें अगदीं पक्कें समजा. श्रद्धा नसेल तर धर्माचें नि देवाचें नांव नच घेणें, यांतच कल्याण व शहाणपण आहे. सर्व धर्मांत--विशेषत: वैदिक धर्मांत--श्रद्धेला वगळून कांहींच चालावयाचें नाहीं व कांहींच लाभावयाचें नाहीं. अर्थात् श्रद्धाहीन मनुष्याला देव भेटावयाचा नाहीं कीं त्याचा प्रसाद लाभावयाचा नाहीं. तेव्हां श्रद्धा म्हणजे काय व ती केव्हां व कोठें अवलंबावी याविषयीं थोडेसें सांगितलें, तर तें अप्रस्तुत होणार नाहीं. म्हणून तिला उद्देशून दोन शब्द येथें लिहितों.

आज लोकांचा समज असा झालेला आहे कीं, बुद्धीला न पटणाऱ्या गोष्टीवर केवळ ती धर्मशास्त्रांत सांगितली आहे म्हणून निमूटपणें विश्वास ठेवावयाचा अगर ती सत्य मानावयाची याचें नांव श्रद्धा. हा आग्रह इतर धर्मांत म्हणजे ख्रिस्ती, यहुदी, इस्लामी, झोराष्टरी, बौद्ध धर्मांत आहे, हें खरें. पण वैदिक धर्मांतील श्रद्धा अशी नाहीं. ही वैदिक श्रद्धा इतर धर्मांतल्याप्रमाणें अंध नाहीं, तर ती चांगली डोळस आहे. डोळ्याला जशी दुर्बिण तशी बुद्धीला ही श्रद्धा आहे. डोळ्याला जेव्हां दिसत नाहीं तेव्हां दुर्बिण लागते; तद्वत बुद्धीला जेव्हां सुचत नाहीं, तेव्हां श्रद्धेची जरूरी भासते. शिवाय आणखी असें कीं बुद्धीचा प्रांत वेगळा व श्रद्धेचा प्रांत वेगळा. जेथें बुद्धीची हद्द संपते, तेथें श्रद्धेचा प्रांत लागतो. बुद्धीच्या प्रांतांत श्रद्धेची लुडबूड चालणार नाहीं व श्रद्धेच्या क्षेत्रांत बुद्धीची ढवळाढवळ निरर्थक होय. हे दोन्ही प्रांत वेगवेगळे असून एकमेकाला भिडलेले आहेत, इतकें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

आतां वैदिक धर्मांत श्रद्धेची व्याख्या कशी करण्यांत आली आहे, हें थोडेसें पाहूं. श्रद्धेची व्याख्या करण्यांत आली आहे, ती अशी:—' श्रत् सत्यं धीयते यस्यां सा श्रद्धा '--श्रत् म्हणजे सत्य, तें जिच्यांत ठेवण्यांत आलें आहे ती श्रद्धा. अर्थात् सद्भावना. ज्या भावनेंत सत्याचें म्हणजे परमेश्वराचें अधिष्ठान आहे ती श्रद्धा. ही व्याख्या किती छान व यथार्थ आहे बरें ? सत्याचा प्रकाश जेथें उजळलेला आहे त्या भावनेला अंध म्हणणारा असा शहाणा कोण असेल ? तेव्हां वैदिकांची श्रद्धा अंध नाहीं, ती चांगली डोळस आहे, हें पुनः सांगण्याची जरूरी नाहीं. वैदिकांचा परमेश्वर पाहिजे असेल तर श्रद्धेची कास धरून शोध करा म्हणजे तो तुम्हांला सांपडेल व दिसेल. ' श्रद्धया सत्यमाप्यते '--श्रद्धेच्या योगानेंच सत्य म्हणजे परमेश्वर सांपडतो, असें श्रुतींत खडसून सांगितलें आहे. म्हणून देवोपासना करावयाची झाली—देवांना प्रसन्न करून घ्यावयाचें झालें--तर त्याला श्रद्धायुक्त अंतःकरणानें हविर्भाग अर्पण करणें हाच सरळ मार्ग आहे. 'श्रद्धया हूयते हविः'(१०-१५१-१) असें ऋग्वेदांत चक्क सांगितलें आहे. आणि हा श्रद्धाधर्म अंतःकरणाचा आहे. बुद्धीचा नाहीं. आणि ईश्वराचें अधिष्ठान झालें तरी अंतःकरणांतच आहे. बुद्धींत नाहीं. ' ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ' असें भगवद्गीतेंत स्पष्ट म्हटलें असून, ' हृदये ह्येव सत्यं प्रतिष्ठितं ' असें शतपथांत सांगितलें आहे. तेव्हां श्रद्धेचा प्रांत हा अंतःकरणच ठरतो, हें आतां निर्विवाद सिद्ध झालें. म्हणून श्रद्धापूर्वक केलेली गोष्ट प्रभावी ठरते. ' यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति ' हें श्रुतिवाक्य जिज्ञासूंस मनन करण्यासारखें आहे. ( छां. १-१-१० )

आतां श्रद्धेचा उपयोग कोठें करावयाचा हें स्थूल दृष्टीनें पाहूं. जेथें इंद्रियांचें व बुद्धीचें चालतें तेथें श्रद्धेच्या मागें लागण्यांत अर्थ नाहीं. तेथें बुद्धीलाच प्राधान्य दिलें पाहिजे आणि बुद्धीचा कौलच तेथें प्रभावी ठरतो. पण ही बुद्धी झाली तरी एक इंद्रियच असल्यामुळें इतर इंद्रियांप्रमाणें तीहि सांतच आहे. अनंत नाहीं. म्हणून या विश्वकोशांत तिचा सर्वत्र प्रवेश होतो व तिला सर्वच कांहीं दिसतें असें समजणें हें मात्र वस्तु-

स्थितीस धरून नाहीं. स्थूल सृष्टींत ती प्रभावी असली तरी सूक्ष्म सृष्टींत ती अधु आहे. तिच्या आवांक्याबाहेरच्या तेथें अनेक गोष्टी आहेत. त्या सच्या व सामान्य बुद्धीला गम्य नाहींत. या सूक्ष्म सृष्टींत बुद्धि जेव्हां कुंठित होईल, हात टेकील, तेव्हां तिला श्रद्धेची जोड देऊन, तिला समर्थ करा असें श्रुतिमाऊलीचें सांगणें आहे, यांत चुकलें कोठें हें आम्हांस कळत नाहीं. देवसृष्टि ही सूक्ष्म सृष्टि—अतींद्रियसृष्टि—असल्यामुळें, तेथें नसतें तर्कट लढवून, ती समजणार नाहीं. ( नैषा तर्केण मतिरापनेया ). पण ज्यांना तशी सूक्ष्म दृष्टि लाभली व त्यायोगें ज्यांनीं ती देवसृष्टि अंतरंगांत जाणली, अशा थोर महात्म्यांच्या अनुभवपुष्ट वचनावर, 'यादृगेव ददृशे तादृगुच्यते' अशी प्रतिज्ञा करून सत्य सांगणाऱ्या ऋषिवचनांवर, विश्वास ठेविल्यास, अन्याय तो काय झाला ? आज तुम्ही विज्ञान शास्त्रवेत्त्यावर विश्वास ठेवतांच कीं नाहीं ? मग सत्यप्रतिज्ञ ऋषिवचनांवरच एवढा अविश्वास व गहजब कां ? असो.

सूक्ष्म वस्तूवर--इंद्रियाला न कळणाऱ्या व न दिसणाऱ्या वस्तूवर—विश्वास कां ठेवावा व केव्हां ठेवावा, याचें एक मोठें मार्मिक उदाहरण उपनिषदांत आलें आहे, तें तेवढें येथें देऊन हा श्रद्धेचा विषय हातानिराळा करतों. याविषयीं छांदोग्यांत गोष्ट आली आहे ती अशीः— 'उद्दालक आरुणि यांचा मुलगा श्वेतकेतु नांवाचा होता. बारा वर्षांचा झाल्यावर विद्यार्जनासाठीं म्हणून तो गुरुगृहीं जाऊन तेथें बारा वर्षें राहून संपूर्ण वेदविद्या शिकून परत घरीं आला. घरीं आल्यावर बापानें त्याला तत्त्वज्ञान--गूढ ज्ञान-- शिकलास काय म्हणून विचारतां, त्यानें नाहीं असें उत्तर दिलें. तेव्हां उद्दालकांनीं त्यास त्या गूढ ज्ञानाचा नाना तऱ्हेनें उपदेश करतां करतां शेवटीं त्यास असें सांगितलें कीं—मुला, हें सर्व जीवजात ज्यांत प्रवेश करून पुनः प्रकट होतें तें 'सत्' असून, अत्यंत सूक्ष्म आहे. अणुप्रमाण आहे. तेंच या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे, तोच आत्मा आहे. आणि श्वतकेतो ! तो आत्मा तूं आहेस ! ( 'स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि' छा. ६-९-४).

बापानें सोदाहरण व्याख्यान देऊनहि श्वेतकेतूस तें ज्ञान पटावें तसें पटेना. बापानें पुढें अनेक दृष्टांत देऊन त्याची समजत पाडण्याची पुष्कळ खटपट केली. किती सांगितलें तरी ' मला पुनः अधिक समजावून सांगा ' (' भूय एव मा भगवान् विज्ञापयतु ') हा आग्रह त्याचा कांहीं चुकेना. त्याला वाटे कीं सूक्ष्मांतून स्थूल—अदृश्यांतून दृश्य—कसें निर्माण होईल ? बाप म्हणतो कीं सूक्ष्मांतील सूक्ष्म अणूपासून मी झालों. अर्थात् तोच मी. पण हें कसें शक्य आहे ? हें कोडें त्यास कांहीं केल्या उलगडेना. त्या चतुर व चाणाक्ष बापानें तें ओळखलें, आणि प्रत्यक्ष एक पुरावा देऊन त्याची समजूत पाडावी म्हणून त्यानें पुढील खुबी केली.

समोरच एक मोठा वटवृक्ष उभा होता. त्याचीं पिकलेलीं फळें होतीं, त्यांतून एक घेऊन येण्यास बापानें सांगितल्यावरून श्वेतकेतु तेथें जाऊन त्यांतील एक फळ घेऊन आला; नंतर बापानें त्यास तें फळ फोडण्यास सांगून, त्यांत त्याला काय दिसतें हें सांगण्यास सांगितलें. तेव्हां श्वेतकेतूनें तें फळ फोडून पाहिल्यावर तो बापास म्हणाला—पिताजी ! त्यांत मला कांहींच दिसत नाहीं ! बाप म्हणाला, अरे, नीट न्याहाळून पाहून सांग ! श्वेतकेतूनें पुनः पाहून बापास म्हटलें कीं, पिताजी ! मला तर त्यांत कांहींच दिसत नाहीं. तेव्हां बाप म्हणाला—आतां पहा ! तुझ्या डोळ्याला त्यांत कांहींच दिसत नाहीं. गोष्ट खरी आहे. तुझ्या स्थूल दृष्टीला त्या सूक्ष्म बीजांतील अत्यंत सूक्ष्म रूप दिसत नाहीं. पण मुला ! हा जो तुझ्यासमोर एवढा विशाल नि प्रचंड वटवृक्ष उभा आहे, तो या अत्यंत सूक्ष्म बीजापासूनच उत्पन्न झाला आहे ! त्या सूक्ष्म बीजांतच हा महान वृक्ष गर्भित आहे. या माझ्या सांगण्यावर विश्वास ठेव ! (' यं वै सौम्यैतमणिमानं न निभालयस एतस्य वै सोम्येषोऽणिम्न एवं महान्न्यग्रोधस्तिष्ठति श्रद्धस्वसोम्य ' छा. ६-१२-२ ) यावरून वैदिक ऋषि श्रद्धेचा आश्रय केव्हां व कोठें करावयास सांगतात हें, अगदीं स्पष्ट होतें.

जेव्हां एखादी गोष्ट या स्थूल इंद्रियाला दिसत नाहीं, बुद्धीला सुचत नाहीं, आकलन करतां येत नाहीं, समजत नाहीं, तेव्हांच अनुभविक ज्ञात्या माणसाच्या उपदेशावर भरीव विश्वास ठेवून तें सत्य धरून चाललें पाहिजे. बुद्धि

ही देखील एक इन्द्रियच असून, तीहि इतर ज्ञानेन्द्रियांप्रमाणें सांतच आहे. म्हणून अशा इन्द्रियांचा पूर्ण उपयोग करून जेव्हां आपणांस एखादी गोष्ट कळत नाहीं—उमजत नाहीं—तेव्हां ज्ञात्यांच्या अनुभवपुष्ट वचनावर विश्वास ठेवून चालणें हें हिताचें व शहाणपणाचें असून, त्यांत कांहीं चूक अगर कमीपणा आहे, अशांतला भाग नाहीं. याला अंधश्रद्धा म्हणून हेटाळणारे व नाक मुरडणारे दीर्घ शहाणे कोणी असणारे असोत, पण विचारवंत लोक अशा श्रद्धेची कास धरतीलच धरतील. आत्मविश्वास ही केवढी जबरदस्त शक्ति आहे, ती ज्याची त्यालाच ठाऊक. असो.

या विवेचनावरून हें स्पष्ट आहे कीं, सूक्ष्मांतूनच स्थूलाची उत्पत्ति आहे व होते. अर्थात् त्या सूक्ष्मतम सद्वस्तूपासूनच हा ब्रह्मांडाचा विशाल व प्रचंड महावृक्ष निर्माण झाला आहे. अर्थात् स्थूलाची सूक्ष्म ही मायकूस आहे, हें दाखविण्यासाठीं, मनांत बिंबविण्यासाठीं, बुद्धींत ठसविण्यासाठीं, श्रद्धेचा अवतार आहे. तेव्हां ‘ श्रत् सत्यं धीयते यस्यां सा श्रद्धा ’ या व्याख्येवरून वैदिकांची श्रद्धा अंध नाहीं, ती चांगली डोळस आहे हें पुनः एकदां सांगून, कोणतेंहि देवताराधन करणारांनीं तें श्रद्धापूर्वक करावें, हें देवोपासकाच्या मनांत बिंबविण्यासाठींच श्रुतिमाऊली बोलली कीं ‘श्रद्धया हूयते हविः’ (१०-१५१-१) श्रद्धापूर्वक देवांना हविर्भाग अर्पण करावा. शतपथांत याज्ञवल्क्यांनीं ‘ श्रद्धया सत्यमाप्यते ’— श्रद्धेनेंच सत्यनारायणाची प्राप्ति होते—असें म्हटलें असून, भगवंतांनीं त्याचाच अनुवाद गीतेंत ‘ श्रद्धावाँल्लभते ज्ञानम् ’ या वचनांत केला आहे. तेव्हां वैदिक देवोपासनेंत श्रद्धा हें एक महत्वाचें अंग असून, ती श्रद्धा चांगली डोळस आहे, अंध नाहीं, हें आतां पुनः सांगण्याची गरज नाहीं. वैदिक धर्मांत श्रद्धेला महत्वाचें स्थान आहे, इकडे जिज्ञासूंचें लक्ष वेधून या विषयाला आतां रजा देतों.

---



## प्रकरण ९ वें

# वैदिक आर्य हा यज्ञप्रकृति आहे

मनुष्य हा रानटी स्थितींतून निवळला आहे कीं नाहीं, तो मानव्यांत शिरला आहे कीं नाहीं, त्याची ज्ञानदृष्टि उजळली आहे कीं नाहीं, त्याच्या आचरणांत पाणीदारपणा खुलला आहे कीं नाहीं, त्याच्या अंतःकरणांत देवपणा रुजला आहे कीं नाहीं, हें अजमावण्याचें गमक त्याच्या सुसंस्कृतपणांत–आचारविचारांत–बोलण्याचालण्यांत–दिसून येतें, असें आर्यांचें मत आहे. मनुष्य ओळखण्याचा त्यांचा निकष आहे तो असा–स्वार्थ, अज्ञान, आलस्य हें रानटीपणाचें लक्षण, दान, दया, उद्योग व औदार्य हें मानव्याचें लक्षण, दम, ज्ञान व तप हें देवत्वाचें लक्षण, अशी ही त्यांची मनुष्य ओळखण्याची कसोटी असून त्या कसोटीवरून मनुष्याचें लक्षण व दर्जा ठरविला जातो. मनुष्याच्या अनुभवावरून त्याचा विचार बनतो; विचाराप्रमाणें आचारास वळण लागतें आणि त्या आचारावरून योग्यता ठरते. अशी ही मनुष्य पारखण्याची वैदिक प्रथा आहे.

ऋग्वेदावरून नजर फिरविली तर वैदिक आर्य हा यज्ञप्रकृति होता. म्हणजे त्याच्यांत दान, दया, उद्योग व औदार्य यांचा चांगला विकास झालेला दिसून येतो. मानव्यांत त्याची चांगली प्रगति झाली असून, परमार्थात व अध्यात्मांतहि त्यानें बरीच आघाडी मारली होती, याची साक्ष तत्कालीन वाङ्मयावरून स्पष्ट पटण्यासारखी आहे. अर्थात् येथें भारतीयदृष्टि पाहिजे; परकीय दृष्टि–पाश्चात्य दृष्टि-विधर्मीदृष्टि–उपयोगाची नाहीं. भारतीय शास्त्र हें स्वतंत्र व स्वयंपूर्ण शास्त्र आहे. आणि त्या दृष्टीनेंच भारतीय जीवनाकडे पाहिलें पाहिजे, तरच त्यांच्या आचारविचाराचें, परमार्थ-अध्यात्माचें, प्रापंचिक–जीवनाचें रहस्य, सौंदर्य व सुसंगति, ह्यांची ओळख पटण्यास मदत होते.

वेद हे वैदिक आर्यांचे मार्गदर्शक असल्यामुळें आणि वेदांत ठिकाठिकाणीं यज्ञ, दान व तप यांची महति व इष्टता गायिली असल्यामुळें ते गुण आपणांत उतरविण्याची महत्वाकांक्षा बाळगून, त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या जीवनक्रमाचा मार्ग आंखला. आणि अखेर त्या मार्गावरून वाटचाल करीत करीत ज्ञानगिरीवरहि आरोहण करून अध्यात्माचें उच्च शिखरहि गांठलें! अर्थात् ते रानटी तर नव्हतेच, उलट मानव्यांत चांगले सुधारलेले व पुढारलेले असे होते. त्यांचा सांगण्यासारखा मुख्य गुण म्हणजे ते यज्ञप्रकृति होते. म्हणजे त्यागवृत्ति ही त्यांच्यांत चांगली रुजून राहिली होती, आणि या त्यागवृत्तीचे निरनिराळे पर्याय असून, त्याची आतां क्रमानें माहिती देत जातो.

## देवयजन

वैदिक आर्यांच्या अंतरंगाकडे जरा सूक्ष्म नजर देऊन पाहिल्यास असें दिसून येईल कीं, त्यांच्या जागतिक जीवनांत प्रपंच व परमार्थ या दोहोंचाहि मधुर मिलाफ झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. अभ्युदय म्हणजे जागतिक उत्कर्ष व निःश्रेयस म्हणजे आत्मिक विकास हे दोन्ही विषय त्यांच्या जीवनक्रमांत दृढमूल होऊन बसले होते, याविषयीं संशयास जागा नाहीं. आणि या जागतिक जीवनाचा—म्हणजे प्रापंचिक व पारमार्थिक जीवनाचा—भरपूर उत्कर्ष व विकास व्हावा एतदर्थ जगावर सत्ता चालविणाऱ्या सर्व शक्तिमान व भक्तकामकल्पद्रुम अशा देवांना उद्देशून जो कांहीं त्याग सांगितलेला आहे, त्यास देवयजन अशी संज्ञा आहे. आणि हें देवयजन यज्ञद्वारा करावयाचें असतें. कारण वैदिक देव हे यज्ञप्रिय देव असून ('यज्ञप्रियाहि देवाः'), जो तद्द्वारा त्यांची सश्रद्धमनानें यथाविधि उपासना करतो, त्या देवोपासकाचे मनोरथ ते पूर्ण करण्यास वचनबद्ध असतात, असें मागें सांगण्यांत आलें आहे. अर्थात् ऋषिप्रणीत वैदिक धर्मावर ज्यांचा अढळ नि भरीव विश्वास आहे, त्यांनीं सश्रद्ध मनानें वेदोक्त मार्गाचा अवलंब करून, देवांना प्रसन्न करण्याचा पुण्य व श्रेयस्कर मार्ग पत्करावा, हें आत्मकल्याणेच्छु देवभक्ताचें पवित्र व विहित कर्तव्य असून,

त्याप्रमाणें प्राचीन आर्यांनीं तो अभीष्टप्रद व श्रेयस्कर मार्ग पत्करला होता, हें वेदवाङ्मयावरून उघड होतें.

त्यांनीं स्पष्टच म्हटलें आहे कीं आम्ही आमच्या इहपर कल्याणार्थ यज्ञरूपी दिव्य नावेचा आश्रय करतों ( 'दिव्यं नावं स्वारित्रामनागसमस्रवन्तीमा रुहेम स्वस्तये ' १०-६३-१० ) अर्थात् देवयजन उर्फ यज्ञोपासना हें त्यांच्या जीवनक्रमांतील एक महत्वाचें कर्तव्य होऊन बसलें होतें. ' देवरथोवाऽ एष यज्ञः '—यज्ञ हा देवांकडे नेणारा—स्वर्गाकडे नेणारा—रथ आहे—असें ऐतेरेय ब्राह्मणांत म्हटलें आहे. ही यज्ञोपासना म्हणजे श्रेष्ठ कर्मांतील अत्यंत श्रेष्ठ कर्म मानण्यांत आली होती. ( ' यज्ञो वै श्रेष्ठतमं कर्म ' श. प. १·७-१-५ ) आणि म्हणून हें यज्ञकर्म—ही देवोपासना—हें देवयजन—करीतच जिवंत राहण्याची आत्महितेच्छुनें इच्छा करावी असें ईशावास्यांत स्पष्ट बोलून दाखविलें आहे. ' कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ' हें वाक्य प्रसिद्धच आहे.

तेव्हां आतां येथें सांगावयाचा मुद्दा म्हणजे हा कीं ज्याला इहपरलोकीं सुखासमाधानांत कालक्रमणा करावयाची आहे, त्यानें वैदिक देवांना यज्ञयागद्वारा प्रसन्न केल्यास तो देवभक्त मनुष्यांत श्रेष्ठ ज्ञानी होऊन, ऐश्वर्यानें, पराक्रमानें व महान् कीर्तीनें जगांत चमकूं लागतो. ( ' यस्ते यज्ञेन समिधा य उक्थैरर्कैभिः सूनो सहसो ददाशत् । स मर्त्येष्वमृत प्रचेता राया द्युम्नेन श्रवसा विभाति ॥ ' ६-५-५ अर्थात् या तेजस्वी व प्रभावी देवयजनांत देवाप्रीत्यर्थ हविर्द्रव्यें वैदिक शास्त्रोक्त विधीनेंच अर्पण केलीं पाहिजेत आणि असा जो देवभक्त तो ज्ञान, ऐश्वर्य व कीर्ति यांनीं सुसंपन्न होतो, इतकेंच नव्हे तर त्यास देवकृत काय अगर मनुष्यकृत काय कसलेंच पाप बाधूं शकत नाहीं. ( ' न तमंहो देवकृतं कुतश्चन न मर्त्यकृतं नशत् ' ८-१९-६ ) शिवाय मरणोत्तर त्यास सद्गति म्हणजे स्वर्गप्राप्ति होते. ( ' यः पृणाति स ह देवेषु गच्छति ' ) असा हा देवभक्ताला देवयजनापासून फायदा आहे.

मात्र हें देवयजन यज्ञद्वाराच केलें पाहिजे, असा वेदनारायणाचा तीक्ष्ण कटाक्ष आहे व वैदिक ऋषींचा तीव्र आग्रह आहे. याचें कारण

असें कीं जो वेदोक्त मार्गानें देवपूजन व देवसंतर्पण करतो, तोच त्यांना प्रसन्न करूं शकतों (' देवान्वाएष प्रीणाति यो यजते '), अशी ही वस्तुस्थिति असल्यामुळें, जागतिक जीवनार्थ व जागतिक उत्कर्षार्थ त्याचप्रमाणें पारलौकिक कल्याणार्थ व आत्म-उद्धारार्थ वैदिक धर्मावर श्रद्धा ठेवून देवभक्तानें यथाशक्ति वेदोक्त मार्गानें देवांप्रीत्यर्थ द्रव्यत्याग—म्हणजे हविर्भाग अर्पण—करणें हें एक महत्त्वाचें कर्तव्य असून, त्या त्यागांत फलपत्रापासून सर्वस्व अर्पण करण्यापर्यंत हवनीय द्रव्याचा समावेश करण्यांत आला आहे. हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें तर जितका तुमचा त्याग अधिक तितका तुम्हांला देव जवळ ! अर्थात् तुमच्या त्यागाची परीक्षा तुमच्या योग्यतेवर अवलंबून आहे. आणि भक्तीचा निकष त्यागावर आहे.

## पुरोहितसत्कार

वर जें देवयजन सांगितलें, त्यांतील देव हे ज्ञानमय असून, ते ज्ञानगम्य व कर्मसाध्य आहेत. म्हणजे वेदज्ञानानें त्यांचें सत्यस्वरूप समजून घेऊन, वेदोक्त कर्मानुष्ठान केल्यानें त्यांचा प्रसाद मिळतो, असा त्याचा भावार्थ. अर्थात् ज्यांना त्यांचें यथार्थ स्वरूप आकलन झालें आहे व ज्यांना त्यांना प्रसन्न करण्याचा मार्गहि साधला आहे, अशा वेदविशारद व कर्मकुशल पंडितांच्या सहाय्यानें व सहकार्यानें देवोपासना केल्यास, ती प्रभावी व फलप्रद होण्यास सुलभ पडते आणि ती सरळ त्या त्या देवांप्रत जाऊन पोंचते, असा प्राचीन देवभक्तांचा अनुभव असल्यामुळें अशा वेदनिष्णात व कर्मकुशल ब्राम्हणाचें सहकार्य मिळवून, प्राचीन देवभक्त देवयजन करीत असत, अशी साक्ष ऋग्वेदांत पदोपदीं आढळते. आणि म्हणून अशा वेदविद्याविशारद व यज्ञकर्मकुशल पंडितांनांच पुरोहित ही संज्ञा असून, देवभक्तानें देवकार्यांत त्यांचें सहकार्य अवश्य मिळवावें, असें श्रुतिमाऊलीनें आग्रहानें सुचविलें आहे. आणि या त्यांच्या सहकार्याबद्दल देवांप्रमाणेंच आदरसत्कारपूर्वक यथायोग्य दक्षिणा देऊन त्यांनाहि प्रसन्न व संतुष्ट करावें, असाहि वेदाचा हितोपदेश—नव्हे आग्रह—आहे.

इतकेंच नव्हें तर अशा विद्वान ब्राह्मणाला वेदनारायणानें या भूलोकीचा आपला प्रतिनिधि म्हणजे प्रत्यक्ष देवच बनविला आहे ! ' विद्वान्

सो हि देवः ’ असें वेदवचनच आहे, आणि या वचनाला पुष्टि म्हणून शतपथांतील हें पुढील वचन मननीय आहे. ‘ द्वया वै देवाः । अहैव देवा अथ ये ब्राह्मणाः शुश्रुवांसोऽनूचानास्ते मनुष्यदेवास्तेषां द्वेधा विभक्त एव, यज्ञ आहुतय एव देवानां, दक्षिणा मनुष्यदेवानां ब्राह्मणानां शुश्रुवुषामनूचानामाहुतिभिरेव देवान्प्रीणाति दक्षिणाभिर्मनुष्यदेवान्ब्राह्मणाञ्छुश्रुवुषोऽनूचानांस्त एनमुभये देवाः प्रीताः स्वर्गंलोकमभिवहन्ति ॥’ ( श. प. ४-३-४-४ ) वैदिक देव हे दोन प्रकारचे आहेत. स्वर्गात राहणारे जे देव ते अहर्देव होत. आणि वेदाध्ययनसंपन्न व वेदाध्यापक असे जे शुचिर्भूत ब्राह्मण ते मनुष्यदेव होत. अर्थात् भूदेव हे त्यांनाच उद्देशून म्हटलें आहे.

त्यानां देव म्हणण्याचें कारण ते ज्ञानदान–विद्यादान–करतात. ‘ देवो दानात् ’ हें देवाचें लक्षण त्यांस पूर्ण लागू पडतें. यज्ञ हा या दोन देवामध्यें विभागला गेला आहे. यज्ञांतील आहुति हा देवांचा भाग आणि तेथें दिली जाणारी दक्षिणा हा मनुष्यदेवाचा म्हणजे वेदाभ्यासक व वेदाध्यापक ब्राह्मणांचा भाग. आहुतींनी यज्ञांत देव संतुष्ट व प्रसन्न होतात. आणि दक्षिणादानानें मनुष्यदेव म्हणजे ब्राह्मण संतृप्त व सुप्रसन्न होतात. अर्थात् देवोपासक यजमान हा आहुति देऊन देवांना व दक्षिणा देऊन ब्राह्मणांना संतुष्ट व संतृप्त करतो. अशा रीतीनें स्वर्देव व भूदेव प्रसन्न झाले म्हणजे ते त्या यजमानाला स्वर्गाप्रत म्हणजे दिव्य सुखाप्रत-नेऊन पोंचवितात. या वरून हें उघड आहे कीं देवोपासना देवभक्ताला उपकारक व्हावयाची झाली तर त्यानें देवांना अग्नींत आहुति व ब्राह्मणांना यथोचित दक्षिणा देऊन दोघानांहि प्रसन्न केले पाहिजे. ब्राह्मणाला वगळून केलेल्या देवपूजनेतील हविर्भाग कोणतेहि देव ग्रहण करूं शकत नाहींत, ही गोष्ट देवोपासकांनी अवश्यमेव लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

असे जे वेदपारग व सच्छील व तसेच सद्वृत्त ब्राह्मण, त्यांच्या सहायानें व सहकार्यानेंच आर्यजनांनी आपापलीं धर्म कार्यें करावींत म्हणजे त्यांचे–त्या यजमानांचे-उद्देश सफल होतील असें ग्रंथराजाचें सांगणें आहे. धर्मकार्यांत पुढारीपणानें भाग घेणाऱ्या वेदविद्याविशारद ब्राह्मणाला पुरो-

हित अशी संज्ञा असून त्यालाच यज्ञकार्यांत ऋत्विज असें म्हणतात. ही यजमान-पुरोहित प्रथा केवळ या मर्त्यलोकांतलीच आहे असें नसून, ती देव लोकांतून इकडे आलेली आहे. देवांचा राजा जो इंद्र त्या देवेंद्राचा पुरोहित बृहस्पति असून तो ब्राह्मण आहे. अर्थात् देवराजाचा बृहस्पति हा देवगुरु आहे आणि 'यथा देवानां चरणं तद्वाऽनु मनुष्याणाम्' या श्रुतिवचनाच्या आधारें ही पुरोहित संस्था वैदिक आर्यांत देवरूढीला धरून येथें निर्माण करण्यांत आली आहे, अर्थात् ती देवनिर्मित असून, स्वार्थी ब्राह्मणांनीं उदरंभरणार्थ ती नियोजिलेली नाहीं. अर्थात् ती मानवकृत नसून, देवनिर्मित आहे, हें वेदवचनावरूनच स्पष्ट होत आहे.

शिवाय ही जी पुरोहित संस्था ती केवळ धर्मकृत्यें व यज्ञकृत्यें करण्या साठींच व करण्यापुरतींच नसून, राजकारणांतहि तिचें प्रमुख स्थान आहे. राजाला राजकारणांत योग्य मार्गदर्शन करण्याचें व परचक्राच्या वेळीं त्याला योग्य मदत करण्याचें महत्त्वाचें कामहि या पुरोहिताचें असून, तशी प्रथा असल्याचें ऋग्वेदावरून स्पष्ट दिसून येते. या बाबतींत वसिष्ठ, विश्वामित्र, भरद्वाज इत्यादि वैदिक ऋषि उल्लेखनीय आहेत. क्षत्रिय हे राजकारणांत गुंतलेले, वैश्य व्यापार उदीमांत रंगलेले, शूद्र सेवावृत्तींत गढलेले असल्यामुळें राज्यांत जागृत राहून चौफेर देखरेख करण्याचें काम या पुरोहिताकडेच येतें. 'वयं राष्ट्रे जागृयाम पुरोहिताः' असें याज्ञवल्क्यांनीं शतपथांत ठसठशीत बोलून दाखविले आहे. पण याची दखलगिरी आज कोणाला आहे? सगळेच 'अंधेनैव नीयमाना यथान्धाः'!

## पुरोहित–महिमा

आतां ऋग्वेदांत या पुरोहितासंबंधानें काय उल्लेख आढळतो, हें आतां आपण पाहूं. अर्थात् वेदांत जे उल्लेख सांपडतात ते सर्व क्षत्रिय राजा व ब्राह्मण पुरोहित यांना अनुलक्षून आहेत, हें प्रथम सांगून मग आतां प्रस्तुत प्रश्नांत शिरतो. पुरोहिताविषयीं ऋग्वेदाचें सांगणें आहे तें असें:— 'स इद्राजा प्रतिजन्यानि विश्वा शुष्मेण तस्थावभि वीर्येण। बृहस्पतिं यः सुभृतं बिभर्ति वल्गूयति वन्दते पूर्वभाजम्॥ ४-५०-७॥ भावार्थ, जो राजा पुरोहिताला अन्नवस्त्रधनधान्यादि देऊन त्याचें सर्वतोपरी संरक्षण

करतो, जो त्याची आदरयुक्त प्रशंसा करितो व त्याला नमस्कार करून त्याचा प्रथम आदरसत्कार करतो, असा राजाच लढाईत मोठा पराक्रम गाजवून सर्व शत्रुसैन्यांस जिंकून विजयी होऊन राहतो. ज्या राजाच्या घरीं प्रथम ब्राह्मण पुरोहित येतो ('यस्मिन्ब्रह्मा राजनि पूर्व एति'४-५०-८), तो राजा आपल्या वाड्यांत सुखसमाधानानें नांदतो ( 'स इत्क्षेति सुधित ओकसि स्वे' ४-५०-८). त्याच्यासाठीं पृथिवी माता सदासर्वकाळ फलधान्यादिकांनीं सुसमृद्ध होऊन राहते ( 'तस्मा इळा पिन्वते विश्वदानीम्' ४-५०-८). त्यालाच प्रजा स्वसंतोषानें वश होऊन राहते ( 'तस्मै विशः स्वयमेवा नमन्ते' ४-५०-८). असा राजा शत्रूची सर्व संपत्ति लुटून आणण्यास सर्वथैव समर्थ होतो ( 'अप्रतीतो जयति सं धनानि प्रतिजन्यानि' ४-५०-९). आणि देव त्याचें सर्वप्रकारें रक्षण करतात ('तमवन्ति देवाः ॥ ' ४-५०-९ ).

हा जो राजा-पुरोहित संबंध—ब्राह्मण क्षत्रिय संबंध—वेदानें सांगितला आहे, त्यांत सूक्ष्म दृष्टया पाहूं गेल्यास फार मोठा अर्थ गर्भित आहे. हा ब्राह्मण-क्षत्रिय संबंध म्हणजे ज्ञान व कर्म—शास्त्र व प्रयोग—शिव व जीव—यांचें सुसंवादी सहकार्य व साहचर्य होय. ही भावना जोपर्यंत भारतीयांत जागृत होतीं, तोंपर्यंत राजाचा राजमुकुट तोऱ्यानें राज्यांत मिरवीत होता आणि भरतभूमि सुवर्णभूमि होऊन राहिली होती. या सर्व गोष्टी आतां इतिहासजमा झाल्या आहेत.

याची प्रचीति पहावयाची झाल्यास ती शुक्ल यजुर्वेदांतील यापुढील मंत्रांत पहावयास मिळते. तो मंत्र असाः—यत्र ब्रह्म च क्षत्रं च सम्यञ्चौ चरतः सह । तं लोकं पुण्यं प्रज्ञेषं यत्र देवाः सहाग्निना ।। ' २०-२५ ॥ जेथें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोघेहि एकमेकाशीं प्रेमानें व सलोख्यानें वागतात आणि एकत्र नांदतात, तोच पुण्यदेश समजावा आणि तेथेंच अग्नि व इतर देव संचार करीत असतात. हा मंत्र ब्राह्मण क्षत्रिय ऐक्याची मंगल युति व फलश्रुति जगाला स्पष्ट जाहीर करीत नाहीं काय ? तिकडे ज्यांचें दुर्लक्ष आहे, अगर त्याच्यांवर ज्यांचा विश्वास नाहीं, अशा दुर्दैवी लोकांची दुर्गति व दुरवस्था आज महाराष्ट्रास तरी नव्यानें सांगावयास नकोच!

हा ब्राह्मण–क्षत्रिय संबंध–अर्थात् यजमान पुरोहित संबंध–इतका निकट व जिव्हाळ्याचा आहे कीं, याज्ञवल्क्यांनीं या दोन वर्णांस देह व अवयव यांची उपमा दिली आहे. तें वचन हें असें:—'आत्मा वै यज्ञस्य यजमानोऽङ्गान्यृत्विजो यत्र वा आत्मा तदङ्गानि यत्रोऽङ्गानि तदात्मा ॥' श. प. ९-५-२-१६ ॥ यजमान हा यज्ञाचा आत्मा असून, ऋत्विज हे त्याचे अवयव आहेत. अर्थात् जेथें आत्मा तेथें अवयव व जेथें अवयव तेथेंच आत्मा. अशी ही वस्तुस्थिति आहे. यावरून पुरोहित व यजमान यांचा अंगागी संबंध लागतो, हे आतां निराळे सांगणें नकोच. आणि म्हणून जेव्हां पुरोहित हे निराश्रित होतात, तेव्हां यजमान हाहि आश्रयरहित होतो ! याचें कारण हें कीं दोघांचें आश्रयस्थान एकच आहे, असा हा वैदिक आर्यांतील यजमान–पुरोहित संबंध आहे ( श. प. ९-५-२-१६ ).

याच अर्थाचा अनुवाद ऐतरेय ब्राह्मणांतहि आला आहे. तें वचन असें—'अर्धात्मो ह एष क्षत्रियस्य यत्पुरोहितः' (७-२६)—पुरोहित हा क्षत्रियाचा अर्धा भाग आहे असें सांगून पुढें म्हटलें आहे कीं ज्या देवोपासनेंत पुरोहित नाहीं, त्या देवोपासनेंतील क्षत्रियाचें हविरन्न म्हणजे नैवेद्य वैदिक देव स्वीकारित नाहींत ! आजचे आम्हा हिंदूंचें रामकृष्णादि देव हे वैदिक देवाचेच अवतारी अंश असल्यामुळें ते वस्तुतः वैदिक देवांतच मोडतात, हें लक्षांत ठेवणें जे राम-कृष्ण-हरी-विठ्ठल–इत्यादि देवाचे भक्त आहेत, त्यांच्या हिताचें व आत्मकल्याणाचें आहे, हें उघड सांगावयास नकोच.

आतां प्रस्तुत मुद्यावर दोन शब्द लिहून पुढील विषयाकडे वळतो. जेथें जेथें देवतानुष्ठान आहे तेथें तेथें देवाला हविर्भाग हा अर्पण करणें प्राप्तच आहे. कारण त्याशिवाय देवतानुष्ठान हें पूर्ण होत नाहीं. आणि जेथें जेथें देवसंतर्पणार्थ हविर्दान आहे, तेथें तेथें दक्षिणादान हेंहि अवश्यन्त्र आहे. कारण जेथें हवि तेथें दक्षिणा अशी ही युति आहे. दक्षिणारहित हविर्दान हें देवांना निषिद्ध आहे. 'नादक्षिणं हविः स्यात्' असें वेदाचें स्पष्ट व बजावून सांगणें आहे. 'तत्रो यच्छक्नुयात्तद्दद्यात्'–त्या देवयजनांत जें शक्य आहे तें

दक्षिणा म्हणून द्यावें. आणि हा दक्षिणा घेणेचा अधिकार फक्त वेदविद्यापारंगत विद्वान पुरोहिताचाच आहे ! इतरांना नाहीं, हेंहि पण येथें जातां जातां सांगून ठेवणें अवश्य आहे. असो. एकंदरींत तात्पर्य काय तर देवाला जसा हविर्भाग पोंचवायचा, तसाच पुरोहितालाहि दक्षिणा अर्पण करून त्यास संतुष्ट करावयाचें. एवंच देवयजनांत देवपूजा व ज्ञानपूजा दोन्हींचाहि समावेश होतो.

## अतिथिपूजन

वैदिक आर्यांत मान्यस्थानाचे जे विषय आहेत, त्यांत अतिथीचाहि समावेश होतो. देवपूजन, ब्राह्मणपूजन, तसेंच हें अतिथिपूजनहि आहे; याची व्रतांत गणना होते. अतिथिपूजन हें एक व्रत आहे असें तैत्तरीय उपनिषदामध्यें म्हटलें आहे. ( 'तद्व्रतम्' तै. उ. ३-१० ) यज्ञांत देव हे अतिथि होऊनच यज्ञमंडपांत येतात. अग्नीला ऋग्वेदांत अतिथि असें म्हटलें आहे ( 'अतिथिर्मानुषाणाम्' ). सोमाला उद्देशूनहि तोच शब्द वापरण्यांत आला आहे. ऋग्वेदांतला सुप्रख्यात राजा जो दिवोदास तो अतिथिपूजनांत अग्रेसर असल्यामुळें त्याला अतिथिग्व असें म्हटलें असून, तेथें अतिथिग्वाची व्याख्या केली आहे ती अशीः–पूजयातिथीन् गच्छतीत्यतिथिग्वः' म्हणजे आदरपूर्वक अतिथीचा सत्कार करण्यास सामोरा जातो तो अतिथिग्व असें सायणभाष्यांत म्हटलें आहे. ( ऋ. ७-१९-८ ) हें विशेषण वेदांत प्रथम देवांना उद्देशून लावण्यांत आलें असलें तरी ब्राह्मण हाहि एका अर्थी देवतुल्यच असल्यामुळें त्यालाहि तें लावण्यांत आलें हें युक्तच झालें. कारण ' विद्वान सो हि देवः ' असें म्हटलें असून, विद्वान व सुचरित्र ब्राह्मण हे वैदिक धर्मांत भूदेवांतच मोडतात आणि ही गोष्ट हिशोबांत घेऊनच तैत्तिरीय उपनिषदांत 'अतिथिदेवो भव' हा बहुमान ब्राह्मण अतिथीस देण्यांत आला आहे. यावरून हें स्पष्ट आहे कीं, घरीं आलेल्या विद्वान अतिथीचा देवाप्रमाणेंच यथायोग्य आदर-सत्कार करावा.

अतिथि त्यालाच म्हणावा कीं ज्याची घरीं येण्याची तिथि म्हणजे दिवस निश्चित ठरलेली नसते. ' न विद्यते तिथिर्यस्य स अतिथिः ' अशी थोडक्यांत अतिथि शब्दाची व्याख्या आहे. अर्थात् जो अकस्मात्

भोजनकाली घरीं येतो, तो अतिथि. आणि तो गृहपतींना अवश्यमेव आदरणीय असून, त्याप्रमाणें त्यानें त्याचा आदरपूर्वक सत्कार करावा अशी धर्माज्ञा आहे.

हा अतिथि घरीं आला असतां त्याचा आदरसत्कार न करतां, तसाच त्यास विन्मुख पाठविणें, हें फार अनिष्ट आहे. कारण जो अतिथि होऊन घरीं येतो, तो प्रखर अग्निप्रमाणेंच–वैश्वानररूपानेंच–घरांत प्रवेश करतो. ( 'वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान्' कठ १-१-७) आणि जे सज्जन आर्य आहेत, ते असा अतिथि गृहाप्रत आला असतां, त्यास सन्मानपूर्वक आश्रय देऊन, अर्घ्यपाद्यादि व भोजनपानादि अर्पण करून, त्यास प्रसन्न करतात ( 'तस्यैतॉं शान्तिं कुर्वन्ति' कठ.१-१-७). अर्थात् असा अतिथि जर घरीं आला तर त्यास आश्रय देण्यास चुकूं नये. 'न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत'–जो कोणी दिवसा अगर सायंकाळीं घरीं आश्रयार्थ म्हणून येईल, त्याला आमच्या इथें सोय नाहीं असें म्हणून त्यास परत लावूं नये—असें तैत्तिरीय उपनिषदांत चक्क सांगून ठेविलें आहे ( तै. उ. ३-१० ) आणि हें गृहपतीचें व्रतांपैकींच एक व्रत आहे ( 'तद्व्रतम्' तै. उ.३-१०). प्रवासांतून आलेला हा अतिथि प्रवासश्रमानें थकूनभागून क्षुधा-तृषादिकानें त्रस्त होऊन घरीं आलेला असतो. अशा श्रांत व त्रस्त मनुष्यास घरीं विश्रांत पावण्यास आश्रय देऊन, त्याला यथाशक्ति भोजनपानादि देऊन, त्याच्या श्रमाचा परिहार करावा, हा अतिथिसत्काराचा मूळ हेतु आहे.

आणि असें जर केलें नाहीं–घरीं आलेल्या अतिथीचा योग्य आदर-सत्कार न करतां त्यास विन्मुख पाठवून देण्यांत आलें–तर काय अनर्थ घडतो हें पुढील श्रुतिवचनांत स्पष्ट सांगून ठेविलें आहे. 'आशाप्रतीक्षे संगतँ सूनृतां चेष्टापूर्ते पुत्रपशूंश्च सर्वान्। एतद् वृङ्क्ते पुरुषस्याल्पमेधसो यस्यानश्नन्वसति ब्राह्मणो गृहे ॥ ' (कठ. १-१-८)—ज्याच्या घरीं ब्राह्मण अतिथि येऊन तेथें उपाशी राहतो, त्या क्षुद्रबुद्धि गृहस्थाच्या अज्ञात व ज्ञात वस्तु प्राप्त करून घेणेच्या सर्व इच्छा, त्या इच्छा सफल झाल्या तर त्यांचें फळ, प्रियवाणीचें फळ, इष्टापूर्तीचें फळ, तसेंच पुत्र व पशू या

सर्वांचा तो नाश करतो ! हाच अर्थ 'अतिथिर्यस्य भग्नाशो गृहस्थस्य गच्छति । तस्मात् सुकृतमादाय दुष्कृतं तु प्रयच्छति' या विष्णु वचनांतहि प्रतिबिंबित झाला आहे. अर्थात् या वचनाप्रमाणें घरीं आलेला अतिथि विन्मुख होऊन गेला तर त्या गृहस्थाचें पुण्य घेऊन आपलें पाप त्यास देऊन जातो !

तेव्हां अतिथि हा घरीं आला असतां गृहपतीनें त्याचा आदर सत्कार करावा. त्यास बसावयास आसन द्यावें. यथाशक्ति सुग्रास भोजन घालावें व त्याच्याशीं गोड भाषण व नम्र वर्तन करून त्यास तोषवावें, असें याज्ञवल्क्यांनीं आपल्या स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे ( 'सत्क्रियाऽन्वासनं स्वादु भोजनं सूनृतं वचः' या.स्मृ.१-१०९). आणि तो आर्यजनांचा गृहस्थ धर्म आहे. अर्थात् तो घरीं असेपर्यंत त्याची चांगली बरदास्त राखून त्यास सुखसमाधानांत ठेवावें. अतिथीची वस्ती एक दिवसच असते. अधिक असत नाहीं. असा हा वैदिक आर्यांचा अतिथिसत्कारविधि आहे.

वरील वचनांत ब्राह्मण अतिथीविषयीं सांगितलें असून, तेथें ब्राह्मण हा शब्द उपलक्षणार्थी योजण्यांत आला आहे. त्यांत क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचाहि समावेश होतो, हें विसरावयाचें नाहीं. व अशांचा अतिथि सत्कारहि त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार यथाक्रम व यथाशास्त्र करावा हें सांगणें ओघानेंच प्राप्त होतें. असो.

## स्वागतार्ह इतर व्यक्तींचा सत्कार

आतांपर्यंत केलेलें विवेचन हें अतिथिसंबंधीं झालें. त्याचप्रमाणें अभ्यागत कोणी घरीं आला तर त्याचाहि योग्यतेनुसार परामर्श घ्यावा. विशेष तिथिप्रसंगी द्रव्याच्या लोभानें जे घरीं येतात, ते अभ्यागत होत ( ' तिथिविशेषेषु द्रव्यलाभमुद्दिश्य येऽभ्यागच्छन्ति तेऽभ्यागताः ' अशी अभ्यागताची व्याख्या आहे, ). असे अभ्यागत जे कोणी येतील त्यांसहि भोजनपानादि द्यावें. या अभ्यागताप्रमाणेंच सगेसोयरे, आप्तइष्ट,मित्रबांधव हे आले असतां त्यांसहि भोजनादि देऊन त्यांचा सत्कार करावा. ( भोजयेच्चागतान्काले सखिसम्बन्धिबान्धवान्' या.स्मृ.१-१०८).

यानंतर जेवणाच्या वेळीं भिक्षु म्हणजे यति आल्यास सत्कारपूर्वक त्यासहि भिक्षा घालावी. त्याचप्रमाणें ब्रह्मचारी आल्यास त्यासहि भिक्षा घालण्यांत यावी ( 'सत्कृत्य भिक्षवे भिक्षा दातव्या सुव्रतायच' या. स्मृ. १-१०८ ). याशिवाय जे भिकारी, अंधपंगु, अनाथ रोगी असे जे भोजन प्रसंगीं अन्नाच्या मिषानें आले असतील, त्यांनाहि भोजनोत्तर यथाशक्ति अन्न देण्यास चुकूं नये. एवंच तात्पर्य काय तर अतिथि, अभ्यागत, आप्त-इष्ट, सोयरेधायरे, मित्रबांधव, भिक्षु ब्रह्मचारी, भिकारी, अंधपंगु, अनाथ, रोगी या सर्वांना भोजनप्रसंगीं घरीं आल्यास त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें अन्नसंतर्पण करणें, हा वैदिक गृहपतीचा अभिजात धर्म आहे व वेदाची तशी त्याला आज्ञा आहे.

## अन्नदान

मनुष्यमात्राला—नव्हे अखिल जीवसृष्टीला-जीव धारणेंसाठीं जर कशाची अत्यंत आवश्यकता असेल, तर ती अन्न हें होय. इतर सर्व गोष्टी नसल्या तरी चालतील. राहावयास घर नसलें तरी चालेल. घालावयास कपडेलत्ते नसले तरी चालतील. इतर सुखसोयी नसल्या तरी चालतील. पण हें अन्न जर नसेल तर कुडींत प्राण टिकून राहणार नाहीं, हें भविष्य न सांगतांच ज्याचें त्याला सहज कळण्यासारखें आहे. अर्थात् या अन्नावरच अखिल जीवसृष्टीचें चैतन्य-सर्वस्व सर्वस्वी अवलंबून आहे आणि म्हणून 'स वा एष पुरुषोऽन्नरसमयः'—हा जो पुरुष तो अन्नरसमय आहे, म्हणजे त्याचा देह हा अन्नाचा सारभूत आहे.—असें म्हटलें आहे (तै. उ. २–१). या अन्नाचें महत्त्व इतकें आहे कीं, शेवटीं श्रुतीनें त्याला उद्देशून 'अन्नं ब्रह्म' अशी घोषणा केली असून (तै. उ. ३-२), अनुभवांती ती सत्यच आहे.

अन्नाला ब्रह्म म्हटलें याचें कारण ब्रह्माचें जें लक्षण तें सर्व या अन्नांतहि दिसून येतें. 'अन्नाध्द्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। अन्नेन जातानि जीवन्ति। अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्ति।'—अन्नापासूनच हीं सर्व भूतें—अर्थात् त्यांचे देह—उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर त्या अन्नावरच जगतात. आणि अखेर अन्नाप्रतच जातात आणि त्यांतच लय पावतात. सारांश हें जं अन्नाचें लक्षण तेंच ब्रह्माचें असल्यामुळें—उत्पत्तिस्थितिलय हे

ब्रह्माचेंहि लक्षण आहे–श्रुतीनें 'अन्नं ब्रह्म' असें म्हटलें, त्यांत कांहीं गैर आहे असें म्हणतां येत नाहीं.

आतां स्पष्टच सांगावयाचें म्हणजे प्राणधारणेला अन्न हें अत्यंत आवश्यक आहे, हें उघड बोलून दाखवावयासच नको. त्याशिवाय शरीरांत प्राण राहणारच नाहीं. म्हणून 'अन्नं प्राणः' असें म्हटलें असून, तोच भाव याज्ञवल्क्यांनीं 'अन्नमु आयुः'–अन्न म्हणजेच आयुष्य–या शब्दांनीं शतपथांत उद्धृत केला आहे. शरीर व प्राण यांचा जो योग, त्यालाच आयु हें नांव आहे. आणि हें पटावयाचें झाल्यास अन्नाचे गुण–अन्नाचा महिमा–काय आहे, हें समजणें जरूर असून, त्याचें वर्णन आयुर्वेदांत देण्यांत आलें आहे तें असें:—'वर्णप्रसादः सौस्वर्यं जीवितं प्रतिभा सुखम्। तुष्टिः पुष्टिर्बलं मेधा सर्वमन्ने प्रतिष्ठितम्॥' (चरक, सू. स्था. अ. २७-३४२)–वर्णकांति, सुंदर स्वर, जीवित, प्रतिभा, सुख, तुष्टि, पुष्टि, बल, मेधा हीं सर्व अन्नांत प्रतिष्ठित आहेत. अन्नाचें हे गुण लक्षांत घेतल्यावर, त्याचें महत्त्व काय आहे याचें निराळें वर्णन करण्याचें कारण राहत नाहीं.

वैदिक आर्यांना हे अन्नाचें गुण व महत्त्व याची पूर्ण ओळख पटली होती. म्हणून त्यांनीं अन्नदानाला फार मोठें महत्त्व दिलें आहे. इतकेंच नव्हे तर सर्व दानांत या अन्नदानाला श्रेष्ठ दान असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत याचें अत्यंत मार्मिक व बोधप्रद असें वर्णन आलें असून त्यांतील महत्त्वाचा भाग येथें थोडक्यांत नमूद करतो. देवांनीं प्राण्यांच्या मागें ही क्षुधा लाविली नसून जणू कांहीं मृत्यूच लावून दिला आहे. (न वा उ देवा क्षुधामिद्वधं ददुः' १०-११७-१) अर्थात् या क्षुधेची शांति न केली तर लवकरच प्राणी मृत्यूमुखीं पडणार, हा त्याचा भावार्थ. अशा प्रकारची जी मृत्युरूप क्षुधा तिची अन्नदान करून जो शांति करतो, तोच खरा दाता होय! असें कोणी समजू नये कीं ज्याच्याजवळ मुबलक अन्न आहे, त्याला मृत्यु गाठणार नाहीं. दररोज यथेच्छ सुग्रास अन्न भक्षण करणाराहि अखेर मृत्यूच्या आहारी जातोच! तेव्हां मरण हें जसें क्षुधिताला चुकलें नाहीं तसेंच तें अन्नवंतालाहि पण चुकलें नाहीं. अतएव जो क्षुधाग्रस्ताला अन्न-

दान न करतां आपण एकटाच त्यावर यथेच्छ ताव मारतो, त्यालाहि अखेर मृत्यु येऊन गांठणारच ! ('आशितमुप गच्छन्ति मृत्यवः' १०-११७-१). यावरून हें स्पष्ट आहे कीं बुभुक्षित व भोक्ता दोघांनाहि मरण हें समसमानच आहे. तें कोणालाच चुकलेलें नाहीं.

शिवाय हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं दान देणाऱ्याचें धन कधींहि कमी होत नाहीं. ('उतो रयिः पृणतो नोप दस्यति' १०-११७-१). त्याबरोबरच हेंहि समजलें पाहिजे कीं, दुसऱ्याला न देतां स्वतःच अन्नाचा खमंग उपभोग घेणारा जो कट्टर बकासूर आहे, त्याला सुखविणारा मात्र जगांत कोणीच भेटत नाहीं.! ('उतापृणन् मर्डितारं न विद्यते' १०-११७-१) ज्याच्याजवळ पुष्कळ अन्न असूनहि जो अशक्त आहे, अन्नेच्छु आहे, दारिद्र्यपीडित आहे, असा क्षुधाग्रस्त मनुष्य घरीं आला असतां, त्याला अन्न देण्याविषयीं जो मन निष्ठुर करतो—अर्थात् त्याला क्लेश देतो, इतकेंच नव्हे तर त्याच्या समक्ष अन्नावर यथेच्छ ताव मारतो, अशा कठोर कंजूष पुरुषाला जगांत सुखविणारा असा कोण व कोठून भेटणार? अर्थात् कोणीच त्याचा हितचिंतक सांपडत नाहीं ! ('य आध्राय चकमानाय पित्वोऽन्नवानसन्रफितायोपजग्मुषे । स्थिरं मनः कृणुते सेवते पुरोतो चित्स मर्डितारं न विद्यते ॥ १०-११७-२ )

आतां खरें सांगावयाचें म्हणजे तोच खरा दाता कीं जो अन्नार्थी होऊन घरीं आलेल्या अतिथीला व गोरगरीबाला यथाशक्ति अन्नदान करतो! अशा दात्यालाच यज्ञाचें म्हणजे देवोपासनेचें भरपूर फल मिळतें. म्हणजे त्याचे मनोरथ सफल होतात. ('स इद्भोजो गृहवे ददात्यन्नकामाय चरते कृशाय । अरस्मै भवति यामहूता' १०-११७-३ ) अशा उदार व कनवाळू अन्नदात्याचे शत्रू देखील मित्र होतात ! अर्थात् जगांत त्याचे सर्वच मित्र असतात. शत्रू कोणीच नसतो ! ('उतापरीषु कृणुते सखायम्' १०-११७-३ )

पण कृपणाची गोष्ट याहून निराळी आहे. जो अन्नसंपन्न असूनहि आपल्या अडल्या-नडलेल्या इष्टमित्रांस, आत्मबांधवांस, मदत करीत नाहीं, तो मग मित्र तरी कसला ! त्याची श्रीमंती—त्यांची संपत्ति—त्याचें वैभव—

काय कामाचें ! तसें सांगावयाचें म्हटलें तर तिजोरी व खजिन्यांत भरगच्च भरून ठेविलेली संपत्ति ही खरोखर संपत्तिच नव्हे ! तर स्वतःसाठीं उपभोग, देवांप्रीत्यर्थ होमहवन, ब्राह्मणाप्रीत्यर्थ दानदक्षिणा, अतिथि-अभ्यागताप्रीत्यर्थ आदरसत्कार, इष्टमित्राप्रीत्यर्थ योग्य मदत, गोरगरीबांचा परामर्श, लोकहितार्थ सार्वजनिक धर्मकृत्यें यांसाठीं जो पैसा खर्च होईल, तेंच त्याचें खरें धन ! तीच त्याची खरी संपत्ति ! तोच त्याचा खरा धर्म ! याशिवाय त्याची जी श्रीमंती, ती श्रीमंतीच नव्हे ! वैभवकाळीं—म्हणजे आपला चालता काळ असतांना—जो त्याचा उदार हस्तानें स्वतःसाठीं व इतरांसाठीं उपभोग व उपयोग करीत नाहीं, अशा कृपणाला—कवडीचुंबकाला—कोण जवळ करील ? त्याचें हितचिंतन कोण करील ! त्याचे इष्टमित्र व आप्तबांधव त्यास मग सोडून गेले तर त्यांत आश्चर्य काय ? त्यांना काय दोष ?

ऋग्वेदांत स्वच्छच बोलून दाखविलें आहे कीं—' न स सखा यो न ददाति सख्ये सचाभुवे सचमानाय पित्वः । अपास्मात्प्रेयान्न तदोको अस्ति पृणन्तमन्यमरणं चिदिच्छेत् ।। १०-११७-४ ) अतएव जो धनवान—अन्नवान—संपत्तिमान—आहे, त्यानें घरीं आलेल्या धनार्थी व अन्नार्थीला यथाशक्ति हात उचलून द्यावें. नाहीं म्हणूं नये. आणि असें केलें तरच तो पुण्यमार्ग पाहील ! ( ' पृणीयादिन्नाधमानाय तव्यान् द्राघीयांसमनु पश्येत पन्थाम् ' १०-११७-५ ). कारण रथाचीं चाकें जशीं वरखालीं फिरत असतात, तद्वत् ही लक्ष्मी झाली तरी मोठी चंचल असून, आज एकाजवळ तर तीच उद्यां दुसऱ्याजवळ अशी सारखी भटकत असते ! ! ( ' ओ हि वर्तन्ते रथ्येव चक्रान्यमन्यमुप तिष्ठन्ति रायः ' १०-११७-५) ही गोष्ट मनुष्यानें लक्षांत ठेवावी.

आंगिरस ऋषि स्पष्टच सांगतात कीं, जो देवादिकांना हविष्प्रदान करीत नाहीं, अतिथि-अभ्यागताचा सत्कार करीत नाहीं, इष्ट मित्रदिकांचें पोषण करीत नाहीं, गोरगरीबांचा परामर्श घेत नाहीं, तर स्वतः एकटाच चैन मारण्यांत रंगून जातो अशा कृपणाचें अन्न हें अन्न नव्हें ! आणि धन हें धन नव्हें ! तर साक्षात् त्याचा मृत्युच होय! ('मोघमन्नं विंदते अप्रचेताः

सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य । नार्यमणं पुष्यति नो सखायम्' १०-११७-६) असा एकटाच कावळ्याप्रमाणें संपत्तीचा उपयोग घेणारा तो केवळ पापीच होये ! (' केवलाघो भवति केवलादी ' १०-११७-६ ) हाच भावार्थ भगवान् श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत 'भुंजते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्' या वचनांत उध्दृत केला आहे. याविषयीं अन्नदेवता प्रत्यक्ष खडसूनच सांगते कीं—'यो मामदत्वा पितृदेवताभ्यो भृत्यातिथीनां च सुहृज्जनस्य । सम्पन्नमश्नन्विषमत्ति मोहात्तमद्म्यहं तस्य च मृत्युरस्मि' बो. ध. सू. २-३ ६८;२१-२२ ) भावार्थ—पितृदेवताप्रीत्यर्थ, अतिथि—अभ्यागता—प्रीत्यर्थ, इष्टमित्राप्रीत्यर्थ, आप्तबांधवाप्रीत्यर्थ, चाकर—नोकरांप्रीत्यर्थ, गोरगरीबाप्रीत्यर्थ दान न करतां जो एकटाच माझें सेवन करतो, त्याला मी खाऊन टाकतें ! अशा कृपणाचा मी जणु कांहीं मृत्युच आहें ! हा अन्नदेवतेचा गंभीर इशारा स्वार्थलंपटांना मननीय नाहीं, असें कोण म्हणेल ?

जातां जातां अन्नदानाचें श्रेष्ठत्व दाखविणारें हें पुढील वचन देऊन हें प्रकरण आटपतें घेतों. ' नान्नदानात्परं दानं किंचिदस्ति नरेश्वर । अन्नेन धार्यते कृत्स्नं चराचरमिदं जगत् ।। अन्नं वै प्राणिनः प्राणा इत्युवाच प्रजापतिः । तस्मादन्नप्रदो राजन् प्राणप्रदः प्रोच्यते बुधैः ।। (महाभारत) अर्थ सरळ व सुबोध असल्यामुळें मराठी अनुवाद देण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

येथपर्यंतच्या विवेचनावरून ही गोष्ट निर्विवाद ठरते कीं वैदिक आर्य हा कट्टर स्वार्थपरायण नसून, तो उदार व त्यागप्रवण होता आणि म्हणून ती त्याची मायभूमि ' सुजलां, सुफलां, सस्यश्यामलां' होती. तो विज्ञानशास्त्रांत म्हणण्यासारखा प्रगति पावलेला नसला तरी मानव्यांत व अध्यात्मविद्येंत त्याचा हात धरणारा अद्यापपर्यंत कोणीच पुढें आलेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असो.

---



## प्रकरण १० वें

# वैदिक आर्यांची नीतिमत्ता

वैदिक आर्य हे केवळ देहतर्पणरत विषयमूढ नसून यज्ञप्रकृति होते, याविषयीं दोन शब्द मागच्या प्रकरणांत सांगितल्यावर त्यांचे इतर आचार-विचार कसे होते याविषयीं दोन शब्द सांगणें हें क्रमप्राप्तच आहे. अतएव त्याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. मनुष्य हा प्राथमिक अवस्थेंत असतांना जवळजवळ त्याची स्थिति पशुसारखीच स्वैर व स्वच्छंदी होती, असें म्हणतात. मग तो पशूचा सुबुद्ध मनुष्य बनला, मानव्यांत आला, तें कशाच्या जोरावर ? वरून आकाशांतून तशी कांहीं दिव्य किमया आयती त्याच्या पदरांत पडली का स्वतः तसें दिव्य करून त्यानें तें दिव्यपद प्राप्त करून घेतलें ? याचें सरळ उत्तर आम्हां भारतीयांच्या दृष्टीनें द्यावयाचें झालें तर मनुष्याला ती किमया तशी कांहीं आयती लाभली नसून, ती त्यानें स्वपराक्रमाच्या जोरावर, दीर्घ तपश्चर्येच्या आधारावर, स्वतःच्या हिंमतीवर, मिळविलेली आहे ! ती त्याची स्वसंपादित दिव्य दौलत आहे ! ती त्याला कोणीतरी आयती पदरांत टांकलेली भिक्षा नव्हे ! मग ती अशी त्याची बहादुरी कोणती ? अशी ती यक्षिणीची कांडी त्याला कशी व कोठून लाभली ?

त्याला उत्तर म्हणजे हें कीं ती यक्षिणीची कांडी म्हणजे तपश्चर्या ! ती दीर्घ व कडकडीत तपश्चर्या ! ती अनन्य ज्ञानोपासना ! अर्थात् तें सूक्ष्म सृष्टिनिरीक्षण ! तो अविरत कर्मयोग ! आणि तें दिव्य योगानुष्ठान ! या त्रिवेणी संगमांत खोल बुडी मारून तो ज्ञानप्रदीप-तो चिंतामणि-त्यांनीं हस्तगत करून घेतला ! ‘असतो मा सद्गमय, तमसो मा ज्योतिर्गमय, मृत्योर्मा अमृतं गमय’ याचें सतत ध्यान करून आणि ज्ञानदेवाची-सूर्यनारायणाची-उदंड उपासना करून—त्यांनीं तो अलौकिक ज्ञानपरीस पदरांत पाडून

घेतला ! आणि त्या दिव्यशक्तीच्या जोरावर आस्ते आस्ते आणि एकेक पाऊल पुढें टांकीत टांकीत अखेर 'खल्विदं ब्रह्म' हें ज्ञानगिरीचें अत्युच्च शिखरहि गांठलें !! एवंच तात्पर्य काय, तर मनुष्य हा पशुवृत्तींतून-रानटी अवस्थेंतून-अज्ञान गर्तेतून-उत्क्रांत व विकास पावत पावत अखेर त्यानें 'अहं ब्रह्मास्मि' चें शिखरश्रेष्ठ गौरीशंकर गांठलें ! हा अलौकिक मान –हा लोकोत्तर विजय-मानवकोटीतील फक्त वैदिक आर्यांच्याच वांटणीस आला आहे, हें नाकारणें खास न्यायास धरून होणार नाहीं.

कर्मयोगानें स्थूल जगाची व ज्ञानयोगानें सूक्ष्म सृष्टीची उदंड आराधना करून, तद्वारां त्यांनीं आपला जागतिक उत्कर्ष व आध्यात्मिक विकास पूर्णत्वानें साधून, अखेर अमरत्वहि मिळविलें ! हा त्यांचा पराक्रम कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ? त्यांचा कर्मयोग म्हणजेच यज्ञोपासना ! सृष्टींतील गूढ व सूक्ष्म शक्तीचे प्रतिनिधीभूत अशा दिव्य देवतांची यज्ञद्वारां श्रद्धापूर्वक एकनिष्ठ उपासना करूनच त्यांनीं प्रापंचिक–जागतिक–अभ्युदय व पारलौकिक–आध्यात्मिक–निश्रेयस यांची जोड मिळविली, ही गोष्ट वैदिक वाङ्मय परिशीलनावरून स्पष्ट प्रतीत होते. शरीर झिजवून, मन निग्रहून व रात्रंदिवस खपून, मानवाचे सर्व पुरुषार्थ त्यांनीं हस्तगत करून घेतले. अर्थात् 'तपसा वै लोकं जयति' हें दिव्य तत्त्व त्यांनीं सतत डोळ्यांपुढें ठेवून मानवजन्माचें परम ध्येय गांठलें, हें विसरणारे, त्यांच्यासारखे दुर्दैवी मग त्यांचे तेच ! !

वेदांतील देव हे आमच्या प्राचीन पूर्वजांना–भारतीय आर्यांना–वैदिक देवोपासकांना–केव्हां प्रत्यक्ष प्रकट होऊन तर केव्हां दृष्टान्त देऊन, त्यांना अडीअडचणींतून त्यांनीं मार्ग दाखवून दिला. त्या दिव्यविबुधांनीं प्रसंगपरत्वें आपल्या चरित्रांतून, आचरणांतून व उपदेशांतून जो धडा घालून दिला, त्याप्रमाणें वागून कित्येक श्रद्धावान् कर्मयोगी त्रिकालज्ञ ऋषि झाले ! आणि अखेर देवत्वहि पावले ! तोच धडा–तोच आचार-धर्म–'देवानां पंथामनुचरेम'–देवांच्या मार्गानें आम्हीहि वाटचाल करावी–या वेदवचनाला धरून, त्या ऋषिवर्यांनीं स्वतः आचरण करून, आम्हां भारतीयांसहि घालून दिला. आणि हाच पाठ याज्ञवल्क्यांनीं 'यथा वै देवानां

चरणं तद्वाऽनु मनुष्याणाम्' या शतपथवचनांत भारतीयांस मार्गदर्शक म्हणून उद्धृत करून ठेविला आहे ( श. प. ३-३-४-५ ).

अर्थात् याज्ञवल्क्य वसिष्ठासारख्या महाविभूतींनीं वेदांतील देवांच्या चरित्रांतील मर्म ओळखून, त्यांतील हितकर व पथ्यकर भाग उचलून, त्याप्रमाणें स्वतः आचरण करून, मग जगास उपदेशिला आहे. असे जे सत्यव्रत व सत्यप्रेमी ज्ञानमूर्ति गुरुदेव तेच आम्हासारख्या सामान्य जनतेचे सन्मार्गदर्शक पुरोहित व स्फूर्तिदाते देव होत ! 'विद्वान् सो हि देवः'– विद्वान हे देवच होत!–हें शतपथ वचन आत्मकल्याणेच्छु सज्जनांस अवश्य मननीय आहे.

यावरून देवांचे दोन प्रकार ठरतात. एक स्वर्देव व दुसरें भूदेव. स्वर्देव हे स्वर्गांत राहणारे देव व भूदेव हे येथें पृथ्वीवर राहणारे देव होत. स्वर्गांतील देव हे आजान म्हणजे जन्मजात देव असून भूदेव हे कर्मजात म्हणजे कर्म करून,तपश्चर्या करून,देवत्व पावलेले देव होत,असें वेदनारायणाचें सांगणें आहे. म्हणून ऋग्वेदांत स्वर्देव व भूदेव–दिव्य विबुध व पार्थिव ऋषि–या दोहोंच्या आचारविचारांचा मधुर व मंगल संगम होऊन, त्यांतून जो कल्याणधर्म निघाला, तो मानवमात्रांना खरोखर आदर्श होऊन आदरणीय व आचरणीय ठरला व ठरावा, यांत कांहीं नवल नाहीं. त्यांतील आचारात्मक बोधाला आधुनिक भाषेंत धर्म ऊर्फ नीति असें म्हणतात. म्हणजे वैय्याक्तिक, कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय यमनियमात्मक जो आचार त्यालाच ऋत ऊर्फ नीति असें नांव आहे. अर्थात् त्यांतीलच कांहीं भागाचें निरूपण ऋग्वेदाला धरून या प्रकरणांत करण्याचें आम्हीं योजिलें आहे. त्याप्रमाणें कांहीं नीतिकल्पनांची–सुष्टदुष्ट आचारविचारांची–या प्रकरणांत थोडक्यांत मांडणी करून दाखवितों.

तत्पूर्वी एका गोष्टीचा उलगडा करणें आम्हांस अगत्याचें दिसतें. ती गोष्ट म्हणजे ही. वर 'देवानां पन्थामनुचरेम' असें जें म्हटलें आहे, त्याचा कित्ता पुढें ठेवतांना फार सावधगिरी बाळगिली पाहिजे. नाहीं तर मोठा अनर्थ माजण्याचा संभव आहे. 'यथा देवानां चरणं तद्वाऽनु मनुष्याणाम्' याचा आधार घेऊन कांहीं जडमूढ देहोपासक लोक असा युक्तिवाद करतील

कीं, आम्ही देखील तुमच्या वैदिक देवांचेंच अनुकरण करून त्याप्रमाणें वागूं लागलों व वागण्याचा उपदेश करूं लागलों तर तुम्ही आम्हांस नांवें काय म्हणून ठेवतां? पाहा, तुमच्या प्रजापति देवानें खुद्द आपल्या कन्येशींच प्रेम-प्रसंग केला! इंद्र तर स्वतः बोलून चालून सोमरसाचे हंड्याचे हंडे उडवीत असे! चंद्रानें ऋषीची बायको जी तारा, तिलाच पळवून नेली! कृष्ण तर बोलून चालून चोरांचा म्होरक्या! या सर्व कृति तुमच्या पूज्य व आदर्शभूत देवांच्याच ना? पांडवांचा इतिहास तर जगप्रसिद्धच आहे. स्त्री एक आणि तिला पांच नवरे!! मग आतां आम्हीहि तुमच्या देवांचा व मान्यजनांचा कित्ता गिरवूं लागलों, तर आम्हांस दोष कां देता व नाक कां मुरडता? आमचे वर्तनहि तुमच्या देवांप्रमाणेंच—मान्य जनाप्रमाणेंच-आहे, नाहीं का? असा युक्तिवाद करणारे इंद्रियोपासक मागें होऊन गेले व आज तर त्यांचा सुकाळच माजला आहे!'खा पी, चैन कर! कुठली नीति नि कुठला धर्म! सगळें थोतांड!' असे बरळत फिरणारे देहतर्पणरत विषयमुग्ध सज्जन—सर्व बंधनांतून मुक्त झालेले—' मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति'च्या कोटींतले आहेत, असें म्हणावयाला मग कसली हरकत आहे? या लोकांच्या वेदान्ताला सैतानी वेदान्त म्हणतात, हें ठीकच आहे.

अशा प्रकारचा कोटिक्रम-विषारी विचारसरणी—कांहीं धूर्त, स्वार्थी, इंद्रियनिष्ठ व उदरोपासक कुटिलमार्गी दुर्जन अज्ञ लोकांपुढें मांडून त्यांची दिशाभूल करतील हें जाणूनच मानवकुलहितचिंतक, त्रिकालाज्ञ व दूर-दर्शी अशा ऋषिवर्यांनीं आपल्या कृतविद्य शिष्यवृंदांना-उदयोन्मुख भारती-यांना—चांगला स्पष्ट इशारा देऊन ठेवला आहे. तो वरील वेदवचनाला पुरवणीवजा असून दोन्हींचा मिळूनच एकत्र विचार करावयास हवा. तो इषारा—तो उपदेश—पुढीलप्रमाणें आहे.

विद्याध्ययन संपल्यावर आश्रमांतून परत घरीं जावयास शिष्यवर्गाला निरोप देतांना गुरुदेव त्यास भावी जीवनक्रमांत त्यांचें आचरण कसें असावें, याबद्दल बोध करतात तो असाः—'सत्यं वद । धर्मं चर । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । यानि अनव-द्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यानि अस्माकं सुचरि-

तानि तानि त्वया उपास्यानि। नो इतराणि। ( तै. उ. ११–१ व २ )
या शिष्या ! आतां तूं या विद्यापीठांतून बाहेर पडल्यावर ब्रह्मचर्यव्रत समाप्त करून गृहस्थाश्रमी होणार आणि तसें तुला झालें पाहिजे. तेव्हां प्रपंचांत–भावी जीवनक्रमांत–तुझें पुढीलप्रमाणें आचरण असावें. केव्हांहि तूं सत्यच बोलत जावेंस ! आणि नीतीनेंच वागावेंस ! केव्हांहि सत्यापासून ढळूं नयेस ! धर्मापासून चळूं नयेस ! कुशलापासून–हितकर व पथ्यकर आचरणापासून–परावृत्त होऊं नयेस ! जें कर्म निष्कलंक व अनिंद्य आहे, तें तेवढेंच आचरणांत आणावेंस ! निंद्य व दोषास्पद असेल तें टाकून द्यावेंस ! आतां आमच्या आचरणाविषयीं तुला सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं, आमचीं जीं चांगलीं, हितकर व पथ्यकर अशीं प्रशस्त कृत्यें असतील, तीं तेवढींच तूं उचलावींस ! इतर कृत्यें विचारांत घेऊं नयेस !

केवढा सुंदर उपदेश ! यांत गुरुदेवांनीं शिष्याला विचारस्वातंत्र्य देऊन, तें कसें उपयोगांत आणावें याबद्दल स्पष्ट व खणखणीत मार्गदर्शनहि केलें आहे. त्यांनीं चक्क सांगितलें आहे कीं, थोरामोठ्यांचें व वडीलधाऱ्यांचें फक्त सद्वर्तन तेवढेंच आदर्श म्हणून घ्यावें आणि इतर आडवर्तनाकडे काणाडोळा करावा. कारण ते जाणून होते कीं प्रसंगोपात्त थोरामोठ्यांकडून देखील केव्हां केव्हां वेडेवाकडें वर्तन घडत असतें. नाहीं असें नाहीं. पण तें थोरांचें म्हणून आदर्श होऊं शकत नाहीं. थोरांचें असलें तरी तें त्याज्यच आहे. म्हणून म्हटलें आहे कीं 'न देवचरितं चरेत्.' वर 'देवानां पन्थामनुचरेम' हें वचन देवादिकांच्या सद्वर्तनास अनुलक्षून असून, 'न देवचरितं चरेत्' हें वचन त्यांच्या आदर्शभूत अशा थोर विभूतींच्या आडवर्तनास उद्देशून म्हटलें आहे. यावरून देवांचें झालें काय अगर ऋषींचें झालें काय, कोणतें आचरण ग्राह्य व कोणतें त्याज्य याचा विवेक करून त्याप्रमाणें आचरण करावें, हा सांगण्याचा मुख्य उद्देश असून, तो आधुनिक उदयोन्मुख भारताला आदर्श नाहीं असें कोण म्हणेल ? असो. आतां प्रस्तुत विषयाकडे वळतों.

## सत्यमेव परोधर्मः

हें जें जग–ही जी मर्त्यभूमि–त्या पार्थिव जगांत सत्य–निर्भेळ सत्य–असें क्वचितच आढळतें. तेथें सत्य व असत्य या दोहोंची सरमिसळ झालेलीच सर्वत्र दिसून येते. स्वर्गांत मात्र असत्य नाहीं. तेथें शुद्ध व निर्भेळ सत्याचेंच साम्राज्य आहे ! आणि या मर्त्य लोकांत निर्भेळ सत्य नाहीं, असत्याचेंच जिकडे तिकडे रान माजलें आहे ! हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे देव हे सत्य आहेत व मनुष्य हे लबाड आहेत. 'सत्यं देवा, अनृतं मनुष्याः' असें शतपथांत स्पष्ट बोलून दाखविलें आहे ! याचा अर्थ येथें सत्य मुळींच नाहीं असा नव्हे,तर त्यांत असत्याची नेहमीं भेसळ झालेली असते व तशी आढळते. या स्वार्थी व लोभी मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति ही सत्यापेक्षां असत्यालाच कवटाळून राहण्यास सवकली आहे. अर्थात् अज्ञान हें तिच्या मुळाशीं आहे. या अज्ञानामुळेंच मनुष्य हा असत्याची बाजू घेतो आणि तें जाईपर्यंत तो त्यास चिकटून राहतो. स्वार्थ व लोभ हे अज्ञानाचे साथीदार असून, जोपर्यंत हे दुष्ट राक्षस मनुष्याच्या अंतःकरणांत दबा धरून बसले आहेत तोपर्यंत मनुष्याला सत्य–निर्भेळ सत्य–सुचणार नाहीं व तें रुचणारहि नाहीं. हें अज्ञान जेव्हां नष्ट होईल, तेव्हांच आणि तरच मनुष्याचें मन निवळून, त्याला असत्याची शिसारी येऊन सत्याकडे ओढ लागेल. तोपर्यंत मनुष्य हा मनुष्यच राहील आणि तोपर्यंत सत्यासत्य यांच्यांत सदैव स्पर्धा व चुरस लागून, सर्वत्र गोंधळ माजून राहील, यांत तिळमात्र संदेह नाहीं.

हा मनुष्यस्वभाव ओळखूनच ऋग्वेदांत म्हटलें आहे कीं 'सच्चासच्च वचसी पस्पृधाते' (७-१०४-१२) सत्य व असत्य यांचें सारखें वाग्युद्ध जुंपलेलें असतें. त्या दोहोंत नेहमीं चुरस लागलेली आम्हांस दिसून येते. अर्थात् ही चुरस व स्पर्धा कांहीं आजकालची नाहीं. ती जगाच्या प्रारंभापासून सारखी चालत आलेली आहे. देव व असुर यांच्यांत होती व आजहि ती मनुष्यांत आहे. त्या दोहोंच्या चकमकींत केव्हां केव्हां कांहीं काल असत्याची सत्यावर मात झाल्यासारखी दिसून येते; हें खरें असलें, तरी तो लढा कांहीं तेथेंच थांबला असें मात्र झालें नाहीं व होणार नाहीं.

कांहीं काल तो लढा दबून राहतो व राहील, इतकेंच. पण पुढें केव्हां तरी पुनः तो प्रसंग साधून, उचल खाऊन, पुनः दोहोंत रण माजतें. त्या दोहों-पैकीं कोणाचा तरी एकाचा सर्वस्वी निःपात झाल्याशिवाय—नाश झाल्या-शिवाय—त्या स्पर्धेला कायमची मूठमाती मिळाली असें होत नाहीं.

जेव्हां अगदीं निकराची वेळ येऊन ठेपते—निर्वाणीचा प्रसंग येऊन ठेपतो—तेव्हां मात्र सत्यप्रेमी व सत्याभिमानी देव हे योग्य प्रसंग साधून, सत्याची बाजू घेऊन त्याचें रक्षण करतात. 'तयोर्यत् सत्यं यतरदृजीयस्त-दित्सोमो अवति' (७-१०४-१२)—त्या दोहोंत जें सत्य असतें—जें सरळ असतें—त्याचें सोमदेव रक्षण करतो. अर्थात् असत्याचा नाश करतो ('हन्त्यासत्'७-१०४-२). त्याचप्रमाणें जो असत्याची बाजू घेऊन भांडत असतो, त्याचेंहि तो देव कमरडें मोडून टाकतो ('हन्त्यासद्वदन्तम्' ७-१०४-१३) आणि याप्रमाणें अखेर सत्याचाच विजय होतो! म्हणून मनुष्यानें केव्हांहि सत्याचीच बाजू घ्यावी आणि नेहमीं सत्यच बोलत राहावें. देव हे सत्यप्रिय व सत्पक्षपाती आहेत हें नेहमीं ध्यानांत ठेवून, जो त्याप्रमाणें वागेल तो खात्रीनें या प्रपंचांत विजयी होऊन मागेंपुढें 'नरा'चा 'नारायण' होईल, यांत बिलकूल संदेह नाहीं. एवंच, तात्पर्य काय तर वेदमाउलीनें मनुष्याला हिताचा धडा घालून दिला कीं 'सत्यं वद! धर्मं चर!'—बाबारे! सत्य बोल आणि नीतीनें वाग! यांतच मनुष्याचें खरें हित व उदंड कल्याण आहे. हा नीतीचा पथ्यकर पाठ मानव जातीला सुखकर व हितकर नाहीं असें कोण म्हणेल? अर्थात् वैदिक ऋषि हे सत्यप्रिय लोक होते, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. 'सत्यान्नास्ति परो धर्मः' हें त्यांचें ब्रीदवाक्य स्वार्थपरायण मूढ-जगाला सदैव नजरे-समोर ठेवण्यासारखें नाहीं, असें कोण म्हणेल?

## वैदिक आर्यांचें दाम्पत्यजीवन

पशूला विवेकबुद्धि नसल्यामुळें-चांगलें वाईट यांतील तारतम्य ओळ-खण्याची त्याच्यांत अक्कल नसल्यामुळें-तो जगाच्या प्रारंभापासून आतां-पर्यंत जशाचा तसाच राहिला व पुढेंहि राहणार, हें ठीकच आहे. पण मनुष्याची गोष्ट मात्र कांहीं अशांतली नाहीं. त्याला विवेक आहे. चांगलें-

बाईट ओळखण्याची त्याच्याजवळ साधनसंपत्ति आहे. आणि म्हणून तो पशु कोटींतून उत्क्रांत पावून मनुष्यांत येऊन, तेथून त्यानें पुढें देवत्वाप्रत मजल मारली आहे ! हें त्यानें आपल्या बुद्धीचा उपयोग करून यमनियमाच्या द्वारें साध्य करून घेतलें आहे, हें उघड सांगावयास नकोच. त्यांतच हा स्त्रीपुरुषांचा संबंधविषयक प्रश्नहि मोडतो. मनुष्याच्या विकासाचें–त्याच्या उत्कर्षाचें–खरें व मुख्य बीज म्हटलें म्हणजे हा इन्द्रिय-निग्रहच होय ! सर्व सुखाचें–सर्व ज्ञानाचें–सर्व उत्कर्षाचें–मूळरहस्य या इन्द्रिय–निग्रहांत आहे, ही गोष्ट अखिल मानवजातींत प्रथम वैदिक आर्यांनींच नीट हेरून धरली हें इतिहास उघडून पाहिल्यास कोणालाहि सहज दिसून येणार आहे. ही आत्मस्तुति नव्हे, तर सत्यकथा आहे !

आतां मनुष्य हा रानटी स्थितींतून-पशुवृत्तींतून-निवळून, वर कसा व केव्हां आला याचें मूळ शोधूं गेल्यास तें वैवाहिक बंधनांत-दाम्पत्यजीवनांत–आपणांस आढळून येईल.मनुष्याच्या–म्हणजे स्त्रीपुरुषांच्या–स्वैराचाराला व स्वच्छंदवृत्तीला आळा पडून त्याला जेव्हां यमनियमांचें व व्यवस्थितपणाचें बंधनात्मक रूप प्राप्त झालें, तेव्हांच त्याला सुस्थिरता लाभून तेथून त्याच्या सुधारणेस, संवर्धनास, व उत्कर्षास प्रारंभ झाला. तत्पूर्वी त्याची स्थिति पशूपेक्षां फारशी उच्च व स्पृहणीय होती, असें म्हणतां येत नाहीं. कोठें तरी फीर, कांहीं तरी खा, केव्हां तरी झोंप आणि कसें तरी राहा, अशा प्रकारचें त्याचें जीवन अनिश्चित व अनियमित होतें. पण पुढें जेव्हां त्या स्त्रीपुरुषांच्या विकारप्रेरित प्रासंगिक साहचर्याला सुस्थिर व सुव्यस्थित स्वरूप प्राप्त झालें, तेव्हां त्या दोघांना मिळून एकत्र राहण्याची आवश्यकता भासून–सुरक्षित अशा आश्रयस्थानाची जरूरी लागून–त्यांतून घराची कल्पना जन्म पावली. अर्थात् स्त्रीचें साहचर्य व सहकार्य जेव्हां लाभलें, तेव्हां पुरुषाला घराची–म्हणजे सुराक्षित आश्रयस्थानाची–कल्पना सुचली. याचा अर्थ असा कीं स्त्रीमुळेंच गृहसंस्था उदयास आली. आणि म्हणून लक्षणेनें स्त्रीलाच घर हें नांव प्राप्त झालें. स्त्री म्हणजेच घर (‘जायेदस्तं’ ३-५३-४) असें ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें असून, याचाच अनुवाद मनूजींनीं ‘न गृहं

गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ' या वचनांत केला आहे, तो तुमच्या आमच्या सर्वांच्या परिचयाचा आहे.

आतां या स्त्रीला पुरुषांचें गृहिणीपद लाभावयाचें झालें, तर तें नुसत्या साहचर्यानें लाभणार नाहीं. त्या साहचर्याला बंधनाची आवश्यकता आहे. वर वेदमाउलीनें स्त्री म्हणजे घर असें म्हणतांना जाया शब्द वापरलेला आहे, तो ध्यानांत घेण्यासारखा आहे. कारण स्त्रीला जायेचें स्वरूप यावयाला पाणिग्रहणाची म्हणजे विवाहाची आवश्यकता आहे. पुरुषानें स्त्रीचें विधियुक्त पाणिग्रहण केल्याशिवाय तिला जायेचा दर्जा प्राप्त होत नाहीं. अर्थात् तिला पत्नीचें स्थान लाभत नाहीं. अर्थात् ती गृहिणी होऊं शकत नाहीं. आणि म्हणून तिला धर्मकार्यांत व प्रापंचिक व्यवहारांत कसलाच मान व अधिकार शास्त्रतः प्राप्त होत नाहीं. हें वैशिष्ट्य फक्त वैदिक विवाहसंस्थेचें असून, भारतीय आर्यांपुरतीच त्याची व्याप्ति आहे. पाणिग्रहणानंतरच स्त्री ही पुरुषाची अर्धांगी होऊन, पुढें त्याच्या सर्व धार्मिक व सांसारिक कृत्यांत ती सहभागी होते. हा अधिकार पाणिग्रहणरहित स्त्रीला प्राप्त होत नाहीं. म्हणून वैदिक धर्मानें चक्क सांगून टाकलें कीं स्त्रीशीं संबंध ठेवावयाच्या पूर्वी पुरुषानें तिचें पाणिग्रहण करावें. ( ' पाणिं गृण्हीयात् ' )

पाणिग्रहण करणें म्हणजे स्त्रीचा नुसता हात धरणें असा त्याचा अर्थ नसून, त्यांत पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो. त्यांत स्त्री-पुरुषांचीं कर्तव्यें व जबाबदाऱ्या गर्भित असतात. त्यांतलें कांहीं येथें उद्धृत करतों. विवाहित स्त्रीचीं कर्तव्यें व जबाबदाऱ्या काय आहेत, याबद्दल ऋग्वेदांत दहाव्या मंडळांत सूर्यासूक्त म्हणून जें सूक्त आहे त्यांत बीजरूपानें उल्लेख करण्यांत आला असून, त्यांतील महत्त्वाचा भाग पुढील वचनांत आढळतो. ' हे वधू! मी तुझा हात आम्हां दोघांच्या भाग्योदयासाठीं–कल्याणासाठीं–ग्रहण करतों. ( 'गृण्हामि ते सौभाग्यत्वाय हस्तं' १०-८५-३६). तर तूं जो मी –तुझा पति (पालनकर्ता)–त्या पतीजवळ राहूनच वृद्ध व्हावीस. ('मया पत्या जरदष्टिर्यथासः ' १०-८५-३६ ) या माझ्या घरांत तूं गृहकृत्यांत सदैव जागरूक राहा. ( ' अस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि' १०-८५-२७ ) आणि तुझा शरीरसंबंध फक्त माझ्याशींच ठेव. ( ' मया पत्या तन्वं सं

सृजस्व ’ १०-८५-२७ ) तो प्रजापति देव आम्हां प्रेमी जोडप्याला संतति देवो. ( ‘ आ नः प्रजां जनयतु प्रजापतिः ’ १०-८५-४३ ) आणि अर्यमादेव आम्हांस म्हातारपण दाखवो ! ( ‘ आजरसाय समनक्त्वर्यमा ’ १०-८५-४३ ), तोंपर्यंत आपण या लोकींच राहूं. ( ‘ इहैव स्तं ’ १०-८५-४२ ). येथें आपला वियोग होऊं नये ( ‘मा वि योष्टं’ १०-८५-४२ ). आपण एकत्र राहून संपूर्ण आयुष्याचा उपभोग घेऊं ! ( ‘ विश्वमायुर्व्यश्नुतम् ’ १०-८५-४२ ) आणि आमच्या मुलाबाळांशीं व नातनातवंडांशीं खेळत-बागडत आनंदानें आमच्या घरांत कालक्रमणा करूं ! ( ‘ क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे’ १०-८५-४२ ) हे वधू ! तूं केव्हांहि प्रसन्न दृष्टीची असावीस ( अघोरचक्षुः’ १०-८५-४४). माझा तूं केव्हांहि द्वेष व तिरस्कार करूं नयेस. ( ‘ अपतिघ्नी ’ १०-८५-४४ ) आमच्या अश्वगवादि पशूंवर प्रेम करणारी असावीस. ( ‘ शिवा पशुभ्यः ’ १०-८५-४४ ) सदैव घरांत प्रसन्न मनानें नांदावीस आणि तेजस्वी वृत्तीनें राहावीस. ( ‘ सुमनाः सुवर्चाः ’ १०-८५-४४ ). तशीच तूं वीर-पुत्र प्रसवणारी हो आणि देवकार्यांत सदैव दक्ष राहा ! ( ‘वीरसूर्देवकामा’ १०-८५-४४). आणि सर्वांना मंगलकारक हो ! (‘स्योना’ १०-८५-४४) हे इन्द्रा ! हे कामकल्पद्रुमा ! तूं हिला उत्तम पुत्रवती कर ! तशीच तिला उदंड सौभाग्यवतीहि कर ! ( ‘इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ’ १०-८५-४५ ) हिला दहा पुत्र होऊं देत ! ( ‘ दशास्यां पुत्रमाधेहि’ १०-८५-४५) हे वधू ! तुला फार काय सांगूं ? तूं आपल्या प्रेमळ वर्तनानें व गोड स्वभावानें सासऱ्याला अंकित कर ! सासूला वश करून घे ! ( ‘ सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव’ ( १०-८५-४६ ) त्याचप्रमाणें नणंदांनाहि नादीं लाव व दीरावर छाप पाड ! ( ‘ ननान्दरि सम्राज्ञी भव, सम्राज्ञी अधि देवृषु ’ १०-८५-४६ ) शेवटीं मागणें हें कीं सर्व देव आम्हांस सद्‌बुद्धि देवोत ! आणि आपोदेवी आमचीं अंतःकरणें एकत्र करोत ! ( ‘समजन्तु विश्वेदेवाः समापो हृदयानि नौ’१०-८५-४७) याप्रमाणें पाणिग्रहणानंतर त्या विवाहित स्त्री-पुरुषांचें—म्हणजे पतिपत्नीचें—भावी दाम्पत्यजीवन ऋग्वेदांत रंगवून व खुलवून दाखविलें आहे. तसा

प्रकार भारतीयांखेरीज इतर कोणत्याहि समाजांत दिसून येत नाहीं हें आम्ही विसरूं नये (या सूक्ताचा अर्थ आमच्या ऋग्रत्न-भांडारांत पाहा).

हा विवाहविधि प्रथम इन्द्रानें पत्नी म्हणून इन्द्राणीचा स्वीकार करतांना केला ( 'वधूरियं पतिमिच्छन् येति यईं वहाते महिषीमिषिराम्' ५-३७-३ ) व तेव्हांपासून तो वैदिक आर्यांत प्ररूढ होऊन आजतागायत चालत आला आहे. अशी ही दिव्य व सनातन परंपरा—स्पृहणीय कौटुंबिक जीवन—फक्त सनातन भारतीय समाजांतच आढळून येते, ही गोष्ट येथें विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. वैदिक विवाहाचा उद्देश धर्म-प्रजा व रति यांच्या साधनार्थ आहे. 'धर्मप्रजारत्यर्थोहि विवाहः' ही वैदिकांची विवाहव्याख्या किती सुंदर, किती मार्मिक, किती समर्पक व उपकारक व हितकारक आहे बरें ! हें स्त्रीपुरुषांचें दाम्पत्यजीवन ऋग्वेदकालींच प्रतिष्ठित झालें होतें याविषयीं आतां वाद माजविण्यांत अर्थ नाहीं. या तेजस्वी दाम्पत्यजीवनामुळेंच वैदिक आर्यांचीं घरें रंगलीं, समाज खुलला, गांवें सजलीं, नीति मोहरली, देवोपासना विकसली, राजकारण बहरलें, कला, कौशल्य, ज्ञान, विद्या, शास्त्र या सर्वांची वाढ व विकास होऊन, ही भरतभूमि तेव्हांपासून इतिहासांत अग्र व पूज्यस्थान पटकावून बसली आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं. असो. सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं वैदिक आर्यांत दाम्पत्यप्रतिष्ठा ऋग्वेदकालींच दृढ होऊन, त्यांचें दाम्पत्यजीवन चांगलें रंगलें व खुललें होतें. त्यांच्यांत लैंगिक स्वैर व स्वच्छंद वृत्तीला पायबंद बसलेला असून तेथें यमनियमाचा हितकर मंगलोदय झाला होता. अर्थात् ते गृहस्थ होऊन प्रापंचिक जीवन खुलविण्याच्या मार्गास लागले होते, हा सांगण्याचा भावार्थ.

## दाम्पत्यजीवनास अपात्र व्यक्ति

वैदिक दाम्पत्यजीवनाचा उद्देश धर्मसाधन, प्रजोत्पत्ति व रतिसुख या त्रयीसाठीं आहे.—'धर्मप्रजारत्यर्थो हि विवाहः'—असें वैदिक धर्मानें घोषित केलें आहे. केवळ रतिसुखार्थच—देहतर्पणार्थच—वैदिक विवाह नाहीं. केवळ प्रजोत्पादनार्थहि त्याची प्रतिष्ठा नाहीं तर धर्मसाधन, प्रजोत्पादन व रतिविलास या तीहींच्या प्राप्त्यर्थ त्याचा अवतार आहे. पण येथें

एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती ही कीं प्रजोत्पादन व रतिसुख यांस सर्वच स्त्री-पुरुष सारखेच प्रशस्त आहेत असा प्रकार नाहीं. तेथेंहि तारतम्य भाव हा आहेच आहे. व कांहीं कांहीं स्त्री-पुरुष तर दाम्पत्य जीवनास अजीबात वर्ज म्हणून सांगितले आहेत. हा दाम्पत्यसंबंध जुळवून आणतांना तेथें नात्यागोत्याचा विचारहि कर्तव्य आहे. सर्वच स्त्री-पुरुष वैदिक दाम्पत्य जीवनास लायक नाहींत. तेथें नात्यागोत्याचा प्रश्न आडवा येतो. हें दाखविण्यासाठीं ऋग्वेदांत एक महत्त्वाचें सूक्त गोवून ठेविलें आहे. तेथें बहीण ही दाम्पत्यजीवनास अनर्ह म्हणून दाखविण्यांत आली आहे. हें तत्त्व दहाव्या मंडळांतील यमयमी संवादांत ग्रथित करून ठेविलें आहे.

तो प्रसंग म्हणजे असाः— यम व यमी ही सख्खीं भावंडें होतीं. तीं आवळीं जावळीं जन्मलीं होतीं. यमी ही मोठी झाल्यावर निसर्ग नियमानुसार विकारवश होऊन आपल्या भावाजवळ येऊन त्याची प्रेमयाचना करूं लागली. अर्थात् ती विकारवश झाली होती. पण यम हा विचारवान असून निग्रही होता. ती त्याला म्हणाली 'यमाजवळ जाऊन एकाच शय्येवर निजण्याची यमीला प्रबल इच्छा झाली आहे. पतीपुढें एकान्तांत पत्नी जशी आपली तनु पुढें करते तद्वत् मी यमी माझी तनु तुज यमापुढें उघडी करीन म्हणतें. तर आतां आपण रथ व चाक याप्रमाणें परस्परांस आलिंगन देऊं!' अर्थात् यमी अगदीं यावेळीं प्रेमवेडी झाली होती. तिला यम म्हणतो—'यमे! हें तूं काय बडबडत आहेस? आपण भाऊ बहीण ना? आपलें नातें भावाबहिणीचें असें समान आहे ना? मग तें आम्ही विषम असें कां व कसें करावें? छे, छे! मी तुझा भाऊ तसें करूं इच्छित नाहीं! देवदूत हे सर्वत्र हिंडत फिरत असतात. तें आपलें हें अधम कृत्य पाहतील कीं! जा! मी नाहीं तुझी इच्छा पूर्ण करणार!' यमी म्हणते—'कृपा कर! यमा! मजवर तूं दया कर! आणि तें तुझें शरीर या माझ्या शरीराशीं आणून भिडीव!' ('तन्वा मे तन्वं सं पिपृग्धि' १०-१०-११) तिला यम उत्तरला—'नाहीं, तसें मी करणार नाहीं! जो बहिणीशीं संलग्न होतो, तो पापी असें सूज्ञ म्हणतात! ('न वा उ ते तन्वा तन्वं सं पपृच्यां

पापमाहुर्यः स्वसारं निगच्छात्’ १०-१०-१२ ) याप्रमाणें बोलून त्यानें यमीचा धिक्कार करून तिला तेथून घालवून दिली. यावरून ऋग्वेदकालीं आर्यांनीं आपल्या नात्यागोत्यांतील कांहीं स्त्रिया दाम्पत्यजीवनास अनर्ह मानल्या होत्या, असें ध्वनित होतें. या सूक्तावरूनच आजतागायत सख्खी बहीण, चुलतबहीण, मामेबहीण, मावसबहीण, आतेबहीण यांना व यासारख्या नात्यांतील इतर स्त्रियांना विवाहबाह्य मानण्यांत येत आहे. असो. सांगण्याचें तात्पर्य हें कीं जवळच्या नात्यागोत्यांतील स्त्रिया दाम्पत्यजीवनास अपात्र म्हणून सांगितल्या आहेत.

## वैदिक आर्यांची दांपत्य-निष्ठा

वरील विवेचनावरून एक गोष्ट निश्चित ठरतें कीं फार प्राचीन काळींच म्हणजे ऋग्वेदकाळींच भारतीय समाजांत दाम्पत्य-प्रतिष्ठा चांगली दृढमूल होऊन राहिली होती. पण तेवढ्यानेंच भागण्यासारखें नसून ती दाम्पत्य-प्रतिष्ठा सर्व बाजूंनीं कार्यक्षम होऊन, प्रभावी ठरावयाची झाली तर त्या दाम्पत्य-प्रतिष्ठेला दाम्पत्य-निष्ठेची सुंदर व प्रवित्र जोड लाभणें हेंहि तितकेंच आवश्यक होतें, हें ते पूर्ण ओळखून होते. दाम्पत्य–निष्ठेशिवाय दाम्पत्य-प्रतिष्ठा चिरायु होणार नाहीं. दाम्पत्य-प्रतिष्ठा चिरायु झाल्याशिवाय कुटुंबसंस्था सुसूत्र व सुव्यवस्थित चालणार नाहीं. कुटुंबसंस्था सुसूत्र व सुव्यवस्थित चालल्याशिवाय समाज सुसंघटित व सुस्थिर बनणार नाहीं आणि समाज सुसंघटित व सुस्थिर बनल्याशिवाय राष्ट्राला स्थैर्य व स्वास्थ्य लाभणार नाहीं ! अर्थात् राष्ट्राला स्थैर्य व दृढता जोपर्यंत लाभली नाहीं, तो पर्यंत मानवजीवन एकंदरींत सुखसमाधानाचें होऊन तद्वारां तें प्रगतिपथास लागेल ही आशा मग कोणीं व कशी करावी? या सर्व गोष्टी वैदिक आर्यांनीं फार प्राचीन काळींच शोधून व ताडून धरल्यामुळें मानवजीवनोत्कर्षाचें आदि-बीज–जी कुटुंबसंस्था–ती सुरक्षित, सुव्यवस्थित व सुयंत्रित करण्याकडे त्यांचें लक्ष लागावें व लागलें, यांत अस्वाभाविक असें काय आहे ?

या कुटुंबसंस्थेचें–विशेषतः भारतीय कुटुंबसंस्थेचें–मुख्य ध्येय म्हणजे जागतिक उत्कर्ष व पारमार्थिक–सिद्धि अर्थात् व्यक्तिविकास व आत्मोन्नति

या ध्येयाला प्रपोषक, प्रोत्साहक व प्रवर्धक अशा प्रकारची जी समाजाची उभारणी, तीच उपकारक व हितकारक ठरून अशा समाजघटणेची धारणा ज्या राज्ययंत्रानें संरक्षिली जाते, तेंच राष्ट्र उत्कर्ष पावून जगांत मान्यतेस व वैभवास चढतें आणि त्याच राष्ट्रांत मानवजीवन सुखसमाधानांत रंगून विद्या-वैभवांत अग्रेसरत्व पावतें, याची जाणीव भारतीय आर्यांना पूर्ण असल्यामुळें, या सर्वांना मूल कारण जी कुटुंबसंस्था तिला दाम्पत्यनिष्ठेची सुदिव्य जोड देऊन, तद्द्वारा मानवतेचा उच्चांक अर्थात् आत्मोत्कर्षाचा गौरीशंकर कसा गांठावा, याविषयीं त्यांनीं आंखलेली रूपरेखा कौशल्यपूर्ण व अनुभवशुद्ध असून धर्मप्रवण विचारी मानवमात्रांना ती खरोखर आदरणीय व अनुकरणीय आहे, असें आमचें प्रांजल मत आहे.

स्त्रीपुरुषांचें साहचर्य व सहकार्य आजन्म टिकून त्यांतून कौटुंबिक जीवन मोहरून, त्या प्रपंचाचा विशाल वृक्ष बनावयाचा तर तेथें पतिपत्नीचें मन, अंतःकरण, बुद्धि व आत्मा यांमधील द्वैत व वैषम्य समूळ झडून व वितळून, त्या दोन स्वतंत्र जीवांचा प्रेमरसायनानें सांधून पूर्ण एकजीव करणें व होणें अत्यंत जरूर आहे. नाहींपक्षीं तो कुटुंबवृक्ष सहसा वाढीस लागणार नाहीं, याची जाणीव वैदिक आर्यांस ठसठशीत झाली असल्यामुळें, प्रेम, इन्द्रियनिग्रह, प्रामाणिकपणा, सहनशीलता, स्वार्थत्याग, कर्तव्यदक्षता इत्यादि संसारोपकारक व कुटुंबहितवर्धक सद्‌गुणांचा दांपत्यनिष्ठेंत समावेश करून, त्यांनीं कौटुंबिक जीवनांत एक प्रकारचें दिव्य चैतन्य स्फुरविलें आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्तीचा आरोप मुळींच टिकणार नाहीं. या सर्व गोष्टी विवाहकालींच वधूवरांना स्पष्ट करून सांगून, त्यांचें भावी दाम्पत्यजीवन कसें असावें याची स्पष्ट कल्पना पुढील उद्‌बोधक वचनांत त्यांनीं स्पष्ट करून दाखविली आहे. त्यांचा येथें थोडक्यांत परामर्श घेतों.

'धर्म-प्रजारत्यर्थो हि विवाहः' हा विवाहाचा सुंदर आदर्श व स्पृहणीय उद्देश सतत डोळ्यांपुढें ठेवून, तो उद्देश तडीस नेण्यासाठीं म्हणून हा पुढील मंत्र या नवदंपतींनीं अहर्निश आपल्या अंतःकरणांत जागृत ठेवावा. 'यदेतद् हृदयं तव तदस्तु हृदयं मम ! यदेतद् हृदयं मम तदस्तु हृदयं

सव ' हें जें तुझें हृदय—म्हणजे मन, भावना व बुद्धि—अर्थात् आशा-आकांक्षा, आवडीनिवडी व विचार-वर्तन—इत्यादि सर्व मनोव्यापार व शारीरिक वर्तन माझ्या मनाशीं अनुरूप व अनुकूल असें असावें. आणि माझें जें मन तें तुझ्या मनाशीं जुळेल असेंच असेल व असावें। हें वचन म्हणजे दाम्पत्यजीवनाचा साक्षात् अंतरात्माच होय ! ही दिव्य भावना ज्या दंपतीच्या अंतःकरणांत सदैव स्फुरत राहील व स्फुरत असते, त्यांचें गृहजीवन खरोखर धन्य होय आणि तें संसारजीवन जगण्यांतच खरी मौज व मानवजन्माची सार्थकता आहे, असें म्हटल्यास त्याला कोण शहाणा नाक मुरडील किंवा नांव ठेवील ?

यावरून हें स्पष्ट आहे कीं वैदिक दाम्पत्यजीवनांत वधूवरांचें वैय्यक्तिक व्यक्तिमत्व अर्थात् मी-तूंपणाची ताठर जाणीव—पतिपत्नीची विसंवादी कठोर अहंकारवृत्ति—सपशेल वितळून जाऊन, तेथें द्वैतांतील अद्वैतसूचक आम्हीपणाचा सुसंवादी वर्तनविचाराचा मंगलोदय व्हावा, व होणें हें दाम्पत्यजीवनास क्षेमकर व हितकर आहे आणि याच उद्देशानें विवाह प्रसंगीं 'समापो हृदयानि नौ' (१०-८५-४७) 'आम्हां वधूवरांची अंतः-करणें द्वैत विसरून एकमेकांत विलीन होवोत ' अशी या मंत्रांत घोषणा करण्यांत आली आहे, अर्थात् वधूवरांची ताठर अहंकार भावना-द्वैतवृत्ति- झडून, तेथें सुमधुर आत्म्यैक्य उजळलें पाहिजे, हें स्पष्ट सांगण्याची जरूरी नाहीं.

या वचनाचें स्पष्टीकरण म्हणून म्हणा अगर दाम्पत्य-निष्ठेची मूलभूत तत्त्वें म्हणून म्हणा, कांहीं म्हटलें तरी हीं पुढील वचनें आत्म-कल्याणेच्छु विवाहित स्त्रीपुरुषांना भावी दाम्पत्यजीवन सुखमय करण्याच्या बाबतींत मार्गदर्शक असल्यामुळें त्यांचें क्रमानें टिप्पण देत जातों. पुरुष स्त्रीचा पाणिग्रहण करून जो तिचा स्वीकार करतो, तो त्या विवाहा-पासून उभयतांचा भाग्योत्कर्ष—म्हणजे ऐहिक अभ्युदय व पारमार्थिक श्रेय-सिद्धि—व्हावी म्हणून. येथें भाग्य या शब्दांत धर्म, अर्थ, काम व मोक्ष या पुरुषार्थचतुष्टयाला उद्देशूनच वेदांत ' सौभाग्य ' ही शब्दयोजना केली आहे. आणि हा उद्देश सिद्धीस जाण्यासाठींच वैदिक विवाहाची

योजना आहे. ( 'गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं' १०-८५-३६). वधूचें विवाहांत पाणिग्रहण करतांनाच वर तिला स्पष्ट वजावून सांगतो कीं म्हातारी होईतोपर्यंत तूं माझा—या पतीचा—आश्रय करून राहावेस ('मया-पत्या जरदष्टिर्यथासः' १०-८५-३६). यावरून वैदिक विवाह हा स्त्री-पुरुषांच्या लहरीवर टिकून राहणारा पाण्यावरचा बुडबुडा नसून, तो अभेद्य—व म्हणून स्थिर व शाश्वत—असा आहे. तेथें काडीमोडीसारखा लहरीपणा व पाचकळपणा नाहीं, हें वरील वचनांवरून स्पष्ट होतें.

हा जो स्त्रीपुरुषांचा दाम्पत्यसंबंध तो कांहीं यदृच्छेनें घडून येणारा नसून, देवसंकल्पांचा तेथें हात असतो ( 'भगो अर्यमा सविता पुरन्धिर्मह्यं त्वादु-र्गार्हपत्याय देवाः'१०-८५-३६). आणि त्यांचा उद्देश म्हणजे नवदंपतीचा गृहस्थाश्रम सफल व सुफल व्हावा म्हणून.तेव्हां वर वधूला म्हणतो— तुला सांगावयाचा इत्यर्थ हा कीं आम्ही आतां नवराबायको होऊन परस्परोपकारक अशा चांगल्या नियमांनीं युक्त होऊन राहावें ( 'सं जास्पत्यं सुयममस्तु ' १०-८५-२३). याप्रमाणें राहून आम्ही संसाराचा रथ हांकीत असतां देवांच्या कृपाप्रसादानें आमचीं अंतःकरणें एकत्र येऊन तीं समरस होऊन जावोत! ('समापो हृदयानि नौ' १०-८५-४७). जोपर्यंत तूं माझ्याजवळ आहेस, तोपर्यंत तुझा प्रेमसंबंध फक्त माझ्याशींच असावा ( 'एना पत्या तन्वं सं सृजस्व' १०-८५-२७ ). तुझें मन माझ्यावरच असूं दे. आम्ही एकमेकांवर अनुरक्त होऊन एकांतांत एकमेकांची रतिसुखेच्छा तृप्त करूं. मी तुझ्याशीं प्रेमविलास करीन. ( 'यस्यामुशन्तः प्रहराम शेपम्' १०-८५-३७ ) अर्थात् तूं परपुरुषाची इच्छा करूं नयेस! ( 'मा च अन्येषु मनः कृथाः' ) याप्रमाणें आपण प्रामाणिकपणें प्रपंच करीत असतां प्रजापति देव प्रसन्न होऊन आम्हांस संतति देणारा होईल. ('आ नः प्रजां जनयतु प्रजापतिः' १०-८५-४३ ) आणि आम्ही यथाकाल पुत्र-पौत्रादिकांनीं सुसंपन्न होऊं! ( 'प्रजां जनवावहै' ) अशा रीतीनें या माझ्या घरांतच तुला माझेपासून मुलेबाळें होऊन तुझे हृदयस्थ प्रिय उद्देश सफल होवोत! ( 'इह प्रियं प्रजया ते समृध्यताम्' १०-८५-२७ ). आपण दोघे मिळून या घरांतच आपला संसार थाटूं या! ( 'इहैव स्तं'

१०-८५-४२ ). मधेंच आपण एकमेकांस अंतरण्याचा प्रसंग आणूं या नको ! ( ' मा वि योष्टं ' १०-८५-४२ ). एकत्र राहूनच आपण समग्र आयुष्याचा सुखानें उपभोग घेत जाऊं !('विश्वमायुर्व्यश्नुतम्'१०-८५-४२) आणि त्या कालांत आम्हांस मुलेंबाळें, व नातनातवंड होऊन त्यांच्याशीं खेळत-बागडत आनंदानें कालक्रमणा करण्याचें भाग्य आम्हांस लाभेल ! ( ' क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे ' १०-८५-४२ ) हे वधू ! तूं केव्हांहि माझ्याकडे न रागावतां शांत व प्रेम दृष्टीनेंच पाहत असावेस ! ( ' अघोरचक्षूः ' १०-८५-४४ ) माझा द्वेष व द्रोह करणारी बुद्धि तुला न व्हावी ! ( 'अपतिघ्नी' ) आमच्या अश्वगवादिक पशूंना तूं सुखविणारी व्हावीस ! ( ' शिवा पशुभ्यः ' १०-८५-४४ ) तूं केव्हांहि प्रसन्न चित्त राहून, सुंदर वस्त्राभरणादिकांनीं भूषित होऊन झगझगीत दिसावीस ! ( ' सुमनाः सुवर्चाः ' १०-८५-४४ ) आणि आमच्या घरांतील चाकर-नोकरांना व गायीगुरादि पशूंना सुखविणारी असावीस ! ( ' शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ' १०-८५-४३ ). एकंदरींत काय, तर या माझ्या घरांत गृहपत्नी होऊन, आमच्या संसारकृत्यांत सदैव दक्ष राहावेस ! ( ' अस्मिन् गृहे गार्हपत्याय जागृहि ' १०-८५-२७ ) ( सबंध सूक्तार्थ ऋग्रत्न-भांडारांत पाहा. )

वैदिक आर्यांची दाम्पत्यनिष्ठा ही अशी आहे. आणि जें दाम्पत्य याप्रमाणें दांपत्यनिष्ठ राहून प्रपंच चालवील, तेथें ' कल्याणं वै ध्रुवम् ' हें सांगण्याला मग जोतिर्षाच कशाला पाहिजे ? अशी दांपत्यनिष्ठा जेथें आहे, तेथें देवांचा स्वर्ग प्रत्यक्ष उतरत असल्यास नवल तें काय ? असो. आतां जातां जातां सांगावयाचें इतकेंच कीं त्या दाम्पत्यनिष्ठ प्रेमी जिवांचा चिमुकला संसार हळुहळु रंगतां-रंगतां त्यांतूनच पुढें यथाकाल वंशविस्तार कसा होत जातो, हें पुढील विवेचनांत स्पष्ट करण्यांत येईल.

## वैदिक आर्यांची वंशप्रियता

परमेश्वरानें या मनुष्य प्राण्याची घटना अशी कांहीं खुबीदार व कौशल्य-पूर्ण केली आहे कीं, तेथें वंशसातत्याची मधुर भावना स्वयंसिद्धच स्फुरत असते. आणि या नैसर्गिक प्रवृत्तीचें पूर्ण आकलन करून घेऊन, जगांत

कोठेंहि आढळत नाहीं इतकी ती आमच्या प्राचीन ऋषींनीं सुव्यवस्थित व सुनियंत्रित करून ठेविली आहे. ही वंशसातत्याची सुखकारक ऊर्मि वयांत आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषामध्यें स्वाभाविकच उफाळत असून, त्याचा शास्त्र-शुद्ध व निसर्गसहज उपयोग करून घेतल्यामुळेंच हा मानव समाज—विशेषत: भारतीय समाज—पशुवृत्तींतून उत्क्रमण पावून, सुंदर कौटुंबिक जीवनांत त्याचें रूपांतर झालें आहे आणि तद्वारां प्रजानिर्मितीचें व प्रजासंगोपनाचें कार्य सुलभ व सुव्यवस्थित होऊन, मानवजीवनाचा विविध प्रकारें उत्कर्ष व विकास साधलेला आहे, याविषयीं दुमत असूं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. स्त्रीपुरुष वयांत आलीं कीं तेथें कामदेवता जागृत होऊन, तिच्या प्रोत्साहनानें त्या दोन भिन्न व स्वतंत्र जिवांत परस्परांत विलीन होण्याची प्रेमभावना जोरजोरानें उफाळूं लागते. ती इतकी कीं त्या उसळणाऱ्या मधुर भावनेस उतार मिळाल्याशिवाय जिवास चैन व मनास स्वास्थ्य मुळींच लाभत नाहीं. आणि हा उतार संगमोत्सुक जिवांना यथाकाल मिळून, त्यांचें भावी जीवन सुखमय व्हावें एतदर्थ विवाह संस्थेचा जन्म झाला आहे, हें आम्ही विसरून चालणार नाहीं.

याविषयीं ऋग्वेदांत उद्‌बोधक असें एक महत्त्वाचें सूक्त असून, तें येथें उद्धृत केल्यास अप्रासंगिक होणार नाहीं, म्हणून वाचकांच्या जिज्ञासातृप्तीसाठीं आम्ही त्याचा येथें भावार्थरूपानें उल्लेख करतों. या विषयाला उद्देशून ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांतील एकशें एकूणऐंशींवें सूक्त मननीय असून, त्या सूक्ताची देवता रति आहे. तेथें अगस्त्य व लोपामुद्रा या दाम्पत्याचा अर्थपूर्ण असा एक लहानसा पण महत्त्वाचा संवाद आहे. त्यावरून असें दिसतें कीं, अगस्त्य ऋषि हा लोपामुद्रेशीं विवाह केल्यावर दांपत्यसुखाकडे पाठ वळवून अत्यंत कडक तपश्चर्येंत काळ घालवीत होता. त्याची पत्नी लोपामुद्रा ही पतिव्रता असल्यामुळें आपल्या स्त्रीहृदयाची नैसर्गिक इच्छा शक्य तितकी आवरून धरून पतिसेवेंत दक्ष राहून दिवस कंठीत असे. याप्रमाणें होतां होतां कैक वर्षें लोटलीं. तारुण्याचा भर ओसरून तेथें वार्धक्याची छटा डोकावूं लागली. इतकें झालें तरी अगस्त्य हा आपल्या तपश्चर्येच्या तन्द्रींतच ! पुढें लोपामुद्रेला राहवेना. पुढें एक

दिवस वेळ प्रसंग साधून या बाबतींत पतीची कान उघाडणी करण्याच्या उद्देशानें ती त्याच्याजवळ आली आणि मोठ्या कळकळीनें व काकुळतेनें म्हणाली, 'पतिदेव ! हें असें काय करतां? मी आपल्याजवळ राहून देवाची व आपली सेवाचाकरी एकनिष्ठपणें सतत करीत आलें आहें. त्यांत माझें सगळें तारुण्य निघून गेलें ! आणि आतां शरीरावर वार्धक्याची छटा पसरूं पाहत आहे ! तरी देखील मजकडे आपण पाहूं इच्छीत नाहीं, हें कसें काय ? आपणांस स्त्रीहृदयाची ओळख पटत नाहीं काय ? वीर्यसंपन्न पुरुष आपल्या प्रेमळ पत्नीशीं रतिसंग करीत असतात, याची आपणांस जाणीव नाहीं काय ? मग आपणच कां एवढे कठोर व्हावें ? खरोखर मी आपणास सांगतें कीं हे सत्यव्रत देव देखील दुर्धर ब्रह्मचर्याची अखेर गांठण्यास मुळींच समर्थ झाले नाहींत! ('ते चिदवासुर्नह्यन्तमापुः' १-१७९-२) त्या त्या देवस्त्रिया आपापल्या पतीशीं खुशाल रतिसंग करीत असतातच कीं नाहीं ? मग तुम्हीच कां मला दूर लोटीत आहां ? माझी तुम्हांला दया येत नाहीं काय ?' हें तिचें प्रेमगर्भ भाषण ऐकून अगस्त्यानें तिचें अंतरंग जाणलें आणि म्हटलें—लोपामुद्रे ! आपण कांहीं व्यर्थ श्रम केले नाहींत बरे ! देवांनीं आमचें रक्षण केलें आहे. त्या देवकृपेनें आपण षड्रिपु जिंकले आहेत! आतां आपण परस्परांत विलीन झालों तर त्या प्रेमप्रसंगांतून आपणांस पुत्रलाभ होऊन अनेक आपत्तिविपत्तींनीं युक्त अशा या संसारसमरांत खास यशस्वी होऊन त्यांतून आपण सुरक्षित पार पडूं. लोपामुद्रे ! तुझा आशय मी ओळखिला. धरण घालून अडवून धरलेलें नदीचें पाणी पुढें धरण फोडून जसें तें जोरानें वाहूं लागतें, तद्वत् माझाहि येथवर कोंडून धरलेला काम या तुझ्या भाषणानें मर्यादा उल्लंघून आतां बाहेर पडला आहे. ( ' नदस्य मा रुधतः काम आगन्नित आजातो अमुतः कुतश्चित् ' १-१७९-४ ). लोपामुद्रेनें मला वीर्यवंताला आतां कामावश करून टाकलें आहे ! ( 'लोपामुद्रा वृषणं नी रिणाति' १-१७९-४ ) प्रेमोत्सुक झालेली तूं देखील आतां खुशाल तुझ्या पतीशीं प्रेमविलास कर ! ' ( ' धीरमधीरा धयति श्वसन्तम् ' १-१७९-४ ). या सूक्तावरून हें स्पष्ट होतें कीं, स्त्रीला काय अगर पुरुषाला काय आजन्म कडकडीत ब्रह्मचर्य पाळणें हें महादुर्घट

असून, त्या दोघांनाहि चिरकाल एकत्र राहून सुखांत नांदतां यावें या उद्देशानेंच नियमयुक्त विवाहाची सुंदर योजना आंखली आहे, यांत गैर तें काय आहे ?

या स्त्रीपुरुषांचें जीवनैक्य जुळवून आणतांना विवाहाचा सुंदर आदर्श वधूवरापुढें ठेवून वैदिक धर्मानें खणखणीत घोषणा केली कीं, ' धर्मप्रजा-रत्यर्थो हि विवाहः ' धर्म प्रजा व रति या तीहोंच्या प्राप्तीसाठीं व पूर्ततेसाठींच हे स्त्रीपुरुषांनो ! या वैदिक विवाहाचा उद्देश आहे ! इतकी सुंदर व स्पष्ट घोषणा जगांतील इतर कोणत्याहि धर्मांत कोठेंहि केलेली आढळत नाहीं. हें फक्त वैदिक धर्माचेंच सुदिव्य वैशिष्ट्य होय ! आणि हा उद्देश सिद्धीस जाऊन उभय पतिपत्नींना प्रापंचिक सुख व पारमार्थिक लाभ यांची जोड मिळून मानव जन्माची सार्थकता व्हावी, या उदार व उदात्त हेतूनें विवाहसमयीं तो त्यांच्याकडून प्रतिज्ञा करावयास लावतो कीं 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि.' हें वचन एकमेकांनीं एकमेकांस दिल्यावरच त्या जोडप्यास नूतन प्रेमसुख अनुभवण्यास परवानगी मिळते.

आतां हें जें दाम्पत्यसुख अनुभवावयाचें तें केवळ इन्द्रियतर्पणार्थच नव्हे. इंद्रियतर्पण हें तेथें आहेच, पण तेवढ्यावरच संतुष्ट होऊन राहतां कामा नये. 'रामा रमणाय' हें एवढेंच वैदिक विवाहाचें ध्येय नव्हे. त्याबरोबरच आणखी इतर जबाबदाऱ्या हिंदु दाम्पत्यावर येऊन पडत असून, प्रजोत्पादन ही त्यांतली एक महत्त्वाची जबाबदारी आहे. पुत्रोत्पत्ति झाल्याशिवाय दाम्पत्यजीवनाला पूर्णता व प्रशस्तता येत नाहीं. शिवाय आणखी, पितृ-ऋणांतून मुक्त होण्याचा त्यास त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. ही वंशरक्षणाची व वंशवर्धनाची जबाबदारी स्त्री व पुरुष या दोघांवरहि सारखीच आहे. आणि म्हणून ' पुत्रान्विन्दावहै बहून् ' अशी विवाहकालींच ती जबाबदारी पार पाडण्याची निश्चितार्थाची घोषणा प्रकट केली जाते.

स्पष्ट सांगावयाचें म्हणजे वैदिक आर्य हा वंशविस्तार-प्रेमी आहे. ' दशास्यां पुत्राना धेहि '—' या वधूला, हे इन्द्रा ! तूं दहा पुत्रांची माता कर ! ' ( १०-८५-४५ )—ही इन्द्रदेवाची प्रार्थना त्याच्या वंशविस्तार-

प्रियतेची निरपवाद साक्ष असून, त्यामुळेंच वैदिक समाज काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत अखंड एकजात पसरून आजपर्यंत टिकून राहिला, ही गोष्ट दृष्टीआड करून भागणार नाहीं. यावरून ही गोष्ट अगदीं निश्चित आहे कीं, त्यास गर्भपात अगर संततिनियमन अशा मूर्खपणाच्या अनैसर्गिक गोष्टी मुळींच मान्य नव्हत्या. त्यांनीं स्पष्टच म्हटलें आहे कीं, 'आमची अपत्य-हीनता नष्ट करा !' ('युयोत नो अनपत्यानि' ३-५४-१८) त्यांची वंशाविस्तार प्रियता किती मोठी व किती प्रबल होती, याचें प्रत्यंतर शुक्ल यजुर्वेदांतील यापुढील मंत्रांत सुस्पष्ट प्रतिबिंबित झालें आहे. तो मंत्र म्हणजे हा असा:—'कांडात्कांडात्प्ररोहन्ति परुषः परुषस्परि। एव नो दुर्वे प्रतनु सहस्रेण शतेन च' (शु. य. १३-२०).—हे दुर्वे ! प्रत्येक कांडापासून व प्रत्येक पेरापासून तूं जशी अंकुरत जातेस, तद्वत् तूं आमचा वंशहि शेंकडो हजारों पटीनें वाढत जाईल असें कर ! ऋग्वेदांत देखील हाच अर्थ ध्वनित आहे. 'प्रजावान्नः पशुमाँ अस्तु गातुः' हे अर्यमादि देव हो ! आमचें घर मुलाबाळांनीं व अश्वगवादि पशूंनीं गजबजून जाईल असें करा ! (३-५४-१८). यावरून वैदिक आर्य हा विशाल कुटुंबाचा गृहपति होता, हें सांगण्यास आतां निराळा पुरावा नको.

आतां हा जो वंशविस्तार सांगितला तो औरस असावा, याचा येथें स्पष्ट उल्लेख करणें जरूर आहे. हा वंशोत्पत्तीचा प्रश्न वैदिक धर्मांत इतका महत्त्वाचा व इतका अगत्याचा आहे कीं, ज्याला पुत्र नाहीं त्याच्या घरचें अन्न स्वीकारण्यास अयोग्य मानण्यापर्यंत धर्माची मजल गेली आहे. निपुत्रकाच्या घरीं राहण्याचा आम्हांवर प्रसंग येऊं नये—'मा शूने अग्ने नि षदाम' (७-१-११)—असें अग्निदेवाजवळ भक्ताचें स्पष्ट मागणें आहे. आणि ही प्रथा अजूनहि कित्येक जुन्या बालबोध घराण्यांत पाळण्यांत येत असलेली दिसून येतें. इतकेंच काय, ज्याला पुत्र नाहीं, त्याला सद्गति लाभत नाहीं—'निपुत्रकस्य गतिर्नास्ति'—असा धर्माचा तीक्ष्ण कटाक्षहि पण दिसून येतो. कारण तो धर्मदृष्ट्या कृतकृत्य झालेला नसतो. जो देव-ऋण, ऋषि-ऋण आणि पितृ-ऋण यांतून मुक्त होईल, तोच कृतकृत्य झाला—अर्थात् तोच स्वर्गाचा अधिकारी झाला—अशी वैदिक धर्माची शिकवण

असून आणि पुत्रोत्पादनाशिवाय पितृ-ऋणांतून मुक्त होण्याचा दुसरा मार्ग नसून, त्याचा परिणाम म्हणजे निपुत्रकाला स्वर्गांत स्थान नाहीं व येथें समाजांत मान नाहीं, असाच होतो. अतएव स्वर्गलोकेच्छु मनुष्याला पुत्रोत्पादन करून वंश पुढें चालू करणें व ठेवणें हें भागच आहे.

त्यांतल्या त्यांत औरस मुलालाच अधिक प्राशस्त्य व प्राधान्य आहे, हें येथें सांगितलें पाहिजे. दत्तक घेतल्यानें पितृ-ऋणांतून मुक्त होतां येतें, नाहीं असें नाहीं. पण औरस मुलाइतकी प्रशस्ति त्याला नाहीं. म्हणून आम्ही औरस मुलाचें मालक व्हावें—'नित्यस्य रायः पतयः स्याम्' (७-४-७)—अशी आर्यांनीं आपली इच्छा स्पष्ट शब्दांत प्रदर्शित केली असून, दत्तकाविषयीं त्यांना वाटावें तितकें प्रेम व आदर वाटत असल्याचें दिसून येत नाहीं. त्यांनीं चक्कच म्हटलें आहे कीं, दुसऱ्याच्या पोटीं जन्मलेला मुलगा तो किती जरी चांगला असला तरी तो पुत्र म्हणून स्वीकारण्यास मन घेत नाहीं ( 'न हि ग्रभायारणः सुशेवोऽन्योदर्यो मनसा मन्तवा उ' ७-४-८). कारण दुसऱ्याचा मुलगा कांहीं झालें तरी मागेंपुढें आपल्या मूळ स्थानाकडेच वळणार ! अर्थात् तो केव्हांहि आपला होत नाहीं ( 'न शेषो अग्ने अन्यजातमस्ति' ७-४-७). म्हणून पराक्रमी व कर्तृत्ववान् असा नव्या जोमाचा औरस पुत्र मिळविण्याविषयीं वैदिकांचा कटाक्ष आहे ( आ नो वाज्यभीषाळेतु नव्यः' ७-४-८). असो. येथपर्यंतच्या विवेचनावरून एवढी गोष्ट स्पष्ट झाली कीं वैदिक आर्य हा वंशविस्तारप्रिय असून, तो औरस संततीचा चाहता व लोभी आहे, असा ऋग्वेदाचा स्पष्ट आशय दिसून येतो.

## स्वस्ति पन्थामनु चरेम

वैदिक आर्यांची मनोवृत्ति कशा प्रकारची होती व असे, याविषयीं दोन शब्द आतां येथें सांगून मग पुढील विषयास हात घालणें हें आम्हांस प्रशस्त दिसतें. कारण त्यांच्याविषयीं आज लोकांत नसता गैरसमज पसरलेला असून त्याचें थोडक्यांत निराकरण करणें हें अवश्य आहे. वैदिक आर्य हे लोक म्हणजे मोठे भांडखोर, अनुदार, अनीतिमान, मत्सरी, चढेल, ताठर व लुबाडखोर, थोडक्यांत म्हणजे ते संकुचित व असंस्कृत

वृत्तीचे होते असा आरोप कांहीं पाश्चात्य पंडित व त्यांच्या पंखाखालीं वाढलेले कांहीं आमचे भारतीय विद्वान अधूनमधून, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, करीत असतात आणि त्यांच्या पांडित्यावर बेहद्द विश्वास ठेवण्यास सवकलेले आमच्यांतील कांहीं आधुनिक अर्धवट सुशिक्षित त्या श्रेष्ठ पूर्वजांविषयीं कडवट भावना करून घेऊन त्यांना नाक मुरडण्यांत मोठा पुरुषार्थ मानीत असतात. तर खरी वस्तुस्थिति काय आहे–वरील आरोपास ते खरोखर पात्र आहेत कीं काय–याविषयीं दोन शब्द लिहून, नवभारताचा भ्रमनिरास करण्याची आतां वेळ आली आहे. तसें पाहूं जातां भारतीयांचा इतिहास भारतीय पंडितांनीं भारतीय दृष्टीनेंच लिहावयास पाहिजे. परकीयांस–मग ते कितीहि विद्वान असोत–तसें करणें हें सहसा शक्य नाहीं. कोणताहि इतिहास लिहितांना त्या इतिहासकाराला त्या त्या लोकांचा धर्म, संस्कृति, भावना, परंपरा व परिस्थिति यांची पूर्ण ओळख असल्याशिवाय व तो त्या सर्वांशीं सहानुभूतिपूर्वक समरस झाल्याशिवाय त्याला समंजस व समर्पक असा वास्तव इतिहास लिहितां येणें हें शक्य नाहीं. आणि जर कोणी तसा प्रयत्न करील तर त्या लेखनास खरा व यथार्थ इतिहास म्हणतां येणार नाहीं. असो. आतां प्रस्तुत मुद्यावर यावयाचें म्हणजे वैदिक आर्यांचें व्यावहारिक धोरण काय होतें हें सांगितलें पाहिजे. आणि तें म्हणजे 'आम्ही कल्याण मार्गाचें–सरळ व शुभ मार्गाचें–अवलंबन करूं.'–('स्वस्ति पन्थामनुचरेम' ५-५१-११)–हें वर मथळयावर निर्दिष्ट केलेलें वचन होय.

तो कल्याणमार्ग म्हणजे काय व त्यास पोषक असे विचार कोणते याचा सारांश रूपानेंच कां होईना पण स्पष्ट रीतीनें येथें मांडून दाखविणें हें अगत्याचें आहे. म्हणून वैदिक आर्यांची जगांत वागण्याची एकंदरीत मनोवृत्ति कशी होती, याची थोडक्यांत कल्पना द्यावयाची तर ती अशी:– त्यांचा कल्याणमार्ग म्हणजे अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति करून देणारा मार्ग आणि त्याला उपकारक व पोषक अशी मनोवृत्ति म्हणजे त्यांची ही अशी–(१) आम्ही दुसऱ्याची चीज घेऊं नये. ('मा ते गृहामहि' ८-२१-१६). (२) जें कर्म आम्हांस बाधक होईल, तें आमच्या

हातून घडूं नये ! ( 'मा तत्कर्म यच्चयध्वे' ६-५१-७). दुसऱ्यांनीं मिळविलेल्या अन्नावर आम्ही चैन मारूं नये ! ( 'माहं राजन्नन्यकृतेन भोजम्' २-२८-९). ज्याची वाणी दुष्ट व कठोर आहे, त्याला धन प्राप्त होत नाहीं ( 'न दुष्टती मर्त्यो विन्दते वसु' ७-३२-२१) आणि दुर्वासना ही अधोगतीस नेणारी असल्यामुळें तिच्यापासून दूर राहण्याबद्दल त्यांचा कटाक्ष दिसतो ( 'अप सेधत दुर्मतिम्' ८-१८-१०). दुसऱ्यांनीं केलेल्या पापाचें फळ भोगण्याचा आम्हांवर प्रसंग येऊं नये ! ( 'मा व एनो अन्यकृतं भुजेम' ६-५१-७). एतदर्थ आम्हांवर दुष्ट व पापी लोकांचा अम्मल न चालावा! ( 'मा नो दुःशंस ईशत' १०-२५-७). याचें कारण असें की या जगांत दुःखाचा खोल खड्डा म्हणजे अगाध नरक या पापी, वाममार्गी व लबाड लोकांनींच निर्माण केला आहे ( 'पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजनता गभीरम्' ४-५-५). देव जे आहेत ते मनुष्याचें अंतःकरण कसें आहे–म्हणजे त्यांत काय चाललें आहे–हें नीट जाणतात. ( 'अग्निर्वेद मर्त्यानामपीच्यम्' ८-३९-६) आणि त्यांचें व्रत म्हणजे सत्याचें पालन व असत्याचा नाश करणें हें आहे ( 'सत्समवति हन्त्यासत्' ७-१०४-१२). म्हणून आम्ही सदैव पापाचा मार्ग टाकून, देवांचा–म्हणजे सत्याचा, न्यायाचा व नीतीचा–मार्ग अनुसरावा ('देवानां पंथामनु चरेम'). ही अशी त्यांची निष्पाप व निर्दोष मनोवृत्ति होती. आणि त्यांवर सूक्ष्म नजर फिरवून त्यांतील गर्भित भाव ओळखल्यावर त्या पापभीरु व निरुपद्रवी लोकांवर रानटीपणाचा, अनुदारपणाचा, संकुचितपणाचा, असंस्कृतपणाचा आरोप करणें हें कितपत सत्यास व न्यायास धरून होईल, याचा ज्याचा त्यानेंच आतां आपल्या मनाशी विचार करावा. 'स्वस्तिपन्थामनुचरेम' अशी ज्यांची स्पष्ट घोषणा आहे, त्यांना मूर्ख अडाणी, भांडखोर, मत्सरी, तामसी क्षुद्रबुद्धि असे म्हणणारे दीड शहाणे खुशाल म्हणोत ! पण ज्यांना सत्याची चाड आहे, ते त्यांना मानवाचे सुंदर आदर्श असेच मानतील ! आणि आम्ही भारतीय तर मानूंच मानूं ! !

## सेवावृत्तींत प्रामाणिकपणा

'ज्याची खावी भाकरी त्याची करावी सरळ चाकरी ' हा सुंदर सेवक-

धर्म ऋग्वेदकाळींच या भरतभूमींत निदान अंकुरून राहिला होता, असें सांगितल्यास त्यांत कांहीं वावगें झालें असें आम्हांस वाटत नाहीं. वेद-ग्रंथांत अशी कांहीं सुंदर तत्त्वें आहेत कीं सुधारणेचा व सुशिक्षितपणाचा टेंभा मिरविणाऱ्या आधुनिक जगालाहि तीं आज आदरणीय व अनुकरणीय अशींच आहेत. तेथील सर्व गोष्टी येथें विशद करून सांगणें हें या चिमुकल्या ग्रंथांत सहसा शक्य नाहीं. तशांत ऋग्वेद हा ग्रंथ म्हणजे ज्ञानाचा व नीतीमत्तेचा अपार व अगाध असा एक मोठा अमूल्य निधीच आहे! आज अनंत कालापासून तो आमच्याजवळ असला तरी मध्यंतरी निष्प्रभ व पौरुषशून्य अशा जैनबौद्धांची जी एक मोठी विषारी लाट या पुण्य-भूमीवर उसळून गेली, त्यांत त्या महाग्रंथाला दुर्दैवानें अडगळीचें स्थान मिळून तेव्हांपासून तो जो आमच्या दृष्टीआड झाला तो आतांपर्यंत तसाच राहिला आहे. ही अनिष्ट प्रथा व अक्षम्य अनास्था आतां हिंदूंच्या स्वरा-ज्यांत—भारतीयांच्या राजवटींत—अशीच पुढें चालू ठेवण्याची दुर्बुद्धि आमची न निवळल्यास आम्हां भारतीयांचा भविष्यकाळ मोठा स्पृहणीय आहे, असें भाकित करण्याचें धाडस कोणी सूज्ञ करील, असें आम्हांस वाटत नाहीं. या भरतभूमींचा उत्कर्ष मागें जो झाला, तो प्रभावी व तेजस्वी अशा वैदिक धर्मछत्राखालींच झाला आणि आतां पुढें व्हावयाचा तर तो पुनः त्या पवित्र व प्रभावी छत्राखालींच होणार, याची अभिजात हिंदूंनीं आतां पक्की गांठ मारून ठेविली पाहिजे! हें येथें सांगण्याची बुद्धि झाली, तिच्या मुळांतला उद्देश हा कीं आतां आम्ही इकडे तिकडे न पाहतां, सरळ वेदमाउलीस कौल लावून त्यांतील परिस्थित्यनुरूप पथ्यकर व पुष्टिप्रद भाग घेऊन, त्याप्रमाणें भारतीय राष्ट्राचें धोरण निर्भयतेनें व निर्भीडपणें ठरविलें पाहिजे. तशी वेळच आतां येऊन ठेपली आहे. यावेळीं आम्ही झोंपून राहूं अगर टंगळमंगळ करूं, तर आमच्या सारखे दुर्दैवी आमचे आम्हीच! असो.

वेदांतील सुंदर तत्त्वांतील एक सुंदर नीतितत्त्व सांगावयाचें म्हणजे सेवाधर्म हें होय. हें तत्त्व सरमेनें—इंद्राच्या एका देवदूतीनें—मनुष्यास गिर-विण्यास म्हणून घालून दिलेलें आहे. तो कथाप्रसंग असा. पर्णीनीं देवगुरु

बृहस्पतीच्या गायी चोरून नेऊन, त्या त्यांनीं आपल्या एका बंदिस्त गुहेंत लपवून ठेविल्या. बृहस्पतीनें ही तक्रार इन्द्राजवळ केली, तेव्हां त्या देव-राजानें बृहस्पतीच्या गायींचा शोध लावण्याच्या कामगिरीवर आपली विश्वासू देवदूती जी सरमा तिची योजना केली. अर्थात् ती इन्द्राचा हुकूम घेऊन तपासास निघाली, व शोध करतां करतां रसा नदी ओलांडून पर्णाच्या प्रदेशांत शिरली. तेथें शोध करीत असतां तिला गाईचा सुगावा लागला. तेथें ती गेली. पण पर्णीचा तेथें खडा पाहरा होता. तिला पाहतांच पणी चपापले. त्यांना तिचा संशय आला. तेव्हां त्यांनीं तिला विचारलें कीं, ' सरमे ! तूं कशी व कोठून आलीस ? तूं फार लांबून आल्यासारखी दिसतेस. काय काम आहे तुझें इथें ? ही आमची रसा नदी दुथडी भरून जोरानें वाहते आहे. ती तूं कशी ओलांडलीस ? तुला भीति कशी नाहीं वाटली ? आम्हांला ही सर्व कथा सांग.'

तेव्हां त्यांना ती सरमा म्हणाली—ऐका, पणी हो, माझी कथा ऐका. मी कां येथें आले तेंहि ऐका. मी स्वर्गात राहणारी आहें. मी इन्द्राची देव-दूती आहे. बृहस्पतीच्या गायी कोणीतरी चोरट्यांनीं चोरून नेल्या आहेत. त्याचा तपास करण्यास म्हणून इन्द्रानें माझी निवड करून मला पाठवून दिली आहे. तपास करतां करतां मी येथें आलें. मी इन्द्राची देवदूती असल्यामुळें मला कशाचेंच व कुणाचेंच भय नाहीं ! मी निर्भय आहे. तुमची ती रसा नदी मी सहज तरून आलें. मला तिची मुळींच भीति वाटली नाहीं. पणी हो, तुम्ही बृहस्पतीच्या गायी चोरून आणून येथें डांबून ठेविल्या आहेत. मुकाट्यानें त्या सोडून देऊन शहाणे व्हा ! आणि जीव वांचवा कसे ! शहाणे असाल तर हें करा !

पणी म्हणाले:—नाही तर काय होईल ?

सरमा:—नाहीं तर ? नाहीं तर तो इन्द्र–तो देवराजा इंद्र–येथें येईल आणि तुमचें पारिपत्य करून गायी सोडवून नेईल ! फुकट तुम्ही प्राणास माल मुकाल !

पणी म्हणाले:—सरमे ! तूं वेडी तर नाहींस ना ! अग, युद्ध केल्या-शिवाय आम्ही कसे राहूं ? आमचीं हत्यारेंहि नीट परजून ठेविलीं आहेत.

हा जो आमचा येथें खजिना आहे तो गायी, बैल, घोडे आणि संपत्ति यांनीं खच्चून भरलेला आहे ! त्याचें आमचे शूर पणी रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून रक्षण करीत असतात. त्या तुझ्या इन्द्राला आम्ही भीक थोडीच घालणार आहो ! बरें, तें असो. काय ग सरमे ! तूं आमचें ऐकशील का ? तूं त्रासल्यासारखी दिसतेस. इन्द्रानें तुला तसदी केली म्हणून तूं त्रासून इकडे आलीस. तसें असेल तर सांग. आम्ही तुला येथें ठेवून घेऊं. तूं आनंदानें आमच्याजवळ राहा. पुनः तिकडे जाऊंच नकोस. शिवाय आणखी हें बघ, इन्द्राच्या ज्या गायी येथें आहेत त्या तुझ्यांत व आमच्यांत वांटणी करून घेऊं. त्यामुळें तूं श्रीमंत व सुखी होशील ! तुझें नष्टचर्य संपेल आणि सुखाचे दिवस उगवतील ! तो इन्द्र मोठा त्रासिक आहे. येथें कोणी तुला त्रास देणार नाहीं. आम्ही तुला बहीण मानून तुझें रक्षण करूं ! मग राहशील कां तूं आमच्याजवळ ?

सरमा थोडीशी हंसून त्यांना म्हणाली— वेड्या पणींनो ! मला तुमचा भाऊपणाहि नको आणि बहीणपणाहि नको ! ही सरमा तुमचा बहीण-पणाहि जाणत नाहीं नि भाऊपणाहि जाणत नाहीं ! तें सर्व माझा धनी इन्द्र जाणतो. तसेंच तुमच्या गायीहि नकोत ! खाचित मी सांगतें कीं, बऱ्या बोलानें तुम्ही गायी सोडत नसाल, तर तो इन्द्र येथें येईल आणि तुमची हड्डी नरम करून देवगुरूच्या गायी सोडवून नेईल ! पणींनो ! मी जातें आतां. तुम्ही मात्र सांभाळा !

असें म्हणून ती तेथून निघून गेली.

सरमा ही दूती खरी. पण पणींच्या लालुचीला ती बळी न पडतां आपल्या कर्तव्याला जागून 'नाहं वेद भ्रातृत्वं नो स्वसृत्वम्' (१०-१०८-१०) असा त्या चोरांना रोखठोक जबाब देऊन आपला हेतु साधून तेथून निघून गेली. या सूक्तावरून ऋग्वेदानें एक मोठा व महत्त्वाचा धडा घालून दिला की कोणी चाकरी नोकरी करणारे सेवक असतील, त्यांनीं आपलें काम प्रामाणिकपणें चोख बजावावें. लांचलुचपतीस अगर इतर आमिषास लुब्ध होऊं नये. तरच ते देवाचे लाडके होऊन मागेपुढें चांगले

दिवस पाहतील व नांवलौकिकहि मिळवितील ! ही आर्यनीति स्पृहणीय नाहीं असें कोण म्हणेल ?

## जुगार–निंदा

ऋग्वेदांत कित्येक अनिष्ट व अनैतिक गोष्टींचा निषेध केलेला दिसून येत असला तरी त्यांतल्यात्यांत जुगाराचा मात्र कडकडून निषेध करण्यांत आला आहे. कारण या व्यसनापासून जे दुष्परिणाम घडतात, ते त्या व्यसनग्रस्त व्यक्तीपुरतेच नसून इतरांना देखील त्याचा उपसर्ग पोंचूं शकतो. इतकेंच नव्हे तर सोन्यासारख्या संसाराचा सर्वस्वी घात होतो ! जुगारांत जसजशी बाजू घसरत जाईल, तसतसा मनुष्य चेवीस चढून बेफान व बेभान होत जातो. त्याची शांतता ढासळते व बुद्धि हतप्रभ बनते ! जसजसा तो या व्यसनांत ओढला व गुरफटला जाईल, तसतसा त्याचा आर्थिक व नैतिक अधःपात होत जाऊन, अखेर अखेर तो वाटेल ते गुन्हे करण्यास मग तयार होतो ! जुगाराला सरावलेला व चटावलेला हा व्यसनी मनुष्य पुढें कशालाच भीत नाहीं व कशालाच लाजत नाहीं ! यामुळें तो पुढें कोणालाहि नकोसाच होतो. त्याला सुखविणारे व आपुलकीने बघणारे जगांत मग कोणीच राहत नाहींत ! ( 'नाथितो विद्यते मर्डितारम्' १०-३४-३ ) आईबाप कंटाळतात, भाऊ बहीण, आप्तइष्ट दूर करूं पाहतात, बायको देखील बसतां उठतां पाणउतारा करण्यास कमी करीत नाहीं ! ऋणकरी लोक दारापुढें येऊन गर्दी करतात व त्याला बाहेर खेंचून त्याची भर रस्त्यांत अब्रू घेतात ! असा हा दुर्दैवी जुगारी अखेर सर्व पैसा व पत घालवून, निर्धन व निर्मित्र बनून रस्त्यावर भिकाऱ्याप्रमाणें भटकत फिरतो ! या जुगारी माणसाच्या दुःस्थितीचें चित्र ऋग्वेदांत अगदीं अर्थपूर्ण रंगविण्यांत आलें असून, त्याचें येथें वर्णन केल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं. म्हणून त्याचें थोडक्यांत वर्णन करतों.

ज्याला जुगारीचें व्यसन जडलें आहे, त्याला म्हणजे असें वाटत असतें कीं फांसे म्हणजे परब्रम्ह ! देवांना सोमरस प्राशन करून जसा आनंद होतो, तसाच आनंद या जुगाऱ्याला फांसे पाहून होतो ! ( 'सोमस्येव मौजवतस्य भक्षो विभीदको जागृविर्मह्यमच्छान्' १०-३४-१ ) या जुगा-

रीच्या व्यसनांत उदंड रंगलेला हा जुगारी पुढें पुढें इतका भ्रष्ट व नष्ट होतो कीं, तो आपल्या सच्छील भार्येचा छळ व त्याग करण्यास देखील कमी करीत नाहीं ! ( ' अक्षस्याहमेकपरस्य हेतोरनुव्रतामप जायामरोधम् ' १०-३४-२ ) दिवसे दिवस तो इतका बहकत व बेफाम होत जातो कीं पुढें तो कोणालाच नकोसा होतो. बायको देखील त्याला दूर लोटूं पाहते ( ' अप जाया रुणद्धि ' १०-३४-४ ) आईबाप, बहीणभाऊ, आप्तइष्ट, सोयरेधायरे, सर्वच त्याचा द्वेष करूं लागतात. त्याचे ऋणकरी घरीं येऊन त्रास देऊं लागले म्हणजे कंटाळून त्यांस चक्क सांगून टाकतात कीं आम्ही कांहीं त्याला ओळखीत नाहीं. ( ' पिता माता भ्रातर एनमाहुर्न जानीमः १०-३४-४ ) पहिजे असल्यास खुशाल त्याला पकडून बांधून घेऊन जा ! ( ' नयता बद्धमेतम् ' १०-३४-४ ) आम्ही कांहीं तुमच्या वाटेस येत नाहीं; त्याचे जुगारी मित्र इतके उन्मत्त व बेशरम बनतात कीं केव्हां केव्हां त्याच्या स्त्रीच्या अंगावर निर्लज्जपणें हात टांकण्यासहि मागेंपुढें पाहत नाहींत ( ' अन्ये जायां परि मृशन्त्यस्य ' १०-३४ ४ ) अशी या जुगाऱ्याची अखेर हीन दीन स्थिति होते !

आतां हे फांसे म्हणजे तरी काय ? अंकुशाप्रमाणें अंगांत रुतून बसणारे जणु कांही अणुकुचीदार तीक्ष्ण कांटेच ! ( ' अक्षास इदङ्कुशिनो नितोदिनः ' १०-३४-७ ) ते शरीराला बोंचणारे, चटका देणारे, दाह उत्पन्न करणारे असे मोठे दुष्ट आहेत ! खेळांत विजय मिळाला म्हणजे ते पुत्रजन्माचा आनंद देतात खरे आणि याप्रमाणें प्रथम लाभाचें आमिष दाखवून माणसाला जुगार खेळण्यास प्रवृत्त करतात. पण अखेर बेटे त्याचा सर्वस्वी घात व पात करावयास चुकत नाहींत ! तुम्ही हें सत्य समजा कीं फांसे हे दिव्यलोकींचे धगधतीत निखारे आहेत ! ( ' दिव्या अंगारा ' १०-३४-९) हाताला ते गार लागत असले तरी काळजाला चांगले चटके देणारे आहेत ! ( ' शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति ' १०-३४-९ )

या जुगाऱ्याची दुःस्थिति काय सांगावी ! बिचारी ती त्याची आई ! आपला मुलगा कुठें तरी भटकत असलेला पाहून दुःखानें सारखी तळमळत असते. आणि ती त्याची पत्नी ! पतिविरहामुळें रात्रंदिवस सारखी

झुरत व अश्रु ढाळीत असते ! ('जाया तप्यते कितवस्य हीना' १०-३४-१०) जवळचा पैसा संपला म्हणजे जुगारी कर्जबाजारी होत्साता रात्रीं दुसऱ्याच्या घरीं जाऊन चोरी करावयास प्रवृत्त होतो. ( ' ऋणवा बिभ्यद्धनमिच्छमानोऽन्येषामस्तमुप नक्तमेति' १०-३४-१० ) अर्थात् मग तुरुंगाचा मिरासदार बनतो ! जुगाऱ्याची ही अशी शोचनीय कथा आहे. ती मनन करण्यासारखी नाहीं असें कोण म्हणेल ? जुगाराच्या नादी लागलेला मनुष्य प्रथम साव असला तरी अखेर तो चोर बनतो ! त्याचा अधःपात होत होत, शेवटीं माणुसकीला तो पारखा होतो !

या जुगाऱ्याची अखेर कींव येऊन त्याचा उद्धार करण्यासाठीं सूर्यनारायणानें त्यास असा उपदेश केला आहे कीं ' बाबारे ! हा जुगाराचा नाद सोड ! आणि शेती कर कसा ! ' ( 'अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व १०-३४-१३ ) कारण शेती कसशील तर संपत्तीचा उपभोग घेशील ! शेती म्हणजे काय समजलास तूं ? बाबारे ! इहलोकांतील ती कामधेनु आहे! तेथें धनधान्य संपत्ति आहे, गायीगुरें आहेत, व प्रेमळ पत्नीचाहि वास आहे ! ( ' तत्र गावः कितव तत्र जाया ' १०-३४-१३ ) या उपदेशावरून वेदकालीं शेतीचें महत्त्व किती होतें, हें नीट व्यक्त होतें. हें ऋग्वेदांतील जुगारीचें वर्णन किती सार्थ व सत्य आहे बरें ? असो.

## पुलुकामो हि मर्त्यः

अखिल जीवसृष्टींत मानव जन्म हा अत्यंत श्रेष्ठ जन्म आहे. याला कारण म्हणजे तें त्याचें मन. तें दिव्य मन—तें तेजस्वी मन—तें प्रभावी मन—तें सूक्ष्म व तीक्ष्ण मन ! निरीक्षण, परीक्षण, ग्रहण, स्मरण, चिंतन व क्रिया या विषयावरील त्याचें सामर्थ्य व प्रभुत्व हें अलौकिक असून, सर्व विश्वांत तें अप्रतिहत संचार करीत असतें. या विश्वव्यापक मनाचे अनेक पैलू पाडण्यांत आले असून, त्याचें वर्णन शतपथांत आलें आहे. तें असें:—' कामः संकल्पो । विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव । ( श. प. १४-४-३-९ ) भावार्थ—वासना, संकल्प, संशय, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधैर्य, लज्जा, बुद्धि, भय इत्यादि मनाचेच पर्याय आहेत.

मनुष्य जीं कांहीं कर्मैं करतो, त्याची प्रेरक शक्ति मन हेंच असल्या-मुळें त्याबद्दल देह जबाबदार नसून मन हेंच आहे. ‘ मन एव कर्तृ, न देह: ’ असें योगवासिष्ठांत वसिष्ठांनीं श्रीरामचंद्रास सांगितलें असून, सुखदु:खाची–बंधमोक्षाची–जबाबदारी सर्व या मनाचीच आहे, ही गोष्ट ‘ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ’ या वचनांत स्पष्ट नमूद करून ठेवण्यांत आली आहे.

या मनाचे वर जे निरनिराळे पर्याय दिले आहेत, त्या सर्वांचें विवेचन येथें कर्तव्य नसून, फक्त काम म्हणजे वासना एवढ्यापुरताच विचार कर्तव्य आहे. हा जो मनुष्यप्राणी आहे तो बहुविध कामनांनीं–वासनांनीं–भरलेला आहे, ही गोष्ट ऋग्वेदांत ‘ पुलुकामो हि मर्त्यः ’ या वचनांत स्पष्ट बोलून दाखविण्यांत आली आहे. ( ऋ. १-१७९-५ ). मानव-मात्राच्या जीवनांतील सर्व हालचालींचें हें वरील ऋग्वेदवचन मुख्य गमक असून, नदीचा उगम जसा पर्वत कुहरांतून होतो, तद्वत् या मनुष्याच्या सर्व हालचाली या वासनेच्या उदरांतूनच उद्गम पावतात. जशी वासना तशी इच्छा, जशी इच्छा तसा निश्चय, जसा निश्चय तसें कर्म आणिं जसें कर्म तसें फळ, हा जो कर्मसिद्धान्त, तो वेदकाळींच वैदिक ऋषींनीं पूर्ण ओळखून ठेविला असून, याज्ञवल्क्यांनीं त्याची उपपत्ति दिली आहे ती अशीः– ‘काममय एवायं पुरुष इति, स यथाकामो भवति तथा क्रतुर्भवति, यथा क्रतु-र्भवति तत्कर्म कुरुते, यत्कर्म कुरुते तदभि संपद्यते ॥’ (श.प.१४-७-२-७) भावार्थः–हा जो पुरुष आहे तो काममय म्हणजे अनेक वासनांनीं युक्त आहे. अर्थात् जशी त्याची वासना तसा त्याचा निश्चय, जसा निश्चय तसें कर्म, जसें कर्म तसें फळ, अर्थात् फलसिद्धि. वैदिकांचा कर्मवाद म्हणतात तो हा. अर्थात् तो शास्त्रशुद्ध व अनुभवसिद्ध आहे, हें सूर्यप्रकाशाइतकेंच स्पष्ट आहे. मग निराळें वर्णन तरी कशाला करू ?

आतां हें कर्मफल सुखरूप अगर दुःखरूप होणें न होणें, हें त्या कर्माच्या स्वरूपावर आणि कर्म हें वासनेवर अवलंबून असतें व आहे. म्हणजे वासना चांगली तर कर्म चांगलें आणि कर्म चांगलें तर फळहि चांगलेंच. त्याचप्रमाणें वासना वाईट तर कर्म वाईट आणि कर्म वाईट तर फळहि

वाईट. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे सद्वासनेपासून सत्कर्म व सत्कर्मांपासून सत्फल म्हणजेच सुख आणि दुर्वासनेपासून दुष्कर्म व दुष्कर्मांपासून दुष्फळ म्हणजेच दुःख, अशी ही सुखदुःखाची कुळकथा आहे. ही गोष्ट शतपथांत मांडून दाखविण्यांत आली आहे ती अशीः–
'यथाकारी यथाचारी तथा भवति । साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति । पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन॥' (श.प. १४-७-२-६)
मनुष्याचें कर्म अगर आचरण जसें असेल तसा तो होतो. म्हणजे सत्कर्म करणारा साधु होतो आणि दुष्कर्म करणारा दुष्ट होतो. पुण्यकर्मानें तो पुण्यवान् म्हणजे सुखी व पापकर्मानें पापी म्हणजे दुःखी होतो. सज्जन अगर दुर्जन–सुखी अगर दुःखी–बनण्याचा हा असा शास्त्रोक्त मार्ग आहे.

हें सर्व येथें सांगितलें–थोडक्यांत सुखदुःखाची मीमांसा केली–त्याचें कारण इतकेंच कीं मनुष्य हा स्वभावतः सुखप्रिय प्राणी असून, त्याच्या सर्व वासना या सुखासाठींच व सुखाभोंवतींच घुटमळत असतात. त्याची सर्व धडपड–त्याचे सर्व प्रयत्न–त्याचा सर्व उद्योग–या सुखासाठींच असतो, हें खरें असलें तरी तें सुख कसें लाभेल अगर मिळवितां येईल, याबद्दल मात्र असावा तसा पोंच अगर विवेक त्यास असत नाहीं. शिवाय सुखाची कल्पनाहि असावी तशी व तितकी शुद्ध, सरळ व पवित्र नसते. आणि यामुळें कैक वेळां त्याची फसगत होते. सुखाकरतां म्हणून तो करावयास जातो एक आणि पदरांत पडतें तें भलतेंच! सुखाची खाण शोधावयास जाऊन दुःखाच्या डोहांत जाऊन गडप झाल्याचीं उदाहरणें जगांत काय थोडींथोडकीं आहेत? हें असें कां होतें अगर व्हावें याचें उत्तर हें कीं सुखाचें सत्य स्वरूप व तत्प्राप्तीचा सरळ व अचूक मार्ग, याचें अज्ञान अगर भ्रामक ज्ञान असें सांगितल्यास तो प्रमाद होणार नाहीं. सुखाचें गांठोडें केवळ संकल्पमात्रेंकरून मनुष्याच्या पदरांत आयते येऊन पडत नाहीं. त्या संकल्पाला कर्माची–प्रयत्नाची–जोड लागते. त्याशिवाय संकल्प सिद्ध होऊं शकत नाहीं. पण संकल्प सिद्धीस जाण्यास–वासनेची तृप्ति होण्यास–कर्माचें यथार्थ ज्ञान जवळ असणें हें अपरिहार्यच आहे, हें उघड सांगण्याची आतां आवश्यकता नाहीं. ऋग्वेदांत मनुष्याच्या ज्या वासना,

भावना, प्रार्थना, विचार व आचार आढळून येतात, त्यांवरून तत्कालीन भारतीय लोकस्थिति अजमावण्यास बरीच मदत होणार आहे. सबब आतां त्या प्रश्नाकडे वळतों.

प्रथम वैदिक आर्यांचा प्रश्न घेऊन, त्यांचें जीवनचित्र कसें रंगलेलें प्रत्ययास येतें—म्हणजे त्यांच्या भावना, वासना, अपेक्षा, प्रार्थना, विचार व आचार यांचा प्रवाह कसा वाहतो—याची रूपरेखा थोडक्यांत आंखून दाखवितों. त्यावरून त्यांच्या मनोघटनेचें व्यावहारिक स्वरूप अजमावण्यास मदत होईल.

आतां ऋग्वेदांतून वैदिक आर्यांचें चित्र कसें उमटलें आहे—म्हणजे त्यांची मनोघटना, आचारविचार, आवडीनिवडी इत्यादि गोष्टींचें रूप व रोख एकंदरींत कशा प्रकारचा आहे—याची येथें ओझरती ओळख करून देण्याचा आमचा इरादा आहे. त्याचा आराखडा येथें थोडक्यांत मांडून दाखविल्यास त्यावरून आज वाचकांना वेदकालीन आर्य लोकांची थोडीबहुत यथार्थ कल्पना करण्यास मदत होईल, अशी आमची समजूत असल्यामुळें ऋग्वेदाला धरून सारांशरूपानें त्याचें येथें वर्णन देत जातों. प्रथम सकृद्दर्शनींच हें सांगून टाकलें पाहिजे कीं, वैदिक आर्य लोक हे सर्वशक्तिमान व सर्वकाम-कल्पद्रुम अशा दिव्य देवांचें अस्तित्व मानणारे म्हणजे आस्तिक असून, ते श्रद्धापूर्वक मनोभावें त्यांची उपासना करणारे असे देवभक्त होते. अर्थात् त्या दिव्य बिबुधांची भावभक्तिपूर्वक उपासना करून आपलें इहपर हित व कल्याण साध्य करून घेणें, हें त्यांचें जीवितध्येय बनलें असून, त्यासाठीं त्यांचे सतत उद्योग व प्रयत्न चाललेले असत, याचा त्या ग्रंथांत चांगला निर्वाळा पाहावयास मिळतो. त्यांनीं आपल्या प्रापंचिक उत्कर्षार्थ व पारलौकिक कल्याणार्थ जो मार्ग आंखला होता, तो असाः—

आम्ही सरळ अशा सुगम मार्गानें—सुखदायक नीतिमार्गानें—वाटचाल करतों. ( ' ऋतस्य पन्थामन्वेमि साधुया ' ऋ. १०-६६-१३ ). कारण नीतीचे मार्ग चोखाळण्यास सुगम व सरळ असतात ('सुगा ऋतस्य पन्थाः' ८-३१-१३ ) आणि त्या सुरक्षित मार्गानें सरळ सुखसंपत्तीकडे नेण्या-

विषयीं ते अग्निदेवाची कळकळीची प्रार्थना करतात. ('अग्ने नय सुपथा राये अस्मान्' १-१८९-१) आम्ही या कल्याणमार्गाचेंच अनुसरण करूं! ('स्वस्ति पन्थामनु चरेम' ८-६२-१२) आम्ही ज्या ज्या मार्गानें देवांकडे जाऊं, ते ते आमचे मार्ग सुखाचे असे सरळ व सुगम होवोत! ('सुगा नो विश्वा सुपथानि सन्तु' ७-६२-६) अशा सुरक्षित व कंटकरहित मार्गाचेंच आम्ही आतांपर्यंत अवलंबन केलें आहे. ('पन्थामगन्महि स्वस्तिगामनेहसम्' ६-५१-१६). याप्रमाणें त्यांनीं आपल्या सुखशांतीचे कल्याणमार्ग आखले होते, हें वरील वचनांवरून स्पष्ट होतें. यावरून त्यांची मनोवृत्ति जीवनोत्कर्षावर—नीतिमार्गावर—केंद्रित झाली होती, असें सांगावयास मग कसली हरकत आहे?

आतां त्यांची वैदिक देवांवर गाढ श्रद्धा बसली होती, त्याचें पुढील वचनांत स्पष्टीकरण आढळतें, तें असें:—त्यांची बालंबाल खात्री होती कीं देवाशिवाय मनुष्यास—देवभक्तास—सुखविणारे असे दुसरे कोणीच नाहींत. ('न हि त्वदन्यः पुरुहूत कश्चन मघवन्नस्ति मर्डिता' ८-६६-१३) त्या देवांपासूनच—म्हणजे अग्निनारायणापासूनच—सर्व मंगल व हितकारक गोष्टी प्राप्त होतात. ('त्वद् विश्वा सुभग सौभाग्यानग्ने वि यन्ति' ६-३३-१). शिवाय ते देव सर्व भुवनजाताचे संरक्षक आहेत. ('देवा विश्वस्य भुवनस्य गोपाः' २-२७-४) अर्थात् या इंद्रादि देवांच्या देणग्या भक्तांना मोठ्या सुखकारक व कल्याणकारक असतात. ('भद्रा इन्द्रस्य रातयः' ८-६२-४) आणि त्यांची कृपाहि पण तशीच मंगलकारक असते. ('भद्रा ते इन्द्र सुमतिः' ३-३०-७) अशा दिव्य देवांची मंगल कृपादृष्टि आमच्याकडे वळो! ('देवानां भद्रा सुमति ऋजूयताम्' १-८९-२) एकंदरींत देवांचें सख्य मोठें गोड—म्हणजे सुखकारक—आहे ('यस्य ते स्वादु सख्यम्' ८-६८-११). म्हणून आम्ही देवांशीं सख्य करूं इच्छितों. ('देवानां सख्यमुप सेदिमा वयम्' १-८९-२)

आतां या देवांपासून काय काय गोष्टींची ते अपेक्षा करितात इकडे थोडेंसें नजर फिरवून पाहूं. देवांजवळ आपलें अंतःकरण उघड करून त्यांचें मागणें आहे, तें असें:—देवा! आम्हांस सुख दे! (अस्मभ्यं

शर्म यच्छतम् ' १-१७-८ ). आम्हांस खंडरहित असें उदंड आयुष्य दे! (' विश्वायुर्धेह्यक्षितम् ' १-९-७ ). आमची या जगांत भरभराट कर! (त्वं नो वृधे भव ' १-९१-१० ). आम्हांला विफल संपत्ति दे! (' विश्वानि द्रविणानि धेहि ' ५-४-७ ). आम्हांस मोठी कीर्ति दे! (' अस्मे धेहि श्रवो बृहत् ' ८-६५-९ ) आम्हांस श्रेष्ठ व पराक्रमशाली अशा मुलाबाळांनीं व धनधान्यादिकांनीं गजबजलेलें व भरभराटलेलें असें प्रशस्त घर राहावयास दे! (' दा नो अग्ने धिया रयिं सुवीरं स्वपत्यं सहस्य प्रशस्तम् ' ७-१५ ). त्याचप्रमाणें आमचें घर अश्वगवादि पशूंनीं समृद्ध असो! (' नः पशुमाँ अस्तु गातुः ' ३-५४-१८ ). आमचें मन शुभ विचारांनीं युक्त, जागृत व कर्तव्यदक्ष असो! (' भद्रं नो अपि वातय मनो दक्षमुत क्रतुम् ' १०-२५-१ ). आमचा योगक्षेम सुरळीत चालो! (' शं नः क्षेमे शमु योगे नो अस्तु ' ७-८६-८). आम्हांस सदैव सुखांत ठेवा! (' नो मृळयत '). आम्हांस बळ व अन्न द्या. त्याचप्रमाणें शारीरिक स्वास्थ्य व मानसिक शांति द्या. (' शं यो धेहि ३-१८-४ ) आणि शांति वाढविणारें असें सुख द्या! (' शंताति मयस्करत् ' ८-१८-७ ). फार काय आम्ही जें जें मागूं तें तें आम्हांस द्या! (' अस्मभ्यं तद्धत्तन यद्व इमहे ' ५-५३-१३ ) देवोपासकांच्या सर्व कामना सिद्धीस जावोत! ('सत्याः सन्तु यजमानस्य कामाः' १०-१२६-८) मनांत जी इच्छा धरून आम्ही देवयजन करतों, ती आमची इच्छा सफल होवो! (' यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु ' १०-१२१-१० ). या सर्व गोष्टी आर्यांच्या आवडीच्या असून त्या मिळण्याविषयीं त्यांची वरीलप्रमाणें देवांजवळ प्रार्थना आहे.

आतां त्यांना कोणत्या गोष्टी संसारांत नावडत्या म्हणजे वावड्या, यांचें थोडेसें दिग्दर्शन करतों. अर्थात् त्या अप्रिय गोष्टींपासून आपणांस अलिप्त ठेवण्याविषयीं त्यांच्या प्रार्थना आहेत. त्यांना यापुढील गोष्टींचें वावडें असल्यामुळें त्या त्यांना नको आहेत. त्यांचा तपशील आहे तो असाः— ' देवांनो! जें कर्म केल्यानें तुम्ही आम्हांस शिक्षा कराल, तसलें पापकर्म आमच्या हातून न घडो! ('मा तत्कर्म वसवो यच्चयध्वे ' ६-५१-७ )

दुसऱ्यांनीं केलेल्या पापाचें प्रायश्चित्त भोगण्याचा कठीण प्रसंग आम्हांवर न येवो ! ( ' मा व एनो अन्यकृतं भुजेम ' ६-५१-७ ). आमच्यावर निद्रेचा अम्मल न चालो ! ( ' मा नो निद्रा ईशत ' ८-४८-१४ ). आम्हांस भुकेच्या तडाख्यांत देऊं नकोस ! ( ' मा नः क्षुधे परा दाः ' ७-१-१९ ) आमच्या आयुष्यास मारूं नकोस ! ( ' मा न आयुः प्रमोषीः ' १-६४-११ ). आम्हांस सतावणाऱ्या शत्रूच्या हवालीं करूं नकोस ! ( ' मा नो अव सृज रिपवे दुच्छुनायै ' १-१८९-५ ) आम्हांस मूर्ख मनुष्याच्या हवालीं करूं नकोस ! ( 'मा नो अग्नेऽमतये परादाः' ७-१-१९) आम्हांस क्रूर व दुष्ट राक्षसांच्या हवालीं करूं नकोस ! ( ७-१-१९ ) आम्हांवर दुष्ट लोकांची सत्ता न चालो ! ( ' मा नो दुःशंस ईशत ' १०-२५-७ ) आमच्यावर पापी लोकांची सत्ता न चालो ! ( ' मा किर्नो अघशंस ईशत ' ६-७१-३ ) आमच्यावर शत्रूची सत्ता न चालो ! ( ' मा नो अरातीरीशत ' २-७-२ ) निपुत्रिकाच्या घरीं राहण्याचा आम्हांवर प्रसंग न येवो ! ( ' मा शूने अग्ने निषदाम नृणाम् ' ७-१-११ ). याप्रमाणें त्यांनीं आपल्याला बावड्या असलेल्या अनेक गोष्टी ऋग्वेदांत ठिकठिकाणीं बोलून दाखविल्या आहेत. तथापि वर उध्दृत केलेल्या वचनांवरून त्यांचें मनोगत अजमावण्यास कोणालाहि अडचण भासेल, असें आम्हांस वाटत नाहीं.

आपली ऐहिक जीवनयात्रा सुरळीत, सुसूत्र व सुखरूप चालण्यासाठीं त्यांनीं देवाजवळ प्रार्थनारूपानें काय काय मागितलें आहे, त्याचा थोडक्यांत सारांश आहे तो असा:—हे देवा ! सदैव जागरूक राहून आमच्या शरीराचें तूं रक्षण कर ! ( ' त्रास्वोत नस्तन्वो अप्रयुच्छन् ' १०-७-७ ) आमचें लोकनिंदेपासून रक्षण कर ! ( पाहि त्वमु नः सहसावन्नवद्यात् ' ७-४-९ ). धूर्त, कंजूष व हिंस्रक लोकांपासून आमचें रक्षण कर ! ('पाहि धूर्तोररुषो अघायोः ' ७-१३-३ ). दंश करणारे व हिंसा करणारे अशा दुष्ट प्राण्यांपासून आमचें रक्षण कर ! ( ' पाहि रीषत उत वा जिघांसतः ' १-३६-१५ ). राक्षसांपासून आमचें रक्षण कर ! ('पाहि नो अग्ने रक्षसः' ७-१-१३ ). अर्थात् सर्व आयुष्यभर सदासर्वकाल तुम्ही आमचें दक्ष

राहून रक्षण करा ! ( ‘ पाहि सदमित् विश्वायु:’ १-२७-३ ).

त्याचप्रमाणें यापुढील गोष्टींपासून आम्हांस जपा. दूरचें अगर जवळचें असें जें कांहीं आम्हांस भय आहे त्याचें निर्दालन करा ! (‘यदन्ति यच्च दूरके भयं विन्दति मामिह । पवमान वितज्जहि ’ ९-६७-२१ ). तसेंच आमचें अज्ञान नष्ट करा ! ( ‘ युयुताऽमतिम् ’ ८-१८-११ ). आमचें अन्नदारिद्य व रोगराई नाहींशीं करा ! ( ‘ युयुतमस्मदनिराममीवाम् ’ ७-७१-२ ). आमच्यांत जी दुष्ट बुद्धि असेल, तिचा सर्वस्वी नायनाट करा ! ( ‘ अप सेधत दुर्मतिम् ’ ८-१८-१० ) आणि आमची आधिव्याधि नष्ट करा ! ( ‘ अपामिवां ( सेधत ) ८-१८-१० ) त्याचप्रमाणें पापांतून आमची मुक्तता करा ! ( ‘ युयुत नो अहसः ’ ८-१८-१० ) फार काय, आमचे जे द्वेष्टे आहेत, त्या सर्वांचा, हे अग्निदेवा ! तूं फडशा पाड ! (‘विश्वा द्वेषांसि प्रमुग्ध्यस्मत्’ ४-१-४ ) आणि जे देवनिंदक असे द्वाड लोक आहेत, त्यांना जिवंत ठेवूं नका ! ( ‘देवनिदो नि बर्हय ’ २-२३-८ ).

येथपर्यंत जें निरूपण केलें, त्यावरून वैदिक आर्यांच्या वासना, संकल्प, भावना व विचार कशा प्रकारचे आहेत, याची अटकळ करण्यास आमच्या सूज्ञ वाचकांस आतां निराळें सांगावयाचे राहिलें असें आम्हांस वाटत नाहीं. त्यावरून आर्यांच्या मनोघटनेची यथार्थ कल्पना करण्यास ते समर्थ आहेत, असें धरून आम्ही पुढें चालूं लागतों. आतां दुर्वासनेचेहि कांहीं श्लोक त्यांच्यांत दिसून येतात, त्याचा आतां परामर्श घेतों. वैदिक आर्यांची सर्व विचारसरणी ऐहिक उत्कर्ष व मरणोत्तर सद्गति—म्हणजे स्वर्गलाभ—यांवर केंद्रित झाली होती, हें उघड दिसत असलें तरी त्यांच्यांतहि कांहीं दुष्ट प्रवृत्तीचे—दुष्ट चालीचे—लोकहि होते, हा पुरावाहि त्या वेदांतच आढळतो.

मनुष्याच्या सुखदुःखाला कारणीभूत होणारी म्हणजे ही वासना होय. आणि ती द्विविध आहे. एक सद्वासना व दुसरी दुर्वासना. सद्वासना ही सुखप्रद असून दुर्वासना ही दुःखपर्यवसायी आहे, असें ढोबळ मानानें एकदमच सांगून टाकल्यास त्यांत कांहीं बिघडत नाहीं. याची जरा फोड करून सांगावयाची झाली तर असें सांगतां येईल कीं दुर्वासनेपासून दुष्कर्म

आणि दुष्कर्मापासून दुर्गति. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मनुष्य हा जो दुःखांत पडतो त्याला कारण ती त्याची दुर्वासनाच! आणि ती ऋग्वेदांत त्याज्य व निंद्य मानली आहे. या दुर्वासनेचे दुःख-पर्यवसायी असे निरनिराळे पर्याय असून, त्यांतील कांहीं महत्त्वाचे प्रकार ऋग्वेदांत सांगितले आहेत ते असेः—'सुरा मन्युर्विर्भीदको अचित्तिः' (७-८६-१०)—सुरा, क्रोध, जुगार व अविचार, हे ते पर्याय होत. अर्थात् हे सर्व पापाला म्हणजेच दुःखाला जन्म देणारे आहेत, आणि दुर्व्यसनाला प्रवृत्त करून त्याला प्रोत्साहन देणारी म्हणजे ती ही दुर्वासनाच होय. जिचा अंत दुःखांत होतो, ती सर्व दुर्वासनाच होय. सुरा हा शब्द येथें लाक्षणिक असून, त्यांत अफू, गांजा, मद्य, इत्यादि सर्व मादक पदार्थांचा समावेश होतो. क्रोधांत मद, मत्सर, लोभ, मोह इत्यादि दुष्ट मनोविकारांचा अंतर्भाव होत असून, जुगारांत सर्व प्रकारच्या द्यूत-क्रीडांची गणना करण्यांत येते. त्याचप्रमाणें अविचारांत सर्व अज्ञानजन्य तामस वृत्तींचा समावेश होतो. एकंदरींत सांगावयाचें तात्पर्य हें कीं, ज्यापासून मनुष्य हा दुःखभागी होतो, संकटांत पडतो, निंद्य व त्याज्य गणला जातो, त्या सर्व कृत्यांची गणना पापांत करण्यांत आली असून, त्या सर्वांचा प्रपंच या दुर्वासनेवर चालतो, असा ऋग्वेदाचा रोख असून, तो मननीय नाहीं असें कोण म्हणेल?

आतां जगांत अशीं कांहीं माणसें असतात कीं या दुर्वासनेच्या आहारीं जाऊन स्वतःस व इतरांस दुःखांत व संकटांत लोटून देण्यास मागें पुढें पाहत नाहींत. अशीं माणसें ऋग्वेदकालींसुद्धां होतीं. सर्व कालीं व सर्व ठिकाणीं सर्वच माणसें सर्वस्वीं सारख्याच विचाराचीं व सारख्याच स्वभावाचीं असतात, असें कोठें व कधीं झालेलें नाहीं. अर्थात् ऋग्वेद-कालींहि दिव्याखालीं अंधेर या न्यायानें आर्य लोकांतहि अशीं कांहीं माणसें असून, दुर्वासनेनें प्रेरित होऊन या लोकांनीं जगांत दुःखाचा खोल खड्डा खणून ठेविला आहे, असा दाखला ऋग्वेदांत एके ठिकाणीं पाहावयास सांपडतो. हीं माणसें कोण याविषयीं तेथें एक वचन आढळतें तें असेंः—अभ्रातारो न योषणो व्यन्तः पतिरिपो न जनयो दुरेवाः

पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजनता गभीरम् ॥ ( ४-५-५ ) बंधुहीन असलेली स्वैर तरुण स्त्री, पतीचा द्रोह करून दुराचरणांत जीवन रंगविणारी जारिणी स्त्री, यांसारख्या पापी स्त्रिया, तसेंच कपटी व अनीतिमान लोक व दुराचरणांत सुख मानणारे वाममार्गी पुरुष या सर्वांनीं मिळून जगांत दुःखाचा हा अगाध खड्डा खणून तयार करून ठेविला आहे. म्हणजे पुरुषाचें बंधन नसल्यामुळें स्वतंत्र राहून स्वैराचारास सवकलेली उदंड कुमारी स्त्री, पतीचा द्रोह करून परपुरुषांशीं चोरून जारकर्म करणारी कुलटा स्त्री, नसत्या थापा मारून लोकांना फसविणारे व लुबाडणारे भामटे व तसेच चोरी करणारे, निशा करणारे, जुगार खेळणारे, कपटानें वागणारे, देवनिंदा करणारे, ब्रह्मद्वेष करणारे, धर्मकार्यांत विघ्न आणणारे, हिंसा करणारे असे अनीतिमान दुष्ट दुर्जन, अशांनीं जगांत दुःखाचा डोह निर्माण केला आहे, असें वेदांत चक्क व स्पष्ट सांगून ठेवण्यांत आलें आहे. आणि तशा प्रकारची दुर्वासना—दुष्ट बुद्धि—आपणांस न देण्याविषयीं—तिचा नाश करण्याविषयीं—ऋषींनीं देवापाशीं करुणा भाकली आहे. ( ‘ अप सेधत दुर्मतिम् ’ ८-१८-१० ) इतकेंच नव्हे तर अशा पापी लोकांनीं—दुर्वर्तनी व दुराचारी लोकांनीं—केलेल्या पापाचें प्रायश्चित्त भोगण्याचा आपणांवर प्रसंग येऊं नये अशी त्यांची कळकळीची प्रार्थना आहे. ( ‘ मा व एनो अन्यकृतं भुजेम ’ ६-५१-७ ) एवंच सुष्ट-दुष्ट, नीति-अनीति, पाप-पुण्य विचार ठरविणेची वरीलप्रमाणें कसोटी असून, वासना हीच या सर्वांची मायकूस आहे हें सांगण्यासाठींच ऋग्वेदानें घोषणा केली कीं ‘पुलुकामो हि मर्त्यः’

---



## प्रकरण ११ वें

# वैदिक आर्यांची सामाजिक घडण

यानंतर आतां वैदिक आर्यांच्या सामाजिक घडणीचा जरासा परामर्श घेऊं. या प्रश्नांत शिरावयाच्या आधीं प्रथम हें सांगून मोकळें झालें पाहिजे कीं, वेदकालीं आर्यांत वर्णव्यवस्था चांगली रूढ होती. त्या वेळीं तो समाज त्रैवर्णिक होता, म्हणजे त्या समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे तीन वर्ग पडले होते. 'त्रयो वै वर्णाः' असें म्हटलें आहे. आणि हे तीनहि वर्ग द्विजांत मोडत असत. अर्थात् त्या सर्वांना वेदाधिकार—म्हणजे वेद शिकण्याचा व म्हणण्याचा—अधिकार होता. शूद्राचा मात्र ऋग्वेदांत उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. अगदींच नाहीं म्हणायला दहाव्या मंडलांतील पुरुषसूक्तांत तेवढा आढळतो. याचें कारण आमच्या मतें असें कीं, या शूद्रांनाच वेदांत इतरत्र दास या नांवानें संबोधण्यांत आलें आहे. या दासांचा जेव्हां पुरा बीमोड होऊन त्यांना आर्यांनीं आपल्या सेवकवर्गांत जमा केलें, तेव्हां दास शब्द जाऊन तेथें शूद्र शब्द आला. शूद्र शब्द आल्यावर पुढें दास शब्द वापरण्यांत आल्याचें आढळत नाहीं. पुढील काळांत म्हणजे पुराणस्मृतिकाळीं दासाऐवजीं सर्रास शूद्र शब्दच वापरण्यांत आला असून, त्याला आर्यसमाजांत चौथे स्थान देण्यांत आलें आहे.

आतां आर्यांत ही वर्णव्यवस्था आढळत असली तरी ती जन्मावर ठरविलेली नसून गुणकर्मांवर आधारलेली होती. आणि त्या वेळीं तेथें हिंदूंच्या जातिव्यवस्थेंतला तुटकपणा—अलगपणा—फुटीरपणा—नव्हता. म्हणजे ते वर्ण लखोटबंद असे बंदिस्त घटक नव्हते, तर त्यांच्या-त्यांच्यांत रोटीबेटी व्यवहार चालत असत. इतकेंच नव्हे तर तपश्चर्येच्या—गुणकर्मांच्या—जोरावर वर्णांतरहि करतां येत असे, असे दाखले ऋग्वेदांत

पाहणाऱ्याच्या दृष्टीस पडतात. याचा विचार पुढें करूं. आतां फक्त इतकेंच कीं आर्य हे त्रैवर्णीक मानले काय, अगर पुरुषसूक्ताप्रमाणें चतुर्वर्णात्मक मानले काय, एक गोष्ट ध्यानांत ठेवावयाची म्हणजे ही कीं, अन्नोदक व्यवहारांत व शरीरसंबंधांत–अर्थात् रोटीबेटी व्यवहारांत– ते अगदीं अलग व तुटक नसत. एक सलग असत. तेथें अंगांगी संबंध होता. या आमच्या विधानास ऋग्वेदांत काय पुष्टि मिळते तें आतां पाहूं.

प्रथम त्यांच्यांतील बेटीव्यवहाराचा–म्हणजे विवाहाचा–प्रश्न घेऊं. याचें कारण असें कीं बेटीव्यवहाराचा प्रश्न सुटला म्हणजे रोटीव्यवहाराचा प्रश्नहि मग आपोआपच सुटल्यासारखा होतो. रोटीव्यवहाराला सोडून बेटीव्यवहार असणें संभवनीय नाहीं. बेटीव्यवहाराच्या पोटांत रोटीव्यवहाराचा प्रश्नहि अंतर्भूत होतोच. शिवाय स्वतंत्रपणेंहि त्याचा विचार योग्य ठिकाणीं येणारच आहे. असो. वेदकालीं सवर्ण विवाह हा सर्वसामान्य होता पण त्याबरोबरच अपवाद म्हणून मिश्रविवाहाचे दाखलेहि सांपडतात हें खोटें नाहीं. उदाहरणार्थ म्हणून ऋग्वेदांत आढळून येणारे असे कांहीं असवर्ण म्हणजे मिश्रविवाहाचे दाखले येथें थोडे देतों.

१ रोमशा. ही बृहस्पतीची मुलगी व भरद्वाज ऋषीची बहीण–अर्थात् ब्राह्मण कन्या–असून, ती भावयव्य राजाला दिली होती. हिला ऋग्वेदांत ब्रह्मवादिनी म्हटलें आहे. ( १-१२६-७ ).

२ शश्वती. ही अंगिरसाची मुलगी व बृहस्पतीची बहीण–अर्थात् ब्राह्मणकन्या–असून ती आसंग प्लायोगी राजास दिली होती. ( ऋ. ८-१-३४ )

३ रेणुका. ही विश्वामित्राची नात व रेणुराजाची मुलगी–अर्थात् क्षत्रिय कन्या–असून, ती सुप्रसिद्ध जमदग्नि ऋषीस दिली होती. हिच्याच पोटीं बहकलेल्या जुलमी क्षत्रियांचा नाश करणारा परशुराम जन्मास आला.

४ अहल्या. ही दिवोदासाची बहीण–अर्थात् क्षत्रिय कन्या–असून, ती गौतमऋषीस दिली होती. हिच्याच पोटीं प्रसिद्ध वामदेव ऋषि जन्मास आला.

५. सुकन्या. ही शर्यात राजाची कन्या—अर्थात् क्षत्रिय कन्या—असून ती च्यवन भार्गव ऋषीस दिली होती.

६ लोपामुद्रा. ही विदर्भ राजाची मुलगी असून, ती अगस्त्य ऋषीस दिली होती.

७ स्वनयराजाची कन्या ही कक्षीवानास—म्हणजे ब्राह्मणास—दिली होती.

८ रथवीति दाभ्य राजाची कन्या ही श्यावाश्वास—अर्थात् ब्राह्मणास—दिली होती.

९ सरण्यू. ही त्वष्ट्याची (सुताराची) मुलगी. ती विवस्वानास दिली होती.

याप्रमाणें असवर्ण म्हणजे मिश्रविवाह ऋग्वेदांत आढळतात. अर्थात् हे सगळे ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्गांतलेच बहुतेक आहेत. यावरून हें उघड होतें कीं सवर्ण विवाहाप्रमाणेंच मिश्रविवाहहि प्ररूढ असून, हे विवाह त्या काळीं शिष्टसम्मत होते.

यानंतर आतां कांहीं ऋषींची जन्मकथा कशी आहे हें पाहूं. अर्थात् हा इतिहास आहे. पण जरा बोधप्रद आहे. हीं उदाहरणें त्या वेळची सामाजिक स्थिति कशी होती, याचें निदर्शक असून, तीं अपवादात्मक आहेत. तथापि त्यांना कांहीं अर्थ आहे. तिकडे नियम म्हणून पाहावयाचें नसून, अपवाद म्हणूनच पाहावयाचें आहे. नियमाला अपवाद हा कोठें कोठें असतोच. दिवा म्हटला कीं तेथें अंधार हाहि आलाच. पण दिवा म्हणजे कांहीं अंधार नव्हे. अशीच गोष्ट अपवादाचीहि आहे. असो. ऋग्वेदांत कांहीं थोडीं उदाहरणें अशीं आढळतात. त्यांचा तपशील हा असा:—

(१) कक्षीवान हा ऋग्वेदांतला एक प्रसिद्ध ऋषि असून तो दीर्घतमाचा मुलगा. पण तो उशिज नांवाच्या दासीपासून झाला. त्याला 'कक्षीवान दैर्घतमस औशिजः' असें म्हटलें आहे. (ऋ. १-१२४). यासंबंधींचा इतिहास मागें ऋषिचरित्रांत आलाच आहे.

(२) कवष. हा ऋग्वेदांतला दहाव्या मंडळांतील एक ऋषि (१०-३०)

असून, तो इलूष दासीचा मुलगा. या कवषाला ऐतरेय ब्राह्मणांत ‘ दास्याः पुत्रः ’ असें स्पष्ट म्हटलें आहे. ( ऐ. ब्रा. २-१९ ).

( ३ ) मनु. हा विवस्वान राजाचा मुलगा. पण तो दासीपासून झाला. तो प्रसंग असा—विवस्वानाची सरण्यू नांवाची स्त्री होती. तीं आपलीं यम व यमी हीं दोन जुळीं मुलें आपल्या दासीजवळ ठेवून, घोडयाचें रूप घेऊन ती कुरु देशांत निघून गेली. पुढें विवस्वान हा त्या दासीला आपली स्त्री सरण्यू समजून तिच्याशीं रममाण झाला. तेव्हां ती त्याच्या वीर्यानें गरोदर राहिली, आणि पुढें तिला जो मुलगा झाला तोच राजर्षि मनु होय. ऋग्वेदांत मनु या नांवाच्या तीन व्यक्ति आढळतात. एक ‘ मनु आप्सव ’ (९-१०६), दुसरा ‘ मनु वैवस्वत ’ (८-२७) आणि तिसरा ‘ मनु सांवरण ’ ( ९-१०१ ), असे तीन मनु असून त्यांत मधला मनु वैवस्वत हा राजर्षि असून तो दासीपुत्र होय. (८-२७).

( ४ ) दिवोदास. हा ऋग्वेदांतील एक फार मोठा प्रसिद्ध राजा असून, त्याचा मुलगा सुदास हा दाशराज्ञ युद्धांतला एक अमरकीर्ति राजा होऊन गेला. दिवोदास हा वध्र्यश्व्याचा मुलगा असून, तो मेनका अप्सरेपासून झाला. (“ वध्र्यश्वान्मिथुनं जज्ञे मेनकायामिति श्रुतिः। दिवोदासश्च राजर्षिरहल्या च यशस्विनी। ” वायु पु. ९९-२०० )

( ५ ) परशुराम. हा जमदग्नि ऋषीचा मुलगा. पण त्याची आई विश्वामित्राची नात व रेणुराजाची मुलगी रेणुका ही होय. हा असवर्ण विवाहापासून झालेला एक महान् वीर योद्धा होय. उन्मत्त बनलेल्या क्षत्रियांना हरघडी धूळ चारणारा तो हाच परशुराम असून, त्याची सहाव्या अवतारांत गणना केली जाते ( ऋ. १०-११० ).

( ६ ) घोषा. ही कक्षीवान ऋषीची मुलगी. पण तिची आई ही स्वनय राजाची कन्या. ( १०-३९ ). ही मिश्र विवाहापासून जन्मली.

( ७ ) व्यास. वसिष्ठाचा नातू—जो शक्तीचा मुलगा—पराशर, त्याचा हा मुलगा. पण त्याची आई जी मत्स्यगंधा ऊर्फ सत्यवती नांवाची होती, ती कोळी राजाची मुलगी होती. तिच्यापासून हा झाला.

( ८ ) वामदेव. गौतमाचा मुलगा ( ४-१ ) याची आई अहल्या ही वध्र्यश्व राजाची मुलगी. ( वायु. ९९-२०० )

हे असे भिन्न वर्णापासून झालेले पण अमर कीर्तीचे श्रेष्ठ नरपुंगव ऋग्वेदांत चमकत असलेले दिसून येतात. यांच्या माता ब्राह्मणेतर असल्या तरी बापाच्या—म्हणजे ब्राह्मण अगर क्षत्रिय—वर्णातच त्यांची गणना करण्यांत आली आहे. कांहीं कांहीं त्यांत दासीपुत्रहि आहेत पण त्यांनीं आपल्या दिव्य तपश्चर्येनें ऋषीचें श्रेष्ठ स्थान पटकाविलें होतें, ही गोष्ट नजरेआड करून चालण्यासारखी नाहीं.

आतां वैदिक आर्यांत अग्रभागीं चमकणारे असे जे यज्ञपुरोहित त्यांची हकीकत काय, हें थोडेंसें नजरेखालीं घालूं. वेदकालीं यज्ञपुरोहित बहुतेक ब्राह्मण वर्णाचेच असत. तथापि त्यालाहि कांहीं अपवाद आढळून येतात. उदाहरणार्थ—विश्वामित्र हा जातीनें क्षत्रिय होता, पण पुढें तपश्चर्या करून त्यानें पुरोहिताचा श्रेष्ठ अधिकार प्राप्त करून घेतला. सुदास राजाच्या अश्वमेध यज्ञांत यानेंच पुरोहिताची मुख्य भूमिका पत्करली होती. त्याचप्रमाणें देवापि हा राजपुत्र, शंतनु राजाचा वडील बंधु असून, तो त्वचा रोगानें पीडित होतसाता, शंतनूला राज्यपद सोडून देऊन, आपण धर्मसाधनार्थ वनांत निघून गेला. तेथें तो ऋष्टिषेण ऋषीजवळ राहून विद्या शिकल्यामुळें त्याला ऋष्टिषेणाचा मुलगा वा शिष्य असें म्हणूं लागले. पुढें शंतनुराजाच्या राज्यांत बारा वर्षें पावसानें गैरमर्जी केल्यामुळें तेथें सर्वत्र भयंकर दुष्काळाचा प्रचंड कहर माजून, लोक सगळे हाय हाय करीत अन्नासाठीं प्राण सोडूं लागले. म्हणून शंतनु देवापीजवळ येऊन त्यास राजपद स्वीकारण्यासाठीं विनंती करूं लागला. तेव्हां देवापीनें त्यास 'आपणास राज्य नको' असें सांगून, अवर्षण घालविण्यास यज्ञ करण्याची सूचना देऊन त्या यज्ञांत आपण पौरोहित्य करण्याचें अभिवचन दिलें. त्याप्रमाणें शंतनूनें यज्ञाची सिद्धता केली व देवापीनें त्यांत पौरोहित्य पत्करून तो यज्ञ सफळ करून दाखविला. पुढें राज्यांत सर्वत्र पाऊस पडून जिकडेतिकडे आबादीआबाद व आनंदीआनंद झाला ! येथें सांगावयाचा मुद्दा हा कीं, देवापि हा क्षत्रिय असूनहि पुढें वेदविद्या शिकून त्यानें पौरोहित्याचें काम यथाशास्त्र पार

पाडलें. त्याचप्रमाणें नाभानेदिष्ट हा मनूचा मुलगा. म्हणजे क्षत्रियकुलोत्पन्न असून त्यानें अंगिरसाचें व सावर्णि मनूचें पौरोहित्य केलें (१०-६१-६२). येणेंप्रमाणें कांहीं क्षत्रियकुलोत्पन्न ज्ञानवीरांनीं क्षात्रवृत्ति सोडून ब्राह्मण-वृत्ति पत्करून यज्ञकार्यांत पुरोहित होऊन चमकून गेले! असो.

ऋग्वेदांत जसे पुरुष तशा कांहीं स्त्रियाहि चमकल्या आहेत. त्यांत कांहीं रणगाजी स्त्रियाहि आहेत. मुद्गलानी ही मोठी शूर स्त्री असून तिनें आपल्या नवऱ्यास चोरून नेलेल्या गायी व बैल परत आणण्यासाठीं चोरांशीं लढण्याच्या वेळीं त्याचें सारथ्य फार उत्तम बजावलें. आणि चोरांचा पराभव करून गायी परत आणल्या. ( १०-१०२-११ ) त्याच प्रमाणें विश्पलेची गोष्टहि आहे. अपाला हिचाहि उल्लेख करण्यासारखा आहे. कारण वेदांतील भक्तिमार्गाचें ती एक आदर्श उदाहरण आहे. शिवाय आणखी कांहीं स्त्रिया आहेत. पण त्यांचा उल्लेख येथें करण्यांत येत नाहीं.

शेवटीं जातां जातां हें सांगितलें पाहिजे कीं, वैदिक आर्यांत वर्ण-भेद होते तरी तेथें तुटकपणा नव्हता. तेथें वर्णावर्णांत द्वेष, मत्सर, चुरस, कलह, अविश्वास, दुराग्रह या व असल्या समाजविघातक दुष्ट व विकृत मनोवृत्तींचा मागमूसहि नसून, उलट परस्परांत प्रेम, आदर, विश्वास, सलोखा, सहानुभूति, सहकार्य इत्यादि समाजोत्कर्षक सत्प्रवृत्तींचा परिपोष मात्र प्रत्ययास येत होता! म्हणूनच तो एवढा आक्रमणशील व प्रसरणशील बनून त्याची वाढ व विकास होतां होतां काश्मीरपासून रामेश्वरपर्यंत त्याचा विस्तार होऊन शेवटीं त्याच्या प्रदेशाला विशाल भरतखंडाचें स्पृह-णीय रूप प्राप्त झालें! आणि ‘ कृण्वन्तो विश्वमार्यं ’ ही घोषणा त्यानें अंशतः तरी सार्थ करून दाखविली! असो. या सर्व विवेचनावरून एक गोष्ट निर्विवाद सिद्ध होते कीं वैदिक आर्यांत वर्णभेद असले तरी तो समाज वर्णनिष्ठ व तुटक नव्हता आणि तपश्चर्येच्या व गुणकर्मांच्या जोरा-वर कोणालाहि त्या काळीं वर्णांतर करून उच्च वर्णात जातां येत असे; हा धडा आधुनिक जातिनिष्ठ भारतीयांना खरोखर शिकण्यासारखा नाहीं, असें कोण म्हणेल ?

---



# प्रकरण १२ वें

# वैदिक आर्यांचें राजकारण

**राजाची उत्पत्ति**

ऋग्वेदकालीं राजसंस्था अस्तित्वांत होती ही गोष्ट अगदीं निश्चित आहे, पण ती केव्हां आली व कशी आली, याविषयीं स्पष्ट खुलासा तेथें आढळत नाहीं. मात्र राजाची उत्पत्ति कशी झाली याविषयीं ऐतरेय ब्राह्मणांत एके ठिकाणीं उल्लेख करण्यांत आला आहे. त्यावरून कांहींशी कल्पना करण्यास वाव मिळतो. तेथें जी आख्यायिका आहे ती देवांतली आहे. त्यावरून बोध घेण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. म्हणून तेथील आख्यायिका येथें जशीच्या तशी देतों. ती आख्यायिका अशी आहे:—

‘ देवासुरा वा एषु लोकेषु समयतन्त त एतस्यां प्राच्यां दिश्ययतन्त तांस्ततोऽसुरा अजयंस्ते दक्षिणस्यां दिश्ययतन्त तांस्ततोऽसुरा अजयंस्ते प्रतीच्यां दिश्ययतन्त तांस्ततोऽसुरा अजंयस्तऽउदीच्या दिश्ययतन्त तांस्ततोऽसुरा अजयंस्तऽउदीच्यां प्राच्यां दिश्ययतन्त ते ततो न पराजयन्त सैषा दिग-पराजिता तस्मादेतस्यां दिशि यतेत वा याजयेद्वेश्वरो हानृणाकर्तोस्ते देवाऽअब्रुवन्नराजतया वै नो जयन्ति राजानं करवामहाऽइति तथेति ते सोमं राजानमकुर्वस्ते सोमेन राज्ञा सर्वा दिशोऽजयन् ’ ( ऐ. ब्रा. १-१४ ).

भावार्थ—देव व असुर यांचें या लोकांत युद्ध चाललें. प्रथम लढाईला तोंड लागलें, तें पूर्वदिशेकडे लागलें. येथें देवांचा पराजय झाला. अर्थात् असुर विजयी झाले. तेव्हां देवांनीं तेथून निघून पुनः दक्षिणेकडे येऊन तेथें असुरांशीं पुनः सामना दिला. पण दुर्दैवानें तेथेंहि त्यांचा पराभव झाला. पुनः तिसऱ्यांदा पश्चिमेकडून जाऊन तेथून लढत दिली. पण येथेंहि त्यांना मार खावा लागला. चौथ्यांदा ते उत्तरेकडे जाऊन लढले.

पण येथेंहि त्यांची तीच गत झाली. चार वेळां व चार निरनिराळ्या ठिकाणीं देवांनीं असुरांबरोबर रणसंग्राम केला. पण दुर्दैवानें त्यांचे चारहि प्रयत्न फसले. त्यांनीं हताश न होतां पुनः एकदां नवीन जोमानें उत्तर व पूर्व दिशांच्या कोपऱ्यांत म्हणजे ईशान्य दिशेस त्या असुरांवर हल्ला चढविला व तेथें ते विजयी झाले ! असुरांचा पराभव झाला व ते पळून गेले.

या खेपेला त्यांनीं म्हणजे देवांनीं एक युक्ति केली होती. त्यांच्यांत आतांपर्यंत राजा नव्हता. त्यामुळें त्यांच्यांत अराजकता माजून राहिली होती. तो दोष काढून टाकण्यासाठीं ते एकत्र जमून विचार करीत असतां ते असें म्हणूं लागले कीं, आमच्यांत अराजकता असल्यामुळें असुर आमचा पराभव करण्यास समर्थ झाले. तर आतां आपण एक राजा निवडला पाहिजे, म्हणजे आमची बाजू निवळेल. असें म्हणून त्यांनीं आपल्यापैकीं सोमास निवडून त्याची राजपदावर स्थापना केली आणि त्याच्या आधिपत्याखालीं त्यांनीं ईशान्य दिशेस असुरांवर हल्ला चढविला व ते तेथें विजयी झाले. त्याचप्रमाणें त्यांनीं पुनः पूर्वपश्चिमादि चारहि दिशांवर असुरांवर हल्ला करून त्यांचा प्रत्येक ठिकाणीं पूर्ण पराभव केला ! ही अशी देवांतली राजोत्पत्तीची कथा आहे.

याचें अनुकरण करून वैदिक आर्यांनींहि आपल्यांत राजा निर्माण केला. कारण वैदिक आर्यांनीं जगांत वागण्याचा आपणांसमोर जो कित्ता ठेविला होता तो देवांचा ठेविला होता. 'यथा देवानां चरणं तद्वानुमनुष्याणाम् '—देवांचें जें आचरण तसेंच आम्हां मनुष्यांचेंहि असावें असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. यावरून राजाची उत्पत्ति ही स्वयंभू नसून, ती देवसृष्ट व म्हणून कृत्रिम आहे. कांहीं प्रसंगांकरतां ती निर्माण करण्यांत आली असून, तत्संबंधीं ऋग्वेदांत काय माहिती मिळते ती आतां आपण पाहूं.

राजाचें मुख्य कर्तव्य जें आहे, तें म्हणजे राष्ट्रधारणा. राष्ट्राची धारणा करणें हें राजाचें प्रथम व प्रमुख कर्तव्य आहे. स्वतःच्या सुखसोईसाठीं—स्वतःच्या ऐषआरामासाठीं—स्वतःच्या नाना तऱ्हेच्या विलासासाठीं—राजाचें राजपद नाहीं.

**राष्ट्रधारणार्थ राजा**

तर प्रजेच्या हितरक्षणार्थ राजाचा जन्म आहे. ऋग्वेदांत राजाला स्पष्ट आदेश देण्यांत आला आहे कीं, 'इह राष्ट्रमु धारय'—हे राजन्, येथें राहून राष्ट्राची धारणा कर!' (१०-१७३-२) येथें रक्षण कर असें म्हटलें नसून धारण कर असें म्हटलें आहे, ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे. नुसतें राष्ट्राचें रक्षण करून भागत नाहीं. त्याबरोबरच राष्ट्राचें पोषण झालें पाहिजे. रक्षण व पोषण या गोष्टी साध्य झाल्या तरी तेवढ्यानें सगळा कार्यभाग झाला असें होत नसून, त्याबरोबरच राष्ट्राचें संवर्धनहि झालें पाहिजे. म्हणजे राष्ट्रांतील प्रजेचें संरक्षण, संपोषण व संवर्धन जेव्हां होईल, तेव्हांच राष्ट्राची धारणा झाली असें म्हणतां येईल. हें जेव्हां राजे विसरतात, इकडे दुर्लक्ष करून स्वसुखाकडे—ऐषआरामाकडे—विविध देहतर्पणाकडेच—सर्वस्वीं रंगून व गढून जातात, तेव्हां त्यांना प्रजेचा शाप लागून, आपला नाश आपणच करून घेतात असा भारत इतिहासाचा दाखला आहे. तेव्हां राजकर्त्यांनीं 'राष्ट्रमु धारय' हें वाक्य अहर्निश डोळयापुढें ठेवून राष्ट्रशकट हाकावा ही वेदनारायणाची आज्ञा राजकर्त्यांना मोठी उपकारक होईल यांत संशय नाहीं.

राजा हा जो उदयास आला, त्याला कारण प्रजा होय. राष्ट्राचा मुख्य पुढारी जो पुरोहित तो राजाला अभिषिक्त केल्यावर त्यास पुढीलप्रमाणें उपदेश करतो. 'हे राजन्, आम्हीं तुला येथें उदयास आणलें आहे, ('आ त्वा हार्षम्' १०-१७३-१). आतां तूं आमच्यामध्यें येनी रहा! ('अन्तरेधि' १०-१७३-१) येथें अढळ होऊन रहा! ('ध्रुवस्तिष्ठ' १०-१७३-१) तेथून मुळींसुद्धां हलूं नकोस! ('अविचाचालिः' १०-१७३-१) हे सर्व प्रजाजन तुझ्यावरच प्रेम करोत! ('विशस्त्वा सर्वा वाञ्छन्तु' १०-१७३-१) हें आमचें राष्ट्र तुझ्यापासून केव्हांहि भ्रष्ट न होवो! ('मा त्वद्राष्ट्रमधि भ्रशत्' १०-१७३-१) हे

राजन्, स्वर्गांत जसा इंद्र आहे, तसा तूं आमच्यांत दृढ होऊन रहा ! ( 'इन्द्र इवेह ध्रुवस्तिष्ठ' १०-१७३-२ ) स्वर्ग हा जसा स्थिर आहे, ही पृथ्वी जशी स्थिर आहे, हे पर्वत जसे स्थिर आहेत, हें सर्व जगत् जसें स्थिर आहे, त्याप्रमाणें हा राजा आम्हां प्रजेमध्यें स्थिर होऊन राहो ! ( 'ध्रुवा द्यौर्ध्रुवा पृथिवी ध्रुवासः पर्वता इमे । ध्रुवं विश्वमिदं जगद् ध्रुवो राजा विशामयम् ॥' १०-१७३-४) हे राजन् , राजा वरुण हें तुझें राष्ट्र स्थिर धारण करो ! देवगुरु बृहस्पति तें दृढ करो ! देवराजा इंद्र व अग्निनारायण हें तुझें राष्ट्र स्थिर व दृढ करोत! ही जी तुझी प्रजा आहे ती, केवळ तुझ्या-वरच अनुरक्त होऊन तुला बलि म्हणजे कर देणारी होईल, असें इन्द्रदेव करो ! ( 'अथो त इन्द्रः केवलीर्विशो बलिहृतस्करत्' १०-१७३-६).

आतां येथें थोडासा खुलासा करणें जरूर आहे. प्रजा या शब्दांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र व इतर लोक हे सर्वसाधारणतः मोडत असले, तरी वैदिकांच्या राजकारणांत त्या सर्वांनाच राजाच्या नेमणुकींत स्थान आहे, असा वैदिक आर्यांचा अभिप्राय नाहीं. जे राष्ट्ररक्षणाच्या कार्यीं आपणास वाहून घेऊन त्या कार्यांत पडतात, त्यांनाच हा अधिकार आहे. म्हणजे क्षत्रियांनाच तो अधिकार आहे, इतरांस नाहीं. याचें कारण असें कीं राजकारण हा विषय ब्राह्मणांचा काय, किंवा वैश्यांचा काय किंवा शूद्रांचा काय किंवा इतरांचा काय यांपैकीं कोणाचाच नसून, तो फक्त राजकारण खेळणाऱ्या शूरवीर क्षत्रियांचा आहे व म्हणून राजा नेमतांना त्याला या क्षत्रियांनीं अनुमोदन देणें हें उचित आहे. त्यांचें त्याला जरूर अनुमोदन मिळालें तरच तो राजा होऊं शकतो, नाहीं तर नाहीं. अशी ही वैदिक परंपरा आहे. याविषयीं श्रुतींत उल्लेख आढळतो तो असाः— 'यस्मै वै राजानो राज्यमनुमन्यन्ते स राजा भवति न स यस्मै न ॥' (श. प. ९-४-१-१) ज्यास राष्ट्राचें रक्षण करणारे राजन्य ऊर्फ क्षत्रिय अनुमोदन देतात तोच राजा होतो, ज्यास देणार नाहींत तो राजा होऊं शकत नाहीं. त्या वेळीं राष्ट्ररक्षणाचें काम मुख्यतः क्षत्रियांकडे असल्यामुळें राजा होण्याला लायक कोण हें अजमावण्यासाठीं त्यांची सम्मति लागत असे. यावरून राजा हा प्रजेकडून निवडला जाई हें अगदीं स्पष्ट आहे. त्या वेळीं

राष्ट्राचे रक्षक हे क्षत्रिय होते. म्हणजे राष्ट्ररक्षणाची जबाबदारी क्षत्रियांवर होती. 'राजानो वै राष्ट्रभृतस्ते हि राष्ट्राणि बिभ्रति' असें शतपथांत म्हटलें आहे ( श. प. ९-४-१-१ ). क्षत्रियांना राजन् हा शब्द वेदांत ठिकठिकाणीं वापरण्यांत आला असून, ते त्या वेळीं राष्ट्राचे रक्षक व विश्वस्त होते, असें वरील वचनांवरून व्यक्त होतें. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य काय तर वैदिक राजा हा त्या वेळीं क्षत्रियांच्या अनुमतीनेंच निवडला जाई.

राजाची निवडणूक होऊन, त्याची राजपदावर स्थापना झाल्यावर राष्ट्रधारणा करण्याची जबाबदारी वेदनारायणानें त्याच्यावर लादली आहे. वर ' राष्ट्रमुधारय ' हें ऋग्वेदांतील सूत्रवचन म्हणजे सर्व जागतिक राजकारणाचें आदिबीज–त्रिकालाबाधित अनुभवसिद्ध महावाक्य–आहे, असें म्हटलें तर त्याला कोणी विरोध करील अगर नांव ठेवील, असें आम्हांस वाटत नाहीं. राष्ट्रधारणा म्हणजे राष्ट्राचें संरक्षण, राष्ट्राचें संपोषण व राष्ट्राचें संवर्धन या त्रयींचा त्यांत गर्भितार्थानें समावेश होतो असें नुकतेंच वर सांगण्यांत आलें आहे. राष्ट्ररक्षण या शब्दांत राष्ट्राचें म्हणजे प्रजेचें अंतर्गत दुष्ट व दुराचारी लोकांपासून व राष्ट्राबाहेरील परशत्रूंपासून रक्षण, तसेंच राष्ट्रपोषण म्हणजे राष्ट्रांतील प्रजेचें अन्नवस्त्रादिकांचें सौलभ्य व समृद्धि राष्ट्रवर्धन या शब्दांत राष्ट्रांतील विद्या व शास्त्र, व्यापार-उद्योग, कलाकौशल्य व न्यायनीति यांची वाढ व विकास,अर्थात् या व यासारख्या राष्ट्राच्या महत्त्वाच्या अंगांचा समावेश होतो.इतका विशाल व सूक्ष्म अर्थ 'राष्ट्रमुधारय' या एवढ्याशा चिमुकल्या सूत्रांत तात्पर्यरूपानें गर्भित होऊन राहिला आहे. आणि आजकालचें राजकारण तरी याशिवाय व यापलीकडे असें निराळें काय आहे ? जगांतील सर्व सुविचारी व सुधारलेल्या राष्ट्रांचें राजकारण या सूत्राच्या धोरणानेंच वाटचाल करीत आलेलें व करीत असलेलें दिसून येत नाहीं काय ?

पण राजावर ही टाकण्यांत आलेली महत्त्वाची जबाबदारी ती पार पाडावयाची कशी ? एकट्या राजाकडून ती गोष्ट घडून येईल हें शक्य व संभवनीय नाहीं ! त्याला प्रजेचा पाठिंबा, सहकार्य व सहानुभूति यांची अत्यंत जरूरी आहे. तसें म्हटलें तर राष्ट्रलक्ष्मी सांभाळण्याची जबाबदारी

प्रजेवरच आहे. ‘ श्रीर्वै राष्ट्रस्य भारः ’ राज्यलक्ष्मी सांभाळणेचा बोजा राष्ट्राचा म्हणजे प्रजेचा आहे, ही वैदिक ऋषींची–योगीश्वर याज्ञवल्क्यजींची–कल्याणकारक मंगल वाणी भारत राष्ट्राला अत्यंत मननीय आहे. राजाला राज्यसुव्यवस्थेसाठीं राज्यांत योग्य व लायक अधिकारी नेमावयाचे असतात, व परचक्रापासून रक्षण करण्यास शूर व रणविद्याकुशल असे वीरहि लागतात. राजानें प्रजेंतील चांगले व सुस्वभावी असे लायक लोक निवडून, त्यांची अधिकारपदावर योजना केली पाहिजे व त्याबरोबरच त्यांच्या योग्यतेनुसार त्यांचा योगक्षेम सुरळीत व सुखरूप चालेल अशी आर्थिक तरतूदहि केली पाहिजे. त्याशिवाय राजकारण प्रभावी व सुखावह होण्याची आशा नाहीं. राष्ट्रशकट सुरळीत व सुसूत्र व सुव्यवस्थित चालावयाचा तर त्याला आर्थिक नियोजनाची आवश्यकता आहे, हें आतां उघड सांगावयास पाहिजे असें नाहीं. आणि तो आर्थिक निधि जमवावयाचा तो प्रजेकडून करग्रहणाच्या रूपानें जमवावयास पाहिजे आणि तो अधिकार इंद्रानें राजास देऊन ठेविला आहे. ऋग्वेदांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, हे राजन् ! इंद्रदेव हा प्रजेला तुला कर देणारी करील. (‘ अथो त इन्द्रः केवलीर्विशो बलिहृतस्करत् ’ १०-१७३-६ ) यावरून राज्यकारभार चालविण्यासाठीं प्रजेकडून माफक कर वसूल करण्याचा अधिकार वेदांतून राजाला देण्यांत आला आहे.

आतां हा कर किती वसूल करावयाचा व कसा वसूल करावयाचा याचा ओझरता उल्लेख केल्याशिवाय या प्रश्नांचा संपूर्ण उलगडा केल्यासारखा होत नसल्याकारणानें, त्याबद्दल दोन शब्द येथें लिहून ठेवितों. याविषयीं खुद्द ऋग्वेदांत उल्लेख आढळत नाहीं, पण त्याचा खुलासा इतिहास पुराणांत आढळतो. त्याच्या मदतीनें हें पुढील विवेचन आहे असें समजावें. राजानें प्रजेकडून वसूल करावयाचें कराचें प्रमाण महाभारतांत सांगितलें आहे, ते असें:—‘ आददीत बलिं चापि प्रजाभ्यः कुरुनंदन । षड्भागमपि प्राज्ञस्तासामेवाभिगुप्तये ॥’–राजानें प्रजेकडून उत्पन्नाचा एक षष्ठांश भाग कर म्हणून घ्यावा व ती सर्व रक्कम तिच्या संरक्षणाप्रीत्यर्थच खर्च करावी. ( शां. प. १२-६९-२५ ). महाभारतानें

स्पष्टच राजाला हिताचा इशारा दिला आहे कीं, हे राजा! लोभबुद्धीनें किंवा अधर्मानें प्रजेवर करभार लादून जुलूम जबरदस्तीनें द्रव्य संपादन करण्याच्या हव्यासास पडूं नकोस! (' मास्म लोभेन नाधर्मेण लिप्सेथास्त्वं धनागमम् ' (शां. प. १२-७१-१३). अर्थात् राजानें अगर राज्यकर्त्यांनीं करवसुलीच्या बाबतींत मालाकाराची भूमिका धारण करावी. म्हणजे माळी जसा आपल्या बागेंतील फक्त फळें व फुलें तेवढींच तोडतो पण झाडाला इजा करीत नाहीं, तद्वत् राजानें प्रजेला न दुखवितां तिच्याकडून करभार वसूल करावा. झाडें जाळून त्याचे कोळसे करणाऱ्याची वृत्ति धारण करूं नये. [' मालाकोरोपमो राजन्भव माऽङ्गारिकोपमः। तथा युक्तश्चिरं राज्यं भोक्तुं शक्ष्यसि पालयन् ॥ ' (शां. प. १२-७१-२) असाच दुसरा दृष्टान्त द्यावयाचा म्हणजे मधमाशीचा देतां येईल. मधमाशी फुलाला इजा न करतां जशी त्यांतील मकरंद तेवढाच आकर्षून घेते, तद्वत् राजाचेंहि कराबाबत वर्तन असावें. म्हणजे प्रजेला न दुखवितां तिच्याकडून करभार वसूल करावा, यांत राजकर्त्याचें हित व कल्याण आहे. पण द्रव्याच्या अवास्तव लोभाला बळी पडून प्रजेकडून भारी कर उकळण्याचें व्यसन हें राष्ट्रोत्कर्षाच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट व आत्मघातक ठरतें. ' अर्थमूलोऽपि हिंसां च कुरुते स्वयमात्मनः। करैरशास्त्रदृष्टैर्हि मोहात्संपीडयन्प्रजाः ' ॥ (शां. प. १२-७१-१५) हें भारतवचन सदैव डोळ्यांपुढें ठेवून सत्ताधीशांनीं कराची योजना आंखावी. यांतच राज्यकर्त्यांचें हित व राष्ट्राचें कल्याण आहे असें सांगण्याचा भारतकारांचा भाव आहे.

या बाबतींत विशेष सांगावयाचें म्हणजे हें कीं—

राजा अगर राज्यकर्ते जे कोणी असतील, त्यांनीं या कराच्या बाबतींत सावधगिरी बाळगणें हें त्यांच्या हिताचें आहे. एक गोष्ट त्यांनीं सतत लक्षांत ठेविली पाहिजे. ती म्हणजे ही कीं प्रजेवर लादावयाचा जो कर, तो न्याय व वाजवी असून, केव्हांहि प्रजेला सहज झेपतां येण्यासारखा असावा. तिच्या शक्तीच्या बाहेरचा नसावा. कोणत्याहि कारणानें कां असेना, कराचें प्रचंड ओझें प्रजेला असह्य होऊन तिच्या मनाचा तोल

सुटेल तर मोठा अनर्थ घडून आल्याशिवाय राहणार नाहीं, ही गोष्ट प्रजेवर जुलूम करून, सत्तेच्या जोरावर सरकारी तिजोरींत धनलोभानें अवास्तव भर घालूं पाहणाऱ्या राज्यकर्त्यांनी जरूर लक्षांत ठेवावी. याविषयीं याज्ञवल्क्यांनीं लोभी व जुलमी राज्यकर्त्यांना उद्देशून खणखणीत व झणझणीत असा सावधगिरीचा अत्यंत प्रखर इषारा देऊन ठेविला आहे, तो कोणत्याहि राज्यकर्त्यांना केव्हांही मननीय असाच आहे. पहा, योगीश्वर काय म्हणतात तें:—' अन्यायेन नृपो राष्ट्रात्स्वकोशं योऽभिरक्षति । सोऽचिराद्विगतश्रीको नाशमेति सबांधवः ॥ प्रजापीडनसंतापात्समुद्भूतो हुताशनः । राज्ञः कुलः श्रियं प्राणान्नादग्ध्वा निवर्तते ॥ ( या. स्मृ. १-३३८-३३९ ). भावार्थः— जो राजा अन्यायानें प्रजेला पिळून कराच्या रूपानें आपल्या तिजोरींत भर घालूं पाहतो, तो लवकरच राज्यलक्ष्मीपासून भ्रष्ट होऊन आपल्या सर्व बांधवांसह व सहकाऱ्यांसह नाश पावतो ! ! जुलमी व असह्य करभारानें प्रजा जेव्हां चेपली जाऊन तिच्या मनाचा तोल सुटेल, तेव्हां जुलमानें गांजल्या गेलेल्या प्रजेच्या विराट देहांतून मनःसंतापाचा प्रचंड भडका उठून, त्यांत राजपुरुषांची आहुति पडल्याशिवाय तो भडकलेला प्रजाकोपाग्नि केव्हांहि शमन पावणार नाहीं !! ही धोक्याची सूचना डोळ्यांआड करून, जे राज्यकर्ते तिजोरींत भर घालूं पाहतात, त्यांचें जीवित मागेंपुढें धोक्यांत आल्याशिवाय राहणार नाहीं, हें त्यांनीं पक्कें समजून राहावें, असा वैदिक ऋषींचा सावधगिरीचा, झणझणीत पण पथ्यकर इशारा आहे. एवंच मुद्दा काय तर, प्रजा राजाला खुषीनें कर देण्यास पुढें येईल, अशा बेतानेंच कराची आंखणी करावी आणि त्यांतच राजाचें व प्रजेचें दोघांचेंहि हित व कल्याण आहे.

आतां आदर्श राष्ट्राची थोडक्यांत कल्पना देऊन प्रस्तुत विषयाला पूर्णविराम देतों.

राष्ट्र सर्वांगपरिपूर्ण होऊन तें सुखी, संपन्न व संतुष्ट केव्हां होईल अगर होऊं शकेल—अर्थात् आदर्श राष्ट्र कसें असावें व कसें असलें तर तें सुखशांतीच्या मंगल वातावरणांत नांदूं शकेल—याचें वेंचक शब्दांत पण अत्यंत मार्मिक असें सुंदर चित्र वैदिक ऋषींनीं मोठ्या कौशल्यानें रंगवून, तें भारत

जनतेपुढें ठेविलें असून, तें आजहि अभ्युदयोन्मुख नवभारत राष्ट्राला मार्गदर्शन करण्यांत अत्यंत उद्‌बोधक व उपकारक होईल, असें वाटल्यावरून आम्ही त्याचें ढोबळपणें मननीय व आदरणीय चित्र येथें रेखाटून दाखवीत आहों. राष्ट्राचें हें मंगलमय ध्येयचित्र योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या शुक्ल यजुर्वेदांत चित्रित करण्यांत आलें असून तें असें आहे:—हे ब्रह्मन् ! या आमच्या राष्ट्रांत–पुण्यशील भरतभूमींत–वेदविद्यासंपन्न असे तेजस्वी व कर्मयोगी ब्राह्मणश्रेष्ठ निपजोत ! ( ' आ ब्रह्मन्ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायताम् ' शु. य. २२-२२ ). त्याचप्रमाणें आमच्या राष्ट्रांत शूर, धनुर्धारी, युद्धकलाविशारद व पराक्रमी असे महारथी क्षत्रियपुंगव निपजोत ! ( 'आ राष्ट्रे राजन्यः शूर इषव्योऽतिव्याधी महारथो जायताम् ' ) आमच्या देशांत धष्टपुष्ट अशा प्रभूत दूध देणाऱ्या सुंदर गायी निपजोत ! ( ' दोग्धी धेनुः जायताम् ), चांगले धट्टेकट्टे भारवाहक बैल निपजोत ! ( ' वोढानड्वान् ( जायताम् ) ). आणि वायुगतीनें धांवणारे असे चपल घोडे निपजोत ! ( ' आशुः सप्तिः ' ( जायताम् ) ). त्याचप्रमाणें हे ब्रह्मन् ! आमच्या राष्ट्रांत सर्वांगसुंदर व सद्‌गुणमंडित अशा रूपलावण्यसंपन्न तेजस्वी स्त्रिया निपजोत ! ( 'पुरन्धिर्योषा' ( जायताम् ) ). आमच्या सुपीक जमिनींत आमच्या प्रार्थनेप्रमाणें वेळोवेळीं पर्जन्यराज जलवर्षाव करो ! ( 'निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु '). आणि आमच्या भूमींत फलधान्यादिकांचीं भरघोंस पिकें येऊन, सर्वत्र आबादीआबाद होवो ! ( फलवत्यो न ओषधयः पच्यन्ताम् ' ) आणि आमच्या राष्ट्रांतील लोकांचा योगक्षेम सुखरूप व सुरळीत चालो !! ('योगक्षेमो नः कल्पताम् ' २२-२२) या पांच हजार वर्षांपूर्वी रंगविलेल्या आदर्श राष्ट्रचित्राच्या तोडीची राष्ट्रकल्पना इतरत्र आढळूं शकेल कीं काय याविषयीं संशयच आहे, असें म्हटल्यास तें गैर होईल काय ? असो.

## वैदिक आर्यांची संग्रामकला

ऋग्वेद ग्रंथांतून वाटचाल करतांना पदोपदीं असें आढळून येतें कीं, त्या वेळीं युद्धाचे प्रसंग हरहमेष उपस्थित होत असत. तेव्हां वैदिक लढा-

ईची तयारी कशी काय करीत हें पाहणें उद्बोधक वाटल्यावरून त्याची येथें तोंडओळख करून देऊं इच्छितों.

**संग्राम-साहित्य**

संग्रामसमयीं वैदिक आर्य आत्मरक्षणार्थ व शत्रूंस जेरीस आणण्यास कोणकोणत्या आयुधांचा व शस्त्रांचा उपयोग करीत, याविषयीं ऋग्वेदांत विशेष माहिती आढळत नसली तरी जी काय इथें तिथें विखुरली आहे, तिच्या आधारावर आम्ही ही खालील माहिती देत आहों. लढाईंत वेदकाळीं मुख्यत्वानें वापरण्यांत येणारें आयुध म्हणजे धनुष्य हें होय. हें धनुष्य भरीव व मजबूत अशा वेळूचें अगर वेताचें केलेलें असून, तें प्रथम अर्धवर्तुलाकार वांकवून त्याचीं दोन्ही टोंकें कातड्याच्या अगर आंतड्याच्या वळलेल्या दोरीनें बांधलेलीं असत. त्या दोरीला ज्या असें नांव आहे. या दोरीला मधोमध बाण लावून दोरी कानापर्यंत ओढून चटकन् सोडून दिल्याबरोबर तो बाण सूं सूं करीत जोरानें जाऊन, शत्रूच्या सैन्यांत घुसून तेथील लोकांच्या शरीरांत घुसून बसे. बाण हा वेताच्या बारीक छडीचा हातभर लांबीचा असून, त्याच्या अग्रभागीं हाडाचें अगर लोखंडाचें अणुकुचीदार टोंक बसविलेलें असून, मागच्या बाजूस पीस लावलेलें असे. यामुळें तो बाण जोरानें सणसणत नेमक्या स्थळीं जाऊन पडे. वैदिक आर्यांचें संग्रामांत लढण्याचें हें सर्वांत मुख्य व प्रभावी आयुध होतें. श्रीरामचंद्रानें याचा मोठ्या कौशल्यानें उपयोग करून लंकाधीश रावणाचा सप्पा उडविला व पंडुपुत्र अर्जुनानें कुरुक्षेत्रावर मोठा प्रलय माजवून अधिकारमदानें धुंद झालेल्या कौरवांना चांगली धूळ चारली. वैदिक आर्यांचा या धनुष्यबाणांवर फार मोठा विश्वास असे. त्याच्या जिवावर ते फार मोठी प्रौढी मिरवीत. याविषयीं ऋग्वेदांतील एक ऋचा फार मननीय आहे ती येणेंप्रमाणें:—

‘ धन्वना गा धन्वनाजिं जयेम
धन्वना तीव्राः समदो जयेम ।
धनुः शत्रोरपकामं कृणोति
धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम ॥ ’ ६-७५-२

**भावार्थः**—धनुष्याच्या सहाय्यानें आम्ही शत्रूंचें गोधन जिंकूं! धनुष्याच्या जोरावर आम्ही शत्रूचा पाडाव करूं! धनुष्याच्या योगानें शत्रूच्या कडव्या सैन्यावर जय मिळवूं! हें आमचें धनुष्य शत्रूचे सर्व मनोरथ हाणून पाडो! फार काय, धनुष्याच्या मदतीनें आम्ही सर्व दिशांतील सर्व शत्रूंवर हमखास जय मिळवूंच मिळवूं! ७–७५–२.

यावरून वेदकालीन आर्यांची धनुष्यावरील निष्ठा चांगली प्रतीत होते.

बाण संग्रहीं ठेवण्यासाठीं धनुर्धारी योद्धे एक पिशवी पाठीवर बांधून घेत असत. याला इषुधि म्हणजे भाता असें म्हणत ('इषुधिः सङ्काः पृतनाश्च सर्वाः पृष्ठे निनद्धो जयति प्रसूतः' ६-७५-५). बाण सोडतांना धनुष्याच्या दोरीचा हातावर जो आघात होतो, तो टाळण्यासाठीं डाव्या हातावर कातड्याचे केलेलें हस्तघ्न नांवाचें कवच गुंडाळण्यांत येई. ('अहिरिव भोगैः पर्येति बाहुं ज्याया हेति परिबाधमानः। हस्तघ्नो विश्वा वयुनानि विद्वान् पुमान् पुमांसं परि पातु विश्वतः॥'६-७५-१४) प्रत्येक योद्धा बाहेर जातांना धनुष्य व बाण बरोबर घेऊन जाई. या आयुधाचा उपयोग शत्रूला अगर इतर दुष्ट प्राण्याला लांबूनच घायाळ करून त्याला जमिनीवर लोळविण्याच्या कामीं फार चांगला होत असे.

याशिवाय खड्ग, भाला, परशु, बर्ची, इत्यादि दुसरीं अनेक हत्यारें असून, शत्रू अगदीं हातघाईवर आला म्हणजे त्यांचा यथाप्रसंग उपयोग करण्यांत येई. पवीर म्हणजे हत्यार होय. ('यो जजान् महिषाँ इवाऽतितस्थौ पवीरवान्। उतापवीरवान् युधा' १०-६०-३). निषङ्गि म्हणजे खड्ग. ('स इषुहस्तैः स निषङ्गिभिर्वशी संस्रष्टा स युध इन्द्रो गणेन' १०-१०३-३). चक्र हें एक वर्तुळाकार शस्त्र असून तें गरगर फिरवून शत्रूवर फेंकलें म्हणजे शत्रूला हमखास घायाळ करून, त्यास जमिनीवर लोळवी. ('चक्रेण ताँ अप वप ऋजीषिन्' ८-९६-९). विष्णूचें सुदर्शन चक्र प्रसिद्धच आहे. भाल्याला वेदांत 'सृक' असें म्हटलें आहे. शंकराचें त्रिशूल हें त्यांपैकींच होय. ('सृके यत् त्वा प्रत्यहन् देव एकः' १-३२-१२) 'सृकं संशाय पविमिन्द्रं तिग्मं' १०-१८०-२) शक्ति हें

नांव बर्चीचें आहे. ( ' शक्तीवन्तो गभीराः ' ६-७५-९ ). कुऱ्हाडीला वेदांत वाशि म्हटलें आहे. ( ' वाशीमेको बिभर्ति हस्त आयसीमन्तर्देवेषु निध्रुविः ' ८-२९-३ ). हें त्वष्ट्याचें हत्यार आहे. परशूचाहि लढाईत चांगला उपयोग होई. ( ' अभीदु शक्रः परशुर्यथा वनं पात्रेव भिन्दन् त्सत एति रक्षसः ' ७-१०४-२१; ' देवास आयन् परशूँरबिभ्रन् वना वृश्चन्तो अभिविड्भिरायन् ' १०-२८-८ ). अशीं हीं ऋग्वेदांतील कांहीं उल्लेखनीय शस्त्रास्त्रें होत. शिवाय दगडाचीं हत्यारें, हाडांचीं हत्यारें, घोड्याच्या बरगड्यांचीं हत्यारेंहि असत. इंद्राचें वज्र प्रथम दगडाचेंच होतें. नंतर तें लोखंडाचें झालें. इंद्रानें दधीची ऋषीच्या हाडाचें शस्त्र बनवून त्यानें वृत्रास रंजीस आणलें असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. शिवाय पाण्याच्या फेसाचाहि शस्त्राप्रमाणें उपयोग करण्यांत येत असे. पाण्याच्या फेसानें इन्द्रानें नमुचीचें शीर धडापासून उडविलें असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. ( ' अपां फेनेन नमुचेः शिर इन्द्रोदवर्तयः ' ८-१४-१३ ). असो. याप्रमाणें युद्धकालीन शस्त्रांची वेदकालीन ही अशी कथा आहे.

**योद्ध्याचा पोषाख**

लढाईस जाते वेळीं योद्धे बचावासाठीं अंगांत कवच घालीत. त्याला ' द्रापि ' हें नांव आहे. ( ' बिभ्रद् द्रापिं हिरण्ययं वरुणो वस्त निर्णिजम् ' १-२५-१३ ). त्याला वर्मन् असेंहि म्हणत. शरीराला शस्त्रास्त्राचा कसलाहि आघात होऊन इजा होऊं नये म्हणून शरीररक्षणार्थ या कवचाचा लढाईत उपयोग करण्यांत येई. हें ' वर्मन ' पोलादी पत्र्याचे लहानलहान तुकडे जोडून तयार केलेलें एक अभेद्य कवच असून, तें अंगांत घातलें म्हणजे शरीराला शस्त्रापासून बाधा होण्याची भीति नसे. म्हणून मोठमोठे योद्धे—विशेषतः रथांत बसून लढणारे वीर—याचा सर्रास उपयोग करीत. आणि त्याचप्रमाणें डोक्याला शस्त्रप्रहारापासून रक्षण करण्यासाठीं डोक्यावर शिरस्त्राण घालीत. याला शिप्र असें नांव आहे. या कवचाचा महिमा ऋग्वेदांत एके ठिकाणीं वर्णन करण्यांत आला आहे. तो असाः—' जीमूतस्येव भवति प्रतीकं यद् वर्मी याति समदामुपस्थे । अनाविद्धया तन्वा जय त्वं स त्वा वर्मणो महिमा पिपर्तु ' (६-७५-१)

**भावार्थः**—रणभूमीवर जाणारा राजा अंगांत जेव्हां कवच धारण करतो, तेव्हां तो मेघासारखें गंभीर स्वरूप धारण करतो. हे राजन् ! अनाविद्ध शरीरानें तूं शत्रूंशीं लढून त्यांवर विजय संपादन कर ! कवचाचें हें प्रसिद्ध सामर्थ्य रणांत तुझें संरक्षण करो !

**संग्रामांतील सैन्यरचना**

लढाईच्या वेळीं जें सैन्य उभें करण्यांत येई, त्यांत पायदळ, घोडेस्वार व रथी असे त्यांत तीन प्रकार असत. पायदळ हें सर्वांत पुढें असे. त्याच्यामागें घोडदळ व त्याच्या पिछाडीस रथी असत. पायदळाला पत्ती अशी संज्ञा असून, त्यांत सामान्य प्रतीच्या लढवय्यांचा भरणा असे. सर्वांत शूर व पराक्रमी योद्धे हे रथांत बसून लढत. त्यांच्या रथाला घोडे जुंपलेले असून ते चांगले बळकट व खंबीर असत. रथाच्यापुढें रथ हाकणारा असून, त्यास सारथी म्हणत असत. हा सारथी रथांत उजव्या बाजूला बसून घोड्याला योग्य मार्गदर्शन करी. योद्धा हा डाव्या बाजूला बसून शरसंधान करी. हत्तीचाहि उपयोग रणांत करण्यांत येई. पण तो अगदीं क्वचित्.

रणांत लांबून लढावयाचें झालें तर धनुष्यबाणांचा उपयोग करीत व जवळून लढावयाचें झालें तर तलवार, भाला, बर्ची, परशु इत्यादिकांचा उपयोग करीत.पायदळ हें बहुतेक धनुर्बाणाचा व हत्यारांचा आणि अश्वदळ हें तलवार व भाला यांचा उपयोग करी. कारण अश्वदळाला धनुर्बाणाचा उपयोग करणें फारसें अनुकूल होत नसून,भाला व तलवार चालविणें त्यांना चांगलें साधे व इतर शस्त्रांचाहि ते प्रसंगानुसार उपयोग करीत असत. रथांत बसून लढणारे रथी मात्र धनुर्बाणांचा सर्रास उपयोग करीत. या तीनहि प्रकारच्या लढवय्या वीरांत घोडेस्वारांची मर्दुमकीच मोठी प्रभावी असे. असो.

त्या वेळीं हल्लींप्रमाणें पगारी खडें सैन्य असल्याचें दिसत नाहीं. पण राष्ट्रांत बहुतेक सर्व पुरुष लढाईचें खाजगी रीतीनें शिक्षण घेऊन तयार होत असत. प्रत्येक कुटुंबांत हें शिक्षण घेऊन एकटा तरी तयार असे.

ब्राह्मण देखील युद्धकलेंत निष्णात असत. परशुराम, द्रोण, कृप, अश्वत्थामा हीं उदाहरणें पुराणांत प्रसिद्ध आहेत. अर्थात् लढाऊ वृत्ति ही त्या वेळीं प्रत्येक पुरुषांत कमीअधिक मानानें असेच असे. राजा हा आपल्या रक्षणार्थ कांहीं शस्त्रधारी लोक वाड्यावर व देशरक्षणार्थ किल्ल्यावर ठेवीत असे. पण खडें सैन्य असें फारच थोडें असे. तथापि लढाईचा प्रसंग आला म्हणजे राष्ट्रांतील सामान्य प्रजाजन आपण होऊनच सैन्यांत येऊन दाखल होत असत, व आपला पराक्रम गाजवून विजयी झाल्यावर शत्रूच्या शिबिरांत व राज्यांत शिरून तेथील संपत्ति व इतर मौल्यवान चीजवस्त लूटमार करून घरीं आणीत. हें प्रत्यक्ष लढाईत भाग घेणाऱ्या सैनिकांविषयीं झालें.

याशिवाय दुंदुभि वगैरे रणवाद्यें वाजविणारे, सैन्यांतील लोकांची शिबिरांत व्यवस्था ठेवणारे, शत्रूकडून बातमी आणणारे, राष्ट्रध्वज संभाळणारे व मागें राहून इतर पडलेलीं कामें करणारे अशा लोकांचाहि त्यांत भरणा असे. हे लोक लढाईत प्रत्यक्ष भाग घेणारे नसून, मागें राहून लढणाऱ्या लोकांना सर्व प्रकारची मदत करीत असत.

**रणवाद्यें**

लढाईतील मुख्य रणवाद्य म्हणजे दुंदुभि हें होय. शिवाय रणभेरी, डंके, शिंग, ढोलगे, शंख इत्यादि अनेक वीरवाद्यें वाजविण्यांत येत. त्यांत प्रामुख्यानें दुंदुभीचा ऋग्वेदांत उल्लेख करण्यांत आला आहे. कारण वीरांच्या वीरश्रीला प्रोत्साहन या दुंदुभिघोषणानेंच सर्वांत अधिक मिळे. या वाद्याला उद्देशून ऋग्वेदांत म्हटलें आहे तें असें:—

‘ उप श्वासय पृथिवीमुत द्यां पुरुत्रा ते मनुतां बिष्ठितं जगत् ।
स दुन्दुभे सजूरिन्द्रेण देवैर्दूराद् दवीयो अप सेध शत्रून् ॥६-४७-२९॥
‘ आ क्रन्दय बलमोजो न आ धा निः ष्टनिहि दुरिता बाधमानः ।
अप प्रोथ दुन्दभे दुच्छुना इत इन्द्रस्य मुष्टिरसि वीळयस्व ॥६-४७-३०॥
आमूरज प्रत्यावर्तयेमाः केतुमद् दुन्दुभिर्वावदीति ।
समश्वपर्णाश्चरन्ति नो नरोऽस्माकमिन्द्र रथिनो जयन्तु ॥ ६-४७-३१॥

**भावार्थः**—हे दुंदुभे ! पृथ्वी व द्युलोक यांना तूं आपल्या रणगंभीर गर्जनांनीं निनादून सोड ! सर्व स्थावर जंगम सृष्टीला तुझी रणगंभीर गर्जना खणखणीत ऐकूं येऊं दे! हे दुंदुभे! इंद्र व देव यांच्या मदतीनें तूं आमच्या शत्रूंना दूर–अत्यंत दूर–पिटाळून लाव ! आमच्या सैनिकांत बल व उत्साह उत्पन्न कर ! आमच्या संकटांचा परिहार करीत, तूं सतत गंभीर गर्जना करीत रहा ! आणि आम्हांला छळणाऱ्या व दुःख देणाऱ्या शत्रूंना पार रणांतून पिटाळून लाव ! हा दुंदुभि सर्वांस ऐकूं येईल असा घनगम्भीर आवाज करीत आहे. हें पहा ! आमचे शूर घोडेस्वार शत्रूंशीं लढण्यांत आतां दंग होऊन गेले आहेत ! तर, हे इंद्रदेवा ! त्या आमच्या रणगाजी वीरांना शत्रूंवर विजय मिळेल असें कर !!

**राष्ट्रध्वज**

लढाईस तोंड लागावयाच्या वेळीं प्रथम सूचनावजा दुंदुभि व इतर रणवाद्यें वाजविण्यांत येत व तीं लढाई संपेपर्यंत चालूं राहत. त्याच वेळीं राष्ट्रध्वज उभारण्यांत येऊन तो वातावरणांत उंच फडकविला जाई. हा राष्ट्रध्वज म्हणजे राष्ट्राचा प्राण असल्यामुळें त्याचें मोठ्या कसोशीनें रक्षण करण्यांत येई. जोंपर्यंत तो आकाशांत उंच फडकत राही व सर्वांस दिसे, तोंपर्यंत त्याच्या जिवावर व आश्रयाखालीं लढणारें वीर मोठ्या शौर्यानें व उत्साहानें लढत रहात. पण तो खालीं उतरविला गेला अगर शत्रूच्या स्वाधीन झाला तर पराजय झाल्याचें तें चिन्ह समजलें जाई. या ध्वजाचा उल्लेख वेदांत आला आहे तो असाः—'अस्माकमिन्द्रः समृतेषु ध्वजेष्वस्माकं या इषवस्ता जयन्तु । अस्माकं वीरा उत्तरे भवन्त्वस्माँ उ देवा अवता हवेषु ॥ १०-१०३-११ ॥

लढाईला प्रारंभ व्हावयाच्या अगोदर प्रथम इन्द्राची व इतर देवांची विजयप्राप्त्यर्थ प्रार्थना करण्यांत येई. त्या वेळीं राजपुरोहित तेथें हजर राहून इंद्राप्रीत्यर्थ सोमयाग करून, त्याला सोमरस अर्पण करण्यांत येई व राहिलेला सोमरस सैन्यांत सर्वांना वाटून दिला जाई. त्यावेळीं सैन्यांतील सर्व लोक सोमपान करून मग लढाईस प्रारंभ करीत. कारण हें सोमपान उत्साहवर्धक पेय असल्यामुळें तें पान करण्याचा त्या वेळचा

प्रघात असे. या वेळीं इन्द्राची जी प्रार्थना करण्यांत येई ती खरोखर मोठी मननीय आहे. ती प्रार्थना अशीः—

**इन्द्र-प्रार्थना**

'बलविज्ञायः स्थविरः प्रवीरः सहस्वान् वाजी सहमान उग्रः। अभिवीरो अभिसत्वा सहोजा जैत्रमिन्द्र रथमा तिष्ठ गोवित् ॥ ५ ॥ गोत्रभिदं गोविदं वज्रबाहुं जयन्तमज्म प्रमृणन्तमोजसा। इमं सजाता अनुवीरयध्वमिन्द्रं सखायो अनु सं रभध्वम् ॥६॥ अभि गोत्राणि सहसा गाहमानोऽदयो वीरः शतमन्युरिन्द्रः। दुश्च्यवनः पृतनाषाळयुध्यो३ऽस्माकं सेना अवतु प्र युत्सु ॥७॥ इन्द्र आसां नेता बृहस्पतिर्दक्षिणा यज्ञःपुर एतु सोमः। देवसेनानामभिभञ्जतीनां जयन्तीनां मरुतो यन्त्वग्रं ॥ ८ ॥ इन्द्रस्य वृष्णो वरुणस्य राज्ञ आदित्यानां मरुतां शर्ध उग्रम्। महामनसां भुवनच्यवानां घोषो देवानां जयतामुदस्थात् ॥९॥ उद्धर्षय मघवन्नायुधान्युत् सत्वनां मामकानां मनांसि। उद्वृत्रहन् वाजिनां वाजिनान्युद्रथानां जयतां यन्तु घोषाः ॥ १० ॥ अस्माकमिन्द्रः समृतेषु ध्वजेष्वस्माकं या इषवस्ता जयन्तु। अस्माकं वीरा उत्तरे भवन्त्वस्माँ उ देवा अवता हवेषु ॥ ११ ॥ अमीषां चित्तं प्रतिलोभयन्ती गृहाणाङ्गान्यप्वे परेहि। अभि प्रेहि निर्दह हृत्सु शोकैरन्धेनामित्रास्तमसा सचन्ताम् ॥ १२ ॥ (१० १०३-५ ते १२)

( १ ) **भावार्थः**—हे इंद्र देवा ! सामर्थ्यसंपन्न, अत्यंत थोर, महायोद्धा, पराक्रमशाली, शत्रुमर्दन, उग्र, रणगाजी असा तूं आतां विजयशाली रथांत आरूढ हो ! अहो आमचे लढवय्ये वीर हो ! हा इंद्र म्हणजे तुम्ही काय समजलां ? तो मोठा पर्वत-भेत्ता आहे ! तो वज्रबाहू आहे ! तो उदंड जयशाली आहे ! शत्रूंना धूळ चारणारा आहे ! तर तुम्ही आतां त्याला अनुसरून सग्राम गाजवा ! आणि आपल्या शौर्याची पराकाष्ठा करा ! तो इंद्रदेव रणांत उतरला म्हणजे अत्यंत कठोर आहे ! मोठा रागीट आहे ! तसाच थोर पराक्रमशाली आहे ! शत्रूंचा फडशा पाडणारा आहे ! असा तो इंद्र या लढाईत आमच्या सैन्याचें रक्षण करो ! आणि तोच आमच्या लोकांचा नायक होवो ! त्याचप्रमाणें बृहस्पति, सोम, यज्ञनारायण इत्यादि देव आमच्या सैन्याच्या अग्रभागीं

चालोत ! पराक्रमशाली इंद्राचें, राजा वरुणाचें, आदित्याचें व मरुतांचें सर्वश्रेष्ठ असें अजिंक्य सामर्थ्य आमच्या बाजूचें असो ! हा पाहा ! त्या दिव्य विबुधांचा दिव्य जयघोष आतां नभोमंडळांत निनादूं लागला ! हे इंद्र देवा ! आमचीं आयुधें आतां तीक्ष्ण कर ! आणि मनें रणोत्साहानें भरून काढ ! आमच्या घोड्यांचे वेग वाढोत ! आणि रथाचे घोष घुमूं लागोत ! इंद्र आमच्या ध्वजाचें रक्षण करो ! आमचे बाण शत्रूंना पिटाळून लावोत ! आणि विजयश्री आमच्या योद्धयांना माळ घालो ! हे देवहो ! तुम्ही आमच्या लढणाऱ्या शूर सैनिकांचें दक्ष राहून रक्षण करा ! हे अप्वे ! हे पापदेवते ! तूं आमच्या शत्रूंचीं अंतःकरणें मोहानें भरून काढ ! व त्यांचें शरीर ताब्यांत घे ! जा ! त्यांचीं हृदयें शोकाग्नीनें जाळून टाक ! आणि दुःखाच्या गाढ अंधकारांत त्यांना लोटून दे ! !

लढाई चालल्या वेळीं सैन्याला योग्य मार्गदर्शन करण्यासाठीं व त्यांना प्रोत्साहन देण्यासाठीं सेनाध्यक्ष हा घोड्यावर बसून सैन्यांत सारखा फिरत असे व त्याच्या नजरेखालीं व आज्ञांप्रमाणें सैन्याच्या हालचाली व लढाईचें काम चाले. त्या वेळीं सैन्याला उद्देशून पुरोहित हा पुढील उत्साहवर्धक मंत्र उच्च घोषानें उच्चारून रणांतील वीरांना मधूनमधून उत्साहप्रेरित करीत असे. तो मंत्र असाः—

'प्रेता जयता नर इन्द्रो वः शर्म यच्छतु ।
उग्रा वः सन्तु बाहवोऽनाधृष्या यथासथ ॥ १०-१०३-१३

शूर वीरहो ! शत्रु-सैन्यांत आतां जोरानें घुसा ! आणि मोठा पराक्रम गाजवून विजय मिळवा ! इंद्र तुम्हांला वीरोत्साह देईल ! तुमचे पराक्रमशाली बाहू आतां रणांत चांगला प्रभाव गाजवोत ! अर्थात् तुम्ही शत्रूंना दाद न देतां अजिंक्य होऊन रहाल ! !

**विजयोत्तर**

लढाईत विजय प्राप्त झाला म्हणजे शत्रूचें सैन्य जीव घेऊन सैरावैरा पळत सुटे. तेव्हां हें विजयी सैन्य त्यांचा पाठलाग करून त्याच्या शिबिरांत व राज्यांत शिरून त्यांची धूळधाण उडवून देई. त्यांच्या गांवांत व घरांत शिरून तेथील संपत्ति, पशु, धनधान्य व इतर मौल्यवान

चीजवस्त यथेच्छ लूटमार करून बरोबर नेई. आणि त्यांचीं बायकामुलें पकडून आणून गुलामाप्रमाणें त्यांना घरकामांत राबवून घेत. लढाईंत जी संपत्ति मिळे ती प्रथम सगळी एकत्र करण्यांत येऊन, राजा ती सर्वांस ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वांटून देई व आपल्याकडेहि त्यांतला कांहीं भाग ठेवून घेऊन त्यांतून कांहीं पुरोहिताला, विद्वानांना व भाट वगैरे लोकांना वाटून देऊन, त्यांचा यथोचित मानसत्कार करी. अशी ही थोडक्यांत वैदिक आर्यांची संग्राम-कथा आहे.

## जशास तसें

सकृद्दर्शनीं हें सांगून ठेवणें जरूर आहे कीं, वैदिक आर्य हे सरळ कल्याणमार्ग चोखाळणारे असून, दुसऱ्यांना उपद्रव देण्याची अगर त्यांची नसती उठाठेव करण्याची किंवा त्यांची चीजवस्त अपहरण करण्याची दुष्ट प्रवृत्ति त्यांच्यांत दिसून येत नाहीं. अर्थात् ते शांततामय जीवनक्रमाचे चाहते व भोक्ते होते, असें म्हटल्यास त्यांत अतिरंजितपणाचा दोष येण्याचा संभव नाहीं. तथापि इतकें मात्र खरें कीं आत्मरक्षणाच्या बाबतींत मात्र त्यांची वृत्ति सिंहासारखी गंभीर व तेजस्वी होती. ते दुसऱ्याच्या वाटेस सहसा जात नसत व दुसऱ्याचें अहितहि चिंतीत नसत, हें जितकें खरें, तितकेंच त्यांच्या वाटेस जर कोणी आले तर त्यांची गयहि ते मुळींच करीत नसत. ते जात्याच निरुपद्रवी आणि शांत व सरळ स्वभावाचे हें खरें. पण त्याच वेळीं हेंहि सांगितलें पाहिजे कीं त्यांना जर कोणी डिवचूं पाहील अगर दुखवूं पाहील, तर वाघाच्या छातीनें त्याच्यावर तुटून पडून, त्याचें पारिपत्य करण्यास ते यत्किंचितहि मागेंपुढें पाहत नसत. ते स्वसंरक्षणाच्या बाबतींत अत्यंत दक्ष व कडवे झुंजार होते हें कांहीं खोटें नव्हे. ते स्वभावानें शांत व सौम्य होते, याचा अर्थ ते सामर्थ्यांत दुर्बल व संग्रामांत भ्याड होते असा नव्हे ! उलट ते निर्भय व निर्धास्त होते. आम्ही कोणांस भिणार नाहीं–' मा भेम ' ( ८-४-७ ), अशी त्यांची वज्रवाणी असून, प्रसंगविशेषीं ती आपली वीरघोषणा पणास लावून त्यांनीं ती परिणामीं यशस्वी करूनहि दाखविली आहे.

अर्थात् ते जसे देवोपासक—ज्ञानोपासक—होते, तसेंच ते बलोपासक—वीर्योपासकहि—होते. 'बलं धेहि तनूषु'—हे इंद्रा, तूं आमच्या शरीरांत सामर्थ्य दे—अशी त्यांची इन्द्रदेवाजवळ कळकळीची प्रार्थना होती. कारण ते ओळखून होते कीं जगांत सुरक्षित व सुखरूप नांदावयाचें झालें, तर बळ हेंच तेथें प्रभावी ठरतें. तेथें न्याय, नीति, शहाणपण यांची फारशी मात्रा चालत नाहीं. 'स्वस्ति पन्थामनुचरेम' हें तत्त्व टिकून राहावयाचें तर त्याला सामर्थ्याची प्रभावी जोड ही हवीच हवी.तरच तो मार्ग चोखाळता येईल. जगांत अब्रूनें व सुखासमाधानानें नांदावयाचें झालें तर तेथें शक्ति-देवतेचें अधिष्ठान हें हवेंच हवें. त्याशिवाय जीवनाला—अभिमानास्पद जीवनाला—वावच नाहीं. हें जग निर्बलाचें नव्हे, समर्थाचें आहे. निर्बलाला कोण विचारतो ? त्याला मानाचा पाट कोण देतो ? 'मृतोहि दुर्बल: पुरुषः' असा जगाचा न्याय असून, 'बलान्नास्ति श्रेष्ठतरं' ही उक्तीच त्रिकाल प्रभावी आहे. आणि ही गोष्ट जमेस धरून जगाचे सर्व व्यवहार चाललेले आहेत व चालत असतात. एवंच तात्पर्य काय तर देवोपासने-बरोबरच बलोपासनाहि अवश्य आहे, अशी त्यांची ठाम समजूत असून त्याप्रमाणें त्यांची वागणूक होती. 'बलं धेहि तनूषु' या प्रार्थनेवरून वैदिक आर्य हे देवोपासनेबरोबरच बलोपासकहि होते, हें स्पष्ट होतें.

पुनः आणखी, नुसती बलोपासना करून तेवढ्यावरच ते थांबले नव्हते. त्यांना शस्त्रास्त्रांचीहि चांगली माहिती होती; त्या विद्यें-तहि त्यांची स्पृहणीय प्रगति होती. तत्कालीन ज्ञात असलेल्या सर्व शस्त्रा-स्त्रांनीं—संग्रामोपकरणांनीं—ते सुसज्ज असून, रणांत त्यांचा ते कौशल्यपूर्ण उपयोग करीत. कारण त्यांची पक्की खात्री होती कीं शस्त्र नसेल तर सामर्थ्याची मात्रा फिक्की पडून, बलवान् मनुष्यहि शस्त्राभावीं दुःखभागी होतो. कारण शस्त्रापुढें नुसतें पाशवी सामर्थ्य लटकें पडतें. निःशस्त्र लोक दुःखभागी होतात—'अनायुधास आसता सचन्ताम्' (४-५-१४), या वेदवाक्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असून, त्याप्रमाणें त्यांनीं शस्त्रास्त्र-विद्या पूर्ण अवगत करून घेतली होती. अर्थात् ते बलाबरोबरच शस्त्राचें महत्त्वहि पूर्ण ओळखून, त्या शस्त्रास्त्रविद्येंतहि ते उत्तम तरबेज होते.

ही बलोपासना व शस्त्रास्त्रविद्या त्यांची आत्मरक्षणार्थ, धर्मपालनार्थ व शत्रुप्रतिकारार्थ होती, हें आतां पुनः सांगण्याचें कारण नाहीं. अनुभवावरून त्यांची अशी खात्री पटली होती कीं, शरीरांत जसे रागद्वेष आहेत, तसेंच बाहेर जगांतहि शत्रुमित्र असून, त्यांच्याशीं कसें वागावें याचें धोरणहि त्यांनीं ठरवून टाकलें होतें. मित्राशीं कसें वागावें व शत्रूशीं कसें वागावें यासंबंधीं त्यांचें धोरण ठरलें होतें, तें त्यांनीं यापुढील वचनांत स्पष्ट बोलून दाखविलें आहे. जे आमचा द्वेष करतील अगर आमच्याशीं शत्रुत्वानें वागतील, त्यांस आम्ही प्रतिकार करून त्यांची खोड मोडूं व जे आमच्याशीं मित्रत्वानें वागतील—सरळ व सलोख्यानें वागतील—त्यांच्याशीं आम्हीहि सख्यत्वानेंच वागूं—( 'सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतः ' ८-४०-७ ). जगांत इतरांशीं कसें वागावें व कसें वागलें तर निभाव लागेल, याचें वरील वचन हें वैदिक राजनीतीचें मुख्य गमक आहे.

अर्थात् त्या वचनांत सूड·बुद्धि नसून प्रतिकारबुद्धि होती व आहे, हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्याचा सरळ अर्थ इतकाच कीं जशास तसें ! त्यांना मनुष्यस्वभावाची पूर्ण पारख असल्यामुळें ' शत्रूंवर प्रेम करा किंवा या थोबाडींत मारली तर दुसराहि पुढें करा ' असला मुळमुळीत आत्मघातकी बाणा त्यांना पसंत नसून, 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ' अशा बाणेदार वृत्तीचे ते चाहते होते. कारण या बाणेदार वृत्तींत जगावें कां मरावें याचें उत्तर गर्भित असून, आर्यांचा कौल मरण्यापेक्षां जगणें हेंच अधिक श्रेयस्कर—' जीवितं मरणात् श्रेयः '—असा होता. कारण जगल्यास धर्म साधतां येतो. ( जीवन् धर्मं समाप्नुयात् ) आणि धर्म साधल्यास ' याच देहीं याच डोळां ' मानव जन्माचें अंतिम साध्य—म्हणजे शाश्वत सुखनिधान—गाठतां येतें. ' अत्रैव ब्रह्म समश्नुते ' या महावाक्याचा साक्षात्कार घेतां येऊन, श्रेष्ठ मानव जन्माचें सार्थक्य साधल्याचें पुण्य व समाधान पदरीं पडतें. म्हणजे येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं मरण्यापेक्षां जगणें हें आर्यांस अधिक पसंत असून, शत्रूचें संकट उद्भवल्यावेळीं त्याचा खडसून प्रतिकार करून आत्मरक्षण

करण्यासाठींच व तेवढ्यापुरतेंच ते शस्त्र उचलीत व रणभूमीवर जे त्यास प्रत्यक्ष समर प्रसंग करण्यास उभे असत, त्यांच्यावरच शस्त्र चालवून त्यांचा फन्ना उडवीत. ('जयेम सं युधि स्पृहः' १-८-३) इतरांवर ते शस्त्र चालवीत नसत. अर्थात् रणभूमीवर शत्रूचें पारिपत्य करणें—त्यांच्यावर शस्त्र चालवून त्यांना कंठस्नान घालणें—हें त्यांच्या मतें न्याय्य होतें. म्हणजे प्रसंगविशेषीं हिंसा त्यांस मान्य होती पण सूडबुद्धि नव्हती. असो. जगांत इतरांशीं वागण्याचा त्यांचा बाणा म्हणजे 'सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतः' शत्रूंशीं शत्रुत्व, आणि मित्रांशीं मित्रत्व—अर्थात् जशास तसें—असा तेजस्वी व प्रभावी होता, हें आतां पुनः सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

---



## प्रकरण १३ वें

# दाशराज्ञ युद्ध

ऋग्वेदांत ज्या कांहीं ऐतिहासिक गोष्टींचा अंधुक अंधुक असा प्रकाश आढळतो, त्यांत दाशराज्ञ युद्ध ही एक अत्यंत महत्त्वाची व फार मोठी ऐतिहासिक घटना घडून गेल्याचा विश्वसनीय दाखला दृष्टोत्पत्तीस येतो. आणि या लढाईचे धागेदोरे सबंध ऋग्वेदभर पसरल्याचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणाऱ्याच्या दृष्टीस पडल्याशिवाय राहत नाहींत. कारण ही लढाई फार मोठ्या प्रमाणांत झाली असून, त्यांत ऋग्वेदांतील अनेक प्रसिद्ध प्रसिद्ध व्यक्तींचा व जमातींचा अंतर्भाव झालेला होता. तो रणसंग्राम अनेक वर्षे धुमसत राहिला असून, तिचें क्षेत्र परुष्णी-पासून यमुनेपर्यंत पसरलेलें होतें. तिला परुष्णीवर तोंड लागून यमुनेवर तिचा शेवट झाला. यांत एका राजाविरुद्ध दहा मोठे व प्रबल राजे व त्यांचे अनेक सहकारी मोठ्या शौर्यानें लढत होते,अशी तेथील वर्णनावरून कोणाचीहि सहज कल्पना होण्यासारखी आहे. एका बाजूला सुदास राजा हा एकटाच असून, त्याच्याविरुद्ध दहा बलाढ्य राजे लढण्यास सिद्ध झाले असून, त्या दोघांच्या भडकलेल्या रणसंग्रामांत पुष्कळ जीवहानि व वित्तहानि झाली. तेव्हां या लढाईंत कोणकोणत्या लोकांनीं भाग घेतला होता, ते कसे लढले, कोणाची काय गत झाली आणि अखेर विजयश्रीनें कोणाच्या गळ्यांत माळ घातली, ही सर्व हकीकत आतां टप्याटप्यानें देत जातों.

लढाईंतील पक्षः—ही जी लढाई चमकून गेली, त्यांत एका बाजूला पुण्यश्लोक दिवोदासाचा सुप्रसिद्ध मुलगा सुदास हा असून, दुसऱ्या बाजूला (१) कवि चायमान, (२) राजा तुर्वश, (३) वैकर्ण राजे, (४)

शिम्यु, ( ५ ) देवक, ( ६ ) शंबर, ( ७ ) भेद, ( ८ ) पक्थ, ( ९ ) श्रुत, ( १० ) कवष इत्यादि दहा बलाढ्य राजे असून, त्यांच्या मदतीला त्यांचा तसाच मोठा मित्रसंघहि होता. या राजांपैकीं प्रामुख्यानें तीन गटांचा निर्देश येथें उल्लेखनीय आहे. त्यांत पहिला महत्त्वाचा गट म्हणजे तुर्वश राजाचा. या गटांत यदु, पुरु, द्रुह्यु व अनु असे चार राजे होते. दुसरा गट म्हणजे पक्थाचा. हा पक्थ राजा तूर्वयाणाच्या वंशांतला असून त्याच्या बाजूनें भलानस, अलिन, विषाणिन् व शिव हे लोक लढत होते. तिसरा जो गट तो भेदाचा. भेद हा अनार्य लोकांचा राजा असून, तो पूर्वेकडचा राहणारा होता. त्याच्या मदतीस त्याचा कैवार घेऊन अज, शिग्रु व यक्षु हे लोक आले होते. या तिसऱ्या गटाशीं जो सामना झाला, तो अखेरचा असून ती युद्धभूमि यमुना तीरावर होती. याशिवाय अभ्यावर्ती चायमानाचा भाऊ कविचायमान, त्याचप्रमाणें वैकर्णाचे दोन राजे, दस्यूंपैकीं सिम्यू , दासाग्रणी शंबर व मन्यमानाचा मुलगा देवक हेहि सुदासाविरुद्ध लढण्यास शत्रुपक्षांत सामील झाले होते.

आतां यांपैकीं कांहीं महत्त्वाच्या शत्रुपक्षीय राजपुरुषांचा थोडक्यांत इतिहास देतों. त्यांपैकीं कांहींची माहिती मागें आलीच आहे. तथापि वाचकांच्या सोयीसाठीं ती येथें थोडक्यांत उध्दृत करतों.

( १ ) राजा तुर्वश हा आर्यांच्या पोटशाखेंतील एका बलाढ्य लोकांचा राजा असून, त्याची प्रजा तुर्वश या नांवानेंच ओळखली जाते. तो इंद्रभक्त असून इन्द्रानें त्याचें अनेक वेळां रक्षण केलें होतें. ( ‘ त्वमाविथ नर्यं तुर्वशं यदुं त्वं तुर्वीतिं वय्यं शतक्रतो ’ (१-५४-६). हे इंद्रा ! तूं नर्य, तुर्वश व यदु यांचें रक्षण केलेंस ). त्याचप्रमाणें हें पुढील वचनहि मननीय आहेः —‘ उत त्या तुर्वशायदू अस्नातारा शचीपतिः । इन्द्रो विद्वाँ अपारयत् ॥ ’ ४-३०-१७. ( भावार्थ—आणि त्या महाज्ञानी इन्द्रानें तुर्वश व यदू यांना पाण्याचा स्पर्श न होऊं देतां सुरक्षित पार केलें.) तसेंच शेवटचें वचनहि वरीलप्रमाणेंच मननीय आहे. ‘महत्ते वृष्णो अभिचक्ष्यं कृतं पश्येम तुर्वशं यदुम् ’ ८-४-७. ( भावार्थ—हे इंद्रा ! तुझे थोर उपकार खरोखर प्रशंसनीय असेच आहेत. तुझ्या कृप प्रसादानें तुर्वश

व यदु या राजर्षींना सुखांत असलेले आम्ही पाहतों. ) अशीं वचनें ऋग्वेदांत अनेक असून, त्यावरून हा तुर्वश राजा इंद्राच्या कृपेंतला होता हें स्पष्ट होतें.

असें जरी असलें तरी, त्याला केव्हां केव्हां त्याच इंद्रानें शत्रूच्या स्वाधीन केल्याचाहि उल्लेख कोठें कोठें आढळतो. उदाहरणार्थ दिवोदासाची व या यदुतुर्वशांची जेव्हां लढाईत गांठ पडली, तेव्हां इन्द्रानें दिवोदासाचा पक्ष घेऊन या दोघांचा पराभव केला, ही गोष्ट ऋग्वेदांत यापुढील ऋचेंत सांगितली आहे. ' पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् । अध त्यं तुर्वशं यदुम् ।। ९-६१-२ ( भावार्थ—एकाच दिवशीं सत्यकर्मा जो दिवोदास त्याचेसाठीं इन्द्रानें शत्रूंचीं नगरें उध्वस्त करून, त्या शत्रूंना म्हणजे शंबर व तुर्वश आणि यदु यांना पराभव करून वश करून घेतलें. ) पुनः एकदां याच तुर्वशाला आणखी असाच मार बसल्याचा प्रसंग आला तो असाः—'स सृंजयाय तुर्वशं परादात्' ६-२७-७ ( भावार्थ—इंद्रानें तुर्वशाला त्याचा शत्रु जो सृंजय त्याच्या ताब्यांत दिलें ) असो. सांगण्याचें तात्पर्य हें कीं इन्द्रानें न्यायान्याय पाहून तुर्वशाला केव्हां पोटाशीं धरलें तर केव्हां दूर लोटून दिलें.

ऋग्वेदांत यदु व तुर्वश यांची मोठी गट्टी असलेली दिसते. कारण ऋग्वेदांत तुर्वशाचा नामनिर्देश करण्याच्या प्रसंगीं त्याच्या जोडीला यदूंचाहि अनेक वेळां उल्लेख करण्यांत आला आहे. पण त्यांच्या नात्यागोत्याचा संबंध मात्र कोठेंच दाखविण्यांत आलेला नाहीं. यावरून ते निराळ्या जमातीचे असून, त्यांच्यांतील सख्य मात्र दाट व दृढ होतें, असें अनुमान काढल्यास तें अवास्तव होणार नाहीं. पण महाभारतावरून दृष्टि फिरविल्यास ते सख्खे भाऊ लागतात. कारण ययातीपासून देवयानीचे उदरीं जन्मलेले ते मुलगे ठरतात. इतकेंच नव्हे तर द्रुह्यु, अनु व पुरु हे देखील एकमेकांचे सख्खे भाऊ असून, ते ययातीपासून त्याची दुसरी बायको जी शर्मिष्ठा, तिच्या ठिकाणीं जन्मलेले पुत्र होत. या गोष्टी महाभारतावरून सिद्ध होत असून, त्या दृष्टीनें विचार केल्यास तुर्वश व द्रुह्यु हे सावत्रभावाच्या नात्यांत येऊन बसतात. पण ऋग्वेदांत मात्र याविषयीं स्पष्ट पुरावा नसून

ते निरनिराळ्या जमातीचे म्हणून तेथें सांगण्यांत आलें आहे. हे द्रुह्यु अनु व पुरु या दाशराज्ञ युद्धांत तुर्वशाच्या पक्षानें लढत होते. आणि या पांचांची गट्टी असावी, असें ' यदिन्द्राग्नी यदुषु तुर्वशेषु यद्द्रुह्युष्वनुषु पुरुषुस्थः ' १-१०८-८:—भावार्थ—हे इंद्राग्नींनो, तुम्ही यदूंकडे अथवा तुर्वशांकडे अगर द्रुह्यु, अनु किंवा पुरु यांकडे असला तरी तेथून आमच्या-कडे या ) या वचनावरून प्रतीत होतें. मात्र या वचनावरून ते सख्खे भाऊ नसून पांच निरनिराळ्या जमाती असाव्यात, असें अनुमान काढ-ल्यास तें विशेष सयुक्तिक दिसतें. असो.

२ **कवि चायमान**—हाहि एक प्रबल योद्धा असून तो दाशराज्ञ युद्धांत सुदासाविरुद्ध दंड थोपटून लढण्यास आला होता. हा प्रख्यात अभ्यावर्तिन् चायमानाचा भाऊ असून, चयमान राजाचा दुसरा मुलगा होता. ज्ञानकोशकारांनीं या लढाईंत अभ्यावर्तिन् चायमान हा आला असून तो मारला गेला असें म्हटलें आहे. ( ज्ञानकोश, भाग ३, पृष्ठ ८१ ) पण ती चूक आहे. दाशराज्ञ युद्धांत अभ्यावर्तिन् जिवंत असणें संभवनीय नाहीं. या युद्धांत मारला गेला तो अभ्यावर्तिन नसून, त्याचा भाऊ कवि चायमान हा होय. ' पशुष्कविरशयच्चायमानः ' कवि चायमान हा पशू-प्रमाणें मरून पडला—असें ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें असून, सायणाचार्यांनीं त्याचा अर्थ ' चयमानस्य पुत्रः कविनामा ' असा केला आहे. अर्थात् हा कवि चायमान लढाईंत सुदासाकडून मारला गेला.

हा भरत कुलोत्पन्न असावा असें दिसतें. या आमच्या अनुमानास पुढील गोष्टीची पुष्टि मिळते. ती कशी हें पुढील वंशावळीवरून कळून येईल. भरताची ऋग्वेदावरून वंशावळ दाखवितां येईल ती अशीः——




ऋग्वेदांतील ६-२७-५ वी ऋचा आढळते, ती अशीः--' वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् ' या वाक्यांतील ' चायमानाय अभ्यावर्तिने ' याचा अर्थ सायनाचार्य लावतात तो असाः-- ' अयम् इन्द्रः चायमानाय चयमानस्य राज्ञः पुत्राय अभ्यावर्तिने एतन्नामकाय राज्ञे शिक्षन् ईप्सितानि वसूनि प्रयच्छन् '-हा इंद्र चयमान राजाचा मुलगा जो अभ्यावर्ति नांवाचा राजा, त्यास त्याच्या इच्छित वस्तू देता झाला. यावरून अभ्यावर्तिन हा चयमान राजाचा पुत्र ठरतो. आतां तो भरताचा नातू कसा ठरतो हें सांगितलें पाहिजे. यासाठीं ६-२७-७ या ऋचेवरून दृष्टि फिरविणें अवश्य आहे, ती ऋचा अशी-' स सृञ्जयाय तुर्वशं परादाद् वृचीवतो दैववाताय शिक्षन् '-या ऋचेंतील ' दैववाताय ' हा शब्द प्रस्तुत विषयावर प्रकाश पाडणारा असून, त्याचा अर्थ सायणाचार्य लावतात तो असाः-'दैववाताय देववातवंशोत्पन्नाय अभ्यावर्तिने राज्ञे '-देववाताच्या वंशांत उत्पन्न झालेल्या अभ्यावर्तिन् राजास.वर अभ्यावर्तिन्चा बाप चयमान असें सांगण्यांत आलें आहे आणि येथें दैववाताच्या कुलांत जन्मलेला असें म्हटलें आहे. तेव्हां बाप

चयमान हा ठरल्यावर त्याला दैववाताचा नातू केल्यास दोन्ही वचनांची अर्थसंगति चांगली लागते. आतां देववाताचा व भरताचा संबंध दाखविला म्हणजे आमचें काम झालें. यासाठीं तिसऱ्या मंडलांतील तेवीसाव्या सूक्तांतील दुसऱ्या ऋचेकडे धांव मारली पाहिजे. ती ऋचा आहे ती अशीः—'अमन्थिष्टां भारता रेवदग्निं देवश्रवा देववातः सुदक्षम्' सायण अर्थ:-'हे अग्ने! भारता भारतौ भरतस्य पुत्रौ देवश्रवाः देववातः चेत्युभौ सुदक्षं शोभनसामर्थ्योपेतं रेवत् रयिमन्तम् अग्निं त्वां अमन्थिष्टाम्', हें असें यावर भाष्य आहे. यावरून देववात व देवश्रवस हे भरताचे पुत्र होते हें सिद्ध होतें. हें सर्व नीट जुळवून सांगितलें म्हणजे वरील आमची वंशावळ शाबीत झाली. तेव्हां सांगावयाचा मुद्दा काय, तर कवि चायनामान हा भरतकुलोत्पन्न ठरतो. हा दुष्ट राजा आपल्या भाऊबंदाशींच लढावयास आला, पण बिचारा अखेर सुदासाकडून ठार मारला गेला! ('पशुष्कविरशयच्चायमान:' ७-१८-८), सुदास हाहि भरतकुलोत्पन्नच आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

(४) **पक्थ**——पक्थ हा पक्थ नांवाच्या जमातीचा राजा होता. आठव्या मंडलांतील बाविसाव्या सूक्ताच्या दहाव्या ऋचेंत 'याभि: पक्थमवथ' असें वचन असून, तेथें 'पक्थं'चा अर्थ 'एतन्नामकं राजानं' असा करण्यांत आला आहे. हा पक्थांचा राजा म्हणजे तूर्वयाण हा होय. या मोठ्या व तरुण राजासाठीं इंद्रानें कुत्स, अतिथिग्व म्हणजे दिवोदास व आयु यांना वश करून घेतलें, असें १-५३-१० मध्यें म्हटलें आहे. आणि तेव्हांपासून पक्थांचें व भरतांचें हाडवैर असून, सुदासाची खोड मोडण्यासाठीं ते त्याच्या शत्रुपक्षास मिळाले होते, हें उघड आहे. या पक्थांचा एक गट असून त्यांत भलानस, अलिन, विषाणिन व शिवास हे लोक सामील होते. हे सर्व लोक सिंधु नदीच्या पश्चिमेस काबूल नदीच्या आसपास राहणारे होते. आज अफगाणांच्या व सिंधूच्या दरम्यान पिस्तूंची (पठाणांची) जी जात आहे, ती या पक्थांपैकींच असावी, असें अनुमान काढल्यास चूक होणार नाहीं,

(५) **भेद**—याच्याविषयीं ऋग्वेदांत फारशी माहिती आढळत नाहीं. तो नास्तिक म्हणजे अनार्य होता. पण मोठा प्रबल राजा होता. हा बहुधा पूर्वेस राहणारा असावा. कारण याच्याशीं जो सामना झाला, तो यमुनेच्या तीरावर झाला.तेथें भेदाला इन्द्रानें ठार मारलें ('प्रात्र भेदं सर्व-ताता मुषायत्' ७-१८-१९ ). त्याच्याबरोबर त्याचा पक्ष घेऊन अज, शिग्रु, यक्षु हे लोकहि आले होते. पण भेदाची रणकुंडांत आहुति पडलेली पाहून, ते घाबरले व शेवटीं इन्द्रास शरण येऊन त्याच्या सन्मानार्थ त्याला घोड्यांचीं शिरें नजराणा म्हणून अर्पण केलीं, असा उल्लेख (७-१८-१९) मध्यें आढळतो.

(६) **कवष**—हा ऋग्वेदांतला एक ऋषि असून,तो दहाव्या मंडळांतील ३१-३२ व ३३ या सूक्तांचा द्रष्टा आहे.तो ब्राह्मण असून एका दासीपासून झाला होता. कारण ऐतरेय ब्राह्मणांत त्याला 'दास्याः पुत्रः' असें म्हटलें आहे. तो कुरुश्रवणाचा पुरोहित होता असें 'कुरुश्रवणमावृणि राजानं त्रासदस्यवम्। मंहिष्ठं वाघतामृषिः' ( १०-३३-४) या वचनावरून स्पष्ट होतें. दाशराज्ञ युद्धांत जो कवष आहे, तो हा कवष नसावा. तो त्या नांवाचा कोणी तरी क्षत्रिय राजा असावा. सायणांनीं तो राजा आहे असें म्हटलें आहे. याचें कारण असें कीं ब्राह्मण अगर पुरोहित युद्धांत प्रत्यक्ष असे भाग घेत नसत. आपल्या राजास काय मदत करायची ती ते मागें राहूनच करीत असत. आणि या युद्धांतला कवष जर ब्राह्मण ऋषि धरला तर ब्रह्महत्त्या केल्याचें पातक सुदासास लागणार आहे. आणि असें होणें असंभवनीय आहे. तेव्हां दाशराज्ञ युद्धांतला हा क्षत्रियच असला पाहिजे. त्याच्या जोडीला श्रुत, वृद्ध, अनु व द्रुह्यु हे जे आहेत, ते सर्व क्षत्रिय राजेच आहेत. यालाच तेवढा त्यांच्यांत ब्राह्मण समजण्यास तसा आधार तरी काय ? असो. या कवषाची काय वाट लागली हें पुढें सांगण्यांत येईल.

(७) **शिम्यू**—हा दस्यूंपैकीं अगर त्यांचा पक्षपाती असून मोठा नास्तिक होता. ('दस्यूञ्छिम्यूँश्च पुरहूत एवैर्हत्वा पृथिव्यां शर्वा नि बर्हीत्' १-१००-१८ ). याच्याविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. हाहि दाशराज्ञयुद्धांत शत्रुपक्षाकडून सामील झाला होता.

(८) **शंबर**—नांव घेण्यासारखा आणखी एक बलाढ्य शत्रु म्हणजे दासांचा प्रमुख शंबर हा होय. हा शंबर म्हणजे सुदासाच्या बापानें म्हणजे दिवोदासानें मारलेला शंबर नव्हे. त्याच्या वंशांतीलच हा कोणीतरी असावा. आमच्या मतें तो मुलगा अगर नातू असावा. शंबर हें नांव रामायणांतहि आढळतें. रावण हा त्याचा साडू होता असा उल्लेख आहे. असो. त्याच्या जोडीला मन्यानाचा मुलगा देवक हाहि होता. हाहि दासच असावा. शंबर, तुर्वश व यदु हे समदु:खी होते. कारण त्यांचा दिवोदासानें एकाच वेळीं पराभव केलेला होता. ( ९-६१-२ ). म्हणून त्यांनीं सूड घेण्याची ही वेळ साधली.

(९) **वैकर्ण**—हे वैकर्ण लोक परुष्णीच्या शेजारीं राहणारे असून त्यांच्यांत राजे दोन होते. यांचे या लढाईत चांगले एकवीस वीर मारले गेले. ( ७-८-११ ) यांची अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

(१०) **द्रुह्यु**—तुर्वशाप्रमाणें हे द्रुह्युहि मोठे शूर लोक होते. त्यांच्या राजाचें नांवहि द्रुह्यूच होतें. द्रुह्यु, अनु व पुरु या सर्व जमाती आर्यांत मोडत असून, त्यांचीं लहान लहान राष्ट्रें पंजाबांत पसरलीं होतीं. भारतावरून पाहिल्यास हे तिघेहि सख्खे बंधु ठरतात. ययाति यांचा बाप असून शर्मिष्ठा ही त्यांची आई असें वर्णन आढळतें. पण ऋग्वेदांतून हें नातें व्यक्त होत नाहीं. म्हणून त्यांची आर्यांतच पण पोटशाखेंत जमा धरून चालल्यास कांहीं बिघडत नाहीं.

दाशराज्ञ युद्धांतील सुदासाच्या विरुद्ध लढणारे असे हे महावीर असून, त्या लढाईत कोणाची कशी वाट लागली, हें आतां पाहूं आणि यासाठीं त्या युद्धाची हकिकत त्रोटकच कां असेना, ऋग्वेदांत कशी नमूद करून ठेवण्यांत आली, इकडे पाहणें जरूर आहे. या लढाईची हकीकत ज्या सूक्तांत आली आहे तें सूक्त म्हणजे सातव्या मंडळांतील अठरावें सूक्त होय. आणि त्याच्या जोडीला तेहतीसावें व अठ्याऐशावें सूक्तहि आनुषंगानें विचारांत घेतलें पाहिजे. कारण तेथेंहि कांहीं महत्त्वाची माहिती आढळते. म्हणून आतां त्या सूक्तांना धरून थोडी थोडी माहिती देत जातों.

त्याच्या आधीं या लढाईस कारण काय झालें असावें, याविषयीं दोन शब्द लिहून मग मुख्य मुद्याकडे वळतों. हा जो दाशराज्ञ युद्धाचा वणवा भडकला, तो कांहीं एकाएकीं भडकला नाहीं. त्याच्या मागें थोडासा इतिहास आहे. ही लढाई केवळ आर्याआर्यांतच झाली अगर आर्य व अनार्यांतच झाली असें नसून, तिच्यांत आर्य, अनार्य, दास व दस्यू या सर्वांचा समावेश झालेला होता. एका बाजूला भरत कुलदीपक सुदास हा एकटाच असून त्याच्याविरुद्ध तुर्वश, यदु, द्रुह्यु, अनु व पुरु हे आर्य राजे, पक्थ, भेद, वैकर्ण इत्यादि अनार्य राजे, शंबर हा दासाचा राजा व शिम्यू हा दस्यूंचा अग्रणी, या सर्वांनीं तलवार उचलली होती. यांत तुर्वश यदु यांचें सुदासाच्या बापापासून वैर, तसेंच पक्थांचें म्हणजे त्यांचा राजा जो तूर्वयाण त्याचें व दिवोदासाचें वैर, शंबर व दिवोदासाचें वैर, ही सर्व माहिती ऋग्वेदांत आढळते. ती आग सुदासाच्या काळीं विझली नव्हती. हे सर्व लोक मनांतून मारखे कुढत होते. पण सुदासावर हात उगारण्याचें धैर्य व सामर्थ्य त्यांच्यांत स्वतंत्रपणें एकांतहि नसल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला होता. पण प्रत्येक जण योग्य संधीची वाट पाहत होता.

पण पुढें सुदैवानें त्यांना ती संधि लाभली. दिवोदासाच्या हयातींत भारताचें पौरोहित्य भरद्वाजाकडे होतें. पण पुढें सुदास राजा झाल्यावर ती जागा विश्वामित्राकडे येऊन, तेव्हांपासून सुदासाच्या लौकिकांत व दराऱ्यांत चांगलीच भर पडत चालली. इतर राजे त्याला वचकूनच वागत. अशा भरभराटीच्या स्थितींत विश्वामित्राच्या मनांत अश्वमेध यज्ञ करण्याचें भरून, त्याप्रमाणें त्यानें सुदासास सल्ला दिला व तो सुदासानें मान्य करून त्याप्रमाणें करण्याचें ठरविलें. या यज्ञांत प्रथम घोडा पृथ्वीवर यथेच्छ फिरून येण्यास मोकळा सोडण्यांत येतो व त्याचे रक्षणार्थ सैन्यहि मागून चाललेलें असतें. असा घोडा या वेळीं सोडण्यांत आला होता, असें ऋग्वेदांत नमूद आहे. तें वचन हें असें आहे:—‘ उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्वं राये प्रमुञ्चता सुदासः । राजा वृत्रं जंघनत्प्रागपागुदगथा यजाते वर आ पृथिव्याः ॥ ३-५३-११ ॥ भावार्थ—अहो कुशिकांनो ! अश्वाजवळ चला ! त्या अश्वाचें रक्षण करणारे असे जे वीर आहेत, त्यांना

सावधान करा ! सुदास राजाचा हा जो घोडा आहे, त्याला दिग्विजय करून संपत्ति मिळविण्यासाठीं पृथ्वीवर मोकळा सोडून द्या ! राजा इंद्र जो आहे, तो तुमच्या कार्यांत अडथळा करणाऱ्या दुष्टाला पूर्वेस, पश्चिमेस उत्तरेस कोणत्याहि बाजूनें तो आला तरी त्यास ठार मारील. काळजी करूं नका, अश्व सोडा. घोडा फिरून आल्यावर सुदास राजा मग पृथ्वीवरील उत्तम अशा यज्ञस्थानावर यज्ञ समारंभ मोठ्या थाटानें साजरा करील ! आणखी येथें हेंहि सांगतों कीं तुम्ही गेल्यावर मी विश्वामित्र येथें इंद्राचें सुंदर स्तोत्र गात बसतों. आणि तें माझें स्तोत्र खात्रीनें तुम्हां भरतजनांचें रक्षण करील ! ( 'विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम्' ३-५३-१२) पुढें घोडा सर्वत्र फिरून परत आल्यावर तो अश्वमेध यज्ञ यथासांग परिपूर्ण करण्यांत आला, हें निराळें सांगणें नकोच.

हें येथें इतकें विशद करून सांगण्याचें कारण हें कीं पुढें दाशराज्ञ युद्धाची जी आग भडकली, त्याचें बीज या अश्वमेध यज्ञांत गर्भित झालेलें होतें, असें आमचें मत आहे. सुदासाच्या दराऱ्यामुळें त्याचा अश्व धरून बांधून ठेवण्यास कोणी धजले नाहींत, हें खरें. पण त्यापासून त्यांच्या स्वाभिमानास फार मोठी जखम झाली, हें कांहीं खोटें नाहीं. सुदासाच्या या कृतीनें सर्वच राजे चिडले व भडकले. पण पृथकशः लढण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य नसल्यामुळें, त्यांनीं आपापसांत यथावकाश बोलणीं करून एक प्रचंड कट तयार केला.

ही कुणकुण सुदासाच्या कानावर आली व आपण केलें तें एका दृष्टीनें बरोबर झालें नाहीं असें वाटून, विश्वामित्राचा सल्ला कुपथ्यावर पडला, असें त्याच्या मनानें घेतलें. या वेळेला वसिष्ठाचा लौकिक चांगला वाढला होता. त्यानें तृत्सूंचें फार कल्याण केलें होतें, म्हणून विश्वामित्राला रजा देऊन, त्याची जागा त्यानें वसिष्ठास दिली. अर्थात् या सर्व गोष्टी घडून येण्यास कांहीं काळ लोटला. बाहेर वारा कसा वाहतो, याचें बरोबर निदान बांधून, वसिष्ठानेंहि येणाऱ्या आपत्तीस तोंड देण्यास नेटानें कमर कसली, व तो इंद्राचा अत्यंत प्रिय भक्त असल्यामुळें त्याचें सहाय्य मिळविण्याचे प्रयत्न करून अखेर त्याचें सहाय्य मिळविलें. हें होतें न होतें तों

इतक्यांत शत्रूंनीं तयारी करून आपापल्या परी सुदासावर हल्ला चढविला! अर्थात् लढाईला प्रथम तोंड लागलें, तें परुष्णी नदीच्या तीरावर लागलें. लढाईला तोंड लागतांच इंद्र सुदासाच्या सहाय्यास धावून आला. कारण त्या दहा राजांच्या सैन्याबरोबर लढून एकट्या सुदासाचा निभाव लागण्यासारखा नव्हता. सुज्ञ व धोरणी वसिष्ठांनी ही गोष्ट ओळखूनच अगोदर इंद्राचें सख्य मिळविलें होतें.

आतां लढाईत काय काय प्रकार घडले आणि कोणाची काय अवस्था झाली, हें आतां ऋग्वेदाच्या साह्यानें पाहूं.

(१) या लढाईत प्रामुख्यानें भाग घेणारा म्हणजे तुर्वश राजा. ( 'पुरोळा इत् तुर्वशो' ७-१८-६) त्यानें इतर राजांशीं फार मोठा कट करून, सुदासाची संपत्ति लुटण्यासाठीं त्यावर चालून आला; पण देवराज इंद्राच्या प्रभावानें पाण्यांत मासे जसे अडकवून ठेविले जातात, तद्वत् त्याच्या साथीदारांची म्हणजे भृगु व द्रुह्यु या राजांची स्थिति झाली. तरी त्यांनीं नेट धरून सुदासावर हल्ला चढविलाच. पण सुदासाचा सखा व पाठराखा जो इंद्र त्यानें सुदासाचा पक्ष घेऊन शत्रूला चांगला चोप देऊन आपल्या सख्यास त्यांतून पार पाडलें ! ही पहिली चकमक होय. पुढें तुर्वश लढाईत चमकला नाहीं.

(२) सुदासाचे दुसरे शत्रु कीं जे मूर्ख व दुष्ट होते, ते परुष्णी ओलांडून, सुदासाला पाण्यांत बुडवून त्याची इतिश्री करावी या बुद्धीनें दुतर्फा भरून तुडुंब वाहणाऱ्या परुष्णीचे तीर फोडते झाले. मग आतां विचारतां काय ? यामुळें त्या नदीच्या पाण्याचा प्रचंड लोंढा आसपासच्या प्रदेशांत सैरावैरा अफाट पसरत चालला. ( दुराध्यो३ अदितिं स्रेवयन्तोऽचेतसो वि जगृभ्रे परुष्णीम् ' ७-१८-८ ). त्या पाण्याच्या प्रवाहांत सुदासाला जलसमाधीच मिळायची. पण त्या स्तुत्य व भक्तरक्षक इंद्रानें आपल्या अतर्क्य मायाशक्तीनें त्या धूमधडाक्यानें पसरत चाललेल्या पाण्याच्या अफाट लोंढ्याला चटकन् आवरून, तें पाणी उथळ करून त्यांतून सुदासाला सुसूत्र सुखरूप तरून जाण्यास योग्य केलें ('अर्णांसि चित्पप्रथाना सुदास इन्द्रो गाधान्यकृणोत्सुपारा' ७-१८-५). तीर फुटल्यामुळें तो जो

पाण्याचा लोंढा आजूबाजूस सारखा पसरत चालला होता, तो थांबविण्यासाठीं इन्द्रानें क्षणाचाहि विलंब न करतां फोडलेले ते नदीचे कांठ जेथल्या तेथें नीट दुरुस्त करून टाकले. आणि याचा परिणाम असा झाला कीं, नदीचें पाणी बाहेर पसरण्याचें बंद पडून तें पूर्वीप्रमाणें सरळ पात्रांतून वाहूं लागलें. सुदासाचा तो चपल घोडा चटकन् त्यांतून पार होऊन आपल्या इष्ट स्थळीं सुरक्षित जाऊन पोंचला आणि या महान् आपत्तींतून त्या सुदास राजाचा बचाव झाला ('ईयुरर्थं न न्यर्थं परुष्णीमाशुश्चनेदभिपित्वं जगाम' ७-१८-९ ).

(३) या आपत्तींतून सुदास सहीसलामत बाहेर पडल्यावर मग जी रणधुमाळी माजली, ती सांगून पुरवत नाहीं. 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' असाच प्रकार या दाशराज्ञ युद्धाचाहि झाला, असें म्हटल्यास त्यांत कांहीं अतिशयोक्ति होणार नाहीं. सुदास राजा सुरक्षित सुटला, हें पाहून शत्रूंचें डोकें अधिकच भडकलें व त्यांना मोठा चेव आला. तेथें जमलेल्या राजांनीं मिळून त्याच्या सभोंवती गराडा दिला. हे जे राजे होते ते सर्व नास्तिक म्हणजे इंद्राला न मानणारे असून, त्या सर्वांनीं मिळून सुदासास चोहोंकडून कैचींत पकडलें. पण इंद्रावरुणाच्या कृपाछत्राखालीं असणाऱ्या सुदासाशीं यशस्वीपणें ते टक्कर देऊं शकले नाहींत. ( 'दश राजानः समिता अयज्यवः सुदासमिन्द्रावरुणा न युयुधुः' ७-८३-७) अर्थात् हे राजे अनार्य अगर दास किंवा दस्यूंपैकीं असावेत. कारण तुर्वश, यदु, अनु, पुरु इत्यादि राजे आर्यांपैकीं असून ते इंद्रभक्त होते. या दहा राजांच्या कात्रींत सांपडलेल्या सुदासाचें इंद्रावरुणांनीं चांगलें रक्षण केलें ( 'यत्र राजभिर्दशभिर्निबाधितं प्र सुदासमावतं तृत्सुभिः सह' ७-८३-६). या देवांनीं शत्रूंच्या कैचींत सांपडलेल्या सुदासाला भरपूर धैर्य व सामर्थ्य देऊन, त्याला त्या संकटांतून सुरक्षित पार केलें ( दाशराज्ञे परियत्ताय विश्वतः सुदास इंद्रावरुणावशिक्षितम् ' ७-८३-८).

(४) या संकटांतून पार पडल्यावर लढाईला खरा रंग चढूं लागला. परुष्णीच्या पाण्यांतून पार झाल्यावर सुदासानें पहिली गोष्ट केली ती म्हणजे दास्यूंचा अग्रणी जो सिम्यू, तो त्याच्यावर धावून आला असतां,

त्याला मोठ्या शिताफीनें पाण्यांत बुडविलें ! ( ७-१८-५) हें होतें न होतें तों इतक्यांत कवि चायमान हा मोठ्या हिरिरीनें सुदासावर चालून आला, पण सुदास हा कांहीं कच्चा योद्धा नव्हता. तोही मोठा रणझुंजार होता. तो युद्धकलेंत मोठा निष्णात असून अंगावर धांवून आलेल्या कवि चायमानाचा हल्ला चुकवून, उलट त्याच्यावरच तो तुटून पडला आणि या चकमकींत चायमानाला एक नेमका प्राणघातक वार करून त्यास खालीं पाडलें. तो वार त्यास वर्मी लागल्यामुळें तो तात्काळ गतप्राण होऊन पशूप्रमाणें जमिनीवर पसरून पडला ! कवि चायमानाची ही अशी वाट लागली ( 'पशुष्कविरशयच्चायमानः' ७-१८-८ ).

( ५ ) आपल्या पक्षांतील एक चांगला मोहरा हरपला, हें पाहून तेथें नजीकच असलेल्या वैकर्ण राजांनीं सुदासावर झडप घातली. दोघांची रणधुमाळी माजून, त्यांत वैकर्णांचे चांगले चांगले असे एकवीस नामी वीर धारातीर्थी कापून काढण्यांत आले ! ( एकं च यो विंशतिं च श्रवस्यां वैकर्णयोर्जनान्राजा न्यस्तः ' ७-१८-११ ). हा प्रकार पाहून वैकर्ण लोकांनीं सुदासाची धास्ती घेऊन पुनः त्याच्या वाटेस जाण्याचें नांव सोडून, रणांतून पळ काढला !

( ६ ) इकडे इंद्रानें शत्रु पक्षाकडून आलेल्या श्रुत, कवष, वृद्ध व द्रुह्यु यांस नेमके घेरून, त्यांना परुष्णीच्या अगाध उदकांत जलसमाधि दिली ! (अध श्रुतं कवषं वृद्धमप्स्वनु द्रुह्युं नि वृणग्वज्रबाहुः' ७-१८-१२).

( ७ ) इतकें झाल्यावर तो देवराज तेथून कवषादिकांच्या नगरांकडे वळला. तीं नगरें भक्कम तटबंदीनें चांगलीं बंदिस्त केलेलीं होतीं. तेथें गेल्यावर तीं दगडी नगरें वज्रानें फोडून फोडून चांगलीं जमीनदोस्त केलीं आणि त्यांच्या सभोवतीं असलेल्या सात भक्कम दगडी तटबंदी-वर वज्र चालवून त्यांचाहि चक्काचूर करून सोडला ! ( ' वि सद्यो विश्वा दृंहितान्येषामिन्द्रः पुरः सहसा सप्त दर्दः' ७-१८-१३. )

( ८ ) हें झाल्यावर अनूच्या राजवाड्यावर मोर्चा वळवून तो पार उध्वस्त करून, तेथील सर्व संपत्ति लुटून आणून ती तृत्सूंना त्यानें वांटून दिली. ( ' व्यानवस्य तृत्सवे गयं भाग् ' ७-१८-१३ ) नंतर व्यर्थ बड-

वढणाऱ्या पुरूवर जय मिळविण्याच्या उद्देशानें तो तिकडे वळला. ('जेष्म पुरुं विदथे मुध्रवाचम् ' ७-१८-१३ ). येथपर्यंत लढाईचा पूर्व रंग झाला.

(९) आतां उत्तररंगाकडे वळूं. परुष्णीवर व तिच्या आसपासच्या प्रदेशांत ही जी लढाई लढली गेली व त्या सर्व चकमकींत सुदास हा पूर्ण विजयी झाला असला, तरी एवढ्यावरच ही मोहीम थांबली असें मात्र झालें नाहीं. पूर्वेस यमुनेच्या पलीकडे भेद नांवाचा एक मोठा नास्तिक दैत्य होता. सुदासावर इतर राजांनीं मिळून मोठी चढाई केली पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं, ही गुणगुण त्याला लागल्यावरून सुदासाची व त्याच्या लोकांची खोड जिरविण्यास ही संधि योग्य आहे, असें पाहून त्यानें आपले मित्र व सहकारी जे अज, शिग्रु व यक्षु इत्यादि लोक होते, त्यांना बरोबर घेऊन सुदासाचें पारिपत्य करावें, म्हणून त्याच्यावर चाल करून आला.

सुदासाला ही बातमी लागतांच तो व इंद्र दोघेहि मिळून त्याचा समाचार घेण्यास निघाले. दोघांची यमुना नदीवर गांठ पडली व तेथें एक मोठा रणसंग्राम माजून, इंद्रानें त्याला अखेर रणमैदानावर लोळविलें! आपला म्होरक्या भेद राजा हा पडला, हें पाहून त्याचे साथीदार अज, शिग्रु, यक्षु इत्यादि लोकांनीं धास्ती घेऊन, आपापलीं हत्यारें खालीं ठेवून इंद्रास शरण आले व त्यास संतोषविण्यासाठीं लढाईत मारलेल्या अश्वांचीं शिरें कापून तीं त्यास बलि म्हणून अर्पण केलीं. त्याचप्रमाणें भेदासारख्या दुष्ट नास्तिकाचा संहार झाला हें पाहून यमुनातीरवासी लोकांनीं व तृत्सूंनीं हर्षभरित होऊन इंद्राला स्तुतिस्तोत्र गाऊन व हविर्भाग अर्पण करून त्याला तोषविलें. हा सर्व मजकूर या पुढील ऋचेंत फार थोडक्यांत आला आहे. ( 'आवदिन्द्रं यमुना तृत्सवश्च प्रात्र भेदं सर्वताता मुषायत्। अजासश्च शिग्रवो यक्षवश्च बलिं शीर्षाणि जभ्रुरश्व्यानि ।।' ७-१८-१९).

( १० ) यानंतर आतां राहता राहिला शत्रु काय तो शंबर व त्याच्याबरोबरच मन्यमानाचा मुलगा देवक. हेहि आपापल्या परि सुदासाची खोड मोडावयास आले होते. इंद्रानें इतर शत्रूंप्रमाणें त्यांचाहि रणभूमीवर

निकाल लावला. हे दोघेहि शत्रू ठार मारले गेले! ('देवकं चिन्मान्यमानं जगन्थाऽव त्मना बृहतः शम्बरं भेत्' ७-१८-२०) याप्रमाणें सुदास आतां जगांत 'निर्वैरमुर्वीतलं' होत्साता, पुढें सुखानें कालक्रमणा करूं लागला!

याप्रमाणें ऋग्वेदांतला एक मोठा संग्राम गाजून, त्यांत सुदास हा पूर्ण यशस्वी व विजयी झाला. अर्थात् हें सर्व श्रेय पुरोहितश्रेष्ठ वसिष्ठांना न दिलें तर तो एक कृतघ्नपणाचा महान् अपराध पदरीं पडणाऱ्यासारखा होणार नाहीं काय? तसें पाहूं गेलें तर या दहा राजांपुढें एकट्या सुदासाचा टिकाव लागणें कितीसें शक्य होतें? ब्रह्मर्षि वसिष्ठांच्या करामतीमुळेंच इंद्र सुदासाजवळ धावून आला आणि त्याच्या कृपादृष्टीनें शेळीनेंच अखेर सिंहाची शिकार केली! असें ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें आहे. ('सिंहं चित्पेत्वेना जघान' ७-१८-१७).

दाशराज्ञ युद्धाचा हा असा थोडक्यांत इतिहास आहे.

---



## प्रकरण १४ वें

# मरणोत्तर संस्कार-विधि

वैदिक धर्मांत संस्काराचें महत्त्व फार मोठें असून, वैदिक आर्यांचें श्रेष्ठत्व व महत्त्व सगळें प्रायः त्यावरच अवलंबून आहे, असें म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. संस्करांतील अगदीं शेवटचा संस्कार म्हणजे हा अंत्येष्टि संस्कार होय. आणि तो मनुष्य मेल्यावर प्रेताला उद्देशून करावयाचा असतो. व तो ऋग्वेदांत कसा सांगितला आहे, याचें प्रस्तुत स्थलीं विवेचन करण्याचें योजिलें आहे. वैदिक धर्मांत संस्काराचे दोन प्रकार आहेत. एक स्मार्त व दुसरा श्रौत. "द्विविधो हि संस्कारो भवति ब्राह्मो दैवश्च ।।" (हारीत). संस्काराचें ब्राह्म म्हणजे स्मार्त व दैव म्हणजे श्रौत असे दोन भेद आहेत. पहिल्या म्हणजे ब्राह्म संस्कारांत गर्भाधानापासून अंतेष्टीपर्यंत अशा सोळा संस्कारांचा अंतर्भाव असून त्यालाच प्रस्तुत काळीं स्मार्त संस्कार असें नामाभिधान आहे. दुसरा जो प्रकार आहे, तो दैव संस्कार असून, त्यासच श्रौत संस्कार असें दुसरें नांव आहे. स्मार्त संस्कार हा एकाग्नीवर म्हणजे गार्हपत्य अग्नीवर व श्रौत संस्कार हा त्रैताग्नीवर म्हणजे आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि या तीन अग्नींवर करण्याचा दंडक आहे. स्मार्त व श्रौत संस्कार मिळून एकंदर चाळीस आहेत. स्मार्त म्हणजे ब्राह्म संस्काराच्या योगानें मनुष्य ऋषीच्या दर्जास पोंचतो व दैव ऊर्फ श्रौत संस्कारानें तो देवपद प्राप्तीस योग्य होतो. ( 'ब्राह्मेण संस्कृत ऋषीणां समानतां सायुज्यं गच्छति' 'दैवेनोत्तरेण संस्कृतो देवानां समानतां सायुज्यं गच्छति ।।' ( हारीत ) या विषयांविषयीं विशेष वर्णन करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें त्या प्रश्नांत खोल न शिरतां, फक्त मनुष्य मेल्यावर त्याच्या और्ध्वदेहिक संस्काराचें ऋग्वेदांत वर्णन कसें करण्यांत आलें आहे, तेवढाच प्रश्न येथें हाताळतों.

मनुष्य मेला म्हणजे त्या निर्जीव देहाला शव असें म्हणतात. ('गृहान्वा प्रज्ञानं वा यो वै कश्च म्रियते स शवः ')—गृहस्थ अगर संन्याशी असा कोणी जरी मेला तरी त्याला शव म्हणतात—असें शतपथांत म्हटलें आहे. ( श. प. १३-७-२-१ ) जेथें या शवाचा अंत्यविधि केला जातो, त्या स्थानाला स्मशान असें नांव आहे. ' शवानां शयनं स्मशानं ' किंवा ' शवाः शेरते अत्र स्मशानं ' अशी स्मशान शब्दाची व्याख्या करण्यांत आली आहे. ' प्रेतदहनस्थानं स्मशानं ' असेंहि म्हणतां येईल. अर्थात् जेथें प्रेताचा अंत्यविधि करण्यांत येतो, त्याला स्मशान असें नांव आहे.

मनुष्य मेल्यावर त्याच्या प्रेताची शेवटची व्यवस्था लावण्यासाठीं गांवाबाहेर एक विशिष्ट जागा राखून ठेवण्यांत आलेली असते. त्याला स्मशान असें म्हणतात. ही जागा गांवाच्या बाहेर आग्नेय अगर वायव्य दिशेस असून ती जरा उंचवटयाची व दक्षिणेस सखल अशी असते. तेथें नेऊन प्रेताची व्यवस्था लावण्यांत येते. वैदिक आर्यांत—ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवार्णिकांत—प्रेत जाळण्याची प्रथा आहे. पुरण्याची नाहीं. कारण अग्नि हा मृतात्म्याला स्वर्गाकडे घेऊन जाणारा देव आहे. आणि तशी ऋग्वेदांत प्रार्थनाहि करण्यांत आली आहे. ( ' यास्ते शिवास्तन्वो जातवेदस्ताभिर्वहैनं सुकृतामु लोकम् ' १०-१६-४ ). याला पोषक असा आधार ईशावास्यांत ' इदं भस्मान्तं शरीरम् '—हें पंचमहाभूतात्मक स्थूल शरीर अग्नीमध्यें जळल्यावर भस्मरूप होवो । ' या वचनांत आढळतो. थोडक्यांत तात्पर्य हें कीं प्राचीन आर्य लोकांत प्रेत जाळण्याची प्रथा होती. पुरण्याची नव्हती. इतकें प्रस्तावना रूपानें सांगितल्यावर आतां प्रेताच्या अंत्यविधीकडे वळतों.

मनुष्य मेल्यावर त्याचें प्रेत शक्य तितक्या लवकर घरांतून बाहेर काढून तें स्मशानांत नेण्यांत येतें. तें तिरडीवरून अगर बैलाच्या गाडींतून घेऊन जातात. मृत मनुष्य आहिताग्नि असला तर त्याच्याबरोबर तीनहि श्रौताग्नि व आहिताग्नि नसला तर गार्हपत्य अग्नि बरोबर घेतला जातो. त्याबरोबरच आहिताग्नि मेला असतां सर्व यज्ञपात्रें, इतर हवनद्रव्यें, एक बोकड व एक अनुस्तरणी गाय इत्यादि पदार्थहि घेतलेले असतात. प्रेत-

यात्रेंत सर्वांत पुढें अग्नि, त्याच्यामागून प्रेत, त्याच्यामागून यज्ञपात्रें, एक बोकड व इतर साहित्य, त्यांच्या मागून मृताचे पुत्र, आप्त, इष्ट, सगे-सोयरे, पत्नी व नात्यांतील इतर बायका व इतर ऋणानुबंधिक लोक चालत जात असतात.

अशा शिस्तीनें तें प्रेत स्मशानांत आणण्यांत येतें. हें स्मशानस्थान गांवाच्या आग्नेय अथवा वायव्य दिशेस जराशा उंचवट स्थानावर असतें. तेथें गेल्यावर प्रेतदहनार्थ एक चांगली प्रशस्त अशी जागा पाहून, ती पसंत करण्यांत आल्यावर ती जागा गर्तोदकानें शमीच्या फांद्यानें 'अपेत वीत' या मंत्रानें शुद्ध करून घेण्यांत येते. कारण स्मशान हें भूत-पिशाच्चादिकांचें संचारस्थान असल्यामुळें तेथून त्यांस हाकलून देण्या-साठीं 'अपेत वीत वि च सर्पतातोऽस्मा एतं पितरो लोकमक्रन्' ( १०-१४-९ ) हा मंत्र म्हणण्यांत येतो. याप्रमाणें दहनस्थान पाणी शिंपडून शुद्ध केल्यावर चितेसाठीं तेथें एक खड्डा खणण्यांत येतो. तो उर्ध्वबाहु पुरुषाच्या उंचीइतका लांब, पांच रत्नि ( हात ) रुंद व दहा अंगुळें खोल असा असतो. अथवा बैल जुंपून ती जागा नांगरून तयार करण्यांत येते. याप्रमाणें जागा तयार झाल्यावर तेथें लांकडाची चिता रचण्यांत येते. चिता रचून तयार झाल्यावर त्यावर प्रथम बर्हि ( दर्भ ) पसरून, त्यावर कृष्णाजिन आंथरून, नंतर तें प्रेत तिरडीवरून उचलून गार्हपत्य अग्नीच्या उत्तर बाजूनें आणून त्या चितेवर ठेवण्यांत येतें.

प्रेत चितेवर ठेविल्यावर त्याच्या शेजारीं त्याच्या पत्नीला निजविण्यांत येते. त्या वेळीं तिचा दीर पुढें येऊन 'उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं' १०-१८-८ ) हा मंत्र म्हणून तिचा हात धरून तिला तेथून उठवून बाजूस घेतो.

हें झाल्यावर त्या प्रेतावर घृतमिश्रित तीळ पसरून, त्यावर बरोबर आणलेलीं यज्ञपात्रें व अजाचीं कापून काढलेलीं निरनिराळीं अवयवें त्या प्रेताच्या निरनिराळया अवयवावर व स्थानावर व्यवस्थित ठेवण्यांत येतात. नंतर अनुस्तरणीची ( गायीची ) वपा काढून, ती 'अग्नेर्वर्म परि गोभिः' या मंत्रानें ( १०-१६-७ ) त्या प्रेताच्या मुखावर व मस्तकावर

पसरली जाते. अनुस्तरणी नसल्यास ती बाब सातूच्या धान्यांनीं भरून काढण्यांत येते व वपेच्या जागीं आपूपाचा उपयोग करण्यांत येतो. नंतर दक्षिणाग्नींत तुपाची आहुति देण्यांत येऊन मग त्या अग्नीला उद्देशून 'अस्मात्त्वमधि जातोऽसि त्वदयं जायतां पुनः ' शु. य. ३५ )–हे अग्ने ! या यजमानापासून तूं जसा उत्पन्न झालास, तसाच हा यजमानहि तुझ्यापासून उत्पन्न होवो !–अशी प्रार्थना करण्यांत येते. नंतर चितेला अग्निसंस्कार करून ती पेटविण्यांत येते.

चिता पेटून त्यांत प्रेत जळत असतां 'प्रेहि प्रेहि पथिभिः' ( १०-१४-७ ), 'संगच्छस्व' ( १०-१४-८ ), 'अति द्रव सारमेयौ' ( १०-१४-१० ), व 'यौ ते श्वानौ' ( १०-१४-११ ) हे मंत्र जपण्यांत येतात. नंतर त्या प्रेताचें 'मैनमग्ने वि दहो' ( १०-१६-१ ) 'शृतं यदा करसि' ( १०-१६-२ ), 'सूर्यं चक्षुर्गच्छतु' ( १०-१६-३) 'अजो भागः' (१०-१६-४), 'अव सृज पुनरग्ने' ( १०-१६-५ ) व 'यत्ते कृष्णः' ( १०-१६-६ ) या मंत्रांनीं उपस्थान करण्यांत येतें. प्रेत जळत असतां त्या चितेंतून तो धूर निघत असतो, त्या धुराच्या सहाय्यानें तो मृताचा जीवात्मा स्वर्गाकडे जातो व यमदूत म्हणजे यमाचे ते चार डोळ्यांचे दोन श्वान त्यास मार्गदर्शन करतात, असा समज आहे.

प्रेत चांगलें जळल्यावर प्रेत-कर्म-कर्ता 'इमे जीवा विमृतैः' (१०-१८-३) हा मंत्र जपतो. नंतर सर्व लोक तेथून निघून परत वळून न बघतां सरळ घराकडे वळतात. स्मशानांतून बाहेर आल्यावर वाटेंत तलाव अगर विहीर असेल तेथें जाऊन स्नान करून, ओंजळींत पाणी घेऊन दक्षिणाभिमुख होऊन मृताच्या गोत्राचा व नांवाचा उच्चार करून 'हे मृता ! हें उदक तुझ्याप्रीत्यर्थ आहे.' असें म्हणून, तें उदक विसर्जन करतात. नंतर पाण्यांतून बाहेर येऊन तें भिजलेलें वस्त्र सोडून, दुसरें चांगलें परिधान करून नक्षत्रदर्शनापर्यंत किंवा सूर्यास्तापर्यंत तेथेंच राहून नंतर घरांत प्रवेश करतात. त्या दिवशीं घरांत स्वयंपाक वर्ज्य असून, विक्रीच्या अन्नावर भागविलें जातें. ( या प्रकरणांत जे मंत्र दिले आहेत त्या सर्वांचा अर्थ आमच्या ' ऋग्रत्न-भांडारां'त पहावयास मिळेल. )

नंतर तिसरे दिवशीं, अगर पांचवे दिवशीं अगर विषम दिवशीं, जो दिवस साधेल त्या दिवशीं, स्मशानांत जाऊन, मृताचे अस्थिसंचयन करण्यांत येतें. ती हकीकत थोडक्यांत अशी:—तिसऱ्या अगर पांचव्या दिवशीं प्रेतक्रिया-कर्मकर्ता पुरोहितासह स्मशानांत जाऊन, त्या प्रेत-दहनस्थानावर 'शीतिके शीतिकावति' या मंत्रानें दुग्धमिश्रित जलानें प्रथम सिंचन करून, मग अस्थि वेंचण्याच्या कामास सुरुवात करतो. प्रथम पायाच्या वेंचून घेऊन त्या एका मातीच्या कुंभांत आवाज न होतां हळूंच घालतो. नंतर मस्तकाच्या आणि त्यानंतर इतर अस्थि क्रमानें वेंचून घेऊन कुंभांत भरून, मग त्याचें तोंड वर झांकणी ठेवून बंद करतो. आणि तो कुंभ तेथून उचलून घेऊन, पाणी न लागेल अशा जमिनींत खड्डा खणून तो कुंभ तेथें पुरतो. पुढें दहाव्या दिवशीं त्या अस्थींचें नदी अगर इतर पवित्र जलाशयांत विसर्जन करण्यांत येतें. पुढें बाराव्या दिवशीं सपिंडीकरण करण्यांत आल्यावर मृताचा हा और्ध्वदेहिक संस्कार पूर्ण झाला असें होतें. हें सपिंडीकरण झाल्याशिवाय मृताचा पितरांमध्यें समावेश होऊं शकत नाहीं. तें झाल्यावर मग तो मृताचा पितर होतो. अशी ही मृताच्या और्ध्वदेहिक संस्काराची ढोबळ हकीकत आहे.

## दायभाग व वारसा

वैदिक आर्यांच्या कांहीं महत्वाच्या प्रश्नांवर येथपर्यंत धांवती चर्चा करण्यांत आल्यावर आतां हाताळण्याचा आणखी एक प्रश्न राहतो, तो म्हणजे हा कीं वैदिक कुटुंबाचा कर्ता म्हणजे गृहपति हा मृत झाल्यावर त्याच्या पश्चात् त्याच्या मिळकतीची वासलात लावण्यासंबंधीं वेदकालांत कांहीं व्यवस्था होती कीं काय? अर्थात् हा प्रश्न कांहीं अवास्तविक नाहीं. म्हणून त्याविषयीं सुचलेले दोन शब्द येथें टिपून ठेवितों. मुख्य प्रश्नास हात घालण्यापूर्वी वैदिक आर्य हा प्राणी घरदार करून स्थायिक झाला होता का पाठीवर बिऱ्हाड घेऊन आज येथें तर उद्यां तेथें असा भटकत फिरणारा पादचारी फिरस्ता होता, याचा प्रथम थोडासा कानोसा घेऊन पाहूं. या बाबतींत वेदग्रंथाची नुसती वरवर चाळणी करून पाहिल्यास व त्याच वेळीं यज्ञसंस्थेवरून नजर फिरविल्यास असें सांगण्यास

प्रत्यवाय दिसत नाहीं कीं वेदकाळीं वैदिक आर्य हा भटक्या वृत्तींतून निवळून व घरदार व शेतीवाडी करून चांगला स्थायिक झालेला होता. गाईगुरें, शेळ्या-मेंढ्या, गाड्याघोडे, धनधान्य, वस्त्रपात्र, इत्यादि अनेक संसारोपकरणांनीं तो चांगला सुसंपन्न असून, शिवाय त्याची समाजधारणा व राजकारणहि होतें. तो स्थितिवंत होता, स्थावर-जंगम मिळकत बाळगून होता अगर असावा असें पुढील वचनांवरून निदान बांधण्यास पुष्कळशी जागा आहे. 'आम्हांस सर्व प्रकारची संपत्ति दे!' ('विश्वानि द्रविणानि धेहि' ५.४-७), आम्हांस हजारांनीं संपत्ति दे' ('रयिं धेहि सहस्त्रिणम्' ८-४३-१५), 'बलवर्धक अन्न दे!' ('वीरवतीमिषम्' ८-४३-१५), 'तेजस्वी संपत्ति दे!' ('द्युमत्तमं रयिं दाः' ५-२४-२) 'श्रेष्ठ प्रकारची संपत्ति दे' ('श्रेष्ठानि द्रविणानि धेहि' २-२१-६) 'आमचें घर गाई, गुरें इत्यादि पशूंनीं भरभराटलेलें असो!' ('पशुमाँ अस्तगातुः' ३-५४-१८), आम्हांस राहावयास अत्यंत प्रशस्त, धनधान्यादिकांनीं सुसमृद्ध, व रक्षण करण्यास समर्थ असें भरभक्कम घर दे!' 'तन्नो देवा यच्छत सुप्रवाचनं छर्दिरादित्याः सुभरं नृपाय्यम्' १०-३५-१२), आमचें घर सर्व बाजूंनीं भरभराटेल असें कर!' ('उरु क्षयाय नः कृधि' ८-६८-१२). या व अशा ठशाच्या वैदिक प्रार्थना वेदांत पदोपदीं आढळून येतात. त्यावरून वैदिक आर्य हा कुटुंबवत्सल व स्थितिवंत प्राणी होता असें अनुमान काढल्यास, त्याला नांव ठेवण्यास जागा नाहीं, असें आम्हांस वाटतें. असो.

आतां येथें असा एक प्रश्न उद्भवतो कीं कुटुंबांतील गृहपति—म्हणजे कर्ता पुरुष-मयत झाला तर त्याच्या पश्चात् त्याच्या मिळकतीचा वारसा कोणाकडे जाई? कोण त्याची मिळकत घेत असे? हा प्रश्न सोडवितांना दोन दृष्टींनीं विचार कर्तव्य आहे. एक धर्मदृष्ट्या व दुसरा सानिध्यदृष्ट्या. धर्मदृष्ट्या म्हणजे बाप मृत झाला म्हणजे त्याच्यासाठीं कांहीं धार्मिक कृत्यें करावयाचीं मागें राहतातच. म्हणजे तो निवर्तल्यावर त्याचीं और्ध्वदैहिक क्रियाकर्में व सालोसालीं त्याच्या मृततिथीस त्याला उद्देशून करावयाचीं श्राद्धपक्ष इत्यादि पैतृक कर्में, हीं त्याला सद्गति मिळण्यास व

परलोकीं त्याला सुखासमाधानानें राहतां यावें म्हणून करावींच लागतात. तेव्हां तीं करण्यास कोणास अधिकार पोंचतो, तोच त्या मृताच्या पश्चात् त्याच्या मिळकतीचा वारस व मालक होतो.

आतां हा अधिकार कोणाकडे जातो, या प्रश्नावर हा वारसाचा प्रश्न सुटणार आहे. म्हणून तो अधिकार कोणाचा, याचा येथें थोडक्यांत विचार करूं. मृताच्या कुटुंबांत त्याच्या अगदीं जवळचें नातेवाईक म्हणजे त्याची पत्नी, त्याचा मुलगा व त्याची मुलगी, हे लोक होत. त्याशिवाय त्याचे आईबाप, बहीणभाऊ हे सुद्धां आहेत. पण त्यांचा प्रश्न वारसाप्रकरणांत फारसा उद्‌भवत नाहीं, म्हणून त्यांना बाजूस काढून फक्त स्त्री, पुत्र व मुलगी या तिघांचाच येथें विचार करूं. या तिघांत मृताचा जो संपूर्ण प्रतिनिधि असेल,तोच त्याचा दाय घेण्यास वारस ठरतो.

आतां मयताच्या पश्चात् त्याच्या मिळकतीस कोण वारस होतो, हें पाहूं. प्रथम त्याच्या पत्नीचा प्रश्न घेऊं. पत्नी ही मयताला अत्यंत जवळची आहे, ही गोष्ट खरी. पण वारसाचा प्रश्न निघाला असतां तिची बाजू एका दृष्टीनें लंगडी पडते. तिला धर्मकार्यांत स्वतंत्र अधिकार पोंचत नाहीं. शिवाय ती मयताची संपूर्ण प्रतिनिधीहि होऊं शकत नाहीं. कारण पुरुषाची ती अर्धांगी आहे. ' अर्धो ह वा एष आत्मनो यज्जाया ' असें शतपथांत म्हटलें असून, त्यावरून तिला संपूर्ण प्रतिनिधीचा अधिकार पोंचत नाहीं, हें स्पष्ट होतें: तर मग दुसरा वारस कोण होऊं शकेल ? पुत्र होईल का ? याला उत्तर होय असेंच देणें प्राप्त आहे. कारण बापाचा तो प्रत्यक्ष आत्माच आहे ! ' आत्मा वै पुत्र नामासि ' असें श्रुतींत म्हटलें आहे. त्याला मयताचीं और्ध्वदैहिक धर्मकृत्यें करण्याचा अधिकार असून, शिवाय तो त्या मृत पित्याचा पूर्ण प्रतिनिधी आहे. म्हणून त्याचा हक्क मयताच्या बायकोपेक्षां सरस आहे. आतां मुलीचा प्रश्न घेऊं. ती झाली तरी आपल्या आईप्रमाणेंच कमी प्रतीची ठरते. तिलाहि धर्मकृत्यांचा अधिकार नाहीं. शिवाय पुत्राप्रमाणें प्रतिनिधित्वहि नाहीं. शिवाय आणखी, लग्न झाल्यावर पितृकुलांतून निसटून ती आपल्या पतीच्या गोत्रांत जाते. म्हणजे तिचा पितृकुलाशीं असलेला जवळचा संबंध सुटतो. म्हणून तीहि वारस होऊं शकत नाहीं.

बाप वारला तर त्याची मिळकत त्याच्या पश्चात् कोणाकडे जावी याबद्दल ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, आमच्या पश्चात् आमचें घरदार—म्हणजे सर्व मिळकत—आमच्या मुलाबाळांकडे जावो. ('वर्तिस्तोकाय तनयाय यातम्' ८-९-११) शिवाय त्याच्या जोडीला हें वचनहि विचारणीय आहे. पुत्र जन्मल्याबरोबर त्याला पित्रार्जित मिळकतींत भाग घेणेचा जन्मसिद्ध हक्क उत्पन्न होतो. ('पित्रो यज्जानं पित्रोरधीयति') पुत्र हा जन्मल्याबरोबर पितराचें धन मिळवितो असा या वचनाचा अर्थ आहे. म्हणजे बाप जिवंत असतांनाच पुत्र हा जन्मल्याबरोबर त्याच्या धनाचा भागीदार होतो. आणि तो मेल्यावर त्याच्या मिळकतीस पूर्ण मालक होतोच होतो, हें आतां मग उघड सांगावयास नकोच.

आतां त्याच्या बहिणीची गोष्ट पाहूं. ऋग्वेदांत याविषयीं स्पष्ट म्हटलें आहे कीं भाऊ हा आपल्या बापाच्या मिळकतींत तिला वांटेकरीण करीत नाहीं. ('न जामये तान्वो रिक्थमारैक्' ३-३१-२). औरस मुलगा (तान्वो) हा आपल्या बहिणीस (जामये) पित्रार्जित मिळकतींत हिस्सा (रिक्थं) देत नाहीं (न आरैक्). या वचनाचा अम्मल वारसा प्रश्नांत ऋग्वेद कालापासून आतांपर्यंत अव्याहत चालत आला आहे. आतां ती बहीण जर अविवाहित असेल तर तिचें लग्न करून तिला संसारास लावण्याची जबाबदारी मात्र त्याच्यावर येऊन पडते. ('चकार गर्भं सनितुर्निधानम्' ३-३१-२) असो.

यावरून हें स्पष्ट झालें कीं मयतास बायको, पुत्र व कन्या असली तर त्यांच्यांत वारसाचा मान प्रथम पुत्राकडे जातो. तो नसेल तर मयताची बायको त्याच्या मिळकतीस वारस होते आणि पुत्र व पत्नी हीं दोन्हीं नसलीं तर शेवटीं त्या मयताची मुलगी वारस होते. या तत्त्वावरच हिंदूंच्या सर्व वारसांचा प्रश्न सोडविण्यांत आला आहे.

शेवटीं येथें हें सांगणें जरूर आहे कीं, पुत्र या शब्दांत मुलगा, नातू व पणतू या तिघांचा आणि पिता या शब्दांत बाप, आजा व पणजा या पूर्वजांचा अंतर्भाव होतो. वैदिक आर्यांत वंशाची वाढ फक्त पुरुष संततीकडून होते. स्त्रीसंततीकडून नाहीं. ऋग्वेदांत वारसाविषयीं व दायभागाविषयीं एवढीच माहिती आढळते.

---



## प्रकरण १५ वें

# मरणोत्तर जीवन

मनुष्य मेल्यावर त्याचें पुढें काय होतें, याची रूपरेषा ऋग्वेदांतील दहाव्या मंडळांत चौदा व सोळा या सूक्तांत दाखविण्यांत आली आहे. या दोन सूक्तांत मृताची मरणोत्तर स्थिति व गति याची थोडक्यांत पण स्पष्ट अशी कल्पना आपणास पाहावयास मिळते. त्यावरून असें म्हणावयास हरकत नाहीं कीं मरणोत्तर स्थिति ही कांहीं अंशीं देहयुक्त स्थितिसारखीच असते. अर्थात् हा मरणोत्तर देह स्थूल पंचमहाभूतात्मक नसून, तो सूक्ष्म असतो म्हणजे—यालाच अध्यात्म शास्त्रांत लिंगदेह म्हणतात. जोंपर्यंत मनुष्य वासनायुक्त असतो, तोंपर्यंत त्याला हा लिंगदेह जन्मोजन्मीं सुटत नाहीं आणि या देहानेंच पुढें तो आपल्या कृतकर्मांचीं—पापपुण्याचीं—फलें उपभोगीत असतो, असा वैदिक तत्त्वज्ञानाचा सिद्धांत आहे. 'किलेदं म्रियते, न जीवो म्रियते ' या छांदोग्य वचनाचा अर्थच असा कीं हें शरीर तेवढेंच मरतें, जीव कांहीं मरत नाहीं. अर्थात् जीव म्हणजे वासनायुक्त आत्मा. हा आत्मा वासनारहित झाला म्हणजे तो ब्रह्म होतो. म्हणजे तो आपल्या मूळ स्वरूपांत जाऊन विरतो. हाच मोक्ष ! असो.

येथें सांगावयाचा मुद्दा हा कीं मनुष्य मेला म्हणजे फक्त त्याचा पंचभूतात्मक स्थूल देह तेवढा पडतो आणि त्यांतील अमरतत्त्व म्हणजे जीव हा तेथून निघून जातो. त्या वेळीं त्याच्याबरोबर काय काय जातें, हें याज्ञवल्क्यांनीं शतपथांत अगदीं स्पष्ट करून सांगितलें आहे. तें म्हणजे असेंः—' एष आत्मा निष्क्रामति चक्षुष्टो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्यो वा शरीरदेशेभ्यः। तमुत्क्रान्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनुत्क्रामन्ति। तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्व प्रज्ञाच ॥' (श. प. १४-७-२-३)

हृदयाच्या अग्रभागामधून हा जीवात्मा बाहेर पडतो अथवा चक्षु, मस्तक किंवा शरीराच्या इतर भागांतून तो निघून जातो. तो निघून गेला म्हणजे त्याच्याबरोबर प्राणहि निघून जातो. प्राणाच्या मागोमाग इतर इन्द्रियेंहि निघून जातात. त्या वेळीं तो विशेष ज्ञानानें युक्त असतो. आणि वासनादि विशेष ज्ञानासह तो जातो. त्या वेळीं त्याचें ज्ञान, कर्म व वासना हीं त्याच्या मागोमाग म्हणजे बरोबरच जातात. हाच मनुष्याचा लिंगदेह होय; आणि तो जन्मजन्मांतरीं असतो. असो.

आतां मनुष्य मृत झाला म्हणजे त्याच्या प्रेताची व जीवात्म्याची पुढील व्यवस्था ऋग्वेदांत कशी लावण्यांत आली आहे, हें चार शब्दांत सांगून, वाचकांस त्याची ढोबळ कल्पना करून देतों. मनुष्य मेल्यावर त्याचें प्रेत जाळण्याची वैदिक आर्यांत प्रथा होती व तीच आज उच्चवर्णीय हिंदूंतहि आहे. याचें कारण असें कीं प्रेत दहन झाल्यावर अग्नि हा त्या मृताच्या आत्म्याला पुण्य लोकाप्रत म्हणजे स्वर्गाप्रत घेऊन जातो. ( 'यास्ते शिवास्तन्वो जातवेदस्ताभिर्वहेनं सुकृतामु लोकम्' १०-१६-४ ) वैदिक आर्य हा अग्नि-उपासक–अर्थात् देवोपासक–असल्यामुळें मरणोत्तर त्याला पुण्यलोक प्राप्त होतो, अशी त्यांची दृढ श्रद्धा असे. स्वधा म्हणून प्रेताला अग्नि दिल्यावर त्याला पितृलोकांत जाण्यासाठीं पुनः नवीन देह देण्यासाठीं त्या अग्नीची प्रार्थना करण्यांत आली आहे. ( 'अव सृज पुनरग्ने पितृभ्यो यस्त आहुतश्चरति स्वधाभिः।' १०-१६-५ ) याचा अर्थ असा कीं मेल्यावर तो देवांच्या अर्थात् अग्नीच्या स्वाधीन होतो. ( 'यदा गच्छत्यसुनीतिमेतामथा देवानां वशनीर्भवति' ( १०-१६-२ ).

अशा वेळीं इंद्रियें कोठें जातात याचाहि विचार तेथें केलेला आहे. चक्षु हा मनुष्य मेल्यावर सूर्याप्रत जातो व प्राण वायुप्रत जातो. ( 'सूर्यं चक्षुर्गच्छतु वातमात्मा' १०-१६-३ ) याचा खुलासा ऐतरेय उपनिषदांत सांपडतो. तो असाः—'अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशद्वायुः प्राणो भूत्वा नासिके प्राविशदादित्यश्चक्षुर्भूत्वाऽक्षिणी प्राविशद्दिशः श्रोत्रं भूत्वा कर्णौ प्राविशन्नोषधिवनस्पतयो लोमानि भूत्वा त्वचं प्राविशंश्चन्द्रमा

मनो भूत्वा हृदयं प्राविशन्मृत्युरपानो भूत्वा नाभिं प्राविशदापो रेतो भूत्वा शिश्नं प्राविशन्' (ऐतरेय उप. २-४) आत्मा जीव होऊन शरीरांत शिरल्यावर त्याच्याबरोबर अग्नि, वायु, सूर्य इत्यादि देवता इन्द्रियांना प्रकाश देण्यासाठीं त्या त्या इन्द्रियांत जाऊन शिरतात याचा उल्लेख वरील उताऱ्यांत आहे. त्याला धरूनच मनुष्य मेल्यावर त्याचीं इन्द्रियें कोठें जातात याचा उल्लेख 'सूर्यं चक्षुर्गच्छति' असें ऋग्वेदांत थोडक्यांत सांगून तीं तीं इंद्रियें प्रथम कोठून आलीं तेथें तीं पुनः आपापल्या मूळस्थानीं जातात, असें ध्वनित केलें. वैदिक धर्माची शिकवण कशी चोख आहे, त्याचा पडताळा हा असा आहे. असो.

अग्नीला तो मृत देह जाळल्यावर त्या देहरहित जीवात्म्याला पितृलोकांत घेऊन जाण्याविषयीं प्रार्थिलें आहे. 'शृतं यदा करसि जातवेदो अथेमेनं परि दत्तात् पितृभ्यः १०·१६-२) आणि त्या जीवात्म्याला पितृयाण मार्गानें पितृ लोकांत जाण्यास विनविलें आहे ('प्रेहि प्रेहि पथिभिः पूर्वेभिर्यत्रा नः पूर्वे पितरः परेयुः' १०-१४-७) इतकेंच नव्हे तर त्यानें केलेल्या इष्टापूर्त पुण्यकर्मांच्या योगानें आकाशांतील अत्युच्च लोकांत म्हणजे स्वर्गांत जाऊन तेथें पितर व यम यांजबरोबर रहाण्यास त्या मृतास सांगितलें आहे. ('सं गच्छस्व पितृभिः सं यमेनेष्टापूर्तेन परमे व्योमन्' १०-१४-८) किंवा वाटल्यास त्याच्या इच्छेप्रमाणें आपल्या स्वतःच्या घरीं तेजस्वी शरीर धारण करून पुनः जन्मास येण्यासहि सांगितलें आहे. ('पुनरस्तमेहि सं गच्छस्व तन्वा सुवर्चाः' १०-१४-८) याप्रमाणें त्या मृताच्या जीवात्म्याची मरणोत्तर स्थिति गति होते. अर्थात् ही देवोपासकाची गोष्ट आहे. याच्या उलट, जे देवद्वेष्टे व धर्मनिंदक आहेत, पापी व दुष्ट आहेत, कंजूष व खादाड आहेत, त्यांना स्वर्गद्वार बंद असून, दुःखरूपी खोल खड्ड्यांत म्हणजे नरकांत त्यांची बोळवण करण्यांत येतें, हें निराळें सांगावयास नकोच.

आतां येथें आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, मनुष्य मेल्यावर अमृतत्व पावतो म्हणजे पुनः जन्मास येत नाहीं, असें कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे. व तो पुनः जन्मास येतो असेंहि कांहीं ठिकाणीं

म्हटलें आहे. मग यांत सत्य कोणतें? हा विरोध कां व कसा उत्पन्न झाला? यावरून मनुष्यानें समजावें तरी काय? अशा प्रकारचे प्रश्न चिकित्सक मनुष्याच्या मनांत उद्‌भवून त्याचें मन साशंक व अस्थिर बनतें. अतएव त्याचा खुलासा येथें थोडक्यांत करून दाखविणें हें आम्हास इष्ट वाटल्यावरून त्याविषयीं दोन शब्द लिहितों:—मनुष्य मेल्यावर अमर होतो आणि तो मेल्यावर पुन: जन्मतो अशा अर्थाचीं वाक्यें ऋग्वेदांत आहेत; आणि वर वर पाहणारास त्यांत विरोध दिसतो हें खरें, पण वस्तुतः तसा विरोध नाहीं. वैदिक धर्मांत ज्ञानी लोकांचा स्वर्ग व कामी लोकांचा स्वर्ग याप्रमाणें स्वर्गाचे दोन भेद आहेत व त्यांचे मार्गहि निरनिराळे आहेत. जे ज्ञानी आहेत ते देवयान मार्गानें स्वर्गास जाऊन अमर होतात व जे कामी आहेत ते पितृयाण मार्गानें स्वर्गास जाऊन, तेथील सुखोपभोग घेतल्यावर पुनः परत जन्मास येतात. ज्या स्वर्गांत गेल्यावर पुनः जन्म नाहीं, त्या स्वर्गाला ब्रह्मलोक ऊर्फ सत्यलोक हें नांव असून, जेथें गेल्यावर पुन: जन्म मिळतो, त्या स्वर्गाला पितृलोक ऊर्फ यमलोक म्हणण्याचा परिपाठ आहे. ज्या शहाण्यांनीं तें आदितत्त्व-मूलतत्त्व-आत्मतत्त्व—जाणलें, ते मरणोत्तर अमृतत्व प्राप्त करून घेतात. ( 'ये इत् तद्विदुस्ते अमृतत्वमानशुः' १-१६४-२३ ) आणि अर्थात् ज्यांना त्याचें ज्ञान नाहीं, त्यांना स्वर्ग मिळाला तरी अमरत्व प्राप्त होत नाहीं. ते कांहीं काल स्वर्गांत राहून पुन: या लोकीं परत येतात. म्हणूनच मृताला उद्देशून म्हटलें आहे कीं सुंदर शरीर धारण करून तूं पुन: या घरांत जन्मास ये ( 'पुनरस्तमेहि सं गच्छस्व तन्वा सुवर्चाः' १०-१४-८ ) याचें कारण असें कीं, जे यज्ञ, दान, तप करतात, ते पुण्यवान असून, त्यांची गति स्वर्गापर्यंतच—पितृलोकापर्यंतच—इंद्रादि लोकापर्यंतच—असते. पुढें ते जाऊं शकत नाहींत. पण जे आत्मज्ञानी आहेत, ते स्वर्गास तर जातातच पण त्याच्याहि पुढें ते आदित्य, विद्युत् व ब्रह्म-लोकापर्यंत मजल मारून, अमर होतात. जें ब्रह्म लोकापर्यंत गेले त्यांनाच—फक्त त्यांनाच—पुनर्जन्म नाहीं. ('ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति, तेषां न पुनरावृत्तिः' श. प. १४-९-१-१८) असें याज्ञवल्क्यांनीं म्हटलें आहे. असो. हें इतकें विवेचन प्रस्तुत स्थलीं वाचकांची शंका निरसनार्थ पुरेसें आहे.

# वैदिक आर्यांचा स्वर्ग

जगांतील प्राचीनांतला अत्यंत प्राचीन धर्म–त्या प्रभावी व तेजस्वी वैदिक धर्माची-उभारणी ज्या एका महान् तत्त्वावर झाली आहे, तें सुंदर तत्त्व म्हणजे हें—' न जीवो म्रियते ' ( छा. ६-११-३ )–जीव हा कांहीं मरत नाहीं. हाच भावार्थ शतपथांत याज्ञवल्क्यांनीं ' प्राणा एव अमृता आसु: '–प्राण म्हणजे जीव हा अमर आहे. ( १०-१-४-१ ) या वचनांत ग्रथित करून ठेविला आहे. मरणारें म्हणजे हें पंचमहाभूतात्मक शरीर होय. ' किलेदं म्रियते ' हें शरीर मर्त्य आहे. हीच गोष्ट शतपथांत ' शरीरं मर्त्यं ' या शब्दांनीं स्पष्ट बोलून दाखविली आहे. ( श. प. १०-१-४-१ ) या मुख्य सूत्राला धरूनच–' आत्मैव सत्यम् । अन्यदार्तम् ' या सत्यज्ञानाला धरूनच–वैदिकांचें सगळें धर्मकारण रंगविण्यांत आलें आहे. वैदिकांच्या धर्मकारणांत आधुनिकांचें राजकारण, समाजकारण, नीतिशास्त्र, व्यवहार, विश्वज्ञान, व तत्त्वज्ञान या सर्वांचा समावेश होतो, इतका हा धर्म विश्वव्यापक व सर्वसंग्राहक असून, त्याची सर जगांतील इतर कोणत्याहि धर्माला येत नाहीं, हें आम्ही प्रतिज्ञेवर सांगूं इच्छितों, आणि म्हणूनच 'धर्मो विश्वस्य जगत: प्रतिष्ठा ', असें म्हटलें आहे आणि हें सूत्रवाक्य डोळ्यांपुढें ठेवूनच त्या रोखानें वैदिक धर्माची मांडणी करण्यांत आली आहे, ही गोष्ट सतत डोळ्यापुढें ठेवूनच वेदग्रंथांशीं हितगुज करणारांनीं करावें, तरच जिज्ञासु मनाला शांति व मंदबुद्धींत प्रकाश उजळेल ! आणि आमचे सूज्ञ वाचक सश्रद्ध मनानें व सद्भावनेनें हा ग्रंथ वाचतील हें गृहीत धरून मनुष्याच्या मरणोत्तर प्राप्तव्यस्थानाची–त्या दिव्य अमरलोकाची–रूपरेखा दोन शब्दांत आम्ही येथें आंखून दाखवितों.

मनुष्याला जें काय पाहिजे आहे–ज्यासाठीं तो धडपडत आहे–जिकडे त्याची सारखी ओढ लागून राहिली आहे—तें म्हणजे अखंड सुख, उदंड आनंद व परमशांति ही होय ! अर्थात् परमानंद व शाश्वत शांति ! तें पदरांत पडेतोंपर्यंत विचारी जीवाला–जागृत जीवाला–खरी शांति नाहीं किंवा पूर्ण समाधान नाहीं. आणि तें कसें मिळेल नि कोणाला लाभेल हें वैदिक

धर्मानें आपल्यापरी एक सुनिश्चित अशी तर्कशुद्ध व अनुभवघटित योजना आंखून, ती विचारी मानवापुढें—जिज्ञासु मुमुक्षुपुढें—ठेविली आहे. पटल्यास घ्यावी, नाहीं तर कोणाचें कांहीं जात नाहीं! वेदोक्त मार्गानें वाटचाल करणाराला मरणोत्तर कोणती गति प्राप्त होते, याचें चित्र वेदांत ठिकाठिकाणीं तुटक तुटक रंगवून ठेवण्यांत आलें आहे आणि तें सर्व एकत्रित करून पाहिल्यास भाविक मनाला एक प्रकारचें शांतिसमाधान वाटतें, हें खरें. पण त्या प्रश्नांत शिरण्यापूर्वी मनुष्याच्या परमानंदाची वैदिक दृष्ट्या किंचित कल्पना देऊन, मग मरणोत्तर मिळवावयाच्या पुण्यवंतांच्या पुण्यलोकाची—देवलोकाची—म्हणजे स्वर्गलोकाची—माहिती देणें हें इष्ट व युक्त वाटल्यावरून आम्ही प्रथम परमानंदाची कल्पना श्रुतींत कशी बिंबविली आहे, याचा धावता उल्लेख करून मग प्रस्तुत मुद्याकडे वळतों.

मानवी परमानंदाची यथार्थ कल्पना आल्याशिवाय अत्युच्च अशा ब्रह्मानंदाची या अल्पज्ञ मानवी बुद्धीला खरी ओळख पटणें सहसा शक्य नाहीं. खरें म्हटलें तर ब्रह्मानंद हा कसा असतो, हें शब्दशास्त्राला अगम्य आहे. तो आनंद अनिर्वचनीय आहे, पण असें सांगितल्यानें जिज्ञासूचें व्हावें तसें समाधान होत नाहीं. म्हणून वैदिक ऋषींनीं वाणीला शक्य तेवढ्या शब्दाचा उपयोग करून, त्याची अंधुकच कां होईना, पण पर्यायानें कल्पना करून देणेचा आटोकाट प्रयत्न केला आहे. त्यांतल्यात्यांत याज्ञवल्क्यांनीं याची अधिकांत अधिक ओळख करून देण्याचा प्रयत्न केला असून, त्यावरून वाचकांना किंचित् बोध होण्यासारखा आहे, म्हणून त्यांच्या शब्दांतच आम्ही ती येथें देत आहों. शतपथांत मानवी परमानंदाची कल्पना दिली आहे ती अशी:—'स यो मनुष्याणां राद्धः समृद्धो भवति । अन्येषामधिपतिः सर्वैर्मानुष्यकैः कामैः संपन्नतमः स मनुष्याणां परम आनंदः।' (श. प. १४-७-१-३२). मनुष्यांमध्यें जो कोणी अत्यंत सुखी, सकल प्रापंचिक सुखोपकरणांनीं सुसंपन्न आहे आणि इतर लोकांवर जो सत्ता चालवूं शकतो आणि त्याबरोबरच सर्व कामोपभोगांनीं अत्यंत समृद्ध आहे, अशाचा जो आनंद तो

इहलोकांतील मनुष्याचा परमानंद होय. हा जो मानव परमानंद आहे, तो नाशवंत आहे. पण देवांचा जो आनंद आहे, तो कसा आहे म्हणाल तर तो असाः—वर जो मानुष परमानंद म्हणून सांगण्यांत आला, त्या आनंदाच्या शंभर पट जो आनंद तो पितरांचा आनंद, अशा पितरांच्या शंभर पटीचा जो आनंद, तो कर्मदेवांचा एक आनंद आणि या कर्मदेवांच्या शतपटीचा जो आनंद, तो देवांचा एक आनंद ! या देवांचा जो आनंद आहे, तो स्वर्गलोकांत आहे ! ! आणि तो अभंग आहे. हें सर्व येथें सांगण्याचा हेतु एवढाच कीं, आधुनिकांना मानुष परमानंदाची व देवलोकांतील आनंदाची कांहींशी कल्पना आणून द्यावी. याज्ञवल्क्यांनीं सांगितलेली परमानंदाची ही कल्पना जगांतील कोणत्याहि विचारी माणसाला पटणारी अशीच तर्कशुद्ध व अनुभवसिद्ध आहे.

आतां पुन: प्रस्तुत मुद्यावर यावयाचें म्हणजे वैदिकांचा देवलोक—अर्थात् स्वर्गलोक—कसा आहे, याचें ढोबळ चित्र वाचकांपुढें रंगून ठेवणें. तो प्रयत्न आम्ही ऋग्वेदाला चिकटूनच स्थूल मानानें दिग्दर्शित करूं इच्छितों. वैदिक आर्यांचा तो स्वर्ग—विचारी मानवांचें तें सुखनिधान—पुण्यशील व योगी लोकांचें तें विश्रामधाम—सत्यसंकल्प व सत्यव्रत दिव्य विबुधांचा तो आनंदमय सत्यलोक ऊर्फ स्वर्गलोक—म्हणजे असा आहे, कीं जेथें अखंड प्रकाश उजळून आहे ! ( ‘ यत्र ज्योतिरजस्रम् ’ ९-११३-७). जेथें उदंड आनंद आहे ! जेथें परम उल्हास आहे ! जेथें शाश्वत संतोष आहे आणि जेथें अक्षय प्रहर्ष आहे ! ! ( ‘ यत्रानंदाश्च मोदाश्च मुद: प्रमुद आसते ’ ९-११३-११ ). विष्णूचें श्रेष्ठ स्थान म्हणतात तें हेंच होय ! हा स्वर्ग ! ( ‘ विष्णोर्यत् परमं पदम् ’ १-२२-२१ ) आणि तेथें दिव्य अमृताचा सुमधुर झरा सारखा उफाळत असतो. ( ‘ विष्णो: पदे परमे मध्व उत्स: ’ १-१५४-५ ) तेथें सोम, घृत व मध यांची उदंड सुबत्ता आहे ( १-१५४-१ ) येथें स्वधारूपीं परमान्न आहे आणि त्यामुळें शाश्वत तृप्तिहि आहे. ( ‘ स्वधा च यत्र तृप्तिश्च ’ ९-११३-१० ). म्हणून येथें स्वच्छंदानें यथेच्छ विहार करतां येतो. ( ‘यत्रानु निकामं

चरणम् ' ९-११३-९ ) आणि म्हणून येथेंच मानवी जीवात्म्याच्या सर्व इच्छा-आकांक्षा नितांत परिपूर्ण होतात ! !

असा हा वैदिक आर्यांच्या वेदांतला दिव्य लोक—म्हणजेच स्वर्ग लोक—असून, त्या लोकांत पुढील दिव्य विबुधांचा निवास असतो. तेथें तेज म्हणजे सूर्य आहे आणि ब्रह्म म्हणजे वेदनारायण आहे ! ( ' तेजश्च यत्र ब्रह्मच ' खिल. २०-४ ). जगज्जनक ब्रम्हा आहे व जगत्पालक विष्णु आहे. ( ' ब्रम्हा च यत्र विष्णुश्च ' खिल. २०-४ ). आाणि तेथें सोमेश्वर महादेवहि आहे ( ' यत्र सोमेश्वरो देवः ' खिल २०-५ ). तेथें यमराज राहतो, राजा वरुण राहतो व आमचे प्राचीन पितर राहतात ! ( ' यत्र नः पूर्वे पितरः परेयुः । उभा राजाना स्वधया मदन्ता यमं पश्यसि वरुणं च देवम् । ' १०-१४·७ ). तेथें ज्ञानी व योगी जातात व राहतात ( ' यत्न भावभावी योगीश्च ' खिल २०-२ ) तेथें इंद्र राहतो, मरुद्गण राहतात व सर्व देव राहतात ! ( ' यत्र देवा महात्मानः सेन्द्राश्च समरुद्गणाः ' खिल २०·४ ) आणि शंखचक्रगदाधराचें स्मरण व मुक्तिहि तेथेंच आहे. ( ' यत्र शंखचक्रगदाधरस्मरणं मुक्तिश्च ' खिल २०-६ ). अर्थात् या ठिकाणीं ज्ञानी, पुण्यवान व दिव्यविबुध एकत्र वास करून आहेत व असतात. वैदिक आर्यांचा हा असा स्वर्गलोक आहे ! !

इतकें सांगितल्यावर आतां हें सांगणें क्रमप्राप्तच झालें कीं असा हा दिव्य व पुण्यलोक, तो कोणाकरतां आहे ? तो सर्वांनाच सरांस मोकळा आहे, कां विशिष्ट लोकांचीच ती दिव्य दौलत आहे ? अर्थात् तेथें कोण जातात व कोण जात नाहींत ? या प्रश्नावर वैदिक ऋषींचा असा अभिप्राय आहे कीं हा स्वर्ग म्हणजे कांहीं सार्वजनिक अड्डा नव्हे ! तेथें लोकशाही नाहीं, देवशाही आहे ! तेथें व्यक्तीला महत्त्व नाहीं, गुणाला आहे ! जातीला नाहीं, कर्माला आहे ! मताला नाहीं, सत्याला आहे ! स्वार्थाला नाहीं, त्यागाला आहे ! ! अर्थात् स्वर्ग म्हणजे धर्मशाळा नव्हे, तर राखीव जागा आहे ! ! म्हणून तेथें कोणाचा प्रवेश होतो, कोणाला तें स्थान मिळतें आणि कोण त्याचा अधिकारी याविषयीं वेदनारायणाचा निर्णय आहे तो असा:—

‘ नाकस्य पृष्ठे अधि तिष्ठति श्रितो यः पृणाति स ह देवेषु गच्छति ’ ( १-१२५-५ )–जो मनुष्य वैदिक देवांना हविर्भाग अर्पण करून त्यांना संतुष्ट करतो, तोच स्वर्गातील उच्च व श्रेष्ठ स्थानाप्रत जाऊन तेथेंच कल्पांतापर्यंत राहतो. म्हणजे देवयजन करणारा देवोपासक मरणोत्तर देवांमध्यें म्हणजे स्वर्गामध्यें जाऊन राहतो. अर्थात् तो देवांपैकींच एक होतो. मनुष्याचा विकास, मनुष्याचा उत्कर्ष, मनुष्याचा उद्धार ज्या एका तत्त्वावर अवलंबून आहे आणि ज्या तत्त्वावर भरीव व संपूर्ण श्रद्धा ठेवून वैदिक आर्य या लोकीं ज्ञानाचा उच्च गौरीशंकर गांठून परलोकीं अखंड व उदंड आनंदांत समरस होऊन गेले, तें प्रभावी व आद्य तत्त्व म्हणजे हेंच ! हें ‘ यः पृणाति स ह देवेषु गच्छति ’ दिव्य तत्त्व ! याचाच अनुवाद ‘ मद्भक्ता यान्ति मामपि ’ या गीता वचनांतहि स्पष्टपणें बिंबित झाला आहे.

आतां देवांकडे कोण कोण जातात, याचा तपशीलच पाहिजे असल्यास तें या पुढील ऋचांत स्पष्ट पहावयास मिळेल. त्यांतली पहिली ऋचा म्हणजे ही:—‘ तपसा ये अनाधृष्यास्तपसा ये स्वर्ययुः । तपो ये चक्रिरे महस्तांश्चिदेवापि गच्छतात् ’ ( १०-१५४-२ )–जे आपल्या तपोबलानें अप्रतिहत झाले आहेत, जे तपाच्या योगानें स्वर्गात गेले आहेत, व ज्यांनीं महान् तप केलें आहे, त्यांच्याकडे–म्हणजे स्वर्गाकडे–हा मृतात्मा जातो! त्याचप्रमाणें या तपस्वी लोकाप्रमाणेंच हे पुढील थोर व उदार पुरुषहि स्वर्गास जातात. जे रणांत शौर्यानें लढून धारातीर्थीं आपला देह ठेवितात, अथवा यज्ञांत म्हणजे देवकार्यांत जे ब्राह्मणांस सढळ हातानें हजारांनीं दाक्षिणा देतात, असे वीर व उदार महात्मे जेथें जातात, तेथें तूंहि जा ! ( ‘ ये युध्यन्ते प्रधनेषु शूरासो ये तनूत्यजः । ये वा सहस्रदक्षिणास्तांश्चिदेवापि गच्छतात् ॥ ’ १०-१५४-३ ). त्याचप्रमाणें पूर्वींच्या काळीं ज्यांनीं सत्यधर्माचें आचरण केलें, ज्यांनीं यज्ञोपासना केली व ज्यांनीं सद्धर्मानें वागून आपला उत्कर्ष करून घेतला, असे तपोधन पितर जेथें गेले, तेथें हे मृतपुरुषा ! तूंहि जा ! (ये चित् पूर्व ऋतसाप ऋतावान ऋतावृधः । पितॄन् तपस्वतो यम तपोजाँ अपि गच्छतात् ॥ १०-१५४-४ ).

या वरील तीन मंत्रांवरून हें स्पष्ट होतें कीं जे तपोनिष्ठ आहेत, जे शूर वीर सद्धर्मरक्षणार्थ स्वयंस्फूर्तीनें लढून, धारातीर्थी देहपात करतात, जे दानशूर आहेत, जे यज्ञोपासक आहेत, जे सत्यनिष्ठ आहेत, जे सदाचरणसंपन्न आहेत, ते सर्व लोक पुण्यवान असून, मरणोत्तर ते स्वर्गास जातात. म्हणून म्हटलें आहे कीं, 'न यजमान रिष्यसि'–हे देवभक्ता! तुझा नाश होत नाहीं! ( ८-३१-१६ ). हा भावार्थ 'न मे भक्तः प्रणश्यति' असा भगवंतांनीं गीतेंत सांगितला आहे.

इतकेंच नव्हे, तर देवकार्यी कामास येणारे पशू देखील मरणोत्तर स्वर्गास जातात! कारण स्वर्गात हा मनुष्य, हा पशु, हा ब्राह्मण, हा चांडाळ, हा पुरुष, ही स्त्री, हा गरीब, हा श्रीमंत असा पक्षभेद नाहीं. जीवात्म्यांत असा भेद नसतो. पशूचा काय वा मनुष्याचा काय, आत्मा सगळा एकच. तेथें भेदभाव नाहीं. म्हणून देवकार्यी–सत्कार्यी–देह खर्ची घालणारा पशुदेखील पुण्यवान, ज्ञानी, योगी पुरुषाप्रमाणेंच स्वर्गाला जातो! ही गोष्ट आज आम्ही हिंदु विसरलों असलों, तरी वेदांत ती स्पष्ट नमूद करून ठेवण्यांत आली आहे. पहा, यज्ञांतील पशूला उद्देशून असें म्हटलें आहे कीं, हे पशो! तूं कांहीं मरत नाहींस! तुझा नाशहि पण होत नाहीं! तर देवयान मार्गानें तूं सरळ देवांकडे म्हणजे स्वर्गलोकाकडे जातोस! ('न वा उ एतन्म्रियसे न रिष्यसि देवाँ इदेषि पथिभिः सुगेभिः')

केवढा प्रभाव हा वैदिक देवोपासनेचा! पण जैनाळलेल्या आम्हां दुर्बल मनोवृत्तीच्या लोकांना हे तेजस्वी विचार काय होत! असो. स्वर्गाचें दार कोणाकोणाला मोकळें आहे व असतें, याचें आम्हीं हें थोडक्यांत निरूपण केलें आहे. त्यावरून स्वर्ग लोक हा फक्त सत्कर्मवंतांचा–देवकार्यी कामास येणाऱ्या जीवांचा–लोक असून, तेथें ते पुण्यशील महात्मे अखंड आनंदांत कालक्रमण करीत असतात. ('नरो यत्र देवयवो मदन्ति' १-१५४-४) असा स्पष्ट व सुंदर माथितार्थ ऋग्वेदांतून स्पष्ट ध्वनित होतो. वैदिकांचा स्वर्ग काय तो हा! उदंड प्रकाशमय नि अखंड आनंदमय असा पुण्यवंतांचा पवित्रमय दिव्य लोक!!

## नरक

मनुष्य हा बुद्धिमान् असल्यामुळें त्याला बरें-वाईट, पुण्यपाप, नीति-अनीति, न्याय-अन्याय या सर्व गोष्टी चांगल्या कळतात. म्हणजे त्याला तारतम्य समजण्याचा विवेक आहे; तसा तो इतर प्राण्यांना नाहीं. आणि तसा विवेक मनुष्याला आहे म्हणूनच त्याचा उत्कर्ष व विकास होत आला आहे. स्वभावत: तो सुखप्रिय प्राणी आहे हें खरें. पण तसाच तो दु:खाला बुजणाराहि पण आहे. आणि हें सुखदु:ख ज्याच्या त्याच्या बऱ्यावाईट कर्मावर अवलंबून आहे व असतें, हें तत्त्व प्रथम वैदिक आर्यांनींच हेरून धरलें, हें कांहीं खोटें नाहीं. जो तो मनुष्य आपापल्या कर्मास जबाबदार आहे हा कर्मसिद्धांत केवळ धर्मक्षेत्रांतच नव्हे तर जगाच्या व्यवहारांतहि तितकाच प्रभावी आहे. वैदिक ऋषींनीं हा शोधून काढलेला कर्मसिद्धांत आतांपर्यंत जगांतील कोणत्याहि तत्त्वज्ञान्याला खोडून काढतां आला नाहीं. तर उलट सर्वांनीं त्याचीच री ओढली आहे. हा वैदिक ऋषींच्या सूक्ष्म व तीक्ष्ण शोधक बुद्धीचा तत्त्वज्ञान क्षेत्रांतील महान् विजय नव्हे, असें कोण म्हणेल ?

योगीश्वर याज्ञवल्क्यांनीं स्पष्टच बोलून दाखविलें आहे कीं, 'यथाकारी यथाचारी तथा भवति, साधुकारी साधुर्भवति, पापकारी पापो भवति पुण्यः पुण्येन कर्मणा भवति, पापः पापेन' (श. प. १४-७-२-६) मनुष्याचें जसें कर्म अगर आचरण असेल तसा तो होतो. सत्कर्म करणारा साधु होतो. पापकर्म करणारा पापी होतो. पुण्यकर्मानें पुण्यवान होतो आणि पापकर्मानें पापी होतो. हें याज्ञवल्क्य प्रभूचें जें महावाक्य तें जगांतील विचारवंत लोकांचें आद्य आचार-सूत्र होऊन बसलें आहे. मग हे लोक देव मानणारे असोत वा नसोत. हा प्रश्न उद्भवत नाहीं. अर्थात् आधुनिक नीतिशास्त्राचा 'यथाकारी तथा भवति'–कर्म तसें फल–हें तत्त्व मुख्य आत्मा होऊन बसलें आहे, असें म्हटलें तरी त्यांत कांहीं बिघडण्यासारखें नाहीं. पापपुण्याची–सुखदु:खाची–सर्व जबाबदारी या हुकमी तत्त्वावरच आधारलेली आहे, हें विसरून भागणार नाहीं. हेंच

दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे स्वर्गनरक ही कल्पना पापपुण्य कर्मांचाच विपाक होय.

आणि स्वर्ग-नरक म्हणजे तरी काय? स्वर्ग म्हणजे सुख आणि नरक म्हणजे दुःख; अर्थात् मरणोत्तर प्राप्त व्हावयाची सुगति अगर दुर्गति. जिवंतपणीं ज्याला सुख म्हणावयाचें त्यालाच मरणोत्तर स्वर्ग म्हणावयाचा आणि जिवंतपणीं ज्यास दुःख म्हणावयाचें त्यालाच मरणोत्तर नरक म्हणावयाचें. 'सुखमेव स्वर्गः' व 'दुःखमेव नरकं' ही वैदिक आर्यांची ऐहिक कर्मानुसार मरणोत्तर प्राप्त व्हावयाची सुगति अगर दुर्गति. पैकीं स्वर्ग म्हणजे काय याचें निरूपण वर करण्यांत आलेंच आहे. आतां नरक म्हणजे काय आणि तो कोणाकरतां आहे, याचा आतां थोडक्यांत परामर्श घेतों.

मात्र येथें हें अगोदरच सांगून ठेवणें जरूर आहे कीं, ऋग्वेदांत स्वर्गाची जशी स्पष्ट व सुटसुटीत कल्पना आहे, तशी नरकाची नाहीं. नरक हा शब्दच सगळ्या ऋग्वेदांत कोठेंच आढळत नाहीं. पण म्हणून मरणोत्तर दुर्जनाची काय गति होते—ते कोठें जातात—याविषयीं मुळींच स्पष्टीकरण नाहीं, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. ऋग्वेदांत नरकाची—म्हणजे मरणोत्तर दुर्गतीची—कल्पना आहे. पण ती फार अंधुक म्हणजे अस्पष्ट आहे. याविषयीं सूचक अशी एक ऋचा आहे ती अशी:— 'अभ्रातरो न योषणो व्यन्तः पतिरिपो न जनयो दुरेवाः। पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजानता गभीरम्॥ (४-५-५)-बंधुरहित असलेल्या स्त्रीप्रमाणें जे कुमार्गानें वर्तन करणारे आहेत, पतीचा द्वेष करणाऱ्या उनाड स्त्रीप्रमाणें जे दुराचारी आहेत, जे पापी आहेत, ज्यांची बुद्धि खोटी आहे व वाणी सत्याला सोडून आहे अशांनीं हें अगाध स्थान (नरक) कृतकर्माचें मरणोत्तर प्रायश्चित्त भोगण्यास म्हणून निर्माण केलें आहे. या ऋचेंतील 'गभीरं पदं'—हे शब्द नरकसूचक आहेत असें सायन भाष्यावरून दिसून येतें. 'गभीरं पदं' याचा मराठीतला सरळ अर्थ म्हणजे खोल खड्डा असा होतो व हाच अर्थ ऋग्वेदांत अन्यत्र 'वव्रॉं अनन्तॉं अव सा पदीष्ट' (७-१०४-१७) या मंत्रांतून

ध्वनित करण्यांत आला आहे. जी राक्षसी मनांत द्रोहभाव धरून घुबडी-प्रमाणें रात्रीं आपलें गुप्त रूप प्रगट करून भटकत असते, ती अगाध गर्तेत म्हणजेच खोल खड्ड्यांत अधोमुख होऊन पडो ! अशाच अर्थाची आणखी एक ऋचा आहे. ती म्हणजे ही:—' इन्द्रसोमा दुष्कृतो वव्रे अन्तरनारम्भणे तमसि प्रविध्यतम् ' ( ७-१०४-३ ) भावार्थ—हे इन्द्र-सोमहो ! दुष्कर्म करणाऱ्या राक्षसांना दुःखाच्या खड्ड्यांत व निरालंबन अंधकारांत कोंडून तेथें त्यांना चांगला चोप द्या ! या उताऱ्यावरून अंध-कारमय अशा दुःखात्मक खोल खड्ड्यालाच नरक म्हणतां येईल. 'अन्धं-तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते '—या ईशोपनिषदांतील ' अंन्धंतमः ' याचा अर्थ अंधकारमय अधोलोकच म्हणजे नरकलोकच होय. कारण ' दुःखं च नरकं विदुः ' या वचनावरून दुःखालाच नरक ही संज्ञा आहे, हें उघड होतें. अंधकारमय दुःखात्मक असा जो खड्डा म्हणजे अधोलोक तोच नरक होय. आणि येथें पापी व दुष्ट लोकांना कोंबून तेथें त्यांना प्रायश्चित्त देण्याबद्दल विनविलें आहे. अर्थात् या खड्ड्यांतच—अधो-लोकांतच—पाप्यांना मरणोत्तर शिक्षा करण्यांत येत असून, त्यालाच उत्तर-वाङ्मयांत नरक म्हणण्याचा परिपाठ पडला. अथर्ववेदांत, शुक्ल यजु-र्वेदांत, शतपथ ब्राह्मणांत वगैरे इतर श्रुतिग्रंथांत नरकाचा उल्लेख आहे. यावरून हें निश्चित आहे कीं, अधोलोक म्हणजे मरणोत्तर दुःख भोग-ण्याची जागा. त्यालाच नरक हें टोपण नांव असून, ती जागा अंध-कारानें दाटून गेली आहे. येथेंच पापी, दुष्ट व दुराचरणी लोक आपल्या कृतकर्मांचें मरणोत्तर प्रायश्चित्त भोगण्यास म्हणून येऊन पडतात. हें इतकें विवरण नरकाविषयीं पुरें आहे. असो.

**यमः**—यम हा मृत्यु देव आहे, ( ' तस्मै यमाय नमो अस्तु मृत्यवे ' १०-१६५ ४ ). विवस्वान् हा त्याचा बाप. ('विवस्वतं हुवे यः पिता ते' १०-१४-५ ) व त्वष्ट्याची मुलगी सरण्यू ही त्याची आई. (१०-१७-१) आम्हा मनुष्यांसाठीं स्वर्गाचा मार्ग प्रथम शोधून काढणारा म्हणजे हा यमच होय, ( ' यमो नो गातुं प्रथमो विवेद ' १०-१४-२ ) कीं, ज्या स्वर्गांत आमचे पूर्वीचे पितर जाऊन राहते झाले ( ' यत्र नः पूर्वे पितरः

परेयुः १०-१४-२). अर्थात् हा पितृ लोक म्हणजेच यमलोक होय. आणि तो स्वर्गाच्या तिसऱ्या म्हणजे खालच्या भागांत आहे. स्वर्गाचे एकंदर तीन भाग असून वरचे दोन भाग सूर्याकडे असून, तिसरा यमाकडे आहे. (तिस्रो द्यावः सवितुर्द्वा उपस्थाँ एका यमस्य भुवने विराषाट्' १-३५-६). यम हा तेथील राजा आहे. ( 'यत्र राजा वैवस्वतो ' ९-११३-८) आणि त्याच्याबरोबर पितर आनंदांत राहत असतात. ( 'अथा पितॄन् त्सुविदत्राँ उपेहि यमेन ये सधमादं मदन्ति ' १०-१४-१० ) मनुष्य मेल्यावर स्वर्गांत जातो तेव्हां तो यम व वरुण यांचेसमोर जाऊन उभा राहतो. ( १०-१४-७ ). अग्नि हा यमाचा प्रिय दूत आहे. ( 'भुवद्दूतो विवस्वतो विवो मदे प्रियो यमस्य ' १०-२१-५ ) घुबड व कपोत हे त्याचे दूत आहेत. ( १०-१६५-४ ) आणि चार डोळ्यांचे दोन कुत्रे हे त्याचे रक्षक आहेत. ( यौ ते श्वानौ यम रक्षितारौ ' १०-१४-११ ) त्याला सोम व हवि अर्पण करून ( 'यमाय सोमं सुनुत यमाय जुहुता हविः ' १०-१४-१३ ) आपल्याला देवाकडे नेण्याबद्दल व दीर्घकाल जगण्याकरतां दीर्घायुष्य देण्याबद्दल त्याची प्रार्थना करण्यांत येते. ( 'स नो देवेष्वा यमद् दीर्घमायुः प्र जीवसे ' १०-१४-१४ ).

**पितर**—मनुष्य जातीचे जे पूर्वज त्यांना पितर अशी संज्ञा आहे. अंगिरस, अथर्वाण, भृगु, नवग्व इत्यादि हे सर्व पितरांत मोडतात. ( १०-१४-६ ). ते यमाजवळ राहून आनंदांत कालक्रमणा करतात. ( 'यमेन ये सधमादं मदन्ति ' १०-१४-१० ) आणि देवांबरोबरहि आनंदांत असतात. ( 'त इद्देवानां सधमाद आसन्नृतावानः कवयः पूर्व्यासः ' ७-७६-४ ) पितरांनीं सोमयाग करून स्वर्ग प्राप्त करून घेतला. त्यांना सोम्यास असें म्हणतात. जे येथें आहेत व जे येथें म्हणजे या पितृयज्ञांत नाहींत; ज्यांना आम्ही ओळखतों व ज्यांना आम्ही ओळखीत नाहीं, अशा सर्व पितरांना अग्नि ओळखतो ( 'ये चेह पितरो ये च नेह याँश्च विद्म याँ उ च न प्रविद्म । त्वं वेत्थ यति ते जातवेदः ' १०-१५-१३ ). ते सर्व पितर पितृयज्ञांत येऊन दर्भासनावर दक्षिणेकडे बसून आपलें स्वधान्न ग्रहण करतात. ( 'आच्या जानु दक्षिणतो निषद्येमं यज्ञ-

माभि गृणीत विश्व ' १०-१५-६ ) ते इन्द्र व देव यांसह रथांत बसून येतात ( ' इन्द्रेण देवैः सरथं दधानाः ' १०-१५-१० ) अंधकारानें म्हणजे राहूनें ग्रासिलेल्या सूर्याला पितरांनींच मंत्रसामर्थ्यानें शोधून काढून त्याची प्राप्ति करून घेतली आणि सिद्धमंत्र अशा त्यांनीं उषेला प्रकाशित केली. ( ' गूळ्ह ज्योतिः पितरो अन्वविन्दन् त्सत्यमंत्रा अजयन्नुषासम् ' ७-७६-४ ) जेथें इन्द्रादि देव राहतात त्या स्वर्गाच्या भागाला देवलोक आणि जेथें यमपितरादि राहतात त्या भागाला पितृलोक अशी संज्ञा असून, देवलोकाचा राजा इन्द्र व पितृ लोकाचा राजा यम आहे. आणि हे लोक जसे स्वर्गांतच पण निरनिराळे आहेत, तद्वत् त्यांकडे जाणारे मार्गहि पण वेगवेगळे आहेत. देवलोकाकडे जाणाऱ्या मार्गाला देवयान व पितृलोकाकडे जाणाऱ्या मार्गाला पितृयाण असें नांव आहे. ' परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात् ' ( १०-१८-१ ) या वचनांत देवयानाशिवाय इतर जो मार्ग आहे, त्या मार्गानें म्हणजे पितृयाण मार्गानें जाण्यास मृत्यूची विनंति करण्यांत आली असून ' पन्थामनु प्रविद्वान् पितृयाणं द्युमदग्ने समिधानो वि भाहि ' ( १०-२-७ ) यांमध्यें पितृयाण मार्ग हा अग्नि जाणतो असें म्हटलें आहे. यावरून देवयान व पितृयाण असे स्वर्गास जाणारे दोन निरनिराळे मार्ग आहेत असें सिद्ध होतें. असो.

काळया घोड्याला दागिने घालून जसें सजवावें त्याप्रमाणें पितरांनीं आकाशाला रात्री नक्षत्रांनीं सुशोभित केलें. ( ' अभि श्यावं न कृशनेभिरश्वं नक्षत्रेभिः पितरो द्यामपिंशन् ' १०-६८-११ ) आणि स्वर्गाकडे जाणारा मार्ग यज्ञद्वारा त्यांनींच आंखून ठेविला. ( इदं नम ऋषिभ्यः पूर्वजेभ्यः पूर्वेभ्यः पथिकृभ्द्यः ' १०-१४-१५ ) आपलें कल्याण करण्याबद्दल, सुख देण्याबद्दल, दुःख नाहींसें करण्याबद्दल त्यांची प्रार्थना करण्यांत आली आहे. ( ' अथा नः शं योररपो दधातन ' १०-१५-४ ) त्याचप्रमाणें मानवी स्वभावाला अनुसरून आम्ही जो कांहीं त्यांचा अपराध केला असूं, त्याबद्दल त्यांनीं आपणास दंड करूं नये अशाबद्दलहि

प्रार्थना आहे ( ‘ मा हिंसिष्ट पितरः केन चिन्नो यद्व आगः पुरुषता कराम ’ १०-१५-६ ) आणि शेवटीं वीरपुत्रादिकांनीं युक्त अशी संपत्ति देण्याबद्दलहि त्यांना विनविलें आहे. ( अथा रयिं सर्ववीरं दधातन ’ १०-१५-११ ). जातां जातां हेंहि सांगणें इष्ट वाटतें कीं, रणांतहि त्यांनीं रक्षण करावें व दुष्ट शत्रूंच्या ताब्यांत आपणास देऊं नये, अशी देवभक्ताची इच्छा आहे ( ‘ ब्राह्मणासः पितरः सोम्यासः......नःपातु दुरितादतावृधो रक्षा माकिर्नो अघशंस ईशत ’ ६-७५-१० ) वैदिक आर्यांचे पितर हे असे आहेत.



## प्रकरण १६ वें

# ऋग्वेदांतील तत्त्वज्ञान

ज्या वेळीं परमेश्वरानें हा सगळा विश्वपसारा निर्माण केला—ही जी विविध व विचित्र सृष्टि प्रथम निर्माण झाली—त्या वेळीं तें पहावयास प्रथम कोण गेला होता ? ( को ददर्श प्रथमं जायमानं ' १-१६४-४ ). अर्थात् हें विश्व प्रारंभीं कसें निर्माण झालें, तें प्रत्यक्ष जाऊन कोणीं पाहिलें आहे ? कारण ज्यानें तें विश्व निर्माण केलें, त्याच्याशिवाय त्या वेळीं दुसरें कोणीच नव्हतें. फार काय, त्या वेळीं आकाश नव्हतें, वायु नव्हता, पृथ्वी नव्हती, कांहींच नव्हतें. अर्थात् शरीरहि नव्हतें व मनहि नव्हतें. आतां त्या शरीराचा स्वामी जो जिवात्मा तो होता म्हणावा, तर तो तरी कोठें व कसा असणार ? ( ' आत्मा क स्वित् ' १-१६४-४ ) देहेंद्रियांशिवाय राहण्याला त्याला आधार तरी काय ? एवंच आत्माहि—अर्थात् जिवात्मा—त्या वेळीं नव्हताच. मग हा सगळा विश्वप्रपंच निर्माण झाला, त्या वेळीं तो पहावयास कोण गेला होता म्हणावा ?

तो ऋषि म्हणतो, मला तर हें कांहीं कळेनासें झालें आहे. या बाबतींत मी खरोखर नेणता आहें. मला हें कांहींच समजण्यासारखें नाहीं. म्हणून जाणत्यांना—विचारवंतांना—विचारतों कीं हें सगळें जाणणारा असा कोण आहे ? ( पाकः पृच्छामि मनसाविजानन् ' १ १६४-५ ) कोण हें खरोखर जाणतो ? कोण बरें मला हें सर्व समजावून सांगेल ? ही जी विविध नामरूपात्मक विचित्र सृष्टि माझ्या डोळ्यांसमोर अफाट पसरलेली आहे, ती कशी झाली व कशापासून झाली ? तिचें उपादान कारण कोणतें व निमित्त कारण तरी काय ? कोणत्या साधनाच्या सहाय्यानें ती निर्माण करण्यांत आली ? आणि ती बनविली गेली, तें द्रव्य तरी कोणतें ? व

कोठून आलें ? हें सर्व चोख जाणणारा व नीट समजावून सांगणारा असा मनुष्यांत कोण आहे आणि कोण बरें मला हें सर्व नीट उलगडून सांगेल ? ( ' को अद्धा वेद ? क इह प्र वोचत ? कुत आ जाता ? कुत इयं विसृष्टिः ? ' १०-१२९-६ ).

मनुष्यांत तरी माझी ही जिज्ञासा तृप्त करील असा कोणी असेल, असें मला वाटत नाहीं. बरें, आतां हे देव तरी माझी समजूत करूं शकतील काय ? त्यांना जाऊन विचारल्यास माझी ही ज्ञानलालसा तृप्त होऊं शकेल काय ? कारण ते मनुष्याच्या आधीं जन्मलेले आहेत. त्यांना हें ठाऊक असण्याचा संभव आहे. पण हें काय म्हणतों मी ? ते झाले तरी काय सांगणार ? त्यांचीहि कथा आम्हा मनुष्यांप्रमाणेंच आहे कीं ! कारण ते मनुष्याच्या आधींचे असले तरी ही सृष्टि उत्पन्न झाल्यावरच त्यांचाहि जन्म झाला आहे! मग आपल्यापूर्वी जन्मलेल्या सृष्टीची उत्पत्तिकथा नंतर जन्मलेले ते बिचारे देव झाले तरी काय सांगणार नि कसें सांगणार ! आम्हां मनुष्यांप्रमाणें त्यांनाहि हात टेकावे लागणारच ! छे, तीहि निराशाच ! ( ' अर्वाग्देवा अस्य विसर्जनेन अथ को वेद यत आ बभूव ' १०-१२९-६ ). मनुष्यहि नाहीं, देवहि नाहीं. मग आतां हें सांगणारा तरी कोण ? विचारायचें तरी कोणाला ?

हें सर्व जाणणारा कोणी तरी असूं शकेल काय ? कदाचित् असला तर एक असूं शकेल; आणि तो म्हणजे परमेश्वर ! देवांचाहि देव ! ज्यापासून ही गिरी–नदी–समुद्रादि–रूपात्मक विविध सृष्टि उत्पन्न झाली, तो परमेश्वर मात्र हें सर्व जाणतो, तोच एक तेवढा हें सर्व अचूक सांगण्यास पूर्ण समर्थ आहे. इतरांस हें शक्य नाहीं. जो या भौतिक जगाचा अध्यक्ष आहे, तो आकाशांत राहणारा ईश्वर मात्र हें सर्व जाणत असेल. पण कोणी सांगावें, तो सुद्धां जाणत नसेलहि ! ! मग हें कोडें आतां कसें उलगडणार नि कोण उलगडणार ? ( ' इयं विसृष्टिर्यत आ बभूव यदि वा दधे यदि वा न । यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् सो अङ्ग वेद यदि वा न वेद ' १०-१२९-७ ).

अशा प्रकारची सूक्ष्म व गहन चिकित्सा करणारे असे कांहीं जिज्ञासु लोक त्या वेळीं सुद्धां होते. जवळजवळ हे वरील विचार आधुनिक अज्ञेय वादासारखेच दिसून येतात. असे स्वतंत्र व गूढ विचाराचे चिकित्सक ऋषी ऋग्वेदकालांतहि होते, हें यावरून स्पष्ट होतें.

अशाच ठशाचे पण जरा निराळ्या वळणाचे आणखी कांहीं एतद्विषयक विचार ऋग्वेदांत आढळून येतात, तेहि विचार करण्यासारखे आहेत. त्या विचारांचा रोख वाहतो तो असाः—ज्यापासून देवांनीं ही द्यावा पृथ्वी निर्माण केली, तो वृक्ष कोणता आणि जेथें तो वृक्ष वाढला तें अरण्य तरी कोणतें? ( ‘ किं स्विद्वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी नि ष्टतक्षुः ’ १०-३१-७ ). अर्थात् येथें उपादान कारणाची पृच्छा करण्यांत आली आहे. कुंभार जसा माती घेऊन, त्या द्रव्यापासून घट निर्माण करतो, त्याप्रमाणें कोणतें द्रव्य घेऊन देवांनीं त्यापासून ही जडसृष्टि निर्माण केली, असा प्रश्न एक ऋषि येथें करीत आहे. त्याचप्रमाणें दुसरा एक विचारतो कीं ज्या वेळीं विश्वकर्म्यानें ही द्यावापृथ्वी उत्पन्न केली, त्या वेळीं त्या ईश्वराचें अधिष्ठान काय होतें? आणि त्या सृष्टीचें उपादानकारण तरी काय? कोणत्या द्रव्यानें त्यानें हें सर्व विश्वजात बनविलें? कारण त्या वेळीं एका परमेश्वराशिवाय इतर निराळी वस्तुच नव्हती! मग ही सृष्टि त्यानें कशापासून बनविली? अर्थात् तें द्रव्य कोणतें? ( ‘ किं स्विदासीदधिष्ठानमारम्भणं कतमत्स्वित्कथासीत यतोभूमिं जनयन्विश्वकर्मा वि द्यां ’ १०-८१-२ ) याला पुढें उत्तर देतात कीं सर्वद्रष्टा जो विश्वकर्मा, त्या देवानें ती जी सृष्टि उत्पन्न केली, ती आपल्या महिम्यानेंच! त्याला इतर कशाची जरुरी लागली नाहीं. आपल्या अचिंत्य मायाशक्तीच्या योगानेंच त्यानें हें सर्व विश्वजात निर्माण केलें! ( ‘ यतो भूमिं जनयन्विश्वकर्मा वि द्यामौर्णोन्महिना विश्वचक्षाः ’ १०-८१-२ ).

पण विश्वकर्म्यानें हें केलें, हें म्हणणें देखील जरा अयुक्तच आहे. कारण कोणता देव झाला तरी काय, तो सृष्टीनंतरचाच आहे. त्याच्यापेक्षांहि श्रेष्ठ देव—देवाधिदेव—असा एक आहे. म्हणून देवाचें हें सामर्थ्य

नव्हे ! तर त्याच्यापेक्षांहि जो एक श्रेष्ठ देव आहे, त्या हिरण्यगर्भाचा—सूक्ष्म रूपधारी—अशा त्या लिंगात्म्याचा—तो महिमा आहे ! ( 'नैतावदेना परो अन्यदास्त्युक्षा स द्यावापृथिवी बिभर्ति' १०-३१-८ ). हा जो हिरण्यगर्भ-म्हणजेच प्रजापति—तोच द्यावा पृथिवी उत्पन्न करून, त्यांना धारण करतो. म्हणून ही द्यावा पृथ्वी कोणापासून झाली व कशापासून झाली याचें अंतिम उत्तर अंतर्ज्ञानी ऋषि देतात कीं, तें मूल कारण म्हणजे हिरण्यगर्भ अर्थात् सगुण ब्रह्म ! ! ( 'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे' १०-१२१-१).

अशा प्रकारचे कांहींसे अज्ञेयवादासारखे विचार केव्हां जिज्ञासाप्रेरित तर केव्हां संशयग्रस्त लोकांनीं काढलेले मधूनमधून आढळत असले, तरी विश्वोत्पत्तीची साधार व समर्पक मीमांसा करणारे असे कांहीं दिव्य अंतःचक्षूचे श्रेष्ठ व प्रतिभासंपन्न ऋषीहि तेथें चमकत होतेच, असा त्या वेळचा इतिहास स्पष्ट कौल देतो. या ऋषींनीं या विश्वोत्पत्तीची आपल्या परी सूक्ष्म चिकित्सा करून शास्त्रशुद्ध मीमांसा केली आहे, ती मोठी मननीय आहे. त्यांच्या विचारसरणीचा रोख वाहतो तो असाः—देवादिकांच्या पूर्वयुगांत—म्हणजे ही सृष्टि उत्पन्न व्हावयाच्या पूर्वी नामरूपादिरहित असें एक सूक्ष्म पण अव्यक्त चैतन्यघन आदितत्त्व होतें. यालाच ऋग्वेदांत 'असत्' असें म्हटलें आहे. 'असत्' म्हणजे शून्य—अभाव—असा अर्थ नव्हे; तर अव्याकृत—अव्यक्त—असें सूक्ष्म आदितत्त्व—बीजवस्तु. या आदितत्त्वालाच वेदांतांत ब्रह्म-परब्रह्म-निर्गुण ब्रह्म—असें म्हणण्याचा वैदिक ऋषींचा परिपाठ आहे.

अर्थात् हें असत्तत्त्व शून्य नाहीं, अव्यक्त पण सद्भावरूप आहे. नामरूप गुणादिकांनीं विवर्जित असें जें हें ऋग्वेदांतलें 'असत्' तत्त्व म्हणजेच निर्गुण ब्रह्म, त्या निर्गुण, निरंजन, निराकार ब्रह्मापासूनच ही सगुण व साकार सृष्टि निर्माण झाली. या सृष्टीला 'सत्' असें नांव आहे. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे असत् म्हणजे निर्गुण ब्रह्म व सत् म्हणजे सगुण ब्रह्म. अर्थात् हें निर्गुण ब्रह्म सगुण ब्रह्माची मायकूस आहे, असें ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें आहे. ( 'असतः सदजायत' १०-७२-२ ). हाच भाव तैत्तिरीय उपनिषदांत 'असद्वा इदमग्र असी-

त्ततो वै सदजायत ' ( तै. उ. २-७ ) या वचनांतून प्रतिबिंबित झाला आहे. आणि तसाच प्रतिघोष शतपथांतहि ' ब्रह्मवा इदमग्र आसीत् ' ( श. प. ११-२-३-१ ) या वचनांत उमटलेला आहे. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य काय तर मूल निर्गुण ब्रह्मापासून—आदि बीजापासूनच—पुढें ब्रह्मांडाचा हा विशाल वृक्ष निर्माण झाला, वाढला व फोंफावलेला आहे.

आतां ' असत् ' शब्दाचा कांहीं लोक—विशेषतः नास्तिक लोक—जडवादी स्थूलदृष्टि लोक—शून्य असा अर्थ करून, ' कथं असतः सत् जायेत ? ' असा सवाल करतात. आणि सामान्य जनतेची दिशाभूल करून त्यांना आडमार्गावर नेऊं पहातात. पण असत् म्हणजे शून्य—अभाव—हा अर्थ वैदिक ऋषींना मान्य नाहीं. अभावापासून भाव कसा निर्माण होईल ? दूध असेल तर दही होईल. नसेल तर दहीं कसें व कोठून होणार ? बीज असेल तर वृक्ष, बीजच नसेल तर वृक्ष कसा होईल ? म्हणजे कारण असेल तर कार्य. कारणाशिवाय कार्य असूं शकत नाहीं. याला विकासवाद—सत्कार्यवाद—म्हणतात. आणि वैदिक ऋषींचा हा जो विश्वोत्पत्तिवाद आहे तो कांहींसा विकास-वादासारखाच आहे. वैदिकांच्या मतें ' असत् ' म्हणजे अभावात्मक शून्य नसून, भावरूप पण अव्यक्त अशी बीजशक्ति. तेंच विश्वाचें आदि बीज होय. तें इंद्रियांना दिसत नसलें, तरी वस्तुतः सद्भावरूपानें—परम सूक्ष्म रूपांत—आहे व असतें, ही गोष्ट उद्दालकांनीं श्वेतकेतूला वडाचें सूक्ष्म बीज दाखवून त्यांतूनच समोरचा विशाल वटवृक्ष कसा निर्माण झाला, याची खात्री पटवून देऊन, शेवटीं ' बाळा, त्या सूक्ष्म बीजांतच डोळ्याला कांहीं दिसत नसलें तरी त्यांत वडासारखा प्रचंड असा महान् वटवृक्ष गर्भित आहे, ' असें सांगून, अखेर त्यास माझ्या शब्दांवर विश्वास ठेव, ' श्रद्धस्व ' या महामंत्राचा उपदेश केला. तो आजहि तितकाच सत्य आहे. जें स्थूल इंद्रियाला दिसत नाहीं तें नाहींच, असा अर्थ काढणें किती वेडेपणाचें आहे, हें यावरून स्पष्ट होतें.

म्हणून शून्यवाद्याचें—जडमूढ नास्तिकांचें—तोंड बंद करण्यासाठीं म्हणून वैदिक ऋषींनीं छातीला हात लावून ठिकठिकाणीं ठासून सांगितलें आहे

कीं, ' ब्रह्म वा इदमग्र आसीत् ' ! वैदिक ऋषींची अशी प्रतिज्ञा आहे कीं ' यादृगेव ददृशे तादृगुच्यते ' ( ५-४४-६ )-जसें आमच्या अंतर्दृष्टीला दिसलें-जें आम्हीं ज्ञानचक्षूनें पाहिलें व जाणलें-तसेंच आणि तेंच आम्ही बोलून दाखवितों. यावर ज्यांचा विश्वास असेल, त्यांच्यासाठींच वैदिक धर्माचा अवतार आहे. विश्वास नसेल तर त्या वाटेस नच जाणें हेंच बरें ! असो. सांगावयाचा मुद्दा हा कीं या मूल असत्तत्त्वापासून म्हणजे परब्रह्म वस्तूपासूनच-सूक्ष्म बीजापासूनच-पुढें ही नामरूपात्मक विशाल व विविध सृष्टि निर्माण झाली. अर्थात् तें आदितत्त्वच या स्थूल जगाचें मूलबीज-आदिकारण-होय !

त्याचप्रमाणें ती परब्रम्हवस्तुच जगाचें उपादानकारणहि होय. हा विश्वप्रपंच कसा विस्तार पावला अगर पावत गेला, याची वैदिक ऋषि सोपपत्तिक मांडणी करून दाखवितात ती अशी:—प्रथम हें जग उत्पन्न व्हावयाच्या पूर्वी म्हणजे प्रलयावस्थेंत तें मायेनें पूर्ण गुरफटलेलें होतें. ही वैदिकांची जी माया तीच सांख्यांची प्रकृति असून, तिलाच उद्देशून ऋग्वेदांत तम-काळोख-असें म्हटलें आहे. ज्याप्रमाणें दुग्धमिश्रित पाण्यांतून दूध निराळें व पाणी निराळें करतां अगर काढतां येत नाहीं, तद्वत् प्रकृति ऊर्फ माया व जग यांच्या प्रलयकालीन ऐक्यावस्थेंत नामरूपात्मक जग हें त्या कारण ब्रह्माच्या मायेपासून विभक्त करतां येण्यासारखें नाहीं व नसतें. तें त्या वेळीं कारण ब्रह्मांत मायेसहित पूर्ण विलीन होऊन सुप्त व गुप्तावस्थेंत असतें. पुढें तें सृष्टिसमयीं त्या कारण ब्रम्हांतून निघून कसें प्रादुर्भूत होतें, याची ऋग्वेदांत रूपरेखा देण्यांत आली आहे, तिचा आतां परामर्श करणें हें ओघानेंच प्राप्त झालें आहे. म्हणून आतां त्या विषयाकडे वळतों.

हें सर्व विश्वजात त्या कारणब्रह्माच्या मायेच्या कुशींतून बाहेर पडावयाच्या वेळीं प्रथम परमेश्वराच्या मनांत काम-म्हणजे मायेंत गुप्त असलेल्या विश्वाला बाहेर प्रकट करण्याची इच्छा-झाली. ( ' कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतं प्रथमं यदासीत् ' १०-१२९-४ ), अर्थात् प्रथम परब्रह्माच्या मनांत आपण अभिव्यक्त होऊन बहुत व्हावें, अशी इच्छा उत्पन्न

झाली. ( 'सो अकायमत बहुः स्याम प्रजायेय इति' तै. आ. ८-६ ) म्हणून त्यानें त्यासाठीं संकल्परूपी तप आचरण केलें आणि त्या तपाच्या योगानें त्या ब्रह्माच्या प्रकृतीची साम्यावस्था भंग पावून येथें सूक्ष्म रूपानें सुप्त असलेलीं जगाचीं बीजतत्वें हळुहळू चुळबुळ करूं लागून—अंकुरून—तीं साकार बनत चाललीं, म्हणजे स्थूल जग प्रकट व्हावयास लागलें. ( स तपस्तप्त्वेदं सर्वमसृजत' तै. आ. ९-६) ऋग्वेदांतहि हीच गोष्ट सांगितली आहे. ( 'तपसस्तन्महिना जायतैकम्' ऋ. १०-१२९-३ ). परमेश्वराच्या सृष्टी उत्पन्न करण्याच्या संकल्पप्रभावानें जग निर्माण झालें. येथें तप म्हणजे शारीरिक श्रम नसून ज्ञानमय तप असा अर्थ आहे. ( 'यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः' असें मुंडक उपनिषदांत म्हटलें आहे. (१-१-९) एकंदरींत ध्यानांत ध्यावयाची मुख्याची गोष्ट ही कीं मायेंत सुप्त असलेलें—प्रकृतींत लीन झालेलें—जग प्रगट व्हावयाला परमेश्वराची जग उत्पन्न करण्याची प्रबल इच्छा व तदनुरूप ज्ञानमय तप हेंच कारण होय.

आतां यापुढें सृष्टि कशी उत्पन्न झाली, हें पाहूं या. वर सांगण्यांत आलें आहे कीं विश्वोत्पत्तीच्या पूर्वी तम म्हणजे माया—अर्थात् अनिर्वचनीय अशी मूळ प्रकृति—हें होतें. आणि तें विश्व या तमानें—मायेनें—म्हणजे अज्ञानरूपी काळोखानें-आच्छादिलेलें होतें. ( 'तमसा गूळ्हमग्रे' १०-१२९-३ ) ही माया म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून, ती परब्रह्माच्या अंगचीच अनिर्वचनीय अशी अद्‌भुत व दिव्य शक्ति होय. तिच्यांत व त्याच्यांत अंगांगी संबंध आहे, असें म्हटलें तरी चालेल. तें जग प्रकट व्हावयाच्या पूर्वी प्रथम सर्वत्र पाणीच पाणी होतें. याचें सुंदर स्पष्टीकरण शतपथांत आढळतें तें असें:—'आपो ह वा इदमग्रे सलिलमेवास। ता अकामयन्त कथं नु प्रजायेमहीति ता अश्राम्यँस्तास्तपोऽतप्यन्त तासु तपस्तप्यमानासु हिरण्मयमाण्ड सम्बभूवाजातो ह तर्हि संवत्सर आस तदिदं हिरण्मयमाण्ड यावत्संवत्सरस्य वेला तावत्पर्यप्लवत' (११-१-६-१) ततः संवत्सरे पुरुषः समभवत्। स प्रजापतिः ११-१-६-२ ). भावार्थः—ही सृष्टि प्रादुर्भव व्हावयाच्या आधीं प्रथम सर्वत्र पाणीच होतें. आम्हीं आतां प्रवर्धन पावावें अशी त्यानें मनांत इच्छा धारण केली, तदर्थ त्यानें श्रम केले व तप केलें. त्या तपाच्या योगानें त्या पाण्यांत एक हिरण्मय अंडें

निर्माण झालें. पुढें जन्मून त्याला एक संवत्सर लोटलें. तोंपर्यंत तें पाण्यांतच तरंगत राहिलें. पुढें संवत्सर पूर्ण झाल्यावर तें फुटून, त्यांतून एक पुरुष निर्माण झाला. हाच प्रजापति होय. सगुण ब्रह्म काय, हिरण्यगर्भ काय, विराट पुरुष काय, तो हाच ! हा प्रजापति ! !

या हिरण्मय अंडयांत वर्षभर राहून पुढें जो जन्म पावला, त्यालाच ऋग्वेदांत हिरण्यगर्भ म्हटलें असून, प्रजापति हा त्या हिरण्यगर्भाचाच पर्याय शब्द आहे. हा जो हिरण्यगर्भ ऊर्फ प्रजापति तोच मायेचें पांघरूण घेतलेला आदि पुरुष असून त्यालाच सूत्रात्मा असें म्हणतात. प्रजापति हें त्याचें दुसरें नांव आहे. आणि सगुण ब्रह्म म्हणजे तोच हा हिरण्य-गर्भ ऊर्फ प्रजापति, म्हणून ' हिरण्यगर्भः समवर्तताग्रे ' असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; तर ' प्रजापतिर्वा इदमग्र आसीत् ' असें शतपथांत उद्गारलें आहे. शब्दांत फरक असला तरी मूळ पुरुषांत फरक नाहीं. दोघेहि एकच नि सारखेच. शिवाय विराट पुरुष असेंहि याला आणखी एक नांव आहे. हा विराट-पुरुष—अर्थात् हिरण्यगर्भ उर्फ प्रजापति—सर्वप्राणिसमष्टि-रूप असून, त्यालाच सहस्र म्हणजे अनंत शिरें, अनंत डोळे व अनंत पाद आहेत, असें पुरुषसूक्तांत म्हटलें आहे; ( ' सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् '१०-९०-१) यालाच पुनः आणखी दुसरीकडे ' विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात्' (१०-८१-३) असें म्हटलें आहे.

या विराटपुरुषानें त्या हिरण्मय अंडयांतून प्रकट झाल्याबरोबर हें सर्व ब्रह्मांडाचें ब्रम्हांड त्यानें व्यापून सोडलें. अर्थात् आपल्या एका अंशानें त्यानें हा सर्व पराक्रम गाजविला ! ( 'स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशांगु-लम्'१०-९०-१). तेव्हांपासून हें जें त्रिकालातील अखिल जगज्जात आहे तें हा पुरुषच होय. ( पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ' (१०-९०-२). आणि तोच अमृतत्त्वाचा स्वामीहि आहे. ( ' उतामृतत्वस्येशानः ' १०-९०-२ ). जोंपर्यंत हें जग अस्तित्वांत आहे, त्यांतील सर्व घडामोडी हा याचाच महिमा होय ! इतकेंच काय, याहूनहि तो पुरुष कितीतरी मोठा आहे. हें जें भूतजात आहे, तें फक्त याचा एक चौथा भाग असून, बाकीचा भाग सगळा विनाशरहित असून, तो सूर्यमंडलांत स्थित आहे. ( पादोऽस्य

विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ' १०-९०-३ ). हा जो त्रिपादपुरुष तो या विश्वप्रपंचापासून अगदीं अलिप्त असून, त्याचाच एक भाग सृष्टि-संहारार्थ पुनः येथें अवतरला, ( ' त्रिपादूर्ध्व उदैत्पुरुषः पादोऽस्येहा भवत् पुनः ' १०-९०-४ ).

त्यानंतर देवमनुष्यपशुपक्षी इत्यादिकांच्या जिवात्म्यांचीं रूपें धारण करून, त्यानें अन्नावर वाढणाऱ्या व जगणाऱ्या सर्व जीवजाताला व तसेंच गिरि-नद्यादि भूतजाताला व्यापून टाकलें. अर्थात् चेतनसृष्टि व अचेतनसृष्टि-जीव-सृष्टि व जडसृष्टि–हीं दोन्ही रूपें आपल्या महिम्यानें त्या एकट्यानेंच धारण केलीं. ('ततो विष्वङ् व्यक्रामत्साशनानशने अभि' १०-९०-४) आतां हें कसें झालें याचें वर्णन पुढें ऋग्वेदांत सांगितलें आहे तें असें:—सर्वांत प्रथम ब्रह्मांड देह उत्पन्न झाला. त्यानंतर त्या देहाचा आश्रय घेऊन त्यांत राहणारा तद्देहाभिमानी जीव झाला. हाच विश्वात्मा होय. ( ' तस्माद्विराळजायत विराजो अधि पूरुषः' (१०-९०-५). हा विराडपुरुषच प्रजापति होय. पुढें त्यानें देवमनुष्यपशुपक्ष्यादिजीवजात धारण केल्यावर-म्हणजे त्या त्या प्राण्याचा जीवभाव धारण केल्यावर–मग पृथ्वी उत्पन्न करून, नंतर त्या त्या जिवांना राहण्यास अनुरूप अशी तीं तीं शरीरें निर्माण केलीं. ( ' स जातो अत्य-रिच्यत पश्चाद्भूमिमथो पुरः ' १०-९०-५ ).

हा सर्व विकास कसा कसा होत गेला, याची रूपरेखा पुढें स्थूलमानानें आखून दाखविण्यांत आली आहे ती अशी:–पूर्वी साध्यदेवांनीं ही सृष्टि उत्पन्न होण्याच्यापूर्वी एक मानस यज्ञ केला. त्या यज्ञांत या आदिपुरुषाला पशु कल्पून त्याचें तिथें प्रोक्षण करून, तो यज्ञ यथासांग सिद्धीस नेला. त्या यज्ञां-तील या पुरुषपशूपासून हें विविध विश्व निर्माण झालें तें असें–त्या पुरुषाच्या डोक्यापासून द्युलोक म्हणजे स्वर्ग झाला. ( ' शीर्ष्णोद्यौः समवर्तत ' १०-९०-१४ ) आणि नाभीपासून अंतरिक्ष झालें. ( ' नाभ्या आसी दन्तरिक्षं ' १०-९०-१४ ) त्याचप्रमाणें पायापासून पृथ्वी व श्रोत्रापासून दिशा झाल्या. ( ' पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोका अकल्पयन् ' १०-९०-१४ ) म्हणजे या विश्वकोशांत स्वर्गलोक हा अगदीं वर,

अंतरिक्ष लोक हा मधोमध व पृथ्वी ही सर्वांत खालीं, असा हा या विश्वांतील लोकांचा क्रम लागला.

आतां यानंतर देवांची उत्पत्ति कशी झाली हें सांगतात. त्या यज्ञस्थानीं पशु कल्पिलेल्या प्रजापतीच्या मनापासून चंद्र झाला. ( 'चंद्रमा मनसो जातः ') १०-९०-१३ ), चक्षूपासून सूर्य झाला ( 'चक्षोः सूर्यो अजायत ' १०-९०-१३ ), मुखापासून इंद्र व अग्नि ( 'मुखादिन्द्रश्चाग्निश्च ') आणि प्राणापासून वायु झाला. ( 'प्राणद्वायुरजायत ' १०-९०-१३ ) अशी ही थोडक्यांत देवांची जीवसृष्टि असून तीच पहिली जीवसृष्टि होय. या सृष्टीची स्थापना स्वर्गलोकांत म्हणजे पहिल्या द्युलोकांत झाली.

यानंतर मानवसृष्टीचा इतिहास आहे तो असाः—त्या प्रजापतीच्या मुखापासून ज्ञानोपासक ब्राह्मण झाले. ( 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् ' १०-९०-१२ ) आणि त्याच्या बाहूपासून बलोपासक क्षत्रिय झाले. ( 'बाहु राजन्यः कृतः' १०-९०-१२ ) त्याचप्रमाणें मांड्यापासून कृषि-उपासक वैश्य व पायापासून सेवोपासक शूद्र झाले. ( 'ऊरू तस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ' १०-९०-१२ ). असा हा मानवजातीचा थोडक्यांत वैदिक इतिहास आहे. येथें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे शब्द जातीवाचक नसून, गुणवाचक आहेत. वेदकालीं म्हणजे वेदाचा चालता काळ असतांना मनुष्याचें स्थान जातीवरून न ठरवितां वर्णावरून—म्हणजे गुण-कर्मावरून—ठरविलें जात असे. असो.

यानंतर पशुसृष्टि सांगावयाची राहिली. ती म्हणजे थोडक्यांत अशीः— त्या पुरुषयज्ञापासून घोडे उत्पन्न झाले. ( 'तस्मादश्वा अजायन्त ' १०-९०-१० ). आणि खालीं व वर दांत असलेले इतर गर्धभादि पशूंहि निर्माण झाले. ( 'ये के चोभयदतः ( अजायन्त ) १०-९०-१० ) गायीहि त्यापासूनच झाल्या, आणि तसेच अजादि प्राणीहि झाले. ( गावो ह जज्ञिरे तस्मात् तस्माज्जाता अजावयः ' १०-९०-१० ). ही सर्व पशुसृष्टि संक्षेपानें सांगण्यांत आली.

याप्रमाणें हें असें ऋग्वेदांतील विश्वोत्पत्तीचें तत्वज्ञान आहे. इतकें विस्तृत, इतकें सुसंगत, इतकें शास्त्रशुद्ध विश्वोत्पत्तीचें वर्णन जगांतील इतर

कोणत्याहि धर्मग्रंथांत पहावयास सांपडत नाहीं. या विश्वोत्पत्ति कथेच्या पुढें ब्राह्मण ग्रंथांत विकास होत होत शेवटीं उपनिषदांत त्याला सुव्यवस्थित, सुसंबद्ध, विस्तृत व सुटसुटीत असें सुंदर स्वरूप प्राप्त झालें. ते तेथील अमृत बोल खोडून काढण्याचें धारिष्ट्य तेव्हांपासून आतांपर्यंत कोणीहि पद्धतशीर व प्रमाणशुद्ध केलें नाहीं, असें म्हटल्यास त्यांत कांहीं अन्याय होईल, असें आम्हांस वाटत नाहीं. अर्थात् वैदिक ऋषींचा वाङ्मयक्षेत्रांतला हा एक मोठा अपूर्व व अद्वितीय विजयच नव्हे काय ? होय, तो एक महान् विजयच होय, असें आम्ही भारतीय लोक समजतों. उपनिषदांत तत्वज्ञानाचा जो सुंदर विकास झालेला आहे, त्या ज्ञानाची मायकूस म्हणजे मूळ हे वेदग्रंथच होत, हें निराळें सांगितलें पाहिजे असें नाहीं. आतां उपनिषदांत या विषयाची मांडणी कशी करण्यांत आली आहे, हें सांगणें इष्ट व मनोरंजक असलें, तरी तो विषय आमच्या प्रस्तुत उद्देशास सोडून असल्यामुळें त्या भरीस आम्ही येथें पडूं इच्छित नाहीं. फक्त ऋग्वेद-ग्रंथांत विश्वोत्पत्तीची कथा तत्वज्ञान दृष्टीनें कशी सांगण्यांत आली आहे, एवढें दाखविण्याचा आमचा उद्देश असल्यामुळें तेवढ्यापुरतेंच हें आमचें विवेचन करण्यांत आलें आहे. वैदिक धर्माची ही जी तत्वज्ञानक्षेत्रांतील कामगिरी आहे, तेथील जी मांडणी आहे, जी शिकवणूक आहे, जे सिद्धांत आहेत, ते ज्यांना ती अंतर्दृष्टि आहे,—ज्ञानचक्षु आहे—त्यांनाच फक्त पटणारे व मानवणारे आहेत. जे जडमूढ आहेत—मंदबुद्धि आहेत—त्यांना ते पटणें शक्यहि नाहीं आणि त्यांच्या प्रकृतीला ते मानवणारहि पण नाहींत. ऋग्वेदांत स्पष्टच म्हटलें आहे कीं जो ज्ञानी आहे—ज्याला ज्ञानचक्षु आहे—त्यालाच हें उच्च व सूक्ष्म ज्ञान कळणार, जो जडमूढ व मंदबुद्धि आहे, त्याला तें कळणें शक्यच नाहीं. ('पश्यदक्षण्वान्न वि चेतदन्धः' १-१६४-१६ ) एवढें सांगून आतां पुढें चालूं लागतों.

आतां शेवटीं जातां जातां हा जो वेदांतला परमेश्वर—सगुण ब्रह्म—प्रजापति देव—देवाचाहि देव—आहे, त्याचेंहि उडत उडत वर्णन करून हा विषय हातानिराळा करतों. उपनिषदांत ब्रह्म हा मुख्य प्रतिपाद्य विषय असून, त्यालाच अध्यात्म विवेचनांत आद्यस्थान मिळालें आहे. आणि ब्राह्मण ग्रंथांत

–कर्मकांडांत–तो मान प्रजापतीला देण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें तेंच स्थान ऋग्वेदांत–मंत्रभागांत–हिरण्यगर्भाला देण्यांत आलें आहे. तथापि तें उपनिषदांतील ब्रह्म, ब्राह्मणांतील प्रजापति व वेदांतील हिरण्यगर्भ हीं सगळीं सगुण ब्रह्माचीं–शबल ब्रह्माचींच–प्रतीकें आहेत. ही गोष्ट ध्यानांत ठेविली तर वाचकांचा घोंटाळा होणार नाहीं. उपनिषदांत 'ब्रह्म वा इदमग्र आसीत्' म्हटलें आहे, तर ब्राह्मणांत 'प्रजापतिर्ह वा इदमग्र आसीत्' असा पाठ आढळतो आणि ऋग्वेदांत 'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे' अशी घोषणा करण्यांत आली आहे. तथापि हे सर्व वस्तुतः निराळे नसून अर्थतः एकच आहेत. तेव्हां या पुरुषोत्तमाचें ऋग्वेदांत कसें वर्णन करण्यांत आलें आहे, हें येथें थोडक्यांत पाहूं या.

तसें म्हटल्यास वैदिकांच्या परमेश्वराचें यथार्थ वर्णन करावयाचें झाल्यास, त्याला एक स्वतंत्र ग्रंथच लिहावयास हवा. पण तो उद्देश आमचा येथें नसल्यानें फक्त त्याच्या स्वरूपाचें व गुणधर्मांचें धांवतें वर्णन करून, तेवढ्यावरच सर्व कांहीं भागवितों. हा जो वेदांतला पुरुषोत्तम, परमेश्वर म्हणजे प्रजापति देव आहे, तो ब्रम्हांडाएवढा मोठा तर आहेच. इतकेंच नव्हे तर त्याहूनहि तो किती तरी पटीनें मोठा आहे. तो किती मोठा याचें प्रत्यक्ष मोजमाप घेऊन निश्चयपूर्वक सांगणें हें या अल्प व सांत मानव बुद्धीच्या आवांक्याबाहेर आहे; या अल्पबुद्धीला तें समजणें व समजलें तरी तोंडानें बोलून दाखविणें हें सहसा शक्य नाहीं. आतां कांहीं तरी सांगावयाचें म्हणून सांगावयाचें झालें तर तो अनंत आहे, एवढेंच फार तर सांगतां येईल. आतां त्याचें सगुण रूपांत कसें चित्र वेदांत रंगविण्यांत आलें आहे, हें आतां हळूहळू सांगत जातों.

हा जो विश्वविधाता परमेश्वर आहे, त्याला हजार म्हणजे अनंत शिरें, अनंत डोळे व अनंत पाद आहेत. ('सहस्रशीर्षः पुरुषः सहस्राक्षः सहस्र-पात्' १०-९०-१) याचा भावार्थ असा कीं तो सर्वज्ञ, सर्वसाक्षी व सर्वव्यापी आहे. हा अर्थ 'विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतो बाहु-रुत विश्वतस्पात् (१०-८१-३) या वचनांतून ध्वनित केला आहे. त्यानेंच ही पृथ्वी व अंतरिक्ष लोक निर्माण केले. ('यः पृथिव्या यो

वा दिवं सत्यधर्मा जजान ' १०-१२१-९ ). आणि त्यानेंच आल्हाद-दायक उदकहि निर्माण केलें. ( 'यश्चापश्चंद्रा बृहतीर्जजान' १०-१२१-९). इतकेंच नव्हे, तर तो हें सर्व करून त्यांत घनदाट भरून राहिला आहे. शिवाय आणखी, या विश्वाच्या बाहेरहि तो सर्वत्र व्यापून राहिला आहे. ( 'स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलम्' १०-९०-१) म्हणजे विश्वांतहि अणुरेणूमध्यें सुद्धां तो भरून राहिला असून, बाहेरहि पण तोच आहे. त्यानेंच देवांना उत्पन्न केलें असून, त्यांच्यांत 'हा इंद्र, हा अग्नि, हा वरुण, अशीं निरनिराळीं नांवेंहि पण त्यानेंच दिलीं. ( यो देवानां-नामधा ' १०-८२-३ ). अर्थात् तो देवांतला मुख्य देव—म्हणजे देवाधि-देव—आहे. ( ' यो देवेष्वधि देव एक आसीत् ' १०-१२१-८ ). त्यानें अंतरिक्ष लोक उग्र केला, ही पृथ्वी स्थिर केली, स्वर्गलोक सावरून धरला आणि आकाशांतील आदित्यमंडळ तोलून धरलें. ( ' येन द्यौरुग्रा पृथ्वी च दृळ्हा येन स्वः स्तभितं येन नाकः ' १०-१२१-५ ). अर्थात् हें सर्व भुवनजात तो जाणतो. ( वेद भुवनानि विश्वा १०-८२-३ ) मनु-ष्यांचा व पश्वादिकांचा तोच स्वामी आहे. ( 'य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः' १०-१२१-३ ). इतकेंच नव्हे तर देवमनुष्यादि सर्व जीवजातांचा तो राजा होऊन राहिला आहे. ('एक इत् राजा जगतो बभूव' १०-१२१-३) तसेंच द्यावापृथ्वीचें संरक्षण तोच करतो ( ' स द्यावापृथिवीं बिभर्ति ' १०-३१-८ ) म्हणून ही सर्व प्राणिसृष्टि व देवसृष्टि त्याची आज्ञा शिरसा वंद्य मानते. ('यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः' १०-१२१-२) प्राण्यांना आत्मरूपानें चैतन्य देणारा व बल देणारा तोच आहे. ( ' य आत्मदा बलदा ' १०-१२१-२ ) आणि जगांतील सर्व घडामोडी त्याच्यामुळेंच होतात. अर्थात् तो सृष्टिविधाता आहे. ( ' यो विधाता ' ) त्याची ज्ञानपूर्वक जे उपासना करतात त्यांना मोक्ष प्राप्त होतो व जे अज्ञानपूर्वक करतात, ते ' पुनरपि जननं पुनरपि मरणं 'च्या फेऱ्यांत पडतात. ( ' यस्य छायामृतं यस्य मृत्युः ' १०-१२१-२ ) अशा प्रका-रचा हा जो प्रजापति देव—परमेश्वर—त्या महादेवाला हे लोकहो, तुम्ही जाणत नाहींत. ( न तं विदाथ ' १०-८२-७ ) कारण तुम्ही भाताच्या शेता-

प्रमाणें अज्ञानानें अगदीं गुरफटून गेला आहां. इतकेंच नव्हे तर 'मी राजा आहें' 'मी पंडित आहें' 'मी शूर आहें' 'मी श्रीमंत आहें' अशा विचारानें अहंकारविमूढ होऊन, व्यर्थ बडबडणारे आहां. आणि उदरंभरणांत–देहेन्द्रिय तर्पणांत–पूर्ण रंगून गेला आहां, ('नीवारेण प्रावृता, जल्प्याऽसुतृप:' १०-८२-७). याप्रमाणें हीं जीं ऋग्वेदांतील अर्थपूर्ण-सूचक सूत्रात्मक वाक्यें आहेत, त्यांचें जर विस्तारपूर्वक विवेचन करूं लागलों, तर ग्रंथाचा विस्तार भरमसाठ वाढेल.

याबरोबरच आणखी एक मुद्याची गोष्ट येथें सांगावयाची म्हणजे हें जें वर्णन दिलें आहे, तें त्याचें प्रत्यक्ष वर्णन झालें. त्याशिवाय आणखी असें सांगतां येईल कीं ऋग्वेदांत प्रजापतीशिवाय जे आणखी देव आहेत–उदाहरणार्थ इंद्र, अग्नि, वरुण इत्यादि–ते सर्व प्रजपतीचेच अंश असल्यामुळें इंद्रादिकाचे जे रूपगुणधर्म तेथें सांगण्यांत आले आहेत, ते सर्व या प्रजापतीच्या ठिकाणींहि आहेत, असें घेऊन चालल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. कारण इंद्रादि देव व प्रजापति यांच्यांत कार्यकारण-संबंध असल्यामुळें कार्याचे गुणधर्म कारणांतहि गुप्तरूपानें सुप्त असतात असा सत्कार्यवादाचा शास्त्रनियम आहे; त्या नियमाप्रमाणें इंद्रादि देवांचे सर्व गुणधर्म हेहि प्रजापतीचे गुणधर्म धरून चालल्यास त्यांत कांहीं दोषास्पद नाहीं. मागें आम्ही इंद्रादि देवांचें जें वर्णन दिलें आहे, तें सर्व या देवाधिदेव प्रजापतीचें पर्यायानें वर्णन आहे, याची वाचकांनीं दखलगिरी घेतल्यास, त्यांना वैदिकांच्या परमेश्वराची–देवाधिदेवाची-यथार्थ कल्पना करण्यास बरेंच सहाय्य होईल. असो.

आतांपर्यंत हें जें विवेचन केलें, त्यावरून एक गोष्ट निर्विवाद सिद्ध होते कीं, वेदांत अनेक देव व अनेक देवोपासना सांगितल्या असल्या तरी मुळांत जाऊन पाहूं लागलें, तर तेथें एकेश्वरीवादच दिसून येतो. याविषयीं आतां अधिक लिहावें असें कांहीं राहिलें नाहीं. कांहीं लोकांना इतकी सूक्ष्म दृष्टि नसल्यामुळें व त्यांचें निरीक्षण व परीक्षणहि उथळ व बेताचेंच असल्यामुळें, वेदांत एकेश्वरी वादाचा मागमूसहि नसून तेथें अनेक देवदेवतावादाची खिचडी मात्र झाली आहे, असा आरोप

करण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. या कंपूतील लोकांचा पुढारीपणा पाश्चात्य पंडितांकडे गेला असून, त्यांच्या छायेखालीं वाढलेले आमचे कांहीं भारतीय पंडितहि तोच सूर काढण्यांत आपणांस मोठे धन्य मानीत आहेत. हा प्रश्न अध्यात्मज्ञानशून्य ख्रिस्तधर्मानुयायी पाश्चात्य-पंडितांनीं उपस्थित केला, यांत त्यांचा दोष नसून अज्ञान हें कारण आहे. बायबलांत एकच देव सांगितला असून, त्या संस्कृतींत वाढलेल्या विद्वानांना वैदिक धर्माचें यथार्थ व व्यापक स्वरूप ग्राह्य करणें शक्य झालें नाहीं. वैदिक धर्माचा सखोल अभ्यास त्यांना करतां आला नाहीं. शिवाय धर्मानें व संस्कृतीनें पूर्ण परके असल्यामुळें व इतर धर्माविषयीं त्यांचा ग्रह स्वभावतःच विपरीत झाला असल्यामुळें वेदांकडे पाहतांना ती दूषित दृष्टि घेऊनच त्या ग्रंथाकडे पाहण्याची त्यांची प्रवृत्ति बनली. त्यामुळें त्यांना वेदनारायणाचें सत्य स्वरूप—यथार्थ दर्शन—घडलें नाहीं व घेतां आलें नाहीं. त्यांची वेदांकडे पाहण्याची दृष्टिच मुळीं दूषित असल्यामुळें वेदांतील एकेश्वरीवाद त्यांना ओळखतां व ग्रहण करतां आला नाहीं,याविषयीं त्यांची कींव केलेलीच बरी !

आतां आम्ही वैदिक लोक छातीवर हात ठेवून या पंडितमहाशयांस असें स्पष्ट सांगूं इच्छितों कीं वेदाला एकेश्वरी वादच मूळतः व मुख्यतः अभिप्रेत आहे. तेथें अनेक देव आहेत व अनेक उपासना आहेत, हें सर्व खरें. पण त्या देवांचा देवहि—देवाधिदेवहि—एकच आहे, असें त्याच ग्रंथांत चक्क व स्पष्ट सांगितलें आहे, इकडे डोळेझांक करून कसें चालेल ?

वेदांत जसे इंद्र, अग्नि, वरुण इत्यादि देव आहेत, तसाच त्या देवांना निर्माण करणारा अधिदेवहि एक आहे. त्याला हिरण्यगर्भ, प्रजापति, विराटपुरुष, सगुण ब्रह्म, सत् अशीं निरानिराळीं पण एकाच अर्थाचीं सूचक नांवें आहेत. त्याचा आम्हीं वर उल्लेख केलाच आहे, म्हणून पुनरुक्ति करूं इच्छित नाहीं. इतकेंच काय, ऋग्वेदांत तशीं वचनें ठिकठिकाणीं प्रत्यक्ष देण्यांतहि आलीं आहेत. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ' ( ऋ. १-१६४-४६ ), एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति' ( १०-११४-५ ), ( ' यो देवेषु अधि देव एक आसीत् ' १०-१२१-८ ) 'द्यावा पृथिवी जनयन् देव एकः' ( १०-८१-३ );

'यो देवानां नामधा एक एव' ( १०-८२-३ ) अशीं किती तरी वाक्यें ऋग्वेदांत ठिकठिकाणीं विखुरलेलीं असून, तीं एकेश्वरीवादाचें सूचक व दर्शक नाहींत, असें डोळे असलेल्यांनीं कसें व कां म्हणावें ? शिवाय इंद्रादि देव हे एकाच परमेश्वराचे—परमात्म्याचे—निरनिराळे अंश असल्यामुळें त्यांची उपासना म्हणजे परमार्थतः एकाच परमेश्वराची उपासना अशी आम्हां भारतीय पंडितांची प्रामाणिक समजूत आहे. वेदांत अनेक देव उपासनेसाठीं व्यवहारांत गृहीत धरले असले, तरी तेथें परमार्थतः एकेश्वरी वादच प्रामुख्यानें गर्भित आहे, हें सुंदर तत्व भारतीय अंतःकरणालाच फक्त पटणारें व मानवणारें आहे, हें येथें स्पष्ट सांगितल्याशिवाय आमच्यानें पुढें जाववत नाहीं.

या विषयावर हें पुढील वचन अगदीं स्पष्टच आहे; 'यद्यपि इन्द्राद-यस्तत्र हूयन्ते तथापि परमेश्वरस्यैव इन्द्रादिरूपेणावस्थानादविरोधः ॥' —सायनाचार्य. त्याचप्रमाणें हें याज्ञवल्क्य वचनहि उद्‌बोधक आहे. 'तद्य-दिदमाहुरमुं यजामुं यजेत्येकैकं देवमेतस्यैव सा विसृष्टिरेष उ ह्येव सर्वे देवाः' ( बृ. उ. १-४-६ ) हीं श्रुतिवचनें देव एकच आहे, असें स्पष्ट व खणखणीत प्रतिपादन करीत नाहींत काय ? पण इतक्या खोल पाण्यांत शिरण्याची यातायात करतो कोण ? वरवर जें काय दिसेल तेवढ्यावरच वेळ मारून नेण्याची ज्यांची खोडच आहे, त्यांना अधिक काय सांगायचें ? असो. झालें हें इतकें पुरें झालें.

ऋग्वेदांतील तत्त्वज्ञानाची रूपरेखा ही आम्हीं अशी अगदीं थोड-क्यांत मांडून दाखविली. तिच्यापासून सूज्ञ वाचक बोध घेतीलच. ऋग्वे-दांत काय सांगितलें आहे, याचें आम्हीं हें थोडक्यांत निरूपण केलें आहे. याच्यापेक्षां आणखी पुष्कळ सांगतां आलें असतें व येण्यासारखें आहे. पण आमच्या ग्रंथमालेचा उद्देश सामान्य जनतेला प्राचीन विद्येविषयीं सुबुद्ध करण्याचा असल्यामुळें त्यांना झेपेल व मानवेल अशा बेतानेंच आम्हीं हें ऋग्वेदाचें अंतरंग महाराष्ट्रास उघड करून दाखविणेचा एक अल्पसा प्रयत्न केला आहे. तो आमचे भाविक व जिज्ञासु वाचक गोड मानून घेतील, अशी सदिच्छा प्रदर्शित करून, प्रस्तुत प्रकरणाला पूर्णविराम देतों.

---



## प्रकरण १७ वें

# ऋग्वेदांतील विविध विषयांची ओझरती ओळख

### वेदनामें

१ ऋग्वेद ( १०.९०-९ )
२ यजुर्वेद ( १० ९०-९ )
३ सामवेद ( १०-९०- ९ )

वैदिक आर्यांच्या प्राचीन वेदग्रंथांत फक्त तीनच वेदांचा समावेश होतो. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांस मिळून ' त्रयी विद्या ' अशी पारिभाषिक संज्ञा असून, त्यांत अथर्व वेदाचा समावेश होत नाहीं, हें आतां उघड सांगावयास नकोच. ' त्रयी वै विद्या ऋचो यजूंषि सामानि ।। ४-६-७-१ ।।, ' असें शतपथांत स्पष्ट म्हटलें असून, जो ऋग्वेदाचें यथासांग अध्ययन करील, त्याला या पृथ्वी लोकाची प्राप्ति होते, जो यजुर्वेदाचें अध्ययन करील, त्याला अंतरिक्ष लोकाची व जो सामवेदाचें अध्ययन करील, त्यास द्यु लोकाची प्राप्ति होते असें श्रुतींत सांगितलें आहे (' इममेव लोकमृचा जयति । अंतरिक्षं यजुषा दिवमेव साम्ना ।। ४-६-७-२ ।। श. प. ) या तीन वेदांपैकीं ऋग्वेद हा मधासारखा, सामवेद हा घृतासारखा व यजुर्वेद हा अमृतासारखा गोड व हितकारक आहे. ( ' मधु ह वाऽऋचः । घृतं ह सामान्यमृतं यजूंषि ' श. प. ११-५-७-५ ) यांत अथर्ववेदाचा कोठें सुद्धां नामनिर्देश केलेला आढळत नाहीं. याचें कारण असें कीं वेदाचा अवतार हा प्रामुख्यानें यज्ञोपासनेकरतां झाला असून, त्या यज्ञोपासनेंत अथर्ववेदाचा संबंध येत नाहीं, आणि म्हणून त्याला या यज्ञविद्येंत स्थान देण्यात आलें नाहीं, असें आम्हांस वाटतें. असो.

ऋग्वेदाच्या अध्ययनानें वैदिक हा देवांना मधानें प्रसन्न करतो. सामवेदाच्या अध्ययनानें घृतानें व यजुर्वेदाच्या अध्ययनानें अमृतानें प्रसन्न करतो, असें याज्ञवल्क्यांनीं स्वाध्याय प्रशंसेंत म्हटलें आहे. ( 'मधुना ह वा एष देवाँस्तर्पयति । य एवं विद्वानृचोऽहरहः स्वाध्यायमधीते ॥ ११-५-७-६ ॥ घृतेन ह वा एष देवाँस्तपर्यति । य एवं विद्वान्त्सामान्यहरहः स्वाध्यायमधीते ॥ ११-५-७-७ ॥ अमृतेन ह वा एष देवाँस्तर्पयति । य एवं विद्वान्यजूंष्यहरहः स्वाध्यायमधीते ॥ त एनं तृप्तास्तर्पयन्ति सर्वैः कामैः सर्वैर्भोगैः ॥ ११-५-७-८ ॥ श. प. ) यासाठीं म्हणून वेदोपासकानें ऋग्, यजुः, सामवेदाचें दररोज अध्ययन वा पठण करावें, म्हणजे त्याला तीनहि लोकांची दौलत लाभते, असा वेदमाउलीचा वैदिक आर्यास कळकळीचा शुभ संदेश आहे. ऋग्वेदांत जो मंत्रसंग्रह आहे, तो सर्व अग्निविषयक आहे. आणि जे यजुर्मंत्र आहेत, ते सर्व वायुविषयक व जीं सामसूक्तें आहेत तीं सूर्यविषयक आहेत, असें बृहद्देवदेंत स्पष्ट म्हटलें आहे. ( 'समस्ता ऋचो आग्नेयो वायव्यानि यजूंषि च । सौर्याणि चैव सामानि सर्वाणि ब्राह्मणानि च ॥ ८-११० ) ऋग्वेदांत स्तोत्र व प्रार्थनाविषयक, यजुर्वेदांत यज्ञविषयक व सामवेदांत गानविषयक मंत्रांचा संग्रह करण्यांत आला आहे. अशी ही वेदविषयक थोडक्यांत हकीकत आहे.

---

## छंदनामें

| | | |
|---|---|---|
| १ अत्यष्टि | ७ गायत्री | १२ बृहती |
| २ अनुष्टुभ् | ८ जगती | १३ महापंक्ति |
| ३ अष्टि | ९ त्रिष्टुप् | १४ विराज् |
| ४ अस्तारपंक्ति | १० पंक्ति | १५ शक्वरी |
| ५ उष्णिह | ११ प्रस्तारपंक्ति | १६ सतोबृहती |
| ६ ककुभ | | |

यांशिवाय आणखी कांहीं किरकोळ छंद आहेत. पण त्यांचा क्वचितच उपयोग करण्यांत आला असल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख करण्याचें

टाळलें आहे. मुख्य छंद म्हणजे गायत्री, त्रिष्टुप्, जगती, बृहती, अनुष्टुभ, उष्णिह व पंक्ति हे असून, ऋग्वेदांत प्रामुख्यानें यांचाच उपयोग करण्यांत आला आहे. या छंदांपैकीं गायत्री व उष्णिह हे छंद अग्नीचे, अनुष्टुप् हा सोमाचा, बृहती हा बृहस्पतीचा, पंक्ति व त्रिष्टुप् हे इंद्राचे, जगती हा विश्वेदेवाचा, विराज हा मित्राचा, स्वराज वरुणाचा आहे, असें बृहद्देवतेंत म्हटलें आहे. ( बृ. दे. ८-१०५ ते १०७ )

---

## ऋग्वेदांतील यज्ञनामें

| | |
|---|---|
| १ अतियाज ६-५२-१ | १० परिवत्सर |
| २ अतिरात्र ७-१०३-७ | ११ पशुयाग १-१८०-४ |
| ३ अनुयाज १०-१८२-२ | १२ पितृयज्ञ १०-१५-४ |
| ४ अश्वमेध १-१६२-४ | १३ पुरुषमेध १०-९०-६ |
| ५ इष्टापूर्त १०-१४-८ | १४ प्रयाज १०-१८२-२ |
| ६ इष्टि २-१८-१ | १५ प्रातःसव ३-५२-४ |
| ७ उक्थ्य ८-१३-१ | १६ बृहस्पतिसव ३-६२-५ |
| ८ त्रिकद्रुक २-१५-१ | १७ माध्यंदिन सव ६-५२-५। |
| ९ दर्शपौर्णिमास १-९४-४ | १८ सोमयाग १-१५-७ |

---

## यज्ञ पुरोहित

| | |
|---|---|
| १ अध्वर्यु १-९४-६ | ८ प्रशास्तृ १-९४-६ |
| २ आग्नीध्र २-१-२ | ९ ब्रह्मा १०-९१-१० |
| ३ उद्गातृ २-४३-२ | १० ब्राह्मणाच्छंसी ४-९-४ |
| ४ ग्रावस्तुत् १-१६२-५ | ११ शामितृ ५-८५-१ |
| ५ नेष्टृ २-१-२ | १२ सुब्रह्मण्य १०-६२-४ |
| ६ पोतृ २-१-२ | १३ होतृ ४-९-४ |
| ७ प्रतिपस्थाता १-१६२-५. इत्यादि | |

वैदिक यज्ञोपासनेंत पुरोहिताशिवाय कोणतेंच देवकार्य सिद्धीस जाऊं शकत नाहीं. देवोपासक यजमानाच्या जोडीला वेदनिष्णात व यज्ञकर्म-कुशल पुरोहितहि असावे लागतात, त्यांशिवाय देवतानुष्ठान हें इष्ट नाहीं. म्हणून या पुरोहितांसंबंधीं कांहीं माहिती येथें देणें आम्हांस इष्ट वाटत असल्यावरून ती येथें थोडक्यांत देत आहों. या वैदिक देवोपासनेंत ऋत्विजांची फार मोठी अवश्यकता असून, त्यांत चार मुख्य ऋत्विज असतात. आणि या चौघांत अध्वर्यु हा प्रमुख पुरोहित असून, त्याच्या सल्ल्यानें व अध्यक्षतेखालीं इतर ऋत्विज आपापलीं कामें करतात. यज्ञाची सर्व जबाबदारी या चार मुख्य ऋत्विजांवर असून, त्यांना अध्वर्यु, ब्रह्मा, होता व उद्गाता अशीं चार नांवें आहेत.

या चार ऋत्विजांत अध्वर्यु हा मुख्य ऋत्विज आहे. हा अध्वर्यु सर्वांत प्रमुख असून, यज्ञकार्य यथासांग व निर्विघ्न पार पाडण्याची जबाबदारी सर्वस्वीं याच्यावरच असते. अग्नींत देवताप्रीत्यर्थ आहुति अर्पण करणारा ऋत्विज म्हणजे हा अध्वर्यूच. तोंडानें मंत्र—केव्हां मोठ्यानें तर केव्हां हळूंच—म्हणत देवांना हविर्भाग अर्पण करणारा ऋत्विज काय तो हाच. शिवाय यज्ञमंडपांत चोहोंकडे नजर ठेवून सर्व ठिकाणीं चोख व्यवस्था व टापटीप राखण्याचें कामहि याचेंच आहे. प्रसंगोपात्त इतर ऋत्विजांना प्रेष म्हणजे हुकूम सोडणारा अधिकारी म्हणजे हा अध्वर्यूच. अर्थात् यज्ञानुष्ठान अथपासून इतिपर्यंत सगळें सुसूत्र व सुरळीत पार पाडून, तें यशस्वी करून दाखविणेची मुख्य व महत्त्वाची जबाबदारी सर्वस्वीं याचीच असल्यामुळें यज्ञकर्ता यजमान प्रथम याचीच निवड करून, मग त्याच्या सल्ल्यानें इतर ऋत्विजांची निवड करतो.

याचें कारण असें कीं, अध्वर्यु हा मनाच्या जागीं असून, इतर ऋत्विज हे मनाच्या तंत्रानें वागणाऱ्या इतर इंद्रियांप्रमाणें आहेत, असें शतपथांत म्हटलें आहे. 'वागेवर्चश्च सामानि च। मन एव यजूंषि स य ऋचा च साम्ना च चरन्ति वाक्ते भवन्त्यथ ये यजुषा चरन्ति मनस्ते भवन्ति तस्मान्नानभिप्रेषितमध्वर्युणा किञ्चन क्रियते' ॥

( श. प. ४-६-७-१९ ). ऋचा व साम हीं वाक् म्हणजे वाणी होत आणि यजु म्हणजे मन. जे ऋचा व साम म्हणतात, ते वाणीसारखे असून, जे यजुर्वेदाचे पठण करतात, ते मनोरूप होत. म्हणून अध्वर्यूनें सांगितल्याशिवाय कोणतेंहि कृत्य यज्ञकर्मांत केलें जात नाहीं. अर्थात् या वचनावरून हें उघड आहे कीं, मनाच्या हुकमतींत जशीं इतर इंद्रियें असतात व वागतात तद्वत अध्वर्यूच्या तंत्रानें इतर ऋत्विजांनीं वागावयाचें आहे. कारण तो अध्वर्यु म्हणजे प्रत्यक्ष मनच–' एतन्मनो अध्वर्युः', असें शतपथांत स्पष्ट म्हटलें आहे.

आतां दुसरा महत्वाचा ऋत्विज म्हटला म्हणजे ब्रम्हा हा होय. यज्ञामध्यें सर्व ऋत्विजांवर नजर ठेवून, यज्ञानुष्ठान शास्त्रशुद्ध व प्रमाद-रहित होतें कीं नाहीं, हें पाहण्याची कामगिरी याच्याकडे असते. म्हणून ' यज्ञस्य हैष भिषग्यद्ब्रह्मा '–यज्ञाचा ब्रह्मा हा वैद्य आहे, असें ऐतरेय ब्राम्हणांत म्हटलें आहे. ( ऐ. ब्रा. ४-३४ ). म्हणजे यज्ञकार्यांत कांहीं चुकलें, राहिलें, बिघडलें अगर कमीजास्त झालें, तर तें नीट सुधारून व्यवस्थित व शास्त्रशुद्ध करवून घेण्याची कामगिरी या ब्रम्ह्याची आहे. तसेंच ऋत्विजाऋत्विजांत यज्ञक्रियेसंबंधीं कसला तरी एखादा वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाला तर त्याचा निर्णय करण्याचें व देण्याचें कामहि याचेंच आहे. म्हणून हा सर्व ऋत्विजांमध्यें अधिक वेदशास्त्रपारंगत असावा लागतो. म्हणजे याला तीनहि वेदांचें व यज्ञशास्त्राचें यथार्थ व पूर्ण ज्ञान असावें लागतें. अर्थात् याचें महत्त्व झालें तरी जवळजवळ अध्वर्यू इतकेंच म्हटलें तरी चालेल.

यानंतर तिसरा महत्त्वाचा ऋत्विज म्हणजे होता हा होय. हा देवांचा स्तुतिपाठक व आमंत्रक असून, अध्वर्यूच्या सांगण्याप्रमाणें देवतांना वेळो-वेळीं आव्हान करण्याचें व त्यांचें स्तुतिस्तोत्र गाण्याचें काम याचें आहे. त्याचप्रमाणें चौथा ऋत्विज हा उद्गाता असून याचें काम सामवेदांतील मंत्र सुस्वर गायन करून देवांना आळविण्याचें व त्यांना खूष करण्याचें आहे. अर्थात् अध्वर्यु हा यजुर्वेदपारंगत, होता हा ऋग्वेदपारंगत, उद्गाता हा सामवेदपारंगत ऋत्विज असून, ब्रह्मा हा तीनहि वेदांत निष्णात असावा

लागतो. याप्रमाणें मुख्य मुख्य ऋत्विजांत ही अशी यज्ञानुष्ठानांतील कार्य-विभागणी असून, या सर्वांनीं एकोप्यानें, सहकार्यानें व तत्परतेनें वागून यजमानाचें यज्ञकार्य सुफल व यशस्वी करून दाखवावयाचें असतें.

याचें कारण असें कीं यज्ञांतील प्रत्येक विधि व क्रिया यथाशास्त्र व व्यवस्थित झाली पाहिजे आणि झाली तरच तो फलदायक ठरतो. पण तेथें कांहीं विघ्न आलें अगर बिघाड झाला, कांहीं चुकलें अगर राहिलें, अगर अव्यवस्थित झालें, तर फलसिद्धीच्या नांवावर शून्याचा आंकडा चढतो. म्हणून यज्ञ यथासांग व यथाशास्त्र व्हावयास यजमानास वेद-शास्त्रसंपन्न अशा पुरोहिताकडे धांव मारणें अवश्यच ठरतें. या प्रत्येक पुरोहिताच्या हाताखालीं त्याला मदतनीस म्हणून आणखी इतर उप-ऋत्विज असतात. त्या सर्वांचा तपशील देणें येथें स्थलसंकोचास्तव इष्ट वाटत नाहीं.

वैदिक धर्मांत यजमान व पुरोहित यांचा निकट व अगदीं जिव्हाळ्याचा संबंध असलेला दिसून येतो. ' आत्मा वै यज्ञस्य यजमानोऽङ्गान्यृत्विजः ' यजमान हा यज्ञाचा आत्मा म्हणजे शरीर असून, ऋत्विज हे त्याचे अवयव आहेत, असें श्रुतिवचन आहे (श. प. ९.५-२-१६). अर्थात् त्या दोघांत विरोध अगर बिघाड आला तर दोघांचेंहि अकल्याण होतें. त्यांत एकाचा आश्रय तुटला अगर सुटला कीं दुसऱ्याचाहि तो तुटलाच व सुटलाच म्हणून समजावा. 'यदा वाऽऋत्विजोऽलोका भवन्त्यलोक उतर्हि यजमान उभयेहि समान लोका भवन्ति'—ऋत्विज जेव्हां आश्रयहीन होईल तेव्हां यजमानहि आश्रयहीन होतोच. कारण दोघांचें आश्रयस्थान एकच आहे, असें शथ-पथांत म्हटलें आहे. ( श. प. ९-५-२-१६ ). अशाच अर्थाचे पण शब्दांत जरा बदल करून ' अर्धात्मो ह वा एष क्षत्रियस्य यत्पुरोहितः ' असें ऐतरेय ब्राम्हणांतहि म्हटलें आहे. (ऐ. ब्रा. ७-२६) याप्रमाणें वेदांत देवोपासक यजमान व पुरोहित यांचा मोठ्या जिव्हाळ्याचा संबंध आहे. तेथें स्वयंपुरोहित नाहीं, व चालत नाहीं ! असो.

---

## यज्ञमंडप

| | | |
|---|---|---|
| १ प्राचीन वंश | ३ हविर्धान | ५ मार्जालीय |
| २ सद | ४ आग्नीध्र | ६ शामित्र |

## यज्ञकुंडें

| | | |
|---|---|---|
| १ आहवनीय | २ गार्हपत्य | ३ दक्षिणाग्नि |

आतां येथें यज्ञमंडपाविषयीं थोडीशी विशेष माहिती देणें अवश्य वाटत असल्यामुळें ती आम्ही कात्यायन-श्रौतसूत्राधारें थोडक्यांत खालीं देत आहों. याविषयीं ऋग्वेदांत फारशी माहिती नाहीं. कारण तो विषय ऋग्वेदाचा नसून यजुर्वेदाचा आहे. यज्ञांतील कर्मविषयक सर्व माहिती यजुर्वेदांतून मिळत असल्यामुळें, यज्ञमंडप कसा असावा याचें निरूपण यजुर्वेदावरील श्रौतसूत्रांत सविस्तर करण्यांत आलें आहे. त्याला अनुसरून आम्ही ही पुढील माहिती देत आहों. या विषयावरील सविस्तर माहिती पाहिजे असल्यास आमच्या ‘ याज्ञवल्क्य-दर्शन ’ या ग्रंथांत ती पहावयास मिळेल. फक्त येथें त्याचें ओझरतें दिग्दर्शन करण्यापलीकडे अधिक कांहीं करतां येत नाहीं. असो.

वैदिकांचा यज्ञमंडप असतो, तो असाः—सकृद्दर्शनीं येथें हें सांगून टाकतों कीं यज्ञोपासना ही घरीं करावयाची नसते. ती बाहेर उघड्या मैदानावर मांडव घालून, तेथें यज्ञसमारंभ थाटावयाचा असतो. जेथें यज्ञानुष्ठान केलें जातें, त्या स्थानास ‘देवयजन’ असें नांव असून, तें शक्य तितकें उंच, सपाट, माळ व पूर्व बाजूस अमळ सखल असें असावें लागतें. या मंडपाचे मुख्य पांच भाग असतात. प्राचीन–शाला, सद, हविर्धान, आग्नीध्र व मार्जालीय असे पांच मंडप मिळून एक मोठा सलग यज्ञमंडप तयार होतो. प्राचीन शाला ऊर्फ प्राग्वंश हा मंडप कोठें दहा हात चौरस तर कोठें दहा हात रुंद व वीस हात लांब असा दीर्घचतुस्र असून, त्यास पूर्व, पश्चिम व दक्षिण बाजूस दार असतें; व तो मंडप सर्व बाजूंनीं कूड घालून व बांबूचे तट्टे बांधून चांगला बंदिस्त करून, आंत मंडपांत एक ऐष्टिक वेदि घालून, तिच्या पूर्वेस आहवनीय, पश्चिमेस गार्हपत्य व

दक्षिणेस दाक्षिणाग्नि यांचीं कुंडें क्रमानें चौकोन, वर्तुळ व अर्धवर्तुळ अशीं तयार करण्यांत येतात व त्यांत आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि या श्रौताग्नींची स्थापना करण्यांत येतें. देवांप्रीत्यर्थ जें होमहवन करावयाचें, तें आहवनीय अग्नींत, त्यासाठीं जीं हवनद्रव्यें व पुराडाशादि पाकसिद्धि करावयाची ती गार्हपत्य अग्नींत व पितरांना उद्देशून अर्पण करावयाचीं स्वधा द्रव्यें दक्षिणाग्नींत करण्याचा परिपाठ आहे.

या प्राचीन वंश शालेच्या पूर्वेस सद नांवाचा मंडप असून तो चोवीस हात लांब व बारा हात रुंद असतो. यास 'उदग्वंश शाला' असेंहि म्हणतात. याचें कारण असें कीं या मंडपाच्या आढ्याला जे कळक बांधलेले असतात, त्यांचीं अग्रें उत्तरेकडे करून बांधलेलीं असतात. त्याचप्रमाणें प्राचीनशालेचीं अग्रें पूर्वेस करून बांधलेलीं असतात, म्हणून त्यास प्राग्वंश मंडप असें नामाभिधान आहे. या सदो मंडपांत ऋत्विजांचें बसणें-उठणें, खाणें-पीणें, निजणें, झोंपणें, चर्चा, वादविवाद इत्यादि गोष्टी करण्यांत येतात. या सदो मंडपांत पश्चिमेस व पूर्वेस असें एकेक दार असून बाकीचा मंडप तट्टे बांधून बंदिस्त व सुरक्षित केलेला असतो. सदो मंडपांत यज्ञ करणाऱ्या यजमानाचें प्रतीक म्हणून त्याच्या एवढा उंच असा एक उंबराचा वाटोळा खांब पुरण्यांत येतो. या मंडपाच्या पुढें हविर्धान नांवाचा मंडप असतो. हा दहा हात लांब व दहा हात रुंद असा हम चौरस मंडप असून, येथें सर्व यज्ञसाहित्य म्हणजे हवनीय द्रव्यें ठेवण्यांत येतात. या मंडपांतच दक्षिणेकडच्या हविर्धान शकटाजवळ उपरव नांवाचे वीतभर रुंद व हातभर खोल असे चार खळगे जोडी-जोडीनें अमोरसमोर खणून काढण्यांत येऊन, त्यांवर लांकडी दोन फलक ठेवून ते झांकण्यांत येतात व या फलकांवर तांबड्या रंगानें रंगविलेलें बैलाचें कातडें पसरून, त्यावर सोमरस कुटण्याचा विधि केला जातो. या यज्ञमंडपांतच महावेदि असते. ही वेदि पूर्वपश्चिम तीस हात (प्रक्रम) लांब व पूर्व टोंकास चोवीस हात व पश्चिम टोंकास तीस हात रुंद अशी असते. हिला सौमिक वेदि असें म्हणतात.

या महावेदीच्या पूर्व बाजूस अगदीं मधोमध दहा हात हम चौरस असा एक ओटा तयार करण्यांत येऊन, त्यावर मध्यभागीं वीतभर लांब व

वीतभर रुंद व वीतभर खोल असा चौरस खळगा म्हणजे कुंड–यास नाभि अशी संज्ञा आहे–तयार करून तेथें आहवनीय अग्नीची स्थापना करून त्यांत ज्योतिष्टोमांतील पशुयाग करावयाचा असतो. यास उत्तर वेदि असें नांव आहे.

या महावेदीच्या उत्तरेस आग्नीध्र नांवाचा एक मंडप उभारण्यांत येतो. त्याचा अर्धा भाग महावेदींत व अर्धा भाग वेदीच्या बाहेर अशा बेतानें तो उभारलेला असून, तेथें एक धिष्ण्याची स्थापना करण्यांत येते. त्याचप्रमाणें महावेदीच्या दक्षिण बाजूस मार्जालीय नांवाचा एक चौखांबी मंडप उभारण्यांत येऊन, तेथें यज्ञपात्रें व हस्तादि प्रक्षालन करण्याची सोय केलेली असते. त्याचप्रमाणें पशूचें संज्ञपन करण्यास म्हणून मंडपाच्या बाहेर उत्तरेस थोड्याच अंतरावर शामित्रशालाहि निर्माण करण्यांत येते. त्याच्या खालीं केरकचरा टाकण्यास चात्वाल नांवाचा खड्डा खणलेला असतो. असें हें यज्ञमंडपाचें थोडक्यांत वर्णन आहे. त्याची सविस्तर माहिती पाहिजे असल्यास आमच्या 'याज्ञवल्क्य दर्शन' ग्रंथांत पहावयास मिळेल. असो.

या यज्ञमंडपाचें रूपक शतपथांत फार मार्मिकपणें वर्णिलेलें आहे. तें म्हणजे असें:—' पुरुषो वै यज्ञः। शिर एवास्य हविर्धानम्। मुखमेवास्याहवनीयः। बाहूऽएवास्याग्नीध्रीयश्च मार्जालीयश्च उदरमेवास्य सदः। अथ यावेतौ जघनेनाग्नी पादावेवास्यै तौ ॥' ( श. प. ३-५-१ ते ६ ). हा यज्ञमंडप म्हणजे खरोखर पुरुषाचें प्रतीक असून हविर्धान हें त्याचें शिर, उत्तर वेदीवरील आहवनीय अग्नि हें त्याचें मुख, आग्नीध्र व मार्जालीय हे त्याचे बाहू, सद हें त्याचें उदर, उपरव खळग्यांपैकीं पुढील दोन खळगे हें त्याचें नाक, मागील दोन खळगे हे त्याचे कान, त्यांवर झांकलेले फलक हे त्याचे जबडे, त्यावर पसरलेलें तांबडें कातडें ही त्याची जीभ, बत्ते हे त्याचे दांत, प्राचीन शालेंतील जुने आवहनीय व गार्हपत्य अग्नि हे त्याचे पाय आणि सदोमंडपांत यजमानाचें प्रतीक म्हणून उभारलेला औदुंबरी यूप हें त्याचें अन्न असा हा यज्ञपुरुषाचा ( यज्ञमंडपाचा ) एक रूपकवजा सुंदर दृष्टान्त आहे.

---

## हवन द्रव्यें

| | |
|---|---|
| १ अपूप ३-५२-१ | ११ पुरोडाश ३-५२-२ |
| २ आशिर ८-६९-६ | १२ पृषदाज्य १०-९०-८ |
| ३ करंभ ३-५२-१ | १३ मधु ८-६९-७ |
| ४ गवाशिर ३-३२-२ | १४ मांस ५-२९-८ |
| ५ घर्म ८-८७-२ | १५ मेद ३-२१-५ |
| ६ घृत ५-१-७ | १६ यवाशिर ३-४२-७ |
| ७ दधि ७-३२-४ | १७ रसाशिर ३-४८-१ |
| ८ दध्याशिर १-१३७-२ | १८ वपा ५-४३-७ |
| ९ दूध ४-५-१० | १९ समिधा ४-१२-२ |
| १० धाना ३-५२-१ | २० सोम ३-३२-२ इत्यादि |

( १ ) अपूप म्हणजे घारगा अथवा अनारसा, ( २ ) आशिर म्हणजे सोमरस व दूध यांचें मिश्रण ( ३ ) करंभ म्हणजे भाजलेल्या यवाच्या पिठाची लापशी, ( ४ ) गवाशिर म्हणजे सोमरस व गाईचें दूध यांचें मिश्रण, ( ५ ) घर्म म्हणजे मातीच्या मडक्यांतून तापविलेलें कढत दूध ( ८ ) दध्याशिर म्हणजे दहीं व सोम यांचें मिश्रण, ( ९ ) दूध म्हणजे गाईचें दूध. यज्ञांत दूध, दहीं, तूप वापरावयाचें तें नेहमीं गायीचेंच असतें. म्हशीचें अगर इतर पशूचें असून चालत नाहीं. ( १० ) धाना म्हणजे व्रीहि भाजून त्याच्या केलेल्या लाह्या, ( ११ ) पुरोडाश—हा पदार्थ तांदळाच्या पिठाचा मातीच्या ढलपीवर भाजून तयार केलेला हल्लींच्या पावाच्या आकाराचा असतो. ( १६ ) यवाशीर म्हणजे यवाचें पीठ व सोम यांचें मिश्रण, ( १७ ) रसाशिर म्हणजे गाईचें दूध व सोमरस यांचें मिश्रण, ( १८ ) वपा म्हणजे यज्ञांत मारलेल्या पशूचें नाभीजवळ पोट फाडून त्यांतून काढलेला कागदासारखा पांढरा व पातळ पदार्थ, (१९) समिधा म्हणजे यज्ञांत अग्नि पेटविण्यासाठीं अश्वत्थ वृक्षाच्या वाळलेल्या डहाळ्याचे वीतभर लांबीचे बारीक बारीक तुकडे, २० सोम—सोम ही एक वल्ली असून ती ठेंचून अगर वाटून काढलेला रस, ( २१ ) हवि म्हणजे यज्ञांत देवांना उद्देशून अर्पण करावयाचें द्रव्य.

## यज्ञोपकरणें

| | |
|---|---|
| १ अंक १-१६२-१३ | १९ पवित्र ८-२-२ |
| २ अरणि ७-१-१ | २० परिधि १०-९०-१५ |
| ३ इध्म ८-४५-२ | २१ पशु २-४-७ |
| ४ उखा १-१६२-१३ | २२ प्रस्तर १०-१४-४ |
| ५ उपभृत् ७-२-५ | २३ बर्हि १०-१५-३ |
| ६ उलूखल १-२४-१ | २४ मन्था ३-२९-१ |
| ७ कोश | २५ मुसल १-२८-७ |
| ८ ग्रह ३-३२-२ | २६ यूप ३-८-१ |
| ९ ग्रावा ८-१-१७ | २७ रशना १-१६३-५ |
| १० चमस १-५४-९ | २८ शुक्र ३-३२-२ |
| १० अ चरु १-१६२-१३ | २९ शूल १-१६२-११ |
| ११ चषाल १-१६२- ६ | ३० सूना १-१६२-१३ |
| १२ चर्म ९-१०१-११ | ३१ श्रुच् १-१६२-१७ |
| १३ जुहू १-७६-५ | ३२ श्रुवा १-११६-२४ |
| १४ तरू ५-४-५ | ३३ स्वधिति १-१६२-९ |
| १५ दर्भ १-१९१-३ | ३४ स्वरु ३-८-१० |
| १६ दर्वि ५-६-९ | ३५ हविर्धान २-४१-१९ |
| १७ द्रोण ९-३-११ | ३६ हारियोजन १-८२-४ |
| १८ नीक्षण १-१६२-१३. | इत्यादि |

वरील शब्दांपैकीं कांहींचें थोडक्यांत स्पष्टीकरण करतों.

१ अंक—आंकडा.

२ अरणि—मंथन करून अग्नि उत्पन्न करण्याची (मंथा पाहा ) मधोमध एक खोंच असलेली लांकडी फळी. इला अधरारणि असें नांव आहे.

३ इध्म—अग्नीसभोंवतीं ठेवावयाचीं जाड लांकडें.

४ उखा—यज्ञांत पाक तयार करण्याचें मातीचें पात्र.

५ उपभृत्—देवांना उद्देशून अग्नींत हविर्द्रव्य अर्पण करण्याची लांकडी पळी.

६ उलूखल—तांदूळ सडण्यासाठीं अगर सोमरस काढण्यासाठीं तयार केलेलें लांकडाचें उखळ.

७ कोश—घागर.

८ ग्रह—देवांप्रीत्यर्थ सोमरस भरून ठेवण्याचें लांकडी पात्र.

९ ग्रावा—सोमवल्ली ठेंचून तिचा रस काढण्याचा दगडी बत्ता.

१० चमस—सोमरस प्राशन करण्याचें उंबराच्या लांकडाचें एक पात्र.

११ चषाल—यूपाच्या माथ्यावर बसविलेलें एक वीत लांबीचें लांकडी टोपण.

१२ चर्म—हरिणाचें कातडें.

१३ जुहू—देवांप्रीत्यर्थ अग्नींत आज्य अगर इतर हवन द्रव्यें अर्पण करण्याची लांकडी पळी. ही पळी लांब असून तिच्या तोंडाला चोंचीसारखा आकार असतो.

१४ तरू—झाड.

१५ दर्भ—एक प्रकारचा गवत. प्रस्तर वगैरे या दर्भाचे करतात.

१६ दर्वि—लांकडाची पळी.

१७ द्रोण—सोमरस सांठवून ठेवण्याचें डोणीवजा लांकडी पात्र. या पात्रावर दशापवित्र पसरून त्यावर कुटलेला सोमरम ओतल्यावर तो स्वच्छ सोमरस या द्रोणकलशांत गळून पडतो.

१८ नीक्षण म्हणजे कांटा.

१९ पवित्र—सोमरस गाळण्याचें लोकरी वस्त्र.

२० परिधि—आहवनीय अग्नीच्या सभोंवती रचावयाचीं पलाश वृक्षाचीं जाड लांकडें.

२१ पशु—यज्ञांत बळी द्यावयाचा बोकड अगर इतर पशु.

२२ प्रस्तर—दर्भाचा पुंजका.

२३ बर्हि—एक प्रकारचें गवत. तो यज्ञमंडपांत वेदीवर व इतर ठिकाणीं जमिनीवर पसरण्यांत येतो.

२४ मंथा—अग्नी उत्पन्न करण्यासाठीं रवीच्या आकाराची दांडी. हिला उत्तरारणि असें म्हणतात व ती अश्वत्थ वृक्षाची केलेली असते. ही

दांडी अधरारणीच्या खाचेंत रोवून तिनें घुसळलें म्हणजे त्या घर्षणानें लांकडांतून अग्नि प्रगट होतो व तो अग्नीच यज्ञकार्यांत उपयोगी पडतो.

२५ मुसल—तांदूळ सडण्यासाठीं केलेला लांकडी जाड दांडा. याला मराठींत मुसळ हें नांव आहे.

२६ यूप—यज्ञांत बळी द्यावयाच्या पशूला बांधून ठेवण्यासाठीं उत्तर वेदीच्या बाहेर तीन हात अंतरावर समोर रोवलेला पांच हाती अष्टपैलू असा पळसाचा खांब.

२७ रशना—पशूला खांबास बांधून ठेवण्यासाठीं दर्भाची वळून केलेली दोरी.

२८ शुक्र—हें एक पेलेवजा लांकडी पात्र असून त्यांत सूर्यदेवा-प्रीत्यर्थ सोमरस भरून ठेवण्यांत येतो.

२९ शूल—पशूचें हृदय शिजत असतां टोंचून धरण्याचें शस्त्र. याला हृदयशूल हें टोपण नांव आहे.

३० सूना म्हणजे सुरी. यज्ञांत संज्ञपन केलेल्या पशूचे अवयव कापून निरनिराळे करण्याचें शस्त्र.

३१ स्रुच्—अग्नीमध्यें तूप अर्पण करण्याची लांब अशी लांकडी पळी.

३२ स्रुव्—स्थालीमधलें आज्य काढून घेऊन तें जुहूंत ओतण्याची लांकडी पळी.

३३ स्वधिति म्हणजे कुऱ्हाड. यूपासाठीं झाड तोडण्याच्या कामीं तिचा उपयोग केला जातो.

३४ स्वरू—यूप तयार करतांना त्याचीच एक पहिली राखून ठेविलेली ढलपी.

३५ हविर्धान—यज्ञासाठीं शेतांतून धान्य वाहून आणावयाचा गाडा. हे गाडे दोन असून, ते हविर्धान मंडपांत एक उत्तरेकडे व एक दक्षिणे-कडे उभे करण्यांत येतात.

३६ हारियोजन—गाळलेला सोमरस सांठवून ठेवण्याचें पात्र.

---

## पितर-नामें

| | |
|---|---|
| १ अग्निष्वात्त १०-१५-११ | ७ नराशंस १०-१८२-२ |
| २ अंगिरस १०-१४-३ | ८ दशग्व १-३९-५ |
| ३ अथर्वन् १०-१४-६ | ९ बर्हिषद् १०-१४-३ |
| ४ ऋक्वत् १०-१४-३ | १० भृगु १०-१४-६ |
| ५ कव्यभुक् १०-१४-३ | ११ साध्य १-१६४-५० |
| ६ नवग्व ६-२२-२ | १२ सोम्यास १०-१४-१ |

या पितरांचा लोक म्हणजे यमलोक हा होय.

---

## ऋग्वेदांतील नदी-नामें

| | |
|---|---|
| १ अनितभा ५-५३-९ | १७ रसा ५-५३-९ |
| २ अश्मन्वती १०-५३-८ | १८ वितस्ता ५-४२-९ |
| ३ अंशुमती ८-९६-१४ | १९ विपाश ३-३३-१ |
| ४ आशिक्नी ८-२०-२५ | २० शुतुद्रि ३-३३-१ |
| ५ आपया ३-२३-४ | २१ श्वेतयावरी ८-२६-१८ |
| ६ अर्जिकीया १०-७५-५ | २२ श्वेती १०-७५-६ |
| ७ कुभा ५-५३-९ | २३ सरयू ४-३०-१८ |
| ८ क्रुमु ५-५३-९ | २४ सरस्वती १०-७५-५ |
| ९ गंगा १०-७५-५ | २५ सिंधु १०-७५-२ |
| १० गोमती ५-६१-१९ | २६ सुदुधा ५-३१-८ |
| ११ तुष्टामा १०-७५-६ | २७ सुवास्तु ८-१९-३० |
| १२ दृषद्वती ३-२३-४ | २८ सुषोमा ८-६४-११ |
| १३ परुष्णी ८-७४ १५ | २९ सुसर्तु १०-७५-६ |
| १४ मरुद्वृधा १०-७५-५ | ३० हारियूपिया ५-५६-१६ |
| १५ यमुना १०-७५-५ | इत्यादि |
| १६ यव्यायती ६-२७-६ | |

---

## ऋग्वेदांतील देशनामें

१ आर्जिक ९-६५-२३
२ कीकट ५-५३-१४
३ कृत्वन् ९-६५-२३
४ गांधारि १-१२६-७
५ गुंगु १०-४८-८
६ रुशम ५-३०-१४
७ वैकर्ण ७-१८-११
९ सिंधु १-१२६-१

## पर्वत नामें

१ मूजवत १०-३४-१
२ हिमवत् १०-१२१-४

## सरोवर

१ शर्यणावत् ९-११३-१.

## ऋग्वेदांतील भूगोल

आतां येथें वर ठोकळ मानानें ऋग्वेदांत आढळणाऱ्या कांहीं प्रसिद्ध नद्यांची, देशांचीं व पर्वतांचीं जीं नांवें देण्यांत आलीं आहेत, त्या वरून वेदकालीन आर्यांचें वसतिस्थान कोणतें असावें, याविषयीं अंधुक कल्पना करण्यास थोडासा अवसर मिळतो. त्यांतील कांहीं नद्यांचा आज पत्ता लागत नाहीं हें जरी खरें असलें, तरी त्यांतील कांहीं प्रसिद्ध प्रसिद्ध नद्या आजहि ओळखतां येण्यासारख्या आहेत, ही एक त्यांतल्या त्यांत सुदैवाचीच गोष्ट म्हटली पाहिजे. सर्वांत मुख्य व महत्त्वाची नदी म्हटली म्हणजे सिंधु नदी होय. हिला अफगाण, वायव्य प्रांत, काश्मीर व पंजाब या प्रांतांतून वाहणाऱ्या नद्या—कांहीं पश्चिमेकडून व कांहीं पूर्वेकडून—येऊन मिळतात. त्याशिवाय गंगा, यमुना, सरस्वती, दृषद्वती, शरयू आपया इत्यादि नद्या मध्यदेशांतून वाहणाऱ्या असून, त्यांत सरस्वतीला ऋग्वेदांत फारच महत्त्वाचें स्थान देण्यांत आलें आहे. त्यांपैकीं यमुना ही गंगेस व आपया व दृषद्वती या नद्या सरस्वतीस येऊन मिळतात. या

सर्व नद्यांची थोडक्यांत माहिती सांगितली म्हणजे वेदकालीन आर्योच्या वसतिस्थानाची म्हणजे भूगोलाची ओझरती कल्पना करण्यास कांहींशी मदत होते. म्हणून क्रमानें कांहीं नद्यांचें वर्णन देत जातों.

( १ ) असिक्नी—ही जी ऋग्वेदांतील नदी आहे, ती आज पंजाबांतील चिनाब नदी म्हणून ओळखली जाते. ही पुढें शुतद्रु म्हणजे सतलज नदीला जाऊन मिळते. वितस्ता ही नदी उत्तरेकडून काश्मिरांतून वाहत येऊन पुढें पंजाबांत शिरल्यावर तिचा या असिक्नी नदीशीं प्रथम संगम होतो. संगम झाल्यावर पुढें त्या दोन्ही नद्यांना मिळून मरुद्वृधा हें नांव प्राप्त होतें. पुढें ही मरुद्वृधा शुतद्रु नदीला जाऊन मिळते. वितस्ता नदी आज पंजाबांत झेलम या नांवानें प्रसिद्ध आहे.

( २ ) आपया—ही नदी मध्यदेशांत वाहणारी असून, ती सरस्वतीला येऊन मिळते. या नदीविषयीं निश्चित अशी माहिती फारशी उपलब्ध नाहीं.

( ३ ) कुभा—ही नदी पूर्व अफगाणांतून वाहत येऊन सिंधूला पश्चिमेकडून मिळते. कुभा ही नदी आज काबूल नदी या नांवानें ओळखली जाते.

( ४ ) क्रुमु—ही नदी अफगाणिस्तानांतील हल्लींची कुरूम नदी असून, ती सिंधूला येऊन मिळते.

( ५ ) गंगा—या नदीचा उल्लेख ऋग्वेदांत नदी-स्तुतींत फक्त एकदांच आला आहे. या नदीविषयीं ऋग्वेदांत फारशी माहिती नाहीं. वेदकालीं सिंधु व सरस्वती या नद्यांना जें महत्व होतें, तसें गंगा व यमुना या नद्यांना असलेलें आढळून येत नाहीं. मात्र वेदकालीं आर्य देशाची ही पूर्व सीमा म्हणून धरून चालण्यास हरकत नाहीं. पौराणिक कालांत मात्र सरस्वती गुप्त झाल्यावर या गंगेला महत्त्व येऊन ती आज सर्व नद्यांत श्रेष्ठ व पवित्र नदी होऊन बसली आहे.

( ६ ) दृषद्वती— ही नदी सरस्वती नदीला मिळणारी एक नदी असून, ती एक लहान नदी असावी. या दोहोंच्या मधल्या प्रदेशाला ब्रम्हावर्त हें नांव प्राप्त झालें.

( ७ ) **परुष्णी**—ही नदी ऋग्वेदांत चांगलीच गाजलेली आहे. याचें कारण असें कीं, ऋग्वेदांतील प्रसिद्ध असें ऐतिहासिक दाशराज्ञ-महायुद्ध या नदीच्या कांठावरच लढलें गेलें, या लढाईंत सुदास राजाच्या विरुद्ध दहा राजे लढत होते. पण इंद्रानें सुदासाचा पक्ष घेतल्यामुळें या दहाहि राजांचा सणसणीत पराभव होऊन, त्यांत कांहीं या नदींत बुडून प्राणास मुकले व कांहींना जीव घेऊन पळतां पळतां भुई थोडी झाली. ही परुष्णी म्हणजे हल्लीं पंजाबांतली रावी नदी होय.

( ८ ) **यमुना**—या नदीचें नांव नदी सूक्तांत आलें असून शिवाय दाशराज्ञ युद्धांतहि तिचा उल्लेख आहे. परुष्णी तीरावर दाशराज्ञ युद्ध झाल्यावर तेवढ्यावर तो संग्राम न संपतां पुनः या यमुनेच्या तीरावरहि तिचा दुसरा एक बार उडाला. त्यांत सुदासानें फक्थांचा राजा भेद यास ठार मारलें ( ७-१८ ). यमुनेचें गंगेप्रमाणेंच ऋग्वेदांत म्हणण्यासारखें महत्व नाहीं. ही यमुना गंगेस मिळाली आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

( ९ ) **रसा**—ही नदी पणी लोकांच्या सीमा प्रदेशावर असून ती पाण्यानें तुडुंब भरून वाहणारी होती, असें (ऋ. १०-१०८-१) या सूक्तांत म्हटलें आहे. तेथें पणींनीं सरमेला तूं पाण्यानें भरून वाहणाऱ्या रसा-नदीला कशी तरून आलीस—कथं रसाया अतरं पयांसि—असा प्रश्न केला आहे. तेव्हां ऋग्वेदकालीं ती विशाल अशी महानदी असावी असा तर्क करण्यास जागा आहे. पणींचा देश आर्यांच्या वायव्य दिशेस असून त्या दोहोंच्या मध्यें ही नदी वाहत असावी. ही महापुरानें वाहत असावी याला आधार ऋग्वेदांत 'अहो मरुतांनो ! ही रसा, अनितभा, कुभा, क्रुमु व सिंधु या नद्या तुम्हास थोपवून न धरोत'—'मा वो रसानितभा कुभा क्रुमुर्मा वः सिन्धुर्नि रीरमत्'—या वचनांत सांपडतो. ( ऋ. ५-५३-९ ) ही रसा नदी पुढें सिंधूस मिळाली, असें पुढें म्हटलें आहे. ( ऋ. १०-७५-६ ).

(१०) **वितस्ता**—ही नदी पंजाबांत हल्लीं झेलम या नांवानें प्रसिद्ध असून, तिचा व चिनाब नदीचा संगम झाला आहे. ही नदी पंजाबांतील

पांच नद्यांपैकीं सर्वांत पश्चिमेकडील नदी असून, ज्या पांच नद्यांमुळें पंजाबला पंजाबु हें नांव मिळालें, त्यांपैकीं हीहि एक आहे.

(११) **विपाश** म्हणजे हल्लींची बियास नदी ही होय.

(१२) **शुतुद्री**—आज पंजाबांत सतलज म्हणून जी प्रसिद्ध आहे, ती ऋग्वेदांत शुतुद्रि नांवानें संबोधिली जाते. सिंधूच्या खालोखाल पंजाबांत या नदीलाच महत्व आहे. पंजाबांतील इतर नद्या म्हणजे विपाश, परुष्णी, असिक्नी व वितस्ता या नद्या शेवटीं या शुतुद्रीलाच येऊन मिळतात. त्यांपैकीं प्रथम वितस्ता व असिक्नी यांचा संगम झाल्यावर पुढें त्या दोघांच्या प्रवाहाला मरुद्वृधा हें नांव प्राप्त होतें. ही मरुद्वृधा पुढें वाहत वाहत अखेर परुष्णीला जाऊन मिळते. त्यानंतर पुढें त्या तिघांचा प्रवाह मिळून कांहीं अंतर पुढें गेल्यावर त्यांचा शुतुद्री नदीशीं संगम होतो, आणि शेवटीं ही शुतुद्री पुढें सिंधूला जाऊन मिळते. या पांच नद्यांवरूनच त्या देशाला पंजाब ( पंजाबु ) हें नांव प्राप्त झालें आहे. शिवाय सहावी म्हणजे सिंधुहि त्या देशांतून वाहत जातेच. या सहा नद्यांच्या जोडीला सरस्वती धरली म्हणजे आर्यांचा सप्तसिंधु हा देश तयार होतो.

(१३) **सरयू**—ही नदी हल्लीं अयोध्या प्रांतांत सर्जु या नांवानें प्रसिद्ध आहे. ही अयोध्येवरून वाहत जाऊन पुढें गंगेस जाऊन मिळते. तथापि या नदीविषयीं अनेकांचे अनेक तर्क आहेत. पण ते सगळे तर्कच असल्यामुळें आणि ते पाश्चात्य पंडितांचे असल्यामुळें त्यांचा विचार येथें कर्तव्य नाहीं.

(१४) **सरस्वती**—ऋग्वेदांत सर्व नद्यांतील अत्यंत प्रमुख व वैदिक आर्यांची मोठी लाडकी नदी म्हणजे ही सरस्वती होय. सिंधूला देखील तितकें महत्त्व नाहीं. ऋग्वेदांत या नदीला ‘ नदीतमे ’–सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ ( २-४१-१६ ) व ‘ प्रियतमे ’–सर्व नद्यांत अत्यत प्रिय (७-९५-५) असें म्हटलें असून, तो मान ऋग्वेदांतील इतर कोणत्याहि नद्यांना देण्यांत आला नाहीं. इतकेंच नव्हे तर तिला ‘ अम्बितमे ’–मातांमध्यें श्रेष्ठ ( २-४१-१६ ) व ‘ देवितमे ’–देवींमध्यें श्रेष्ठ ( २-४१-१६ )

अशा नांवानीं आळवून तिच्या विषयींचा आपला आदरभाव तत्कालीन आर्यांनीं व्यक्त केला आहे. ऋग्वेदांत कोणत्याहि नदीला स्वतंत्र असें सूक्तस्थान मिळालें नसून, तो मान ७-९५ व ९६ मध्यें फक्त या सरस्वतीलाच देण्यांत आला आहे. ही नदी आज गुप्त रूपानें वाहत असली तरी वेदकालीं तिचा प्रवाह मोठा विशाल व जोरकस होता, अशी ऋग्वेदाचीच प्रत्यक्ष साक्ष आहे. तिला 'ऋतावरी' म्हणजे उदकसंपन्न हें विशेषण लावून ती जलपूर्ण होती ही गोष्ट अगदीं स्पष्ट केली आहे ( २-४१-१८ ). ती हिमालयांत उगम पावून सरळ समुद्राला जाऊन मिळणारी आणि त्याचप्रमाणें सर्व नद्यांमध्यें मोठी पवित्र अशी फक्त ही एकटीच आहे. ( एकाचेतत् सरस्वती नदीनां शुचिर्यती गिरिभ्य आ समुद्रात् ' ७-९५-२ ). तिचें सामर्थ्य अनंत व अजिंक्य असून तिच्या प्रवाहाचा वेग अप्रतिहत आहे आणि तितकाच तो प्रभूतजलहि आहे. तो जात असतां मोठ्यानें गर्जना करीत जात असतो. ( ' यस्या अनन्तो अन्हुतस्त्वेषश्चरिष्णुरर्णव: । अमश्चरति रोरुवत् । ' ६-६१-८ ). ती सर्व नद्यांमध्यें अत्यंत वेगवत्तम नदी असून ( अपसामपस्तमा, ६-६१-१३ ), या तिच्या कांठावर पंचजन वसति करून राहिले होते व त्यांचा ती उत्कर्ष करीत होती. ('पंच जाता वर्धयन्ती' ६-६१-१३ ) या सरस्वतीचें सामर्थ्य इतकें प्रचंड होतें कीं ती आपल्या प्रबल लाटांनीं तीरावर असलेले पर्वताचे कड्याचेकडे धडाधड ढासळून खालीं पाडीत असे व तीरावर असलेले मोठमोठे वृक्ष उन्मळून टाकी ! ( ६-६१-२ ).

ही मोठी भक्तवत्सल असून, तिची मनोभावें उपासना करणाऱ्या वध्र्यश्व्याला मोठा बलशाली व पितृऋणांतून मुक्त करणारा असा तेजस्वी दिवोदास नांवाचा पुत्र तिनें दिला. ( ' इयमददात् रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्व्याय दाशुषे ' ६-६१-१ ), विपुल संपत्ति देण्याबद्दल ( १०-१७-९ ) बलवर्धक व आरोग्यकारक अन्न देण्याबद्दल ( १०-१२-७ ), पुत्रपौत्रादि संतति देण्याबद्दल ( २-४१-१७ ), महापुरानें बाधा न करण्याबद्दल ( ६-६१-१४ ) तिची प्रार्थना करण्यांत आली आहे. हिच्या पवित्र तीरावर वैदिक ऋषींनी अनेक यज्ञ करून ते

कृतकृत्य होऊन गेले. अशा प्रकारानें ही सरस्वती नदी ऋग्वेदांत मोठी महत्व पावलेली अशी पवित्र व पावनकर्त्री नदी आहे.

(१५) **सिंधु**—या सिंधु नदीला सरस्वतीइतकें पावित्र्य व पूज्यत्व नसलें तरी महत्वाच्या दृष्टीनें ती झाली तरी सरस्वतीइतकीच प्रशंसनीय आहे. एका दृष्टीनें ती सरस्वतीपेक्षांहि मोठी आहे. ही कैलास पर्वताच्या पश्चिमेकडील बाजूला उगम पावून, तेथून प्रथम पश्चिमेकडे डोंगराळ खडकांतून मार्ग काढून, पुढें हिंदुकुश पर्वतामधून फुटून बाहेर पडून, नंतर दाक्षिणवाहिनी होऊन काश्मीरांतून खालीं पंजाबांत उतरली आहे. पंजाबांत शिरल्यावर तिला पश्चिमेकडून व पूर्वेकडून अनेक नद्या येऊन मिळाल्या आहेत. पश्चिमेकडील नद्यांत कुभा, गोमती, क्रुमु, मेहात्नु इत्यादि नद्या येऊन मिळाल्या आहेत. ( 'त्वं सिंधो कुभया गोमती क्रुमुं मेहत्न्वा सरथं याभिरीयसे' १०-७५-६ ). आणि पूर्वेकडून वितस्ता, परुष्णी, मरुद्वृधा, विपाश, शतद्रु इत्यादि नद्यांशीं तिचा संगम झाला आहे. या सर्व नद्या मिळाल्यावर ती पुढें प्रचंड अशी महानदी बनून खालीं सिंधु प्रांतांत उतरून नंतर समुद्रास जाऊन मिळाली आहे.

तिचा प्रवाह सारखा अखंडित असून मोठा वेगवान आहे. ( 'अदब्धा सिन्धुरपसामपस्तमा' १०-७५-७ ). ती जातांना वृषभाप्रमाणें गर्जना करीत जाते, ( 'सिन्धुर्यंदेति वृषभो न रोरुवत्' १०-७५-३), ती युवतीसारखी सुंदर आहे ( 'वपुषीव दर्शता' १० ७५-७), ती सुंदर घोड्यांनीं युक्त आहे, सुवसना आहे, सुवर्णालंकारांनीं मंडित आहे; ती विपुल अन्नांनीं संपन्न आहे, ती सुंदर लोकरीनें युक्त आहे, ती नित्य तरुणी आहे, ती सील नांवाच्या गवतानें विभूषित आहे, आणि ती मधुवर्धक आहे ! ( 'स्वश्वा सिन्धु सुरथा सुवासा हिरण्ययी सुकृता वाजिनीवती ऊर्णावती युवतिः सीलमावत्युताधि वस्ते सुभगा मधुवृधम्'।। १०-७५-८). अर्थात् तिच्या प्रदेशांतील लोकांना ती मोठी सुखदायक व उत्कर्षक झाली आहे, हें निराळें सांगणें नकोच. ( 'सिन्धुरद्भिर्नो शर्म यंसत्' ४-५४-६) आणि म्हणून वैदिक आर्यांनीं तिचा महिमा मोठा म्हणून गाईला आहे.

( 'महान्ह्यस्य महिमा पनस्यते' १०-७५-९ ) असें हें वेदांत गाईलेलें या सिंधूचें वर्णन आजमितीसहि सत्य असेंच आहे !

याशिवाय इतर ज्या नद्या आहेत, उदाहरणार्थ, अतिनभा, अश्मन्वती, आर्जिकीया, सुदुधा, सुवास्तु, सुषोमा, हरियूपिया, इत्यादि नद्यांचा आज पत्ता लागत नाहीं. त्या आज भूमिगत तरी झाल्या असल्या पाहिजेत अथवा नांवांत आमूलाग्र बदल तरी झाला असला पाहिजे. हरियूपिया ही नदी कोठें होती हें आज सांगतां येण्यासारखें नाहीं. पण ऋग्वेदांत त्या नदीवर चायमान राजानें वृचीवंताचा पराभव केला असें म्हटलें आहे. तेव्हां ती ऋग्वेदकालीं नदी असावी, असें मानण्यास हरकत नाहीं. पण ती कोठें होती, याचा आज पत्ता लागत नाहीं. या नद्यांविषयीं अनेकांचे अनेक तर्क आहेत. पण ते सगळे तर्कच होत. त्यांत तथ्यांश फारसा नाहीं.

ऋग्वेदांत ज्या देशांचा उल्लेख आहे, त्यांचा आज खात्रीलायक सुगावा लागत नाहीं. तथापि कीकट म्हणजे मगध, गांधारि म्हणजे कंद-हार व सिंधु म्हणजे पंजाब असें मानलें तरी त्यांत मोठीशी चूक होणार नाहीं.

ऋग्वेदांत पर्वत फारसे आढळत नाहींत. फक्त दोन नांवांचा मात्र उल्लेख आढळतो. एक हिमवत् म्हणजे आजचा हिमालय व दुसरा पर्वत म्हणजे मूजवत्. अर्थात् हा मूजवत् पर्वतहि हिमालयाचा एक भागच असून, तेथील सोमवाल्लि फार प्रसिद्ध होती. या पर्वताचा संबंध रुद्र देवाशीं येतो. तेव्हां तो कैलास असावा असें आम्हांस वाटतें. असो. ऋग्वेदांत नांव घेण्यासारखें सरोवर म्हणजे एकच असून त्यास शर्यणावत् असें म्हणतात. हें सरोवर कुरुक्षेत्राजवळ असून त्यांतील सोम ऋग्वेदांत फार प्रसिद्ध होता. असो. याप्रमाणें ऋग्वेदांतील आर्य राष्ट्राचा हा असा थोड-क्यांत भौगोलिक इतिहास आहे.

---

## ऋग्वेदांतील जमाती

| | |
|---|---|
| १ अज ७-१८-९ | १६ पुरु ७-१८-१३ |
| २ अनु १-१०८-८ | १७ भरत ६-१४-४ |
| ३ अलिन ७-१८-७ | १८ भलानस ७-१८-७ |
| ४ कीकट ३-५३-१४ | १९ मत्स्य ७-१८-६ |
| ५ क्रिवि ८-२०-१४ | २० यक्षु ७-१८-६ |
| ६ गंधारि १-१२६-७ | २१ यदु १०-४९-८ |
| ७ चेदि ८-५-३७ | २२ विषाणिन् ७-१८-७ |
| ८ तुर्वश ५-३१-८ | २३ वृचिवंत ६-२७-५ |
| ९ तृत्सु ७-१८-१३ | २४ वैकर्ण ७-१८-११ |
| १० दस्यु २-१५-९ | २५ शिग्रु ८-१८-१९ |
| ११ दास ६-२०-६ | २६ शिम्यु ८-१८-१९ |
| १२ द्रुह्यु ७-१८-६ | २७ शिव ८-१८-७ |
| १३ पक्थ ७-१८-७ | २८ शिश्नदेव ७-२१-५ |
| १४ पणि १०-१०८-२ | २९ सृंजय ६-२७-७ |
| १५ पारावत ८-३४-१८. | |

ऋग्वेदांतील लोकांसंबंधीं सांगावयाचें झाल्यास त्यांत मुख्यतः दोन प्रकारचे लोक दिसून येतात. एक वेदोपासक आर्य व दुसरे वेदनिंदक अनार्य. वैदिक आर्यांतहि निरनिराळे गट असून, ते सिंधू नदीच्या पूर्वेस गंगायमुना नदीपर्यंत तेथें तेथें वसति करून रहात होते. अर्थात् वैदिक आर्यांत अनेक जमातींचा समावेश झालेला असून, त्यांत भरत, तृत्सु, तुर्वश, पुरु, यदु, द्रुह्यु, क्रिवि, सृंजय इत्यादि लोक आपापलीं लहान लहान राष्ट्रें बनवून एकमेकांच्या शेजारीं रहात असत. त्याचप्रमाणें अनार्य लोकांचेहि निरनिराळे गट असून त्यांची वसाहत सिंधूच्या पश्चिमेकडील प्रदेशांत म्हणजे पूर्व अफगाणिस्तान, वायव्य प्रांत, सरहद्द प्रांत येथें हिंदुकुश पर्वताच्या डोंगराळ प्रदेशांत पसरलेली होती. त्या अनार्य लोकांत अलिन, गंधारि, दस्यु, दास, पक्थ, पणि, भलानस, विषाणिन्, वगैरे

निरनिराळ्या टोळ्यांचा समावेश होतो. आतां हे सर्व लोक वेदकालीं कोठें कोठें रहात होते याविषयीं थोडीशी माहिती देतों.

प्रथम आर्यांची माहिती देऊन मग इतरांकडे वळतों. पुढें जावयाच्या अगोदर प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं वैदिक आर्य यांची मातृभूमि ही सप्तसिंधु या नांवानें ओळखली जात होती. सप्तसिंधु म्हणजे सात नद्यांचा प्रदेश. सिंधु, वितस्ता, असिक्नी, परुष्णी, विपाश, शुतद्रु व सरस्वती या नद्यांमधील व त्यांच्या शेजारच्या प्रदेशाला सप्तसिंधु हें नांव असून, या नद्यांच्या सुपीक प्रदेशांतच वैदिक आर्यांच्या निरनिराळ्या जमाती निरनिराळ्या ठिकाणीं वसति करून रहात होत्या. अर्थात् या नद्यांच्या तीरांवर व त्यांच्या आसपास कोणकोणते लोक रहात होते, याची थोडक्यांत माहिती म्हणजे अशी आहे:—

भरत व तृत्सु हे शुतद्रु ( सतलज ) व सरस्वती या नद्यांच्या सुपीक प्रदेशांत रहात होते. पुरु हे सरस्वतीच्या कांठींच पण भरतांच्या नैऋत्य दिशेस आपला संसार थाटून असत. यदु हे सिंधु व मरुद्वृधा यांच्या मधल्या दोआबांत, तुर्वश व अनु हे असिक्नी ( ८-२०-२५ ) व पुरुष्णी ( ८-७४-१५ ) यांच्या दोआबांत, द्रुह्यु हे असिक्नीच्या कांठावर, सृंजय हे दृषद्वतीच्या दक्षिण तीरावर भरतांच्या पूर्वेस, क्रिवि उर्फ पांचाल हे गंगानदीच्या उत्तरेस म्हणजे हल्लींच्या अयोध्याप्रांतांत, वृचिवंत हे सिंधु व वितस्ता ( १०-७५-२ व ५-४२-९ ) यांच्या दोआबांत, व चेदि हे यमुनेच्या कांठावर वसाहत करून असत.

यानंतर आतां अनार्य जमातीचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. गांधारि हे लोक कुभा ( काबूल ) नदीच्या आसपास, पक्थ हे क्रुमु नदीच्या उगमाजवळच्या डोंगराळ प्रदेशांत, भलानस हे क्रुमु नदीच्या पश्चिमेस व पक्थांच्या दक्षिणेस, आलिन हे मेहत्नूच्या काठीं, विषाणिन हे सिंधू नदीच्या पश्चिमेस गोमती व क्रुमु नदी यांच्या दोआबांत, पणी हे रसा नदीच्या पलीकडे दक्षिण काश्मीरच्या डोंगराळ प्रदेशांत, दास व दस्यू हे हिमालयाच्या दक्षिणेकडच्या प्रदेशांत राहणारे अनार्य लोक होते. असा हा थोडक्यांत वेदकालीन आर्य व अनार्य यांच्या वसतिस्थानाचा इति-

ह्रास आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं वैदिक आर्य हे सिंधु, वितस्ता, असिक्नी, परुष्णी, शुतुद्रु, सरस्वती, दृषद्वती, यमुना व गंगा या नद्यांच्या कांठांवर व त्यांच्या आसपासच्या सुपीक प्रदेशांत राहणारे असून, अनार्य लोक हे सिंधू नदीच्या पश्चिमेस म्हणजे पूर्व अफगाण, कंदाहार, वायव्य-प्रांत, काश्मिर इत्यादि डोंगराळ प्रदेशांत राहणारे होते. दस्यू व दास हे हिमालय प्रदेशांत आपला संसार थाटून असत. ऋग्वेदांतील अशी ही आर्य व अनार्य लोकांच्या वसतिस्थानाची थोडक्यांत कथा आहे.

## वैदिक आर्यांचें खाद्यपेय

| | |
|---|---|
| १ अपूप ३-५२-७ | ८ पितु १-६१-७ |
| २ ओदन ८-६९-१४ | ९ पृषदाज्य १०-९०-८ |
| ३ करंभ ३-५२-१ | १० मधु ८-४-८ |
| ४ क्षीर ८-२-९ | ११ मांस |
| ५ घृत १-१३४-६ | १२ यवागु |
| ६ दधि ८-२-९ | १३ सुरा |
| ७ पयस् ४-३-९ | १४ सोम, वगैरे |

वेदकालीं वैदिक आर्यांच्या चारितार्थाचें मुख्य साधन म्हणजे कृषिकर्म हें होय. आणि त्याबरोबरच पशुसंवर्धन हेंहि तितकेंच महत्वाचें होतें. त्या वेळीं प्रत्येक कुटुंब गायीगुरें इत्यादि पशुसंपत्ति व पुरेशी सुपीक जमीन जवळ बाळगून असे. त्यांचा सर्वसामान्य आहार म्हणजे यव व भात हा असून, त्यांच्या पिठांपासून निरनिराळे खाद्यपदार्थ ते तयार करीत. ते यवाची लागवड करीत ( ५-५३-१३; ६-१३-४ ) आणि व्रीहि म्हणजे भातहि पिकवीत असत. ( ५-३३-१३; ६-१३-४; १०-९४-१३ ). मूग वगैरे कडधान्येंहि ते पिकवीत असावेत. पण आश्चर्य हें कीं ते पंजाबांत असूनहि गव्हाचा उल्लेख ऋग्वेदांत केलेला दिसून येत नाहीं. त्यावरून गहूं त्यांना त्या वेळीं माहीत होता कीं नव्हता याविषयीं संशय आहे. व्रीहि म्हणजे तांदूळ व यव म्हणजे बार्ली. त्याचें भाजून पीठ करून त्यांत दहीं अगर तूप मिसळून त्यापासून करंभ नांवाचा पदार्थ तयार करीत. याचें सादृश्य म्हणून आजचा अनारसा अगर घारगा

देतां येईल. हा करंभ म्हणजे देवांपैकीं पूषा देवाचा मोठा आवडीचा पदार्थ असून, तो यज्ञांत त्याच्या प्रीत्यर्थ हवन करण्यांत येई. तांदळाच्या पिठापासूनहि तो तयार करण्यांत येई ( ३-५२-७; १०-४५-९ ). त्याच-प्रमाणें त्या पिठापासून अपूप म्हणजे पोळीसारखा पदार्थ तयार करण्यांत येई ( ३-५२-७ ). धाना म्हणजे साळीच्या लाह्या आणि चरु म्हणजे तुपांत अगर दुधांत शिजविलेला भात. पुरोडाश हा पदार्थ यव अगर तांदळाच्या पिठाचा केलेला असून तो आधुनिक पावाच्या आकारासारखा असे. शिवाय भातांत दूध मिसळून अन्न तयार करीत, त्याला क्षीरोदन हें नांव आहे. तसेंच मांसमिश्रित भाताला मांसोदन व मूगमिश्रित भाताला मुद्गौदन हें नांव आहे. मुद्गौदन म्हणजे आजची खिचडी. हे सर्व विविध पदार्थ यव व तांदूळ यांपासून तयार करण्यांत येत.

याशिवाय गोधन हें प्रत्येक कुटुंबांत विपुल असल्यामुळें दूध, दहीं, लोणी, तूप इत्यादि विविध गोरस पदार्थांची त्या वेळीं सर्वत्र मोठी चंगळ असे. दुधापासून ते पायस म्हणजे खीर करीत. दह्यांत मध मिसळून श्रीखंडासारखा मधुर पदार्थहि बनविला जाई. सोमरसांत दूध मिसळून गवाशिर नांवाचा पदार्थ, दहीं मिसळून दध्याशिर नांवाचा पदार्थ, यवाचें पीठ मिसळून यवाशिर नांवाचा पदार्थ तयार केला जाई व त्यांचा देवांप्रीत्यर्थ होम करण्यांत येई व अवशेष भाग भक्षण करण्यांत येई. या सर्वांची गणना आहारांतच केली जात असे.

यावरून असें मात्र कोणी समजूं नये कीं वैदिक आर्य हे फक्त शाकाहारीच होते. तो समज जर कोणाचा झाला असेल तर तो खरा नाहीं. शाकाहाराप्रमाणेंच मांसाहारहि त्यांना मान्य व प्रिय होता. त्यांची अन्नाची कल्पना आजच्या आमच्या जैनाळलेल्या हिंदूंहून निराळीच होती. शरीराचें धारण, पोषण व वर्धन ज्यापासून होतें तें सर्व अन्नांतच त्यांचें मोडत असे. आरोग्यकारक, बलवर्धक व पुष्टिदायक असे जे जे पदार्थ आहेत, ते सर्व अन्नांतच गणले जात असत. आणि मांस हें वरील दृष्टीनें सर्वतोपरी श्रेष्ठ अन्नच आहे असें म्हटलें, तर तें चूक आहे असें आहारशास्त्रदृष्ट्या नांव ठेवतां येणार नाहीं.

येथें आतां स्पष्ट सांगावेंसें वाटतें कीं वेदकालीं आर्यांना मांस हें मुळींच निषिद्ध नव्हतें. इतकेंच नव्हे, तर तें त्यांच्या प्रिय आहारांतच मोडत होतें. वैदिक देवांना तर त्याची भारी आवड. देवराज इंद्रानें तर एकाच वेळीं वीस बैल खाल्ल्याचा ऋग्वेदांत उल्लेख आहे. (१०-८६-१४; १०-२७-२) आणखी एका ठिकाणीं म्हटलें आहे कीं, त्याच्याकरतां मरुतांनीं तीनशें रेडे शिजविले ( ‘ विश्वे मरुतः सजोषाः पचच्छतं महिषाँ इन्द्र तुभ्यम् ’ ६-१७-११ ). अग्नीला तर घृत, मांस, मेद, वपा यांची आहुति म्हणजे मोठी मेजवानीच! आणि मग या देवांचें अनुकरण करण्यांत धर्म मानणाऱ्या वैदिक ऋषींना तें वावडें व निषिद्ध कसें असणार ?

याज्ञवल्क्यांनीं तर स्पष्टच म्हटलें आहे कीं मांसान्न म्हणजे परमान्न होय ! (एतदु ह परमान्नं यन्मांसम् श. प. ११-७-१-३) अर्थात् मांसान्न हें सर्व अन्नांत श्रेष्ठ अन्न आहे. घरीं एखादा राजा किंवा ब्राह्मण अगर चांगला प्रतिष्ठित पाहुणा अगर अतिथि आला, तर त्याच्या प्रीत्यर्थ एखादा लठ्ठ बोकड अगर चांगला पुष्ट बैल मारून त्याचें पक्वान्न–मिष्टान्न–तयार करावें, असें शतपथांत स्पष्ट म्हटलें आहे. ( ‘ यथा राज्ञे वा ब्राम्हणाय वा महोक्षं वा महाजं वा पचेत्तदह मानुषं हविः ’ ३-४-१-२ ). त्याचप्रमाणें ऐतरेय ब्राह्मणांतहि तोच अगर तशासारखाच मजकूर आहे ( १-३-४ ).

एवंच तात्पर्य काय, तर याविषयीं अधिक विस्तार न करतां थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वैदिक आर्यांना शाकाहार व मांसाहार हे दोन्ही आहार सारखेच प्रिय व मान्य होते, व ते आहार साधेच असले तरी हितकर, आरोग्यकर, पुष्टिप्रद व बलवर्धक होते, हें निर्विवाद आहे.

याशिवाय मध, सोम, दही, दूध, तूप इत्यादि पदार्थ त्यांच्या खाद्यपेयांतच मोडत असून त्याविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं. वैदिकांच्या सामान्य आहाराचें हें थोडक्यांत निरूपण करण्यांत आलें.

---

## वैदिक आर्यांचे उद्योगधंदे

वेदकालीं वैदिक आर्यांत कोणकोणते उद्योगधंदे प्रचलित होते, याचा येथें थोडक्यांत परामर्श घेतों. प्राचीन काळीं वैदिक आर्यांचा मुख्य धंदा म्हणजे कृषिकर्म हा होय. त्यावेळीं ते धनगर वृत्तीचे भटके लोक राहिले

नसून, पंजाबांत ते चांगले स्थाइक होऊन राहिले होते. ‘ कृषिमित् कृषस्व ’–शेतकी कर–असा उपदेश ऋग्वेदांत करण्यांत आला असून, त्याचें महत्व ‘ तत्र गाव: कितव तत्र जाया ’–त्या शेतकी धंद्यांत गाई आहेत व स्त्रीहि आहे–असें म्हटलें आहे. आणि शेती करशील तर लोकांत चांगली प्रतिष्ठा मिळवून, संपत्तीचा उपभोगहि मिळेल–वित्ते रमस्व बहुमन्यमानः ’–असें कृषिकर्माचें वैशिष्ट्य सांगण्यांत आलें आहे. यावरून सांगावयाचें तात्पर्य हें कीं वेदकालीन आर्य लोकांत उपजीविकेचा मुख्य धंदा शेतकी हाच होता. याविषयीं विशेष माहिती पुढें देण्यात येईल.

या कृषिकर्माबरोबरच पशुपालन हेंहि तितकेंच उपजीविकेचें एक महत्वाचें साधन होऊन राहिलें होतें. गोरक्षण, गोपोषण व गोवर्धन हेंहि तत्कालीन आर्यकुटुंबाचें आद्य व पवित्र कर्तव्य मानलें जात होतें. कारण त्यापासून उपजीवनास व देवोपासनेस फारच मोठी मदत होत होती. दूध, दही, लोणी, तूप इत्यादि पदार्थ प्रत्यक्ष गायीपासून पैदास होत असल्यामुळें व त्याचप्रमाणें शेतकी कामास लागणारे बैलहि तिच्यापासूनच निपजत असल्यामुळें गोपालन हा आर्यांचा महत्वाचा उद्योग बनावा यांत आश्चर्य नाहीं. कृषिकर्मामुळें घरांत धान्यसमृद्धि व गोरक्षणामुळें दूधदुभतें यांचा भरपूर लाभ होत असल्यामुळें व कुटुंबचरितार्थाचा प्रश्न सहज व सुलभ सुटत असल्यामुळें हे दोन्ही उद्योग कुटुंबपोषणास व त्याचप्रमाणें देवोपासनेसहि मोठे उपकारक होते आणि म्हणून प्रत्येक आर्य कुटुंबांत या दोन्ही उद्योगांना–कृषिकर्म व गोपालन–यांना महत्वाचें स्थान प्राप्त झालें होतें, असें सांगितल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं.

वैदिक समाज त्या काळीं सुसंस्कृत असल्यामुळें त्यांच्यांत इतर समाजोपयोगी उद्योगधंदे व कलाकौशल्य यांचाहि विकास झाला होता. पंजाबांत थंडी मनस्वी असल्यामुळें व लोकरीची पैदासहि तेथें उत्तम व विपुल होत असल्यामुळें शरीर आच्छादनार्थ व संरक्षणार्थ वस्त्र तयार करण्याची कलाहि त्यांनीं हस्तगत केली होती. अर्थात् ते विणकरी होते (२-३-६). आणि हें काम मधून मधून स्त्रियाहि करीत असत असें अनुमान करण्यास जागा आहे. ‘ वि तन्वते धियो अस्मा अपांसि वस्त्रा

पुत्राय मातरो वयन्ति' (ऋ. ५-४७-६) माता पुत्रांकरितां वस्त्रें विणतात, असें ऋग्वेदांत एके ठिकाणीं म्हटलें आहे.

त्याचप्रमाणें सुताराचा धंदाहि चालू होता. शेतकी आउतें, गाड्या, चाकें, रथ, तसेंच घरगुती सामान व यज्ञासाठीं लागणारे चमस, जूहू, यूप, आसंदी, द्रोण, ग्रहपात्रें इत्यादि अनेक यज्ञोपकरणें तयार करण्यासाठीं सुताराची आवश्यकता होती. त्याला कारु (९-११२-३) अथवा तक्ष ( ९-११२-१ ) असें म्हणत.

त्याचप्रमाणें मातीचीं भांडीं करणारे कुंभारहि होते. कलश ( ३-३२-१५ ) कुंभ ( १-११६-७ ), उखा ( १-१६२-१३ ) वगैरे मातीचीं भांडीं हे कुंभार करीत. शिवाय सोन्यारुप्याचे दागिने तयार करणारे सुवर्णकार म्हणजे सोनारहि होते. निष्क ( ८-४७-१५ ), रुक्म, कर्णकुंडलें ( ८-७८-३ ) इत्यादि दागिने करण्याचें काम सोनारच करीत असत. कातड्याचे पदार्थ तयार करणारे चर्मकार म्हणजे चांभारहि असत. यांना ऋग्वेदांत चर्मम्न म्हटलें आहे ( ८-५-३८ ).

तसेंच लोखंडाचें सामान तयार करणारे कर्मार (कम्मार) हेहि त्यावेळीं होते (९-११२-२). खड्ग, हत्यारें, बाणांचीं टोंकें, चिलखत, भाले, कुऱ्हाड, कोयते, सुरी, इत्यादि हत्यारें व फाल इत्यादि शेतकीचीं उपकरणें यांची आवश्यकता असल्यामुळें ती गरज भागविण्यासाठीं लोहाराची आवश्यकता होतीच होती. अर्थात् लोहारहि त्या वेळीं विद्यमान होते.

त्याचप्रमाणें न्हावीहि होते. यांना वप्ता असें म्हणत असत ( १०-१४२-४ ). त्याशिवाय वाद्य वाजविणारे वाजंत्री व रोग बरे करणारे वैद्य म्हणजे भिषक् ( ९-११२-१ व ३ ) यांचेंहि अस्तित्व ऋग्वेदांत दिसून येतें. एवंच सांगावयाचा भाव हा कीं कुटुंबाला व समाजाला उपयोगी व उपकारक असे विविध प्रकारचे उद्योगधंदे त्या वेळीं समाजांत रूढ असून, तत्कालीन समाजाच्या प्रापंचिक व धार्मिक गरजा सहज भागविल्या जात. या दृष्टीनें प्रत्येक गांव त्या वेळीं व्यवहार दृष्ट्या स्वयंपूर्ण होता, असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

---

# वैदिक आर्यांची कृषिविद्या

वैदिक आर्यांची कृषिविद्या प्राचीन काळीं कशी काय होती, हें आतां जरासें ऋग्वेदांत डोकावून पाहिल्यास त्यावरून त्यांच्या उपजीवनाचें मुख्य साधन कोणतें होतें याची आज अटकळ करण्यास थोडीबहुत मदत होईल असें आम्हांस वाटतें. म्हणून त्याविषयीं दोन शब्द येथें लिहिण्याचें आम्हीं योजिलें आहे. कारण सर्व धंद्यांत कृषिधंदा हा सर्वश्रेष्ठ असून मनुष्याला जगांत अन्नूनें व गुण्यागोविंदानें नांदून त्यापासून आपला मानव जन्म धन्य व कृतकृत्य करून घेण्यास—म्हणजे जागतिक व पारमार्थिक उत्कर्ष साधण्यास—फार मोठें सहाय्य होणार आहे आणि ही गोष्ट प्रत्यक्ष सूर्यनारायणानेंच जगास जाहीर केली आहे. व्यसनग्रस्त जगाला—जुगाराला चटावलेल्या जुगाऱ्याला—सूर्यदेवानें असा हितोपदेश केला आहे कीं, बाबारे, तुला सुखानें व अन्नूनें जगावयाचें झाल्यास हें जुगारीचें दुष्ट व्यसन सोडून दे ('अक्षैर्मा दीव्यः' १०—३४—३) आणि सुखदायक असा शेतकीचा धंदा कर! ('कृषिमित् कृषस्व' १०—३४—३) मी तुला खरोखर सांगतों, तूं शेतकी करशील तर तुला धनधान्य लाभून, तुला सुखसमाधानांत रममाण होतां येईल, आणि वर प्रतिष्ठाहि लाभेल! ('वित्ते रमस्व बहुमन्यमानः' १०—३४—३) धनधान्य संपत्ति लाभली म्हणजे तुला स्त्रीचें सख्यहि मग सहज लाभेल! ('तत्र जाया' १०—३४—३) शिवाय गोधनाचाहि मोठा लाभ होईल (तत्र गावः' १०—३४—३) गाय व स्त्री यांचा लाभ झाला म्हणजे तुला धर्माचरण करण्यास सुलभ होऊन तुझा मानव जन्म धन्य व कृतार्थ होईल!! याप्रमाणें जुगाऱ्याला पुढें करून, व्यसनाधीन सर्व जगाला हिताचा उपदेश करून सूर्यनारायणानें कल्याणाचा मार्ग दाखविला आहे. अर्थात् कृषिविद्या ही मनुष्याची कामधेनु आहे, हें सांगण्याचें तात्पर्य. यावरून शेतकीचें महत्त्व अभ्युदयोन्मुख मानवाला कसें उपकारक व फलदायक आहे, याचा चांगला बोध होतो. हें सर्व येथें सांगण्याचा आमचा उद्देश असा कीं आत्मकल्याणेच्छु जगाला—विशेषतः भारतीयांना-आपलें ऐहिक व पारमार्थिक हित व उत्कर्ष सुसूत्र व निर्विघ्न साधण्यास शेतकीसारखा अष्टपैलू

दुसरा धंदा नाहीं, असें सूर्यनारायणास सुचवावयाचें आहे. आणि त्यांत मनुष्याचें परम कल्याण नाहीं असें कोण म्हणेल ! सर्व धंद्यांत शेतकीचें महत्त्व जागतिक जीवनास व धर्माचरणास अत्यंत उपकारक असल्या-मुळें त्याचें महत्त्व सर्वश्रेष्ठ आहे, यावर आतां निराळें भाष्य करण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. असो.

आतां प्रथम ऋग्वेदांत आढळणाऱ्या कृषिविषयक उपकरणांचीं नांवें देऊन, मग कृषिकर्माची थोडीशी माहिती देतों.

शेतकी उपकरणांचीं वैदिक नांवें तीं अशीं:—

| | |
|---|---|
| १ अष्ट्रा ( चाबूक ) ४-५७-४ | १४ बीजं ( बीं ) १०-१०१-३ |
| २ आहावः( विहीर) १०-१०१-५ | १५ युगा ( जूं ) १०-१०१-३ |
| ३ कीनाशाः (नांगऱ्या) ४-५७-८ | १६ योनि ( पाळी ) १०-१०१-३ |
| ४ कृष (कसणें) ४-५७-४ | १७ लांगलं ( नांगर )४-५७-४ |
| ५ कृषिः ( शेती ) १०-३४-१३ | १८ वपेत ( पेरा ) १०-१०१-३ |
| ६ क्षेत्रं ( शेत ) ४-५७-२ | १९ वरत्रा ( लगाम ) ४-५७-४ |
| ७ क्षेत्रपति (कृषिदेवता)४-५७-२ | २० वाहाः ( बैल ) ४-५७-४ |
| ८ खलं ( खळें ) १०-४८-७ | २१ व्रजं ( गोठा ) १०-१०१-८ |
| ९ तितऊ ( सूप ) १०-७१-२ | २२ श्रुष्टिः ( पीक ) १०-१०१-३ |
| १० पयः ( उदक ) ४-५७-८ | २३ सीरा ( नांगर ) १०-१०१-४ |
| ११ पर्जन्यः ( पाऊस ) ४-५७-८ | २४ सृणिः ( विळा ) १०-१०१-३ |
| १२ पर्ष ( तुष ) १०-४८-७ | २५ स्थीवी ( कणज ) १०-६८-३ |
| १३ फालः ( फाळ ) ४-५७-८ | वगैरे वगैरे |

त्या वेळीं शेतकरी लोक नांगरास बैल जुंपून शेतांत जात असत. ('शुनं कीनाशा अभि यन्तु वाहैः ' ४-५७-८ ) तेथें गेल्यावर फाळानें जमीन नांगरून चांगली मोकळी व भुसभुशीत करीत. (शुनं नः फाला वि कृषन्तु भूमिम् ' ४-५७-८ ) नंतर त्यांत पाळ्या पाडून त्यांत बीं पेरीत (' कृते योनौ वपेतेह बीजम् ' १०-१०१-३ ) अर्थात् ही पेरणी पावसाकडे लक्ष पुरवून योग्य वेळीं करण्यांत येई,हें उघड सांगावयास नकोच. पुढें पर्जन्य त्या पेरलेल्या भूमीवर मधुर जलाचा चांगला वर्षाव करी. ( शुनं पर्जन्यो

मधुना पयोभिः (वर्षंतु). ४-५७-८ ) प्रार्थनेप्रमाणें पाऊस चांगला पडून जमीन चांगली भिजली म्हणजे पुढें पीकहि तसेंच भरभराटून येई. ( 'गिरा च श्रुष्टिः सभरा असन्' १०-१०१-३ ) तें पीक यथाकाल चांगलें तयार होऊन कापणीस आलें म्हणजे त्यावर विळा चालवून तें कापलें जाई. ( 'नेदीय इत् शृण्य: पक्कमेयात्' १०-१०१-३ ) नंतर तें पीक एकत्र करून खळ्यावर आणून त्याची मळणी करून धान्य व तुष पृथक् पृथक् करण्यांत येई. ( 'खले न पर्षान्' १०-४८-७ ). नंतर तें सुपांतून पाखडून घेण्यांत आल्यावर ( 'सक्तुमिव तितउना पुनन्तो' १०-७१-२ ), तें धान्य घरीं आणून कणजांत भरून ठेवीत. व जरूरीप्रमाणें त्यांतून पुनः काढून खेत ( 'निर्गा ऊपे यवमिव स्थिविभ्यः' १०-६८-३).

याप्रमाणें प्राचीन कृषिकर्माची ऋग्वेदांत ढोबळ मनानें माहिती सांपडते. आणि त्याच धर्तीवर आजहि आमची शेती चालली आहे, हें प्रत्यक्षच आहे. असो.

---

## वैदिक आर्यांचें नातेंगोतें

आतां वैदिक आर्यांची नातेंगोतें दाखविणारी शब्दसृष्टि पुढीलप्रमाणें आहे.

| | |
|---|---|
| १ कुल ( घराणें ) १०-१७९-२ | ११ नारी ( स्त्री ) ७-२०-५ |
| २ कुलपा(कुटुंबाचा कर्ता)१०-१७९-२ | १२ पति(नवरा) १०-८५-३९ |
| ३ गोत्र ( घराणे ) ३-३९-४ | १३ पत्नी (बायको) ५-४-५ |
| ४ जामातृ ( जांवई ) ८-२-२० | १४ पितृ ( बाप ) १-३८-१ |
| ५ ज्ञाति ( आप्त ) ७-५५-५ | १५ पुत्र ( मुलगा ) १-३८-१ |
| ६ दम्पती (नवरा-बायको) ८-३१-५ | १६ बंधु ( आप्त ) ७-७२-२ |
| ७ दुहिता ( मुलगी ) ८-१०१-१५ | १७ भर्तृ ( नवरा ) ५-५८-७ |
| ८ देवृ ( दीर ) १०-८५-४६ | १८ भ्रातृ ( भाऊ ) ४-३-१३ |
| ९ ननान्दृ (नणंद) १०-८५-४६ | १९ मातृ (आई) ८-१०१-१५ |
| १० नपात् ( नातू ) ६-२०-११ | २० वधू (नवरी) १०-८५-३३ |

| | | | |
|---|---|---|---|
| २१ शेष (वंशज) | ६-२७-४ | २५ सूनु (पुत्र) | १-१-९ |
| २२ श्वशुर(सास.) | १०-८५-४६ | २६ स्नुषा (सून) | १०-८६-१३ |
| २३ श्वश्रु(सासु) | १०-८५-४६ | २७ स्याल (मेहुणा) | १-१०९-२ |
| २४ सपत्नी(सवत) | १०-१४५-१ | २८ स्वसृ (बहीण) | ८-१०१-१५ |

वरील नातीगोतीं वाचकांच्या चांगल्या परिचयाचींच असल्यामुळें, त्याविषयीं अधिक लिहिण्याचें येथें प्रयोजन दिसत नाहीं.

---

## ऋग्वेदांतील प्राणि-विशेष

ऋग्वेदांतील प्राणिसृष्टि आढळते, ती पुढीलप्रमाणें आहे.

१ अज (बोकड) १-९०-१०
२ अदृष्ट (सूक्ष्म जंतु) १-१९१-१
३ अवि (मेंढा) १-१२६-७
४ अश्व (घोडा) १०-९०-१०
५ अहि (सर्प) ६-७५-१४
६ आखु (उंदीर) ९-६७-३०
७ इभ (हत्ती) ४-४-१
८ उरा (मेंढी) ८-३४-३
९ उष्ट्र (उंट) १-१३८-२
१० ऋक्ष (अस्वल) ५-५६-३
११ ऋश्य (काळवीट) ८-४-१०
१२ कंकत (विषारी प्राणि) १-१९१-१
१३ कपि (माकड) १०-८६-५
१४ कुषकुंभ (मुंगूस) १-१९१-१५
१५ कोष्टृ (कोल्हा) १०-२८-४
१६ गर्दभ (गाढव) ३-५३-२३
१७ गवय (रान बैल) ४-२१-८
१८ गृध्र (गिधाड) १-११८-४
१९ गो (गाय) १०-९०-१०
२० गोरावि (वन्यमृग) ८-८७-४
२१ छाग (बोकड) १-१६२-३
२२ धेनु (दुभती गाय) १-१५३-३
२३ पिपील (मुंगी) १०-१६-६
२४ मंडूक (बेडूक) १०-१६-१४
२५ मत्स्य (मासा)
२६ महिष (रेडा) १०-१२३-४
२७ मूष (उंदीर) १०-३३-३
२८ मृग (हरीण) १-३८-५
२९ मेष (बकरा) १०-२७-१७
३० रासभ (गाढव)
३१ रुरु (एक जातीचा हरीण) ६-७५-१५
३२ लोपाश (कोल्हा) १०-२८-४
३३ वराह (रानडुकर) १-६१-७
३४ वृक (लांडगा) १-११६-६

| | | | |
|---|---|---|---|
| ३५ वृश्चिक (विंचू) | १-१९१-१६ | ४१ सारमेय (कुत्रा) | १०-१४-१० |
| ३६ वृषभ (खोंड) | १-११६-१८ | ४२ सालवृक(लांडगा) | १०-९५-१५ |
| ३७ शश (ससा) | १०-२८-९ | ४३ सिंह | ४-१६-१४ |
| ३८ शिंशुमार (मगर) | १-११६-१८ | ४४ सूकर (रानडुकर) | ७-५५-४ |
| ३९ श्वान (कुत्रा) | १०-१४- | ४५ सूचिक (विंचू) | १-१९१-७ |
| ४० सर्प (साप) | १०-१६-६ | इत्यादि इत्यादि | |

**गाय:**—आतां यांतील कांहीं महत्वाच्या प्राण्यासंबंधानें थोडीशी माहिती देतों. मनुष्येतर प्राण्यांपैकीं सर्वांत अत्यंत उपयुक्त जनावर म्हणजे गाय हें होय. वैदिक आर्यांची ही अत्यंत प्रिय, पूज्य व पवित्र अशी देवता असून तिचा महिमा ऋग्वेदांत मुक्त कंठानें गाण्यांत आला आहे. मनुष्याला गायीचा मुख्य उपयोग म्हणजे तिचें दूध. दुधाचा मनुष्याला जीवनांत केवढा मोठा उपयोग आहे, हें आज निराळें सांगणें नकोच. दूध हा पदार्थ, अमृतासारखा मधुर असून शिवाय तितकाच तो हितकर, पुष्टिकर व शक्तिप्रदहि आहे. देवकार्यांत तर गोदुग्धाशिवाय इतर प्राण्यांचें दूध चालतच नाहीं. मनुष्याला प्रपंचांत दूध, दही, लोणी व तूप यांची रेलचेल करणारी माऊली म्हणजे ही गोमाताच होय! त्याचप्रमाणें यज्ञोपासनेंत जें दूध, दहीं, लोणी व तूप लागतें, तें फक्त या गाईचेंच लागतें. अर्थात् देवांना प्रसन्न करण्यास्तव देवांचें प्रिय हवन-द्रव्य म्हणजे दूध व घृत पुरविणारी कामधेनु म्हणजे ही गायच होय.

केवळ गाईच्या दुधापुरतीच ही गोष्ट नव्हे, तर तिचें मूत्र व शेण देखील धर्मकार्यांत पवित्र व पावनकारक मानलें आहे. पंचगव्य म्हणून धर्मकृत्यांत जो पदार्थ प्रसिद्ध आहे, त्यांत गाईचें दूध, दहि, तूप, मूत्र व शेण यांचें मिश्रण असून, तें प्राशन करण्याची प्रथा तेव्हांपासून आजमित्तीसहि चालत आली आहे. जमीन सारवून शुद्ध व स्वच्छ करण्यास गाईचें शेणच लागतें. ह्याशिवाय गाईच्या शेणाचा खताकडेहि उपयोग होतो, तो निराळाच. गृहकृत्यांत तिच्या शेणाच्या शेण्याहि जळणाच्या कामीं फार उपयोगी पडतात. पुन: सांगावयाची आणखी एक मुद्याची गोष्ट म्हणजे वेदकालीं तिला संपत्तीचें स्थान प्राप्त होऊन तिचा उपयोग

आजच्या चलनी नाण्यासारखा व्यवहारांत केला जात असे. ब्राह्मणांना दक्षिणा द्यावयाची ती या गोरूप धनांतच देण्यांत येई.

याच हातानें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, वैदिक आर्य हे कृषिप्रधान असल्यामुळें व त्या कामांत बैलाची निपज अवश्य असल्यामुळें त्या दृष्टीनेंहि गाईचें तितकेंच महत्त्व होतें, ही गोष्ट नाकारण्यांत अर्थ नाहीं. जमीन नांगरण्यास, पेरण्यास, मळणी करण्यास व इतर शेतकी कामांत बैलाइतकें दुसरें सुलभ साधन नसल्यामुळें कृषीवर उपजीवन करणाऱ्या लोकांस बैलाशिवाय चालण्यासारखें नाहीं, असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होईल असें आम्हांस वाटत नाहीं. आणि बैल पुरविण्याचें साधन गायी-शिवाय दुसरें कोणतें आहे ? म्हणून गाय ही वैदिक आर्यांना प्राचीन कालापासून फार प्रिय, पूज्य व पवित्र व अत्यंत अगत्याची होती.

आतां ऋग्वेदांत तिच्याविषयीं काय सांगितलें आहे, हें सांगून पुढील वाटेस लागतों. गाय ही अमृताची म्हणजे मधुर दुधाची खाण आहे. ( ' अमृतस्य नाभिः ' ८-१०१-१५ ). देवांचें यजन करण्याचें ती एक मुख्य साधन आहे. ( ' देवांश्च याभिर्यजते ') ती रुद्रांची माता, वसूंची दुहिता व आदित्यांची बहीण असून ( ' माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसादित्यानाम् ' ८-१०१-१५), तिच्यामुळें घराला शोभा येते. ( ' भद्रं गृहं कृणुथ ' ६-२८-६ ) तिचा आवाज मंगल आहे. ( 'भद्रवाचः ' ६-२८-७१ ) अशी ही शुभमंगल गाय भग व इंद्र देव आम्हांस देवोत ! ( ' गावो भगो गाव इन्द्रो मे अच्छत् ' ६-२८-५ ) त्यांना चोरांची बाधा न होवो ! व दुष्ट व पापी लोकांचा संपर्क न पोंचो ! ( ' मा वः स्तेन ईशत माघशंसः ' ६-२८-७ ) म्हणून मी भरद्वाज ऋषि जगाला असें सांगतों कीं अशी ही निष्पाप, उपयुक्त, मंगल व गरीब जी गाय, तिचा हे सुविचारवंत हो ! तुम्ही वध करूं नका ! ('प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गामनेहसामदितिं वधिष्ट' ८-१२१-१५) याज्ञवल्क्यांनीं देखील शुक्ल यजुर्वेदाच्या पहिल्याच मंत्रांत तिला 'अघ्न्या' म्हणजे वध करण्यास अयोग्य असें म्हटलें आहे.

आतां येथें थोडासा खुलासा करणें इष्ट आहे. यज्ञांत कांहीं पशु मारावयाचे असतात. त्याची याद शतपथांत दिली आहे ती अशीः—'**सर्वे वै** पशवः प्रजापतिः पुरुषोऽश्वो गौरविरजः' ॥ ( श. प. १०-२ १-१ ) प्रजापति, पुरुष, घोडा, बैल, बकरा व बोकड हे सर्व पशु म्हणजे देवांच्या अन्नस्थानीं आहेत.('अन्नं वै पशवः')येथें मूळ वचनांत 'गौः'असा शब्द असला तरी त्याचा अर्थ गाय असा न करतां बैल असाच केला पाहिजे. याचें कारण असें कीं 'गो' या शब्दाचा अर्थ गाय अगर बैल असा होत असला तरी गाय ही अवध्य–अघ्न्या–आहे, असें वेदांत स्वच्छ सांगितलें असल्यामुळें त्या वचनाला बाध न येईल असाच अर्थ वरील शतपथवचनांत विविक्षित आहे असें धरून चाललें पाहिजे. 'गामनेहसामदितिं मा वधिष्ट' अशी ऋग्वेदाची स्पष्ट आज्ञा असल्यामुळें वरील शतपथवचनांतील 'गौ'चा अर्थ गाय असा केल्यास या ऋग्वेदवचनाला बाध येतो. म्हणून तो अर्थ योग्य नाहीं.

शिवाय हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं यज्ञांत पशु मारतात, ते सगळे पुरुष पशूच असतात. स्त्रीपशु मारीत नाहींत. प्रजापति, पुरुष, अश्व, बकरा, बोकड हे सर्व पुरुष पशूच असल्यामुळें तेथील गौः शब्दाचा अर्थ स्त्रीलिंगी गाय असा न करतां पुल्लिंगी बैल असाच करणें युक्त आहे. आणि तसा केला तरच संगति नीट लागते व वेद वचनालाहि बाध येत नाहीं. हा सूक्ष्म फरक व यज्ञविषयक शास्त्रीय ज्ञान लक्षांत न घेतल्यामुळें पुष्कळ भारतीय व पाश्चात्य पंडितांचा गैरसमज होऊन त्यांनीं 'यज्ञांत गाय मारली जाते' ही शास्त्रदुष्ट कल्पना आज लोकांत पसरवून देण्याचें पाप केलें आहे. अर्थात् ती खरी नव्हे, भ्रामक–अर्थात् चुकीची– आहे, हें सांगण्याचा आमचा भावार्थ. असो. गाईविषयीं हें जें एवढें लिहिलें, त्यावरून ती वैदिक आर्यांना किती पूज्य, पवित्र व उपकारक होती याची येथें थोडक्यांत कल्पना करून दिली आणि त्या वेदकालाइतकीच आजहि ती आम्हां भारतीयांना पूज्य व पवित्र आहे, हें उघड सांगावयास नकोच.

**घोडा**:—गाईच्या खालोखाल घोड्याचा क्रमांक येतो आणि तोहि गाईइतकाच आर्यांना प्रिय व पूज्य आहे. घोडा हा प्राणि दिसावयास

फार सुंदर, मोठा तरतरीत, तसाच बलवान, वेगवान व धैर्यवान असा एक उमदा प्राणी आहे. त्याचें ऋग्वेदांत वर्णन आढळतें तें असें:—— त्याची उत्पत्ति सूर्यापासून झाली आणि वसुदेवांनीं त्याला उत्पन्न केला. ( ' सूरादश्वं वसवो निरतष्ट ' १-१६३-२ ). त्याला सोन्याच्या शिंगासारखे सुंदर कान आहेत ( ' हिरण्यशृंगः ' १-१६३-९ ), त्याचे पाय लोखंडासारखे कणखर असून ' ( अयोऽस्य पादाः ' १-१६३-९ ), तो मनोगतीनें धांवत जातो. ( ' मनोजवाः ' १-१६३-९ ) त्याला श्येनासारखे पंख ( ' श्येनस्य पक्षा ' ) व हरिणासारखे बाहू म्हणजे पाय आहेत. ( १-१६३-१ ). अर्थात् त्याचें रूप दिसावयास फार सुंदर आहे ( ' ते रुपमुत्तमं ' १०-१६३-७ ). हा अग्नीनें दिला. वायु हा त्यास रथास जोडता झाला. इंद्र त्यावर प्रथम चढून बसला आणि गंधर्वानें त्याचा लगाम धरला. ( 'यमेन दत्तं त्रित एनमायुनक् इंद्र एणं प्रथमो अध्यतिष्ठत् । गन्धर्वो अस्य रशनामगृभ्णात् ' १-१६३-२ ).

अर्थात् थोडक्यांत सांगावयाचें तात्पर्य म्हणजे तो अग्निरूप आहे, आदित्यरूप आहे व वायुरूप आहे ! ( ' असि यमो अस्यादित्यो अर्वन्नसि त्रितः ' १०-१६३-३) तो रथाला जुंपला म्हणजे त्याला तो मोठ्या वेगानें दौडत नेतो. ( ' अश्वा रथेभिः सह वाजयन्तः ' ६-७५-७ ). तो रणभूमीवर मोठ्यानें किंकाळ्या फोडीत ( ' तीव्रान् घोषान् कृण्वते ' ६-७५-७ ), अडवा येणाऱ्या शत्रूंना बेधडक पायाखालीं तुडवून त्यांचा चेंदामेंदा करून टाकतो. ( ' अवक्रामन्तः प्र पदैरमित्रान् क्षिणन्ति शत्रूँनपव्ययन्तः ' ६-७५-७ ) तशांत सिंधुकांठचे घोडे तर फारच श्रेष्ठ असत. त्या नदीच्या नांवावरूनच त्यांना ' सैंधव ' हें नांव प्राप्त झालें आहे. देवधर्मकार्याच्या उत्सवप्रसंगीं मिरवणुकींत घोड्याला सोन्यारुप्याच्या दागिन्यांनीं सजवून अग्रभागीं मिरवीत नेण्यांत येत असे. ती प्रथा आम्हा हिंदूंमध्यें आजमितीसहि चालू आहे.

यज्ञप्रसंगीं याला बळी देण्यांत येतें. त्या यज्ञाला अश्वमेध असें नांव असून तो सर्व यज्ञांचा राजा आहे असें शतपथांत म्हटलें आहे. ( ' राजा वाऽएष यज्ञानां यदश्वमेधः' ) हा यज्ञ सामान्य जनांना उक्त नाहीं. तो

फक्त सम्राट राजानेंच करावयाचा. राजाला जेव्हां मोठ्या लढाईत प्रचंड विजय प्राप्त होईल अथवा त्याचें सामर्थ्य जगावर सर्वश्रेष्ठ ठरेल तेव्हांच हा यज्ञ करावयाचा असतो. या विषयींची अधिक माहिती याज्ञवल्क्य दर्शनांत पहा. असो. वेदकालांतील घोड्याची ही अशी थोडक्यांत कथा आहे.

**म्हैस:**—आर्यांच्या घरीं पाळीव अशीं जीं कांहीं जनावरें असत, त्यांत गाई, घोडे हे तर होतेच. शिवाय म्हैस, शेळी, बकरा, कुत्रा इत्यादिकांचाहि त्यांत कमीअधिक मानानें समावेश असे. त्यांत गाई-घोड्यानंतर म्हशीचाहि क्रम लागतो. कारण ती दूध देण्यांत गाईपेक्षां कंकणभर सरस असून, तिचें दूध अधिक सकस व पुष्टिकर असल्यामुळें दुभत्या जनावरांत तिला गाईच्या खालोखाल मान असे. शिवाय तिच्या-पासून रेड्याची निपज होत असल्यामुळें शेतकीच्या कामीं व भारवाहक म्हणून त्यांचा फार उपयोग होई. तशांत रेडे इंद्राचें प्रिय खाद्य असल्या-मुळें त्याच्यासाठीं त्यांचा बळी द्यावा लागत असे. ऋग्वेदांत एके ठिकाणीं त्याच्याप्रीत्यर्थ देवांनीं तीनशें रेडे शिजविल्याचा उल्लेख आहे. ( 'विश्वे मरुतः सजोषाः पचच्छतं महिषाँ इन्द्र तुभ्यम्' ६-१७-११ ) एवंच म्हैस ही सुद्धां एक उपयुक्त जनावरांत मोडत होती.

**शेळी** ( अजा ):—शेळी हें जनावरहि कुटुंबस्थाला उपयुक्त असल्या-मुळें, तीहि घरांत पाळली जात असे. शेळीचा उपयोग मुख्यतः दुधा-करितां व बोकडाचा यज्ञकार्याकरितां केला जात असून शिवाय त्यांची लोकर सुंदर व गरम वस्त्र विणण्याच्या कामीं फार उपयोगी असे. काश्मीर, गांधार व पंजाब येथील लोकर फार प्रसिद्ध असून तेथील शाली केव्हांहि जगविख्यातच आहेत. शिवाय या प्राण्यांचा मानवी आहा-राकडेहि उपयोग केला जाई.

**बकरा:**—शेळीची जी गोष्ट तीच बकऱ्याची सुद्धां. त्याचा उपयोग मनुष्याच्या अन्नाकडे व देवांच्या हवीकडे होत असून, त्याची लोकरहि तितकीच प्रसिद्ध आहे.

**कुत्रा:**—कुत्रा हा तर सर्व प्राण्यांतला मनुष्याचा फार लाडका व विश्वासूक प्राणी. त्याच्यइतका प्रेमळ व प्रामाणिक, सावध व शहाणा,

धाडसी व चलाख दुसरा प्राणी जवळजवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. शिकारीच्या कामीं तर त्याचा अगदीं हातखंडा ! घर राखणारा रखवालदार तर त्याच्यासारखा त्याचा तोच ! मनुष्य एक वेळां फिरेल, फितूर होईल, विश्वासघात करील, पण कुत्र्याची स्वामिनिष्ठा म्हणजे ती कांहीं अजबच ! अर्थात् मनुष्याचा खरा व प्रामाणिक मित्र म्हणून त्याची स्तुति करावयास तो सर्वस्वीं पात्र आहे.

वेदकालीं सुद्धां त्याला चांगलें महत्त्व होतें. केवळ मनुष्यच नव्हे, देवांनीं सुद्धां त्याला जवळ केलें आहे. वरुणाचें घर राखण्याच्या कामीं याचीच योजना करण्यांत आली होती. याविषयीं वेदांत आधार सांपडतो. तो प्रसंग म्हणजे असा:—वसिष्ठ एके काळीं वरुणाच्या घरीं चोरी करावयास म्हणून रात्रीच्या वेळीं तेथें गेला होता. येथें त्या वेळीं कुत्रा त्या घराचें राखण करीत होता. आपणांस पाहून त्यानें भुंकूं नये, एतदर्थ त्यास झोंप लागण्यासाठीं म्हणून त्यावर मंत्रप्रयोग केल्याचें वर्णन ऋग्वेदांत आढळतें. हे सारमेया ! तूं आतां नीज ! ('सारमेय ! नि षु स्वप !') हें पालुपद असलेलें तें सूक्त आहे. ( ७-७५- २ ते ४ ) शिवाय यमाचे राज्यरक्षक व मृताचे मार्गदर्शक हे कुत्रेच आहेत. एक प्रसंग तर सांगण्यासारखाच आहे.

एकदां असें झालें कीं बृहस्पतीच्या गाई पणींनीं चोरून नेल्या. तेव्हां ती फिर्याद त्यानें देवराज इंद्राजवळ केली. तेव्हां त्या गाईचा शोध लावण्याच्या कामीं इन्द्रानें इतरांची नेमणूक न करतां सरमा नांवाच्या एका कुत्रीची केली ! आणि तिनें पणींच्या राज्यांत शिरून त्यांच्या कसल्याहि देऊं केलेल्या लांचलुचपतीला बळी न पडतां सरळ गाईचा शोध लावून इंद्राकडे आली. याला म्हणावी कर्तव्यनिष्ठा ! स्वामिनिष्ठा ! असो, तात्पर्य काय तर कुत्रा हा प्रेमळ व प्रामाणिक असा मोठा उपयुक्त प्राणि असल्यामुळें वैदिक आर्य हे त्यास घरांत मोठ्या प्रेमानें पाळीत असत. असो.

---

## पक्षी-विशेष



---

## वनस्पति-विशेष

११ तृण १-१६२-११
१२ दर्भ १-१९१-३
१३ दूर्वा १-१३४-५
१४ पर्ण १०-९७-५
१५ पलाश १०-१३५-१
१६ पुष्कर १०-१८४-२
१७ पुष्पिपणी १०-९७-१५
१८ फलिनी १०-९७-१५
१९ मुंज (गवत विशेष) १-१९१-३
२० वैरिण १-१९१-३
२१ शर (गवत विशेष) १-१९१-३
२२ शल्मलि १०-८५-२०
२३ शिंशपा ३-५३-१९
२४ शीतिका १०-१६-१४
२५ शिंबल ३-५३-१९
२६ सस
२७ सैर्य १-१९१-३
२८ सोम ९-६५-२३

## ऋग्वेदांतील कालदर्शक शब्द

१ अद्य (आज) ८-२६-३
( १ अ) अपराण्ह (दिवसाचा चौथा भाग) ५-७६-३
२ अहन् (दिवस) १०-१४-९
३ उषस् (पहाट)
४ ऋतु (दोन महिन्यांचा काल) १०-४२-९
५ दोष (संध्याकाळ) २-८-३
६ नक्त (रात्र) ५-७६-३
७ परिवत्सर (संपूर्ण वर्ष) १०-६२-२
८ पर्वन् १-९४-४
९ पूर्वाण्ह (दिवसाचा पूर्वभाग) १०-३४-११
१० प्रपित्व (सायं.) ४-१६-१२
११ प्रातर् (सकाळ) ७-४१-१
१२ प्रावृष् (पावसाळा) ७-१०३-३
१३ मध्यंदिन (दुपार) ५-७६-३
१४ मास (महिना) ७-९१-२
१५ मुहूर्त (४८ मिनिटांचा काल) ३-३३-५
१६ रात्रि ( रात्र )
१७ श्वः (उद्यां) ८-६१-१७
१८ संवत्सर (वर्ष) ७-१०३-१
१९ संगव (पूर्वाण्ह व मध्यान्ह यांचा मधला भाग) ५-७६-३
२० समा (वर्ष) ४-५७-७
२१ सायं (संध्याकाळ) ५-७७-२
२२ सिनीवाली (अमावास्या) १०-१८४-२
२३ हिमा (हिवाळा) १०-६४-१४
२४ हेमन्त (हिवाळा) १०-१६१-४
२५ ह्यः (कालचा दिवस ) ८-६६-७

वेदांत दिवसाचे पांच भाग–(१) प्रातःकाल (२) संगव (३) मध्यान्ह (४) अपराण्ह व (५) सायंकाळ, व महिन्याचे शुक्ल व कृष्ण असे दोन पक्ष व वर्षाचे सहा ऋतु–(१) वसंत (२) ग्रीष्म (३) वर्षा (४) शरद् (५) हेमंत व (६) शिशीर ऋतु, व बारा महिने आहेत. अशी ही वैदिकांची कालगणना आहे. ३० घटिकांचा १ दिवस, तीस घटिकांची एक रात्र, पंधरा दिवसांचा एक पक्ष, तीस दिवसांचा एक महिना, दोन महिन्यांचा एक ऋतु व बारा महिन्यांचें एक वर्ष.

---

## ऋग्वेदांतील वाद्यें

| | | | |
|---|---|---|---|
| १ अघाटि | १०-१४६-२ | ५ दुंदुभि | ६-४७-२९ |
| २ कर्करि | २-४३-३ | ६ नाडि | १०-१३५-७ |
| ३ गर्गरा | ८-६९-९ | ७ बकुर | १-११७-२१ |
| ४ गोधा | ८-६९-९ | ८ वाण | ८-२०-८ |

---

## वैदिक आर्यांचीं संग्रामोपकरणें

वैदिक आर्यांची संग्रामकला कशी होती, याविषयींची माहिती मागें ' वैदिकांचें राजकारण ' या प्रकरणांत विस्तारानें देण्यांत आलीच आहे. म्हणून त्यासंबंधीं पुन: चर्वितचर्वण न करतां आतां फक्त येथें त्यांचीं युद्धोपकरणें काय काय होतीं, याचाच तेवढा नामनिर्देश करून या वाढलेल्या प्रकरणाला पूर्णविराम देतों.

---

## ऋग्वेदांतील संग्रामोपकरणें

| | |
|---|---|
| ( १ ) अक्त १०-९९-९ | ( ५ ) इषुधि ६-७५-५ |
| ( २ ) अशनि ६-६-५ | ( ६ ) ऋष्टि १-१६९-३ |
| ( ३ ) असि १०-८६-१८ | ( ७ ) ज्या ६-७५-३ |
| ( ४ ) आयुध २-३०-९ | ( ८ ) दिद्युत् ५-८६-३ |

(९) दुर्ग ७-२५-२
(१०) देहि ७-६-५
(११) द्रापि १-२५-१३
(१२) धनुस् ८-७२-४
(१३) ध्वज ७-८५-२
(१४) पुर ३-१५-४
(१५) पृतन ७-२०-३
(१६) फेन ८-१४-१३
(१७) बाण ६-१५-१७
(१८) बुंद ८-४५-४
(१९) मुष्टिहन् ६-२६-२
(२०) युध् ५-२५-६
(२१) युद्ध १०-५४-२
(२२) योध ३-३९-४
(२३) रण १-७४-३
(२४) रथ ६-७५-८
(२५) वर्मन् ६-७५-१
(२६) व्रात १-१६३-८
(२७) शिप्र १०-९६-९
(२८) शृंग १-१४०-६
(२९) समर ६-९-२
(३०) सारथि ६-७५-६
(३१) सृक् १०-१८०-२
(३२) सेना ७-२५-१
(३३) सेनानी ७-२०-५
(३४) स्वधिति ७-३-९
(३५) हस्तघ्न ६-७५-९

याप्रमाणें ऋग्वेदांतील महत्वाच्या कांहीं ठळक ठळक विषयावरील माहिती देण्यांत आली आहे. येथें ‘ ऋग्वेद-दर्शन ’ ग्रंथाचा भाग जवळ-जवळ संपल्यासारखा झाला.

---



## प्रकरण १८ वें

# स्वस्तिवाचन व शांतिपठण

कोणत्याहि मंगल कार्याच्या शेवटीं स्वस्तिवाचन व शांतिपठण करण्याची वैदिक ऋषींची शुभप्रद प्रथा असून, त्या प्रथेला अनुसरून आम्ही या आमच्या वैदिक सांस्कृतिक मंगल वाङ्मय यज्ञाच्या शेवटीं ऋषींच्या मंगल वचनांत स्वस्तिवाचन व शांतिपठण करून, प्रस्तुत ग्रंथाचें मंगल करतों.

आम्ही आमच्या कल्याणार्थ व उत्कर्षार्थ देवांचें–सुविचारवंत विद्वज्जनांचें–सख्य संपादन करूं ! ( ‘ देवानां सख्यमुप सेदिमा वयम् ’ १-८९-२ ). त्या देवांची मंगलकारक कृपादृष्टि आम्हांकडे वळो ! ( ‘ देवानां भद्रा सुमतिर्ऋजुयताम् ’ १-८९-२ ) भगवान इंद्रदेव आमचें कल्याण करो ! ( ‘ स्वस्ति नः इन्द्रः ’ ३-८-९-६ ) पूषादेव आमचें कल्याण करो ! ( ‘ स्वस्ति नः पूषा ’ १-८९-६ ) देवगुरु बृहस्पति देव आमचें कल्याण करो ! ( १-८९-६ ). अहो देवहो ! आम्हीं कानांनीं सदैव शुभ गोष्टीच ऐकत असावें ( ‘भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः’ १-८९-८ ) आणि डोळ्यांनीं मंगल गोष्टीच पहात असावें ! ( ‘ भद्रं पश्येमाक्षिभिर्यजत्राः ’ १-८९-८ ). वायुदेव आमच्यासाठीं सुखकर वाहो ! ( ‘ मधु वाता ऋतायते ’ १-९०-६ ). नद्या आम्हांस मधुर उदक देवोत ! ( ‘ मधु क्षरन्ति सिन्धवः ’ १-९०-६ ). ओषधी आम्हांसाठीं मधुररससंपन्न होवोत ! ( ‘ माध्वीर्नो सन्त्वौषधिः ’ १-९०-६ ). वनस्पति आम्हांस मधुर फळें देवोत ! १-९०-८ ). भगवान सूर्यनारायण आम्हांप्रीत्यर्थ सुमंगलकारक प्रकाश देवो ! ( ‘ मधुमाँ अस्तु सूर्यः

१-९०-८ ). आणि गायी आम्हांस अमृततुल्य मधुर दूध देणाऱ्या होवोत ! ( ' माध्वीर्गावो भवन्तु नः ' १-९०-८ ) अर्थात् हे सर्व देव आमच्या राष्ट्रांतील लोकांप्रीत्यर्थ हितकर, कल्याणप्रद, उत्कर्षकारक अशा मंगल गोष्टींचा वर्षाव करणारे होवोत ! !

भगवान इंद्रदेव आम्हांस सुखकर होवो ! ( ' शं न इंद्रो अस्तु ' ७-३५-६ ). अग्निदेव आम्हांस शुभप्रद होवो ! ! ( ' शं नो अग्निः ' ७-३५-२ ). वरुणदेव आम्हांस मंगलप्रद होवो ! ! ( ' शं वरुणः ' (भवतु) १-९०-९ ). विष्णुदेव आम्हांस सुखप्रद होवो ! ( ' शं नो विष्णुः ' ७-३५-९ ). रुद्रदेव आम्हांस शांतिप्रद होवो ! ( ' शं नो रुद्रः ' ७-३५-६ ). सूर्यदेव आम्हांस हितकर होवो ! ( ' शं नः सूर्यः ' ७-३५-८ ). बृहस्पति देव आम्हांस मंगलप्रद होवो ! ( ' शं नो बृहस्पतिः ' १-९०-९ ) भगदेव आम्हांस कल्याणप्रद होवो ! ( ' शं नो भगः ' ७-३५-२ ). अर्यमादेव आम्हांस सुखप्रद होवो ! ( शं नो अर्यमा ' ७-३५-२ ). सोमदेव आम्हांस मंगलप्रद होवो ! ( ' शं नः सोमः ' ७-३५-७ ). पूषादेव आम्हांस सुखकर होवो ! ( ' शमु पूषा नो अस्तु ' ७-३५-९ ). वायुदेव आम्हांस हितकर होवो ! ७-३५-९ ). विश्वेदेव आम्हांस सुखकर होवोत ! पर्जन्यदेव आम्हांस शांतिकर होवोत ! ( ' शं नः पर्जन्यो भवतु ' ७-३५-१० ). यज्ञ आम्हांस कल्याणप्रद होवोत ! ( ' शमु सन्तु यज्ञाः ' ७-३५-७ ). आपोदेवी आम्हांस आरोग्यप्रद होवोत ! ( ' शमु सन्त्वापः ' ७-३५-८ ). माता अदिति आम्हांस सुखप्रद होवो ! द्यावा पृथिवी आम्हांस क्षेमकर होवोत ! ( ' शं नो द्यावापृथिवी ' ७-३५-२ ) देवी सरस्वती आम्हांस मंगलप्रद होवो ! ( ' शं नः सरस्वती ' ७-३५-११ ). दिशा आम्हांस सुखकारक होवोत ! ( ' शं नः प्रदिशो भवन्तु ' ७-३५-८ ). गोमाता आम्हांस आरोग्यप्रद होवो ! ( ' शमु सन्तु गावः ' ७-३५-१२ ). आणि ब्रह्म आम्हांस सुखशांतिप्रद होवो ! येथें जें घोर आहे, येथें जें क्रूर आहे, येथें जें पाप आहे, तें सर्व शांत होवो ! तें सर्व मंगल होवो ! आणि तें सर्व सुखमय होवो ! ( ' यदिह घोरं यदिह क्रूरं यदिह पापं तच्छान्तं तच्छिवं सर्वमेव

शमस्तु नः ' अथर्व १९-९-१४ ) द्युलोकांत जी शांति आहे ( ' द्यौः शान्तिः ' ३६-१७ ), अंतरिक्ष लोकांत जी शांति आहे ( ' अन्तरिक्षं शान्तिः ' ३६-१७ ), पृथ्वीमध्यें जी शांति आहे ( 'पृथिवी शान्तिः ' ३६-१७ ), उदकांत जी शांति आहे ( ' आपः शान्तिः ' ३६-१७ ), ओषधीमध्यें जी शांति आहे ( ' ओषधयः शान्तिः' । ३६-१७ ), वनस्पतीमध्यें जी शांति आहे, विश्वेदेवांत जी शांति आहे ( ' विश्वे देवाः शांति ' ३६-१७ ), ब्रह्मांत जी शांति आहे ( 'ब्रह्म शान्तिः' ३६-१७), सर्व विश्वांत जी शांति आहे ( ' सर्वं शान्तिः' ३६-१७ ) प्रत्यक्ष शांतींत जी शांति आहे ( ' शान्तिरेव शांतिः' ३६-१७ ) अशी ती शांति आमच्यांत सतत वास करो ! ! ( ' सा मा शान्तिरेधि ' ३६-१७ ).

या आमच्या स्वस्तिवाचनानें व शांतिपठणानें आमच्या या पुण्यशील सनातन भारत राष्ट्रांत सर्वत्र व सदैव सुख व शांति यांचा सुमंगल वास घडो ! ! !

## इति शुभमंगलम्

वाचकहो ! ' ऋग्वेद-दर्शन ' ग्रंथाचा शेवटचा गोड घांस आतां संपल्यासारखा झाला असून भागलेल्या लेखणीला विश्रांति देण्याची आतां वेळ आली. तथापि रजा घेण्याचे पूर्वी दोन शब्द सांगावेसें वाटल्यावरून, ते येथें थोडक्यांत सांगून मग वाचकांची आम्ही सप्रेम रजा घेतों. ऋग्वेद या महाग्रंथाचा विषयच असा आहे कीं तो वाढवावा तसा व तितका वाढतच जातो आणि आखडावा तसा संपुष्टांत येतो ! आम्ही आमचें आर्थिक सामर्थ्य व ग्रंथमर्यादा यांकडे नजर ठेवून, त्याप्रमाणें भाविक महाराष्ट्रास त्याचें यथामति मंगलदर्शन घडविण्याचें एक अल्प व नम्र वाङ्मय-साहस केलें आहे. तें आमचे रसज्ञ व गुणज्ञ वाचक गोड मानून घेतील असा आमचा आत्मविश्वास आहे.

तसें म्हटल्यास ऋग्वेदावर आणखी पुष्कळ सांगतां येण्यासारखें होतें व सांगतां आलें असतें. पण त्यामुळें ग्रंथाचा विस्तार अमर्याद वाढून, सामान्य जिज्ञासु वाचकांस त्याचें दर्शन घेणें आर्थिक दृष्ट्या अवघड झालें असतें. कसल्याहि स्वार्थदृष्टीनें आम्हीं हें कार्य हातीं घेण्यास प्रवृत्त

झालों नसून विस्मरण गर्तेत खोल गाडल्या गेलेल्या व जवळ जवळ स्मृतिशेष झालेल्या या तेजस्वी व प्रभावी वैदिक आर्य संस्कृतीचें पुनः उत्खनन करून त्याचें अष्टपैलू दर्शन घडवून भारतसंस्कृतिप्रेमी व अभिमानी अशा जिज्ञासु महाराष्ट्रास आपल्या प्राचीन पूर्वजांच्या उज्वल संस्कृतीची निदान थोडीबहुत तरी तोंडओळख करून द्यावी, या एकाच एक भावनेनें प्रेरित होऊन, आम्ही हें अत्यंत अवघड कार्य हौसेनें व आनंदानें हातीं घेतलें आहे, हें येथें नमूद करून ठेवल्याशिवाय आम्हांस पुढें जाववत नाहीं.

आणि 'सत्य संकल्पाचा दाता भगवान' या संतवचनावर दृढ विश्वास ठेवून कार्य करीत असतां आतांपर्यंत या गृहभूषण ग्रंथमालेंत प्राचीन भारतीय संस्कृतीचे पांच उद्‌बोधक ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें भाग्य आम्हांस लाभलें आहे; तरी एवढ्यावरच आमची तहान भागली नसून व उमेद खचली नसून, अशाच ठशाचे जागतिक संस्कृतीचे आमचे इतरहि ग्रंथ प्रकाशांत येईपर्यंत आमची ही खडतर तपस्या अशीच पुढेंहि चालू ठेवण्याची आमची महत्वाकांक्षा—नव्हे निश्चय—आहे. वयमान सत्तराच्या पुढें गेलेलें असून, आर्थिक ताकदीचें उष्णतामानहि जवळजवळ तवर्गाच्या अंत्याक्षरावर येऊन ठेपलें असलें तरी गुणग्राहक महाराष्ट्राच्या उदार सहानुभूतीचा शक्य तेवढा आधार घेऊन, पुढील भेटींत 'बुद्ध-दर्शन' या बोधप्रद ग्रंथाचें अपूर्व व सुंदर दर्शन जिज्ञासु महाराष्ट्रास घडविण्याचा संकल्प केला आहे. हें महत्तर कार्यहि महाराष्ट्राची आराध्य देवता जगन्माउली श्री भवानी माता तडीस नेण्यास आम्हांस आयुष्य व सामर्थ्य देईल, असा दृढविश्वास प्रदर्शित करून, प्रिय वाचकांची आम्ही आतां सप्रेम रजा घेतों. इति शम् !

**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः**





# परिशिष्ट १ लें

## ऋग्वेदांतील उद्बोधक वचनसंग्रह

( १ )

अक्षेत्रवित् क्षेत्रविदं ह्यप्राट् स प्रैति क्षेत्रविदानुशिष्टः, एतद्वै भद्र-मनुशासनम् ॥ १०-३२-७ ॥

( २ )

अक्षैर्मा दीव्यः ॥ १०-३४-१३ ॥

( ३ )

अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवं ऋत्विजम् ॥ १-१-१ ॥

## ऋग्वचन संग्रहाचा मराठी भावार्थ

( १ )

इष्ट स्थळीं जाण्याचा रस्ता माहीत नसणारा मनुष्य तो माहीत असलेल्या जाणत्यास विचारतो आणि त्याच्या मार्गदर्शनाप्रमाणें वागून अखेर आपलें इष्ट स्थळ गांठतो. उपदेशाचाहि हा असाच कल्याणमार्ग आहे. ॥ १०-३२-७ ॥

( २ )

अरे जुगारी मनुष्या ! ऐक, माझा उपदेश ऐक ! फाशींनें जुगार खेळूं नकोस ! बाबा ! खेळूं नकोस ! ॥ १०-३४-१३ ॥

( ३ )

यज्ञांत अग्रभागीं स्थापन केलेला, दानादि गुणांनीं युक्त व देवांना यज्ञस्थळीं बोलावून आणणारा ऋत्विज अशा अग्निनारायणाचें मी भक्तिभावपूर्वक स्तुतिस्तोत्र गातों. ॥ १-१-१ ॥

( ४ )

अग्निरीशे बृहतः क्षत्रियस्याऽग्निर्वाजस्य परमस्य रायः ॥ ४-१२-३॥

( ५ )

अग्निर्वै देवानामभवत्पुरोहितः ॥ ३-२-८ ॥

( ६ )

अग्निर्मर्त्येष्वाविशन् ॥ ५-२५-४ ॥

( ७ )

अग्निर्वेद मर्तानामपीच्यम् ॥ ८-३९-६ ॥

( ८ )

अग्निष्टा विश्वा भुवनानि वेद ॥ ३-५५-१० ॥

( ९ )

अग्ने नय सुपथा राये अस्मान् ॥ १-१८९-१ ॥

( १० )

अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परिभूरसि, स इत् देवेषु गच्छति ॥१-१-४॥

( ११ )

अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ १-९४-१ ॥

( १२ )

अजुष्टात् पाहि धूर्तेररुषो अघायोः ॥ ७-१-१३ ॥

( १३ )

अतारिष्म तमसस्पारम् ॥ १-१८३-६ ॥

( ४ )

अग्निदेव हा श्रेष्ठ सामर्थ्याचा स्वामी आहे आणि तसाच उत्कृष्ट अन्नाचा मालकहि पण आहे. ॥ ४-१२-३ ॥

( ५ )

अग्नि हा दिव्यविबुधांचा पुढारी आहे. ॥ ३-२-८ ॥

( ६ )

अग्नि हा मनुष्यांच्या अंतरंगांत प्रवेश करून राहिला आहे.
॥ ५-२५-४ ॥

( ७ )

म्हणून तो मनुष्याच्या अंतःकरणांतील सर्व गुप्त गोष्टी जाणूं शकतो.
॥ ८-३९-६ ॥

( ८ )

आणि म्हणून तो हें सर्व भुवनजात जाणणारा आहे. ॥ ३-५५-१० ॥

( ९ )

हे अग्निदेवा ! तूं आम्हांस सरळ व सुगम मार्गानें सुख-संपत्तीकडे घेऊन जा ! ॥ १-१८९-१ ॥

( १० )

हे अग्ने ! ज्या यज्ञाचें तूं सर्व बाजूंनीं संरक्षण करतोस, तोच यज्ञ—अर्थात् तें देवतानुष्ठान—अहिंसित होऊन देवांप्रत जाऊन पोंचण्यास समर्थ होतें. ॥ १-१-४ ॥

( ११ )

हे अग्ने ! तुझ्या सख्यभावांत नांदणाऱ्या आम्हा भक्तांना अपाय न होईल असें कर ! ॥ १-९४-१ ॥

( १२ )

हे अग्ने ! तूं आमचें अप्रिय गोष्टींपासून, तसेंच धूर्त, पापी व कृपण अशांपासून रक्षण कर ! ॥ ७-१-१३ ॥

( १३ )

आम्ही आतां अज्ञान अंधकारांतून पार पडून बाहेर प्रकाशांत आलों. ॥ १-१८३-६ ॥

( १४ )

अतो ज्यायाँश्च पूरुषः ।। १०-९०-३ ।।

( १५ )

अत्रा युजं कृणुते यो हविष्मान् नासुन्वता सख्यं वष्टि शूरः
।। १०-४२-४ ।।

( १६ )

अथा भव यजमानाय शं योः ।। १-१७-३ ।।

( १७ )

अदब्धानि वरुणस्य व्रतानि ।। ३-५४-१८ ।।

( १८ )

अधा चिदोकः पुनरित् स एति ।। ७-४-८ ।।

( १९ )

अधारयत् पृथिवीं विश्वायसम् ।। २-१७-५ ।।

( २० )

अनायुधास आसता सचन्ताम् ।। ४-५-१४ ।।

( २१ )

अन्तः पश्यन्ति वृजिनोत साधु ।। २-२७-३ ।।

( १४ )

हा जो विराट पुरुष, तो या जगाहूनहि आपल्या महिम्यानें फार मोठा आहे. ।। १०-९०-३ ।।

( १५ )

जो देवाला हविर्भाग श्रद्धापूर्वक व भक्तिभावयुक्त अंतःकरणानें अर्पण करतो, त्याच्याशींच देव मैत्री करूं पाहतो. जो त्यास हविर्भाग अर्पण करीत नाहीं, त्याच्याशीं तो शूर इंद्र मित्रत्वाची अपेक्षा करीत नाहीं. ।। १०-४२-४ ।।

( १६ )

हे अग्ने ! तूं यजमानाचा—देवभक्ताचा—सुखकर्ता व दुखहर्ता हो ! ।। ३-१७-३ ।।

( १७ )

वरुण देवाचे जे नियम आहेत, ते अखंडित म्हणजे अनुल्लंघनीय आहेत. ।। ३-५४-१८ ।।

( १८ )

दुसऱ्याचा दत्तक म्हणून घेतलेला मुलगा अखेर आपल्या मूळ वळणावरच जातो. ।। ७-४-८ ।।

( १९ )

सर्व स्थिरचर पदार्थांना धारण करणाऱ्या पृथ्वी मातेला इंद्र देवानेंच आधार दिला आहे. ।। २-१७-५ ।।

( २० )

जे निःशस्त्र असतात ते दुःखभागी होतात. ।। ४-५-१४ ।।

( २१ )

देव हे अंतःकरणांत राहून, मनुष्यांचीं भलींबुरीं कृत्यें पहात असतात. ।। २-२७-३ ।।

